श्रीः

कविवर्य

मोरोपंतांचे समग्र ग्रंथ

# ८

# अष्टोत्तरशत रामायणें

[२]

संपादक व प्रकाशक

रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर

मुद्रक

अच्युत चिंतामण भट

यशवंत

छापखाना, पुणें

शक १८३८ सन १९१६

# अनुक्रमणिका

कविवर्य मोरोपंतकृत

# अष्टोत्तरशत रामायणें

## [ २ ]

## अनुष्टुप्रामायण

### बालकांड[१]

श्रीशब्रह्मादिदेवाहीं करूनि स्तुतिवंदन,
प्रार्थितां रावणवधा होय दिग्रथनंदन. १
कौसल्या प्रसवे रामा, कैकेयी भरता सती,
जी सुमित्रा लक्ष्मणाख्या शत्रुघ्नाह्वा सुतास ती. २
राम लक्ष्मण मागोनि ने ज्या गाधिज नाम, हा,
ज्यांच्या नामें न संसारीं बाधे आधि जना महा. ३
अस्त्रें दे शत, अत्युग्रा ताटका पर मारवी,
स्ववंशजप्रभुजयें धरि भा परमा रवी. ४
विघ्नकर्ते प्रभुपुढें टिकले न खर क्षण,
श्रीलक्ष्मणाग्रजें केलें लीलेनें मखरक्षण. ५
रामें लावुनि पायांच्या रज्याच्या पवना[२] शिला
अहल्या तारिली, ओत्यागात्याचा भव नाशिला. ६
भंगी भर्गधनुष्यातें, मनुष्या तें न पाहवे.
वाहवे न सुरा दैत्या, गुणध्वनि न साहवे. ७

---

१. ही कांडवारी मूळांत नसून येथें सोयीसाठीं केली आहे. २. वायूला.

ज्या माता भूमि, तें कन्यारत्न देवूनि सादरें,
जामाता जनकें केला, त्यजिली च रसा दरें. ८
सीता देऊनि रामा, दे लक्ष्मणा मग ऊर्मिळा,
दिल्या भरतशत्रुघ्नां बंधुच्या दोन[1] दुर्मिळा[2]. ९
भजोनि पैर[3]धर्मा जी उग्रा भार्गवराम ती
श्रीरामाच्या पुण्यतेजें लावी मार्गवरा[4] मती. १०
[5]म्लानि कंटक हे दोष सारसा केतका, पुरा
त्या न, तें स्वयशें हांसे सार साकेत कापुरा. ११

## अयोध्याकांड

यौवराज्याभिषेक स्वज्येष्ठपुत्रीं करावया
राजा योजी, गुरु म्हणे, 'हा विचार बरा वया.' १२
मागे स्ववर कैकेयी मंथराभिन्नधी, 'रतो!
मनु वर्षें वनीं राम.' जाहला खिन्न धीर तो. १३
पुत्रराज्यार्थ करितां प्रियेनें अंतराय[6] हा,
सत्यपुत्रप्रेमपाशीं म्हणे तो संतराय 'हा!' १४
श्री[सत्य]धर्म रक्षाया सोडिली सत्वर क्षिती,
कीं साधुपुत्र ताताचें सर्वस्वें सत्त्व रक्षिती. १५
सीतालक्ष्मणसंयुक्त श्रीराम प्रभु सँद्रसें
गुरूंतें वंदुनि निघे, वन मानुनि भद्रसें. १६
वदले वल्कलधरा रामा पाहोनि 'हा!' यती;
म्हणे अयोध्या निर्श्रीका शोका वाहोनि 'हाय!' ती. १७
राजाज्ञेसें सुमंत्र तो रथीं प्रार्थूनि वाहिला;
शृंगिबेरीं प्रियसखें गुहकें साश्रु पाहिला. १८

---

१. दोन कन्या (मांडवी व श्रुतकीर्ति). २. दुर्लभ अशा. ३. क्षत्रियधर्माला. ४. स्वधर्माला–ब्राह्मणधर्माला. ५. सारसा म्लानि (कोमेजून जाणें) [व] केतका कंटक हे दोष. ६. विघ्न ७. मोठ्या प्रेमानें. ८. शोभारहित अशी.

जटा रचुनि दे आज्ञा सुमंत्रा ‘ परतें ’ असी.
त्यास होय प्रिय हित प्रभूक्त पर तें [1]असी. १९
म्हणे सख्यासि, ‘ गंगेच्या पारा सुतरि लागु ’ हे.
भवार्णवीं [2]उतारिता सुखें उतारिला गुहें. २०
निववी श्रीभरद्वाजा, ज्या नसे अन्य कामना,
तरोनि तोष प्रभु दे [3]सूर्यांच्या [3]कन्यकामना. २१
चित्रकूटीं मग वसे, गवसे आयता तया
तेथील जो सत्समाज, भेट दे [4]काय तात या[5]? २२
स्त्रीच्या बोलें दशरथें वरदेशा [6]परा सुता
धाडूनि, वारिली जाया परदेशा [7]परासुता. २३
गुरुनें मातुळकुळस्थित सानुज सत्वर
आणवीला भरत, जो [8]गुणौघनटचत्त्वर. २४
ऐके वृत्त, म्हणे ज्ञाता तो, ‘ जी मज्जननी, तिचा
आचार ही ज्यांत नाहीं गंध सज्जननीतिचा.’ २५
‘ सन्म[9]नीं त्याग तोषाचा भरता हेतु लाजसी
ताता शङ्का नसे कोणा, भरता हे तुला जसी.’ २६
भरतें त्याजिली माता लोभांधमति उद्धता,
कौसल्येला कळविली पुन्हा ही आत्मशुद्धता. २७
तत्करें गुरु ताताची करवी बरवि क्रिया,
त्या राज्या ज्ञानादरें तो धरवी [10]वरं [11]विक्रियी. २८
त्यजी पुरी, प्रभुकडे जाय तो सास, तापली
जी गुहाची मति तिला कळवी शुद्धि आपली. २९

---

१. तरवारीप्रमाणें भीतिजनक. २. उतराविणारा, पैलतीरास नेणारा. ३. यमुनेच्या मनाला. ४. जणुं काय. ५. समाजा—पंत. ६. श्रेष्ठा. ७. मरण. ८. गुणसमुदायरूप नटाचें नृत्यांगण. ९. अन्वयार्थ? १०. श्रेष्ठ (भरत). ११. विकार—अराजकत्व.

जाणवी श्रीभरद्वाजा स्वभक्तिभर, तापहा[1]
तो म्हणे, 'चित्रकूटीं जा, श्रीरामा, भरता! पहा.' ३०
गृष्टिरीति[2] प्रभु, भ्राता तो हि तर्णकरीति[3] घे,
तातवृत्तविषें बंधु तप्तकर्ण करी तिघे. ३१
साश्रु श्रीराम ताताला प्रेमें दे पिंडतोय, ती
कथा गाता जो स्वयोगीं न पाहे खिंड[4] तो यती. ३२
'देवू गुरुवचें वर्षें चवदा विरहास हों[5],
हे[6] सुधेची पित्या हर्षें चव दावि, रहा, सहा.' ३३
भरतें वारिल्या राज्या रक्षाया पादुका नतें,
नंदिग्रामीं घातलें जें नाशी तापा दुकान[7] तें. ३४
प्रभुच्या दर्शनें पावे स्वाश्रमीं सुख अत्रि, तें
वर्णिलें सर्व शर्वादिदेवें केवळ न [8]त्रितें. ३५
अनसूया अलंकारीं श्रीला ही अंगरागदा[9],
ती मोडाया श्रमा स्वाशी[10] दे, जैसी संगरा गदा. ३६

## अरण्यकांड

विराधाच्या सुखाविले तपस्वी शापवारणें,
वदले, 'साधु निववा, सद्वैरी तापवा रणें.' ३७
तापसांच्या नमी चित्तें त्या सदीं[11] राम हर्षितें,
जो प्राशी सिंधुतें, वंदी त्या सदारा महर्षितें. ३८
जटायु गृध्रेंद्र सखा ताताचा बहु मानिला
प्रभुनें; हा प्रभुप्रेमा प्रेमें कोणी न वानिला? ३९
गोदेतें प्रभु सेवी, जी सर्वदा सांवरी नया,
प्रेमें मुक्ति म्हणे जीच्या सर्व दासां वरीन या. ४०

---

१. तापहर्ता. २. सकृत्प्रसूता गाईची रीति. ३. वासराची रीति. ४. खंड, अंतर. ५. मी राम. ६. ही वनवासस्थिति. ७. तपश्चर्यारूप दुकान. ८. महर्षिणा-पंत. ऋषिविशेषानें. ९. उटी देणारी. १०. चांगला आशीर्वाद. ११. समाजाला.

त्यांचें चित्त न वैकुंठा, साकेता आठवी, रते
रमा रम्योटजीं, वेद करिती पाठ वीर ते. ४१
त्या श्रीपंचवटीमध्यें वसतां रावणस्वसा
स्वसामर्थ्यें हरूं पाहे जो दुर्जर[1] शिवस्वसा[2]. ४२
दंडितां तीस, तद्भ्राता न धरी परवा खर,
प्रभुतेजें नुरे वज्रें तेजस्वी, पर वाखर[3]? ४३
सांगे शूर्पणखा, कामक्रोधलोभाग्नि वाढवी,
दुर्बुद्धि आवडे मूढा, गाढवा जेंवि गाढवी. ४४
मायामृग मन श्रीचें तो कार्तस्वरसा[4] बळें
मोही, करूनि प्रभुचा शोकार्त स्वर, सा[5]बळें. ४५
प्रसादरत्नयोग्या धिक् कवडी दे वरा सती,
सत्तापें ताप भोगाया दवडी देवरास ती. ४६
रावणें, एकली सीता पर्णशाळेंत राहिली,
पाहिली, व्योमगरथीं[6] सर्वनाशार्थ वाहिली. ४७
जटायु सोडवी सून, ऐकतां हाक, दापित्या
भंगी, धर्मरणीं वांचों न देता हा कदापि त्या. ४८
क्षतार्त विरथ क्रुद्ध गृध्रपक्षति तोडुनि,
सोडुनि न्याय, साध्वीतें ने कुधी हानि जोडुनि. ४९
त्रिलोकी[7] कीर्तिनें जीच्या गंगेनें तंवि शोधिली,
ती अशोकवनीं लंकावनीं नेउनि रोधिली. ५०
दयिताविरहीं शोकें प्रभुचा काय कोंदिला,
विलाप सर्व न जना करुणें आयकों दिला. ५१
वनीं विलाप प्रभुचा ज्याचिया श्रवणीं[8] पडे,
रडे खग मृग व्याघ्र द्रुम वल्ली, असें घडे. ५२

---

१. जिरण्यास कठिण. २. शिवापिन केलेल्या वरप्रमाणें. ३. सुरपें. ४. सुवर्णमय. ५. भोळें. ६. विमानांत. ७. त्रैलोक्य. ८. हस्तदोष–**श्रवणीं ज्याचिया श्रवणीं.**

गृध्रेंद्र शोधितां सीता क्षतमूर्छित देखिला,
सानुजें श्रीवरें साक्षात्तातवात चि लेखिला. ५३
सांगे, 'दशाननें सीता नेली, केली दशा असी,
असीमोग्रें हाणिला बा ! हाणि व्हाया यशा असी.' ५४
मरणीं सगुण ब्रह्म प्रेमें दे त्यासि मांडिला,
धन्यधन्यें तन्मुखश्री प्राशितां काय सांडिला. ५५
दाहादि तत्क्रिया केली, खगांला मांस वाढिलें,
प्रभुनें या यशें भक्तस्वांतींचें शल्य काढिलें. ५६
प्राप्त झाले कबंधाला, जैसे चंद्रार्क राहुला,
समुद्धरिति मारूनी ते त्या योजनबाहुला. ५७
उपाय कार्यसिद्धीचा सांगे तो[1] कृतवंदन,
'सखा करावा सुग्रीव प्लवंग रविनंदन'. ५८
मतंगमुनिची शिष्या ज्या न नाश बरीस ती
गति घे, पूजुनि सरोजानना[2] शबरी सती. ५९
रघ्वादि[3] पाहुनि ध्यानीं पंपास्थविरहाकुळा
वदले पावुनि स्वर्गीं कंपा स्थविर 'हा! कुळा!' ६०
भ्राता उत्साह दे बोधें मानसा वडिलापरी,
रामें शोकें विखरिला मान सांवाडिला[4] परी[5]. ६१

## किष्किंधाकांड

हनुमान् प्रभुला भेटे ज्या लग्नीं[6] फार चारु तें,
पुत्रसुस्वामिप्रियत्वें[7] धारिला हर्ष मारुतें. ६२
सखा सुकंठ प्रभुला रुचला, परिसास हा
लोहगोळक दृष्टांत सुचला, परिसा सहा[8]. ६३

---

१. कबंध. २. कमलानना रामास. ३. रघुप्रभृति राजे. ४. जमा केला. ५. परंतु—पंत. ६. समयीं. ७. हा पाठ वृत्तदृष्ट्या सदोष व अर्थदृष्ट्या तर अत्यंत दुर्बोध किंवा चुकीचा च आहे म्हटलें तरी चालेल. "सुस्वामिप्रियपुत्रत्वें" असा कांहीं उद्दिष्ट पाठ असावा काय? ८. सोसा—मानवून घ्या.

सखा न बहु मानावा अग्निच्या वात कां कणें?
बाणें गुण द्विट्[1]दारांत पिटाया हात कांकणें. ६४
श्रीत्यक्त नग सुग्रीवें सख्या प्रभुसि दाविले,
लाविले हृदयीं रामें दुःखी स्वसम भाविले. ६५
हरी स्त्री, श्री; जपे बंधुप्राणांच्या हरणास जो[2],
प्रभूत्तम न कां तैशा मत्ताच्या मरणा सजो? ६६
प्रभु एकीकडे राहे, सुग्रीवातें पुढें करी,
वाळी न गर्जना साहे, ये तो मत्त जसा करी. ६७
एकें चि रोपें कोपें तो उरीं दुर्मद ताडिला,
पाडिला शिखरी वज्रें तसा क्रौर्यें चि नाडिला. ६८
म्हणे सौमित्रि, "घे आर्यें श्री तारा हि दिली, पहा;
स्वरीति त्यजितां स्वर्गीं ही म्हणेल दिलीप 'हा!'" ६९
देवांचे भेटले कोटि कोटि कीशर्क्ष अंश या
सुग्रीवाच्या वारिती ते राक्षसक्षयसंशया. ७०
आले श्री न पहातां जे वीर अन्यत्र धाडिले,
मासें सरोन, चिंतेंत यमाशागत[3] पाडिले. ७१
सांगे जटायुचा भ्राता संपाती शोध सन्मती,
उत्साहशक्ति स्तवनें वायुजीं होय जन्मती. ७२

## सुंदरकांड

करी चकित मैनाका, ठकवी सुरसामुखा,
वधी छायाग्राहिणी ते, देवदृष्टिस दे सुखा. ७३
लंघूनि दे गोष्पदत्व सिंधुतें धन्य तो कपी,
तच्चरित्र स्वर्गिवृंद तें गमे स्तन्य तोक पी. ७४
पाहे वनीं राक्षसींच्या वेढिली जानकी शतें,
सुखदुःख हि पावे तो उपमा ज्या न कीश तें. ७५
कामांध रावण प्रार्थी निशीथीं श्री समुत्तर[4]

१. शत्रुस्त्रियांत. २. वाली. ३. दक्षिणेकडे गेलेले. ४. योग्य उत्तर.

जें दे तें ऐकुनि म्हणे आपणा, ' हो संमुत् तर.' ७६
दशास्य गेल्यावरि दे मुद्रा, मुद्राशि होय ती,
चित्तीं कपि म्हणे, 'हर्षी सनकादिक हो यती.' ७७
वन भंगी, बळ वधी, चुरी युद्धांत अक्ष, तें
कर्म अत्यद्भुत करी, शरीरें कपि अक्षतें. ७८
सांपडे मेघनादाच्या ब्रह्मास्त्रा, घे हि बांधुनी,
या सत्कीर्तिप्रति म्हणो 'सखी' दिव्यां न कां धुनी ? ७९
रावणाला करी बोध तो धर्मन्याय जाणता,
पुच्छ पेटवितां वीर स्वीकारी रुद्रबाणता. ८०
जाळी लंका, नमी श्रीतें, लंघी मारुति अर्णवा,
म्हणे शक्र सुरांतें, 'या आर्या वर्णुनि वणवा.' ८१
आधीं वातात्मजें सेना, मग, कार्या जपोनि, धी
श्रीरामाची निववली, गाति कीर्ति तपोनिधि. ८२
श्रीचूडामणि संदेश समाचार निवेदिला,
तेव्हां शिव म्हणे, 'मोटा मला हर्ष शिवे ! दिला. ८३

## युद्धकांड

आलिंगिला सुप्रसन्नें श्रीरामें वायुनंदन,
करिती यत्पदरजा ब्रह्मादि सुर वंदन. ८४
'दिले या उपकारा स्वप्राण, होइन मीं ऋणी
करिसील पुढें त्याचा ' ऐसें बोले महाघृणी. ८५
पुसोनि मार्गदुर्गारिविचारबळ आपण
करी 'प्रिया सोडवीन द्वेषी मारुनि' हा पण. ८६
सुमुहूर्तीं निघे सेनासिंधु घेउनि सानुज,
सागराच्या तटा पावे प्रभुवर्य सभानुज. ८७

---

१ आनंदी. २. आनंदराशि. ३. देवनदी ( गंगा ). ४. शंकराच्या बाणाचा गुण. ५. पार्वति ! ६. परमकारुणिक. ७. रस्ते, किले, शत्रूचे बेत व सैन्य [ वगैरे परिस्थिति ]. ८. सुग्रीवासह.

कथितां हित धिक्कारी, त्या मत्ता बंधुस त्यजी,
बिभीषण म्हणे, 'पापी हे तुम्ही अंधु[1] सत्य जी!' ८८
महासुखीं, महोदारा रामा शरण ये, रंते[2].
असे न दाते वंदूनि घेती चरण येर ते. ८९
जों चंद्रसूर्य स्वकथा तों लंकाराज्य ओपिलें,
राम माता जीं जगीं हीं पोषी देवूनि 'ओ' पिलें. ९०
सागरीं रचिला सेतु न सेना चि तरावया,
संसारीं शुद्धिचा हेतु जीवमोह हरावया. ९१
म्हणवी श्रीस दावूनि प्रभुचें शिरचाप 'हा!'
पापहा[3] सरमा सांगे, 'सखि! सत्य न या पहा.' ९२
सुवेळशृंगीं चढुनि प्रेक्षितां दुर्ग देखिला,
उडोन सुगळें केला भग्न, द्वेषी न लेखिला. ९३
प्रभु बोधी अंगदास्यें कीं न हो तामसा वध,
क्षीणायु रावण, नव्हे[4] कारितां साम सावध. ९४
दूतांतें हि वधूं पाहे, काय सत्संग रासभा?
साधूंची परि निःसीमा[5] वर्णी तत्संगरा सभा. ९५
महामायें मेघनादें सानुजप्रभुविग्रह[6]
बांधिला नागपाशाहीं, केला दारुण विग्रह[7]. ९६
त्यातें पाहूनि रडली धरेची तत्परा सुता,
सुरर्षिधीस ही वाटे ती सत्या तत्परासुता[8]. ९७
त्रिजटा धैर्य दे, राहे स्वस्था मग पतिव्रता,
पळवी व्याळ, मोहाची वारी खगप तीव्रता. ९८
कुंभकर्णासि उठवी प्रयासें अवलक्षण,
काळसा चि प्रभुपुढें दावी तो नवल क्षण. ९९
करी, धरूनि सुग्रीवा, देवांचें मन घाबरें;

---

१. कूप, विहिरी. २. सुख पावे. ३. निष्पाप. ४. झाला नाहीं. ५. परलिखित हस्तदोष—**निःशीमा**. ६. देह. ७. युद्ध. ८. त्यांचें मरण.

तत्कर्णनासाहरणें तेज ये अनघा बरें. १००
खवळे, सर्व सेनेच्या सगळे कवळी लया,
तेव्हां राक्षस ही भ्याले अत्युग्रा जवळील या. १०१
तद्बाहुपादशीर्षांचें करी श्रीराम कर्तन,
नभीं मुनींचें, शोकाचें रावणीं होय नर्तन. १०२
ससैन्य सानुज रणीं शराहीं बहु ताडिला,
अंतर्हितें मेघनादें प्रभु पीडुनि पाडिला. १०३
आंजनेयें उठविले ते आणुनि सदोषधी,
मायासीतावधें मोही तो त्यावरि सदोषधी. १०४
लक्ष्मणें वधिला, युद्ध झालें दिवस तीन तें,
प्रार्थिली तज्जया तेव्हां शक्रें शिवसती नतें. १०५
पुत्रशोकार्त दिक्कंठ घे सीतामारणा असी,
अंतकाळीं स्मरे ती त्या प्रभुतें वारणांअसी. १०६
प्रार्थी उग्रा सतीहिंसाकामा सचिव, 'धारणीं
खड्गाच्या सद्यश असो, रामास चि वधा रणीं.' १०७
परते पर तेथूनि क्रोधशोकसमाकुल,
पावोनि भस्म झालें ज्या दावानळसमा कुळ. १०८
बळाब्धि धाडी दिक्कंठ, प्रभुकुंभज आटवी,
वाट वीरांसि नाकाची दावी, प्रलय वाटवी. १०९
मग क्रोधें 'मरावें कीं मारावा राम' हा पण
करी, निघे राक्षसांच्या कोटि घेउनि आपण. ११०
सिंधुला कपिरक्तांच्या नद्यांचें शत भेटवी,
लक्ष्मणोरीं शक्ति हाणी, प्रभुक्रोधाग्नि पेटवी. १११
तो म्हणे, 'संकट स्वामिस्वांतासि न गमो' हरी
आणी पुन्हां ओषधींचें श्रृंग, ज्या नग मोहरी. ११२

१. निष्पाप सुग्रीवाला. २. गुप्त झालेल्या. ३. मलिनबुद्धि (रावण). ४. गजेंद्राप्रमाणें. ५. मारुति.

जी धर्मांचा सन्नयाचा विलंघी पथ, मातली
सेना सेना[1] मारवाया ती आणी रथ मातली. ११३
संक्रंदनस्यंदनीं[2] तो बैसला रघुनंदन,
मंदनक्तंचरेशांता[3] शांतार्यारब्धवंदन[4]. ११४
श्रीरामरावणाचें जें होय द्वैरथ युद्ध तें
अत्यद्भुत, बळें मेलीं अमितें ज्यांत उद्धतें. ११५
सप्ताहोरात्र समर श्रम रक्षोधिपा तया
न दे, वदे प्रभु मनीं, 'होतो कैसा निपात या?' ११६
श्रुती 'अजित' ऐसें ज्या परमायास[5] वानिती,
मानिती देव देवी त्या परमायासवानिती[6]. ११७
लीलानर स्वयें ही तो शत छेदूनियां शिरें,
म्हणे न पडतां वैरी, 'चिंतेंत हृदया! शिरें.' ११८
सांगे 'आदित्यहृदय' श्रीकुंभज तपोनिधी,
मंडळीं[7] लाविली रामें दृष्टिसी च जपोनि धी. ११९
'वधिसील दशास्यातें' ऐसा श्रीरवि दे वर,
उद्धरी शल्य तें ब्राह्में शचीचा कवि देवर[8]. १२०
वृष्टि स्तवनपुष्पांची झाली प्रभुवरावरी,
हा सुखाची करी जीची सुधेची न बराबरी. १२१
दुंदुभिप्रमुखें दिव्यें वाद्यें पुष्कळ वाजलीं,
दिव्यें प्रभुपुढें गानें दिव्यें नृत्यें हि साजलीं. १२२
मंदोदरी मयसुता पावे शोक, विलाप ती
करी जो, सर्व शोकांचा भासे तो काविला पती[9]. १२३
तच्छोक शमवी, पावे न सीतावर विक्रिया,

---

१. साधिपति. २. इंद्ररथीं. ३. मूर्ख रावणाच्या अंतासाठीं. ४. सत्त्वगुण्यांमध्यें श्रेष्ठ अशानीं आरंभिलें वंदन ज्याचें असा. ५. श्रेष्ठ माया ज्याची त्यास. ६. अत्यंत आयास झालेला (इति) असें. ७. सूर्यमंडलीं. ८. उपेंद्र राम. ९. शोकाचा स्वामी (अत्यंत शोक).

बिभीषणासि सांगोनि करवी बरवी क्रिया. १२४
प्रभूक्तें लक्ष्मण स्थापी भक्ता भद्रासनावरी,
भक्तवत्सळ हस्तातें देतां भद्रास नावरी. १२५
लोकापवाद वाराया करी दिव्य महासती
महासें[1] तीर्थपादा[2] दे प्रकटूनि महासें[3] ती. १२६
ब्रह्मादिसर्वदेवर्षिस्तुता शीता कळे वरा,
निवाल्या स्पर्शतां ज्वाळा जीच्या शीता कळेवरा[4]. १२७
भेटे दशरथ स्नेहें, विजयें फार हर्पला;
हुंगितां शिर पुत्रांचें, श्रीचें, प्रेमाश्रु वर्पला. १२८
मृतें उठविलीं सैन्यें शक्रें पीयूषवृष्टिनें,
दृष्टिनें प्रभुच्या लीलाकृतसंहृतसृष्टिनें[5]. १२९
'पूजा घ्यावी' असें प्रार्थी बिभीपण तया, 'कर
सुकंठाची च, ती माझी' ऐसें सांगे दयाकर. १३०
'भेटीव भरता क्षिप्र, प्रिय हें बहु, वाट ती
दुस्तरा, अवधि स्वल्प, स्वांताला खंति वाटती.' १३१
लंकानाथ म्हणे, 'देतों पुष्पक, प्रिय साधितों,
जों आहे अवधि, स्वामी! नसावें चित्त साधि तों.' १३२
सबळा सुगळा पूजी, दे विमान बसावया.
म्हणे तो, 'जाण हें मीं श्री देवि मानव सार्व[6] या.' १३३
झालें जें भरतप्रेम तें पुष्पकविमानसें,
मानिलें पारिजाताचें कीं पुष्प कविमानसें. १३४
ससैन्य लंकाकिष्किंधानाथ बैसविले, शतें
सुखांच्या शकते वर्णूं न प्रेम कवि लेश तें. १३५
बसे विमानीं, सीतेला अंकीं घे राम सादर,
निघे तेथूनि देवूनि रावणा तामसा दर. १३६

---

१. आनंदास. २. रामास. ३. तेजाला. ४. शरीराला. ५. लीलेनें हरण केला आहे सृष्टि (सारें जग) जिनें अशा दृष्टीनें. ६. साळसूद; प्रामाणिक.

रणक्षोणीस सेतूस श्री पाहे सादर क्षण,
स्तवी श्रितांचे कारिते प्रभुचे पाद रक्षण. १३७
संगराच्या वियोगाच्या प्राशी प्रभुमुखें कथा,
व्यथा सुखप्रदा मानी देवी पूर्णमनोरथा. १३८
वाहे विमानीं तारेतें, जें पंपा मन घाबरें
करी, जें प्रेम शबरी, तें ऐके अनवा बरें. १३९
कबंधोद्धार ऐकोनि वंदी गोदावरीस ती,
जटायूत्तरकार्यानें बहु मोदा वरी सती. १४०
अगस्त्यशरभंगात्रिसुतीक्ष्णाद्याश्रमा नमी,
वदे, 'झालें भवत्पुण्यें पात्र शोका श्रमा न मीं.' १४१
चित्रकूटाद्रि यमुनागंगांच्या पुण्यसंगमा,
भरद्वाजा नमी तो जो. उद्धरी स्थिरजंगमा. १४२
भरद्वाजाश्रमीं राहे, भरता प्रभु आठवी,
आंजनेयासि आलों हें कळवायासि पाठवी. १४३
गुहातें भरतातें तो महाकुशळ भेटला.
बेट लागे समुद्रां, कीं विश्ववी ताप पेटला. १४४
प्रयागीं अब्द चवदा श्रीरामें सांग सारिले,
तारिले भक्तबंधू ते तद्वियोगाधि वारिले. १४५
भरताचा निश्चय तो वर्णावा काय हो! महा?
चुकतां अवधि, स्पष्ट करिता कायहोम हा. १४६
आचार्य विप्र जननी सखे सचिव पौर वा,
वंदूनि भेटोनि करी त्यांच्या उचित गौरवा. १४७
'मोटा उत्सव भेटीचा, प्रवेशाचा तयाहुनी,
भारी राज्याभिषेकाचा,' ऐसें वाखाणिती मुनी. १४८
पाहे रामाभिषेकातें, हर्षे, गाय दिलीप या,
भू प्रजेष्ट करी, जाणों वर्षे गाय दिली पया. १४९
सर्वांहूनि मरुत्पुत्र कवि सार सभाजन

पावे, करी सुप्रसादा रवि [1]सारस [2]भाजन. १५०
रामराज्यांत म्हणती, 'पारिजाता! अगा! रहा,'
कीं ताप पावोनि म्हणे न कोणीं ही अगार 'हा!' १५१
ज्या श्रीरामें निजयशःपीयूषें विश्व तर्पिलें,
रामात्मजें मयूरें हें त्या तच्चरित अर्पिलें. १५२

इति श्रीमदनुष्टुप्रामायणं संपूर्णं।

---

# त्रिःसप्तमंत्रमयरामायण

(शार्दूलविक्रीडित)

श्रीकंठादिसुरर्षिसंस्तुत धरादेवामरांच्या हिता
जन्मे, [3]यक्षवरानुजप्रमथना, सूर्यान्वयीं रक्षिता.
धर्मांचा मनुज, स्वयें यश जगीं व्हाया, भय ध्वंसिता,
झाला राघव दिग्रथात्मज महातेजा विधीचा पिता. १
कौसल्योदरसंभव प्रभु, तया श्रीराम सन्नाम हें,
ज्ञाता तो अजपुत्र, सत्प्रियगुणाधारासि ठेवी महें.
कैकेयीज यशोनिधी भरत तेजस्वी; सुमित्रा [4]यॆम
पावे लक्ष्मण जो बरा पटु, दुजा शत्रुघ्न सद्विक्रम. २
ने श्रीगाधिज अध्वरार्तिशमना, अस्त्रें कथी, ताटका
संहारी जगदीश, यज्ञ मुनिचा राखे महानेटका.
विप्रस्त्री[5]रज तत्क्षय प्रभु करी, मोटें जगीं दे यश;
भंगी रुद्रशरासना, वरि महीजा, रा[6]म केला वश. ३
श्री त्यागी प्रभुराज, धर्म समयीं, रक्षी प्रसू[7]चें प्रिय,

---

१. कमळ. २. पात्र. ३. कुवेराचा कनिष्ठ भाऊ जो रावण त्याच्या नाशासाठीं. ४. जुळें. ५. पाप (व्यभिचारदोष). ६. परशुराम. ७. मातृवत् जी कैकेयी तिचें.

तो सीतानुजयुक्त सत्प्रिय वसे रानीं महर्षिक्रिय.[1]
शोकानें जगतीवरा लय घडे, झालें जनाला भय,
दे धीरा भरता, न माय, न मही, तोष; त्यजी आलय. ४
निःश्रीका स्वपुरा त्यजी सुमति; दे आर्धी पित्या पिंड हा.
भेटे साप्तजन, प्रयत्न नगरा आणूं करी जो महा;
त्या अर्पी निजपादुका, यति तसा, निर्व्याज शुद्धाशय,
'नंदिग्राम बरा' म्हणे, प्रभु मनीं चिंती, तपोनिश्चय. ५
श्रीयुक्त प्रभु अत्रिचित्त निववी तारी विराधा मग
आजन्मप्रयत[2] स्मरा[3]विषय जे चिद्व्योम[4]चारी खग
त्यां दे हर्ष; जटायुला तनयसा वंदी, जपे मायसा;
राहे पंचवटींत; सेवि मधुरा गोदावरीच्या रसा. ६
श्रीसी शूर्पणखा 'वरा मज' म्हणे; दंडी तिला; जो खर
जन्या ये, करि तत्क्षय प्रभु; रुचे दिक्कंधरा मत्सर.
चोरी तो जनकात्मजेसि, नय न प्रेक्षी, जटायुर्व्यय[5]
क्रूरात्मा समजे स्वइष्ट; न धरी कांहीं अधर्मैं भय. ७
श्रीचा, लुब्धनरा, वियोग परम क्लेशी करी, त्यापरी;
तो मायामनुज प्रभू सदय 'हा !' रानीं म्हणे मध्वरी.[6]
स्नेहें होय जटायुतोयद जगन्नाथ; स्वकीयप्रिया
साधी, राहु न दे चि दैन्य तम, याऐसी न कोठें दया. ८
श्रीशें, राहुतसा कबंध धरि जो, क्रूरा तया मर्दुनीं,
केली कीर्ति जगीं यशस्विनिकरामध्यें, जसी स्वर्धुनी.
जन्मीड्या[7] शबरी, विर्यन्मणिज[8] ही वाळी हि कीं सायकें
शूरार्यातिमता[9] दिली गति रघूत्तंसें जगन्नायकें. ९

---

१. महर्षींप्रमाणें आचार ज्याचा. २. आजन्मशुद्ध. ३. मदनाचा विषय नव्हेत असें, कामविमुख. ४. चिद्रूपी आकाशांत संचार करणारे पक्षी. ५. नाश. ६. मधुसूदन. ७. जन्मतः च स्तुत्य अशी. ८. सूर्यपुत्र. ९. शूरश्रेष्ठाना अति मान्य अशी.

श्रीचा शोध पराक्रम श्वसनजें केला; तया गौरवी;
दे राजत्व नतासि अक्षय परा; दावी ममत्वा कवी;
बांधी सेतु जळांत; यक्षपतिचा मत्तानुजन्मा नय
त्यागी [1]राज्यवरातिमत्त नुमजे होतां बळाब्धिक्षय. १०
शक्रश्री[2]घ्न पराक्रम व्यसु करूं, बद्ध प्रभूतें करी;
सीताश्रु त्रिजटा पुसी, भय न राहूं दे मनीं ती बरी.
नागांतें भुजगारिचा [3]रंय पिटी; साजे जगीं तो यशें,
राजीवाक्ष महा धरी; खळबळें झाली प्रचिंतावशें. ११
श्रीदाच्या अनुजें पराक्रमपटु भ्राता वधा धाडिला;
तो ही, त्या जगदीश्वरें [4]लयकरामर्पी, रणीं पाडिला.
मेघध्वान करी पराजय जया तें सैन्य मानी यम.
आणि ओषधिशृंग नंदन समीराचा महाविक्रम. १२
श्रीश स्वस्थ विशल्य होय सबळ क्रूरारि मर्दी तया
दे मायाजनकात्मजाक्षयकरा[5]राती महोग्रा भया.
सीतेशानुज तो तदत्यय करी; जन्यांत यत्नें अरी
माराया महिजेसि, शोकवशधी क्रोधी असीतें धरी. १३
मंत्री श्रीवध राहवी; मग अरी सैन्यें प्रभूच्या वधा
प्रेषी; तों अज 'पी यथेष्ट रुधिरा, मधा,' म्हणे भूस 'धा.'
जन्या आपण ये [6]यमाभ, जगती झाली भयव्याकुळा;
धीरा मूर्छित लक्ष्मणा करि, मदें देवूनि काळा कुळा. १४
श्री वीरा मरुदात्मजें दिलि पुन्हां दिव्यौषधीच्या बळें,
आरंभी अजपौत्र सं[7]यति सुराद्यर्थे मराया खळें.
शक्राच्या बसतां रथीं, 'जय! जय!' ध्वाना मुनींच्या मुखें
ऐके [8]रावणकामरामहर तो ब्रह्मांड कोंदी सुखें. १५

---

१. राज्यवभैव व ब्रह्मदेवाचा वर यानीं उन्मत्त असा. २. मेघनाद–पंत. ३. गरुडाचा वेग–झडप. ४. प्रलय करणारा असा कोपी. ५. अराति–शत्रु. ६. यमा सारखा. ७. युद्ध. ८. रावणरूप मदनाला रामरूपी शंकर.

लंकाश्रीसि करी प्रभूत्तम वरा[1]मत्र स्वपादानता;
दिव्यामाजि धनंजय स्तवि वरा सीतामनःशुद्धता.
आलिंगी अजपुत्र त्या यतिजनश्रेयस्करा, तो मग
यानीं बैसुनि राजराज महितीं, हर्षें निघे सानुग. १६
श्रीला राघव दाखवी समरभू, सेतु, स्वकीया कथा
सांगे, आक्रमितां जगत्प्रिय परात्मा व्योमयानें पथा.
तारा घे जनकात्मजा, यमिजनध्येय प्रभू गौतमी
दावी; त्या विरहज्वरा कथि, धरी जो अर्य[2]मत्वा तमीं. १७
श्रीकुंभोद्भवसद्वराश्रम तिला दावी जगाचा धणी;
ती ही जह्नुसुता, पय स्मरहरा जीचें सुचूडामणी.
तेजस्वीश महायशोनिधि भरद्वाजर्षि यज्वा कृती,
तो भार्ग्यें करि शर्मराशिविभुची प्रेमस्तवें सत्कृती. १८
श्रीभर्ता चतुरा मरुत्तनुभवा धाडी पुढें सत्तम;
भेटे तो जै[3]वन प्रभु प्रियगुहा वारावया तच्छ्रम.
हर्षे सानुज निर्मळाशय निजश्रेयस्करार्यागमें;
प्रेमें त्या नमि वानरा भरत तो, नाचे महासंभ्रमें. १९
श्रीमत्पुष्पक दे पुरा मह, जसा बर्हि[4]व्रजाला घन.
भेटे स्वानुज हृत्प्रिया; सदय तो राज्यांत घाली मन.
गाती सर्व अजस्र[5]धर्मनयजप्राज्या यशातें असें
राजा राम करी, कवींस निववी निर्दोषलीलारसें. २०
श्रीदैवीड[6]दभाग्य लोक, नगरामध्यें न कोठें भय,
नाहीं मृत्यु जरा यमस्मृति नरा, मर्त्यांत[7] भेद, स्मय;
सौजन्यें यश जोडिलें जगदिनें[8] रामें[9] यथार्थाभिधें;
केलीं सच्चरितें हरादिमहितें मोक्षार्थ नानाविधें. २१

१. श्रेष्ठ पात्र किंवा वराला पात्र. २. सूर्यपणाला. ३. वेगवान्. ४. मोरांच्या कळपाला. ५. अजस्र=सनातन, नित्य (?) ६. कुबेराला हि लाजविणाऱ्या भाग्याचे. ७. हें मोठें नवल आहे. ८. जगदीशें. ९. राम=रमविणारा.

'त्रिःसप्तमंत्रमय' हें रामायण, निवे दिलें
येथें मन, मयूरें श्रीरामचंद्रा निवेदिलें. २२

इति श्रीत्रिःसप्तमंत्रमयरामायण समाप्त ।

---

# कन्यारत्नरामायण

(स्रग्धरा)

श्रीभर्ता ब्रह्मवाक्यें दशरथसुतता घे, चतुर्मूर्ति झाला,
नामें तो राम विश्वप्रिय भरत सुधी लक्ष्मणारिघ्न आला;
ने विश्वामित्र, अस्त्रें प्रभुसि पढवि; तद्यज्ञ रक्षी, शिळेतें
तारी; जें दुर्लभ, श्रीहरधनुदलनें, रत्न, रामा मिळे तें. १
तेजातें भार्गवाच्या हरि; जनकवचोरक्षणा राज्य सोडी;
मातेच्या, दिङ्मुखार्तामरमुनिततिच्या ही, प्रियातें न मोडी;
ताताला तोय दे, त्या धृतपदभरता पादुका; कीर्ति जोडी;
अव्यादीष्टें विराधा वधि, करुनि जटायुद्विजासीं हि गोडी. २
प्रेमें गोदावरीच्या मुनिमहिततटीं जानकीयुक्त राहे;
दिक्कंठ, स्वस्वसेचें प्रभुवर नुरवी नाक जें, तें न साहे;
ने सीतेतें, छळानें वधुनि खगवरा. खिणसा तो वदे 'हा!'
संस्कारी तातभावें प्रभु खगपतिच्या स्वांकमुक्ता सुदेहा. ३
मारी तारी कबंधा; वरगति शबरी जी तिला दे; समीरा
घाली हर्षीं, करूनि प्रिय अनुग सुता त्याचिया त्या प्रवीरा.
सुग्रीवा सूर्यपुत्रा प्रियसख कारि, ने त्या हि वाळीस अंता;
सीता शोधूनि ये, त्या कवळुनि हृदयीं, गौरवी सर्व संता. ४
देवांशर्क्षप्लवंगामितबळजळधी सिंधुतीरासि नेला,
भ्राता रक्षोधिपाचा, प्रथम चि, नमितां पाय, लंकेश केला.

---

१. रावणपीडित देवऋषींच्या समूहाच्या. २. आपल्या मांडीवर [ पडून प्राण ] सोडलेल्या.

भीतां अद्ययस्तसांबुनिधि, रचविला सेतु अत्यंत भारी,
संख्येनें लांब गांवें शत, दश बरवा रुंद, आश्चर्यकारी. ५
दिक्कंठातें सुकंठ प्रथम निरखितां दाखवी तेज, ताडी;
तो दूता अंगदातें धरवि, धरितयां बाहु झाडूनि पाडी.
युद्धप्रारंभ होतां बहु बळ खपवी राम कोदंडधारी,
बांधी उग्राहिपाशीं घनरव विभुला लक्ष्मणा नाकपारी[1]. ६
'हा!' बोले दाखवीतां विकळ महिसुता; दे 'जटा' जी 'त्रि'पूर्वा
ती धैर्या; स्वास्थ्य पावे करपलि हि सती, वृष्टिनें जेंवि दूर्वा.
पक्षीश व्याळमूर्छा उडवि, करि तनू स्पर्शतां अक्षता; तें
ऐकोनि प्रेषिला जो यमसम कलशश्रोत्र तो अक्षतातें. ७
युद्धीं मारी प्रचंड प्लवगबळ, धरी मूर्छिता कीशपाळा;
तन्नासाकर्ण वेगें सुटुनि हारि. हरी त्या करि क्रुद्ध काळा.
तो भक्षी कीश कांहीं, किति गिळि सगळे, जेंवि सुग्रास; 'हाय!'
सेना 'झाला' म्हणे, 'या प्रलयकर महाकाळ उग्रा सहाय!' ८
ध्वंसी त्या कुंभकर्णा प्रभु; दशमुख तो 'हा!' वदे. वासवारी
मायासीतावधें दे क्षण जडजनताभाव देवास वारी.
त्यातें सौमित्रि मारी; दशवदन रडे, श्रीवधा घे असीतें;
त्यातें मंत्री म्हणे, 'बा! न वधुनि अरितें, मारिसी कां असीतें?' ९
सांगे, 'मारा चि रामा कपिपतिसहिता.' पाठवी सैन्य भारी;
मारी त्या रुद्रसा चि प्रभु, उदधिस तो विप्रसा[2] क्षिप्र सारी.
सारी घे शेष सेना, दशमुख समरीं लक्ष्मणा शक्ति हाणी;
न्हाणी रक्तें; तयातें पवनज उठवी, तें पुन्हां शृंग आणी. १०
प्रेषी वज्री रथातें; प्रभुसि बसवि तो मातली त्या सुयानीं.
वेधी त्या मार्गणानीं प्रभु, न गणि अरी, विद्ध[3] जैसा सुयानीं.

---

१. इंद्रशत्रु (इंद्रजित). २. अगस्त्य ऋषीप्रमाणें. ३. अगोदर च ज्याच्या शरीराला पुष्कळशीं छिद्रें पडलीं आहेत त्याला जशा सुया टोंचण्यानें अधिक वेदना झाल्यासारखें वाटत नाहीं त्याप्रमाणें.

छेदी श्रीराम मूर्धे शतमित, उठले रावणाचे तथापि.
　कर्णाहीं, भक्तिमान् जो परम रसिक, तो अद्भुता या कथा पी. ११
सांगे जें कुंभजन्मा रविहृदय रणीं देवदेवा, जपे या
　तो, यन्नाम[1] स्वभक्ता सुकृतहयमखा दे वदे वाजपेया.
भावें मायामनुष्यें स्तवुनि विनविलां, त्या असारा मराया,
　सूर्यें, 'मारीं दशास्याप्रति,' वर दिधला या असा रामराया. १२
शक्राचा युद्धयज्ञांतिल सुमति सखा सारथी कारभारी,
　सांगे जोडावयाला विजय निजयशोदायका फार भारी.
बाण ब्राह्में कराया परम निपुण जे भादि[2] ते कै ट भारी
　मारी दिक्कुंधरातें उर चिरुनि महासंगरीं कैटभारी. १३
स्ववींद्यध्वान झाले, सुरवर विजयीं वर्षले सुप्रसूनें
　सावित्रीनें शचीनें प्रभुनुति वारिली तारकारि[3]प्रसूनें.
वैरी ही पाववीला, करवुनि विधिनें सत्क्रिया, धन्यतेला.
　तो, जों भू चंद्र सूर्य स्वयश, रघुवरें भक्त लंकेश केला. १४
देवीनें दिव्य केलें; स्वबळ उठविलें, जें रणामाजि मेलें;
　अंतातें दुःख नेलें, प्रभुवरयश जें तें दिगंतासि गेलें.
शोभे या भूमि [4]चेलें सुरुचि वरि दिवा, बोध या स्वच्छ तेलें;
　वंदावें यासि [5]वेलें अमरवसतिच्या, शंभु या हृष्ट बोलें. १५
पूजार्थी रावणाचा सदनुज विनवी; त्या म्हणे राम, 'बा! जें
　सुग्रीवाचें कपींचें प्रिय करिसिल, तें पूजन श्रेष्ठ माजें.
स्त्री, तैसा भेटवूनि त्वरित भरत ही, सद्यशें फार साजें;
　मीं त्यावांचूनि चित्तीं श्रवण हि करितां भोगपूजोक्ति लाजें.' १६
तो सत्कारी सुकंठा कपिबळसहिता पुष्पक [6]प्रह्वभावें

---

१. ज्याच्या नांवाचा जप करणाराला अश्वमेध व वाजपेय या उभय यज्ञांचें पुण्य लागतें असा भाव. (पदें मूळांत अशीं च तोडलीं आहेत. अन्वय नीटसा ध्यानांत येत नाहीं). २. 'कै' व 'ट' आहेत 'भा' च्या आधीं घ्यावेत; कैटभ. ३. पार्वतीनें. ४. वस्त्रानें. ५. कल्पवल्लीनें. ६. नम्रपणानें.

बैसाया दे, म्हणे त्या प्रभुवर, 'भरता त्वां पहायासि यावें.'
सेनायुक्ता कपीशा बसवि, मग निघे व्योममार्गें विमानें;
देवीतें युद्धभूमि स्वपरयश कथी, सेतुतें दावि मानें. १७
श्रीनें तारा विमानीं करुनि बहु दया आणवीतां चि, आली.
झाली हृष्टा, पहातां जनकनृपसुता, ती करी तीस आली.
श्रीस श्रीराम सांगे, "मज, तवविरहीं, हे करी आर्त पंपा
कंपा दे, या असूंतें, सति! सुदति! म्हणे, ताप देवूनि, 'संपा.'"
श्रीतें दावी कबंधस्थळ, कथुनि कथा, राम गोदावरीतें;
जें होतें खिन्न, तीचें [1]श्वशुरसुगतिनें, चित्त मोदा वरी तें.
पाहे त्या त्या अगस्त्यप्रमुखसुमुनिच्या साधुगीताश्रमातें.
सोडी, ती चित्रकूटा निरखुनि हृदयांतूनि सीता, श्रमातें. १९
राहे राम प्रयागीं, सुकृतनिधिभरद्वाजपादांसि वंदी;
वंदीसा वेद ज्यातें स्तवि, शत[2]धृति ही, तो हि [3]यत्पत्र नंदी.
प्रेषी वातात्मजा, तो कळवि कुशळ, ते पावले हर्ष भारी.
सारी वर्षें प्रयागीं, प्रभु पदनिरतां त्यांसि भेटोनि तारी. २०
जें होतां, श्रीश राजा, शिव कथिल, कृती, काय तें? वि[4]प्रजाया
जेंवि स्वोद्धार होतां प्रमुदितहृदया गाय, तेंवि प्रजा या.
हा [5]देवायास तैसा निपटुनि, उडवी पामरायास. मोर
प्रेमें होवूनि नाचे सकळजन घना रामरायासमोर. २१
[6]सत्कीर्तिस्रग्धरा कन्या हे रामायणसत्कथा
मयूरें अर्पिली रामा वरा, जाया मनोव्यथा. २२

इति श्रीरामायणकन्यारत्नं संपूर्णं ।

---

१. जटायु. २. ब्रह्मदेव. ३. नंदीवाहन शंकर. ४. अहल्या. ५. रामानें देवांचे न श्रम हारले असें नसून क्षुद्र जीवांचे हि हरिले. ६. सत्कीर्तिरूप पुष्पमाळा धारण करणारी. (या ठिकाणीं वृत्तानें नांव हि खुबीनें व्यक्त केलें आहे).

# कल्याणरामायण[1]

(पज्झटिकावृत्त[2])

श्रीपति खळ दशमुख माराया, यशगात्यांचा भव साराया,
जो दशरथ गुरु करि या राया, चरणरजें स्थिरचर ताराया. १
झाला कौसल्यासुत राम प्रभु, ज्याचें श्रुतिबहुमत नाम.
कैकेयीसुत भरत, पवित्रा वी लक्ष्मण शत्रुघ्न सुमित्रा. २
रामप्रभु लक्ष्मण हे जोडी, भरत रिपुघ्न यांत बहु गोडी.
यांची रीति त्रिजगीं थोडी, कोणांचें हि न जी मन मोडी. ३
प्रथम मुनि म्हणे, 'या विनयज्ञा संरक्षाया लाविन यज्ञा.'
ने मागुनि, करि मखरक्षण हो! प्रभु इषुसि वदे, 'प्रखर क्षण हो.' ४
करि तारुनि रघुराज यश शिला, लावि म्हणाया या 'जय' शशिला.
मोडी भवगजहरि च्यापातें, सुजन सुखविता आरिच्या पातें. ५
वसुधाप्रभवा सीता बाळा प्रभुच्या कंठीं घाली माळा.
सुमति जनकजनकानुजकन्या वरिति तिघांसि तिघी अतिधन्या. ६
नृप झाले नति करिते ज्यातें त्या रामाच्या[3] हरि तेजातें.
गुरु युवराज कराया पाहे प्रभुसि, न तें कैकेयी साहे. ७
देवूं केलें वरयुग मागे, कीं दासीच्या मतिला लागे.
'पुर पुत्रा, वन रामा चवदा वर्षें, हर्षें द्या, 'हूं' च वदा. ८
सत्यच्युत जो नर काजा तो मुख्या चुकला, नरका जातो.'
या स्त्रीवचनें धार्मिक अडला, रडला राजा, मूर्छित पडला. ९
प्रभु वरि गुरुच्या सत्यसमवना, तापसविप्रापत्यसम वना.
गेला सीतालक्ष्मणसहित स्वहित[4] त्रिदशमुनिश्रुतिमहित. १०
निघतां प्रभु, 'हाय!' वदे पुर तें, तापसवृंद हर्षलें पुरतें,

---

१. रामकथा ही शुभप्रद च आहे म्हणून पंतानीं ह्या काव्यास 'कल्याणरामायण' हें योग्य नांव दिलें असावें. २. हें मात्रावृत्त आहे. ३. परशुरामाच्या. ४. भक्तहितकर्ता.

साक्ष[1] ससाध्वस[2] झाले, झुरतें तम काय तरण्युदयीं उरतें? ११
सुखवि स्वविरहभीतगुहातें जेंवि चकोरा शीतगु[3] हातें;
निववी नमुनि भरद्वाज्यातें म्हणती मुक्तिवरद्वा[4] ज्यातें. १२
होय चित्रकूटीं सुखवासी, सुख ज्या परमसुखा मुख वासी;
वारिला मृत्यु दशरथक्ष्मापें शापें प्रियसुतविरहजतापें. १३
मातुळकुळगत सानुज भरत द्रुत आणविला परमशुभरत.
बहु निंदी तो कवि मातेतें, दुःख जिच्या जाच्यें माते तें. १४
करुनि पित्याचें उत्तरकार्य, प्रभुला शरण जाय तो आर्य.
नमुनि म्हणे नत पुरता, 'परतें, स्वपदीं, वारुनि पुरताप, रतें.' १५
राम म्हणे, 'त्वां म्यां हि करावें गुरुवच, धर्में या चि तरावें.'
बोधें तच्छोकातें जिरवी, त्यासि पादुका देवुनि फिरवी. १६
नंदिग्रामीं तापस राहे, वाहे वल्क जटा, श्रम साहे,
लाहे खेद, वदे गी 'हा!' हे, पाहे न वपु नष्ट कीं आहे. १७
प्रभु वंदी आत्रिस, तद्भार्या सीतेतें बहु सुखवी आर्या.
शरभंगातें सद्गति दे हा, पूजिति मुनि या करुणागेहा. १८
दंडकवनगत सत्तापस जे, प्रभु वाराया तत्ताप सजे.
प्रभुला दिव्यें कुंभज शस्त्रें दे जैसीं श्रीगाधिज अस्त्रें. १९
संहरिता सुरशत्रुभटायु तो नमि त्या जो गृध्र जटायु.
तातप्रियसखवचनें गोदा पाहे, पावे प्राज्या मोदा. २०
पंचवटींत वसे कोदंडी रावणभगिनीतें तो दंडी.
सबळा तद्बंधु खरा खंडी, दशवदना चिडवी ती चंडी. २१
श्रीला कनकहरिण खळ दावी, ती त्या प्रभुसि धराया लावी.
प्रभु त्यातें मर्मीं शर हाणी, आर्तप्रभुपरि ऐकवि वाणी. २२
होय पतिस भय भावुनि भीता, सौमित्रिस 'धांव' म्हणे सीता.
तो सांगे, 'प्रभुला भय नाहीं, अवलोकिसिल कुशळ नयनाहीं. २३

---

१. डोळस. २. सभय. ३. शीतकिरण चंद्र. ४. मुक्तिचें श्रेष्ठ द्वार. ५. येथें संतानीं छला 'च्' जोडला आहे. आर्याभारत–प्रस्तावना पृष्ठ ४।५ पहा.

पीडिल कोण गराक्षसमा[1] या? हे आर्योक्ति न, राक्षसमाया.
तो प्रभुबाणें सति! पर मेला,' तें वाटे कटु अति परमेला[2]. २४
सीता कोपे, साधुसि दापी, अमृतमयी झाली विषवापी.
'मदभिलाष धरिसी तूं पापी! कीं खळ दायाद गळा कापी.' २५
स्वविवेकसुदीप चि मालविला, उटजांतुनि देवर घालविला.
साश्रु शरण गेला अनघाला, कविहो! या कुतुकीं मन घाला. २६
श्री असुख खळें हरिली लाहे, मायामानुषहरिलीला हे.
गृध्र प्रवया बहु, परि सून द्रुत सोडवि, हाका परिसून. २७
होउनि विरथ श्रीतें सोडी, क्षतविकळ हि खळ हात न जोडी.
धर्माची मर्यादा मोडी, खड्गें तत्पक्षांतें तोडी. २८
त्या पापें नेतां ती सीता स्वालंकार त्रिभुवनगीता
पांचां प्लवगांमध्यें टाकी, तच्छोकें 'हा!' वदले नाकी. २९
दुष्ट दशानन नेउनि देवी लंकेंत अशोकवनीं ठेवी.
लक्ष्मण रडत वृत्त तें सांगे, राम म्हणे, 'हा! श्रमलिस कां गे!?' ३०
त्या रघुवंशाच्या कलशाला 'हा!' म्हणवी शून्या दलशाला.
गमला तो कविला पयं[3] शोधी करि बहु शोक विलाप यशोधी. ३१
प्रभु पाहे विकळा तातातें, 'हाय!' म्हणे, घाळी वातातें.
तो कथि, 'वत्सा! रावण सीता घेउनि गेला, त्रिभुवनगीता.' ३२
प्रभुच्या भजकां अंका देहा सोडी, गुरुता रंका दे हा[4].
गृध्रा प्रभु निववि निवापानें[5], म्हणतें हें सुयश 'निवा पानें.' ३३
जो धरि वांछुनि घात कबंध, प्रभु त्याचा हरि पातकबंध.
बसुनि विमानीं तो कथि रामा, 'सुगळ कपि सखा येईल कामा.' ३४
होति गदी जन अगदी शबरीयश सेवुनि, कीं, जगदीश बरी
गति दे तीस, जिला सनकानें गावें त्याच्या ही जनकानें[6]. ३५

---

१. दृष्टिविष सर्पाप्रमाणें (रामाला). २. श्रेष्ठ अशा सीतेला. ३. यश:भाग असून हि पाणी शोधीत आहे! ४. राम. ५. तिळांजळीनें. ६. महादेवानें.

जरि बहु रम्या सरसी पंपा प्रभुला देती झाली कंपा.
मारुतिला दे प्रभुसंग महा सुग्रीवासीं करि संगम हा. ३६
सुगळ सखा दावी श्रीरामा सीतालंकार घनश्यामा.
प्रभु बोले सदलंकारा, 'हो ! स्वस्थ न खळपद लंका राहो.' ३७
सुगळ कळवि, 'निष्कारण वैर स्वभ्राता करि, वर्ते स्वैर.'
प्रभु बाणें भेदुनि उर, वालिप्राण हरी, तज्जा[1] कुरवाळी. ३८
झाला धन्य गतासु गळाला, प्रभु दे राज्य मतां[2] सुगळाला.
कपि पाठविले श्री शोधाया, तत्कुशळें वत्सल तो धाया. ३९
कळवि जटायुबंधु संपाती जी स्वासूंसि म्हणे 'संपा' ती[3].
मारुति शतयोजनजळधीतें लंघी भिववाया खळधीतें. ४०
लंका शोधुनि, चिंता वाहे, मग तीस अशोकवनीं पाहे.
तों ये खळ तत्कुवच न साहे, सुज्ञ म्हणे, 'प्रभुयोग्या आहे.' ४१
देवी बहु धिक्कारी क्षुद्रा, तो जातां, कपि तिस दे मुद्रा.
श्रीसीता चूडामणि अर्पी, आधीं आशीरमृतें तर्पी. ४२
नंदनवनसें उपवन मोडी, झोडी वीर अक्षशिर तोडी.
गोडी युद्धीं बहु, करि खोडी, सोडी न, चमू राहे थोडी. ४३
शक्रजितें ब्रह्मास्त्रें धरिला, दाटुनि सांपडला त्या अरिला.
बद्ध करुनि अतिरुष्टा पाशीं ओढुनि नेला दुष्टापाशीं. ४४
काळाचा अतिबळ वीर गडी अरिला प्रभुबळ कळवी, रगडी.
'प्रभुरत्न प्रभुला दे, चोरा ! [4]हो राख, न राख कुळा घोरा !' ४५
इत्यादि कटु न तो खळ साहे, घेउनि खड्ग वधाया पाहे.
साधुबिभीषणबोधें राहे, मारुति म्हणे, 'हा चि बुध आहे.' ४६
त्याच्या पेटवि खळ पुच्छातें, जाळी पुर, रडवी तुच्छातें.
मणि देवुनि सुखवी रामातें म्हणे, 'दिलें सुख वीरा ! मातें.' ४७
भेटे राम पवनतनयातें, केवळ होय [5]अवनत नयातें.

---

१. तत्पुत्र अंगदाला. २. मान्य अशा. ३. सीता. ४. 'नाहींतर' असा अध्याहार करावा. ५. नम्र.

प्रभु ऐकवि या स्तव नव संता हें[1] सर तो यास्तव न वसंता. ४८
मग सुगळयुतें त्रिजगद्भटकें नेलीं सिंधुतटा कपिकटकें.
तों चि बिभीषण आला शरण, प्रभु दे लंका नमितां चरण. ४९
सेतु समुद्रीं निर्मुनि उतरे, म्हणति कपि, ‘ खळा ! न मदें उत रे ! ’
प्रथम चि सुगळ दशास्या ताडी, सामार्थ प्रभु अंगद धाडी. ५०
हितबोधें न धरुनि तोख वळे, सिक्तघृतदहनसा तो खवळे.
धरवी धरिती राक्षस या जे ते अहि, दूत गरुडसा साजे. ५१
बुडवाया खळ सर्वस्वा हा ‘ करिन ’ म्हणे ‘ बळ सर्व स्वाहा.’
[2]समितीच्या कुकवि प्रारंभा करि, ती[3] यी शुकविप्रा रंभा. ५२
प्रभुची शक्तिचमू गंगा, तें खळबळ अघ, पावे भंगातें;
प्रभुचे प्रसवति बहु शर भाते, न तरति अरिहरि हरिशरभा ते. ५३
दशमुखसुत घनरव मायावी, त्या न जयश्री अवमों यावी.
निववि प्रभु जो नागपाशया[6], बांधी घालुनि नागपाश या. ५४
दुर्मति सर्वा हरिखे दासी, त्रिजटा श्रीच्या हारि खेदासी.
व्यसन उडविलें खगपाळानें तपनें तमसें फणिकाळानें. ५५
कष्टें कलशकर्ण जागविला, सुगळें प्राण हरुनि नागविला.
प्रभुनें बळ गिळितां लोळविला, काळ चि परलोका बोळविला. ५६
होतां शोक गैताक्रिय साधी स्वजनक, घनरव तत्प्रिय साधी.
[9]कपटनरा सबळा परमा या प्रभुला मोही, करि पर माया. ५७
प्रेरी ऋक्षेंद्राची वाणी मारुति ओषधिशृंग चि आणी.
तद्वात चि शल्यांतें खाणी, या आशी दे प्रभुची राणी. ५८
खळसुतबंधुसुभट बहु जपले, प्रलयसमयाशिखिराविसम तपले.
तरि सर्व प्रभुतेजें लपले, दवदहनांत शलभसे खपले. ५९
मायासीताघातें भारी शोक श्रम दे सुत्रामारी[10].

---

१. हें प्रभुचें यश—**पंत**. २. युद्धाच्या. ३. समिति. ४. रामा—**पंत**. ५. अभमा. ६ गजेंद्राच्या मनोरथाला. ७. स्तब्ध ८. सञ्चित. ९. नरदेहधारी रामाला. १०. इन्द्रजित. * समाधानकारक अर्थ लागत नाहीं.

सबिभीषण गुरुहितप्रियकारी लक्ष्मण त्या खळपुत्रा मारी. ६०
युद्धारंभीं प्रभुशिर दावी श्रीस दशास्य, रडाया लावी;
अंतीं ऐकुनि वनरवपाता, घेउनि खड्ग कराया घाता. ६१
वारी सचिव करुनि यत्नातें, "न वधीं प्राज्ञ स्त्रीरत्नातें.
म्हण 'अहितांस चि मारीन,' रतो मन समरमखीं, मारीं नर तो." ६२
दशमुख देवीपासुनि परते, सैन्यांसि म्हणे 'मारा पर ते.'
बहुत उसळलीं नवचतुरंगें, क्षमिलें 'हूं' हें न वच तुरंगें. ६३
झाली सामिति हठानें मोटी, प्रभुनें वधिले पर बहुकोटी.
वदला प्रभु रुद्रास्त्रीं बळ तें हें तुल्य असें सुज्ञा कळतें. ६४
परिसे प्रमथन तो उर्वारि तें सैन्यें घे सारीं उर्वरितें.
निघुनि करी प्रभु बळतरणातें वांछुनि कोपें जळत रणातें. ६५
बहु निजपरबळ तो अरि खपवी, तें पाहुनि सोडी हारिख पवी.
सोडी शक्ति लक्ष्मणावरि, ती झाली त्यासि वधूसी वरिती. ६६
ती हृदयांत शिरे, त्या मोही, 'हाय!' म्हणे शोकें प्रभु तो ही.
सोडी खर शर, अरितें झोडी, जोडी जय, शक्तिस ही मोडी. ६७
मुनि म्हणति, 'दहन न उरवि दारू प्रभु हि तुझें कां न उर विदारू?'
तो आणुनि शिखर पुन्हां आला, सौमित्रि स्वस्थ पळें झाला. ६८
बसुनि हारिरथीं वीरकाविवरें श्रीरामें दशकंठ रविवरें
ब्रह्मास्त्रें उर भेदुनि वधिला, जो कंटक सद्धृदयामाधिला. ६९
दशमुख निगमशिरःप्रतिपाद्यें वधितां सुर वाजवितीं वाद्यें.
करिति कुसुमवृष्टि प्रभुवरि ते, झाले साधु कवि स्तव करिते. ७०
गंधर्ववर प्रभुयश गाती, जी स्त्री होय महा वशगा ती.
करिति अप्सरा बहुशत नृत्यें, श्रीरघुपतिचीं गावुनि कृत्यें. ७१
करवी दशवदनोत्तरकर्मे, स्थिर बसवि पदीं शिकवुनि धर्मे.
लेववि आत्मभजनपविवर्म प्रभुवर बिभीषणा दे शर्म. ७२
दिव्य करी प्रकटी शुद्धिस ती, प्रेक्षक निववि महाबुद्धि सती.

१. महाशत्रु. २. लांकूड. ३. वेदशिरोवंदनीय रामें. ४. उत्सवा—पंत.

प्रभुनें दशरथवचनें वरिली, सुयशें सुरमुनिकविमति हारिली. ७३
बसुनि पुष्पकीं राम परतला, जो राज्यसुखीं भरत न रतला,
त्यातें भेटुनि बहु निववि, खरी संधा करि, विश्वीं शिव विखरी. ७४
अभिषेक स्वीकारुनि राजा होय, सुरतरूंसि म्हणे 'लाजा.'
पौरांतें 'देवाधिक साजा,' विसरवि रघुसहित पिता आजा. ७५
नृपतिशतें रघुसिंहास नतें झालीं, वरितां सिंहासन तें.
कपिराक्षस बळसह गौरवि ते, गुण गाववि, यश शिवगौर वितें. ७६
वदला प्रभु निजपदराजीवप्रणता मारुतिस ' चिरं जीव,
कीर्तिरत धरी न दरा जीव, प्रिय करि चारु, तिस चि रंजीव.' ७७
प्रभु करि आरिपद परमगती तें, वरिति न कां पद पर मग तीर्तें?
वदलें ज्याचें मुख न वच रितें विश्वा दावी सुख नव चरितें. ७८
जो रंका दे सुषमा[1] नावें, अमृतरसा यत्तुष[2] मानावें,
त्याच्या शिर नमन सदा चरणा करु, या त्यजु न मन सदाचरणा. ७९
'कल्याणरामायण' हें मयूरें रामनंदनें,
वाहिलें रामचरणीं कृतसाष्टांगवंदनें. ८०

इति श्रीकल्याणरामायणं संपूर्ण ।

---

# श्रवणामृतरामायण

( नर्कुटकं )

दशरथनंदन त्रिभुवनप्रभु होय, दया
करि भजकांवरि, स्वजनचातकतोयद या;
सुरुचिस ठेविलें रुचिर नाम हि 'राम' असें
स्वजपरता म्हणे, 'गतिस होउनि धाम असें.' १
प्रभुवर कोसलाधिपसुतासुत होय जसा,

---

१. अतिशय शोभा. २. ज्याचें टरफल.

भरत हि तो चि, जो वरपद प्रभुभक्तिरसा;
गुणनिधि लक्ष्मण, स्तुत अरिघ्न चतुर्थ कृपा
करुनि, सुपुत्र शर्म बहु दाखवि साधुनृपा. २
प्रथम चि गाधिजक्रतुविनाशकरांत करी,
चरणरजें महामुनिसतीप्रखराघ हरी,
हरधनु भंगुनि क्षितिसुतेप्रति राम वरी,
जनकसुतोर्मिळाकर हि लक्ष्मण वीर धरी. ३
भरत अरिघ्न जे वरिति ते जनकानुजजा,
हरि रघुवीर राम सकळा भृगुरामरजा[1],
प्रभु भरतप्रसूप्रिय करी, 'पितृसत्यधना
व्यय न घडो,' म्हणे, वरुनि वल्कल जाय वना. ४
प्रमुदित लक्ष्मणक्षितिसुतायुत साधु निघे,
वसुनि तपोवनीं मुनिजनप्रिय साधुनि घे;
नृप विरहीं मरे, भरत ये प्रभुला शरण,
प्रभुवरपादुका करिति तच्छ्रमसंहरण. ५
सुखउनि अत्रितें, मग करूनि विराधवधा,
विमळयशें म्हणे मुनिजनांसि रमाधव 'धा';
श्रुतियुगनासिका अनुज योजुनि कापविली,
खचरपतिस्वसा कुमति दंडुनि तापविली. ६
सकटक मर्दिला खर निशाचर; शूर्पणखा
दशवदना म्हणे, 'खळनराप्रति आपण खा.'
कपट करूनि, तो जनकजेसि कुधी उडवी;
वधुनि जटायुला, प्रभुवरा असुखीं बुडवी. ७
पवनसुत स्वयें रविसुता सुगळा अजिता
मिळवि; उरीं दिला रघुवरें हरिभू[2] न जिता.
पवनसुतें पयोनिधि विलंघुनि, भूमिसुता

१. रजोगुणजन्य क्रोधादि दोष. २. इंद्रपुत्र वाळी.

सुखविलि, मुद्रिका जपुनि देवुनि, विश्वनुता. ८
खळबळ मर्दिलें, नगर जाळुनियां अरितें
भिववुनि अर्पिला प्रमद दंभनरा हारितें.
अभित सुरांश ऋक्ष, कपि ने······भिववी
जलधिस, देवराजनयनें प्रभु तो निववी. ९
दशवदनानुजें नति सकृत् करितां चि, तया
प्रभुवर राज्य दे, करि पित्याहुनि फार दया.
रचवुनि सेतुतें, जलधितें उतरे, अरितें
कळवि, 'यश, क्रिया बरवि न त्यजितां वारितें.' १०
कुमति दशानन त्यजुनि साम, करी समर;
प्रभु हि म्हणे तया, मृगप जेंवि करीस 'मर.'
जय न दिसे, बळक्षय चि; मेघरवें अहितें
प्रभुयुगबंधनेंकरुनि कांपविलें महितें. ११
सकळखगेंद्र जो, भुजगबंधन तो हरि; तें
हृदय भरी मेंहे, गमवि ज्या गुरु मोह, रितें.
प्रमुदित सानुज प्रभु उठे, सु[1]र 'तोयज' या
'रवि' विनतासुता म्हणति; सिद्ध चि होय जया. १२
मग घटकर्ण ये धरि रविप्रभवास, वधी
अजित तया, यशें निववि सामर वासवधी.
घनरव सर्व ते प्रभुसमेत सुवीर खिळी,
अजगरसा चि तो प्र[2]बळ मोह, तयांसि गिळी. १३
उठवि मरुत्सुत त्वरित, ओषधिपर्वत तें
यश मिळवी, मे[3]हें जग भरी बळ सर्व त[3]तें.
कपटसतीवधें म्हणवि, 'हाय!' तया सरणी
धरवुनि मृत्युची, सुपद होय जयास रणीं. १४

---

१. सुर विनतासुता (गरुडा) रवि [आणि] या (सानुज प्रभुला) तोयज म्हणती. २. हस्तदोष—प्रब. ३. विस्तृत—अत्यंत—आनंदानें.

घनरव लक्ष्मणें निवटितां, दशकंठ रडे,
  धरि महिजावधा असि, सुमंत्रिप आड पडे.
बळ चतुरंग जें प्रभुवधा खळ पाठवि, तें
  भसित करि, प्रभु त्रिदशमानस आठवितें. १५
खरतरशक्तिनें मग विदारुनि वक्ष, अरी
  सुविकळ लक्ष्मणा रघुवरा हि, मुहूर्त, करी.
उठवि रणीं तया कपि महौषधिशृंग जवें
  पुनरपि आणुनि, स्वयश गाववि भव्य नवें. १६
परमविभूतिचा, वरुनि शक्ररथासि, धणी,
  रण करि भारती, दिवसरात्रि हि सप्त, गणी.
चळवळ कांपवि क्षितिसि, कंपित राजफणी.
  न घणमणी शिरें उडवितां शत यातुमणी. १७
घटज सुमंत्र दे, द्युमणि ही वर, तच्छमना[1],
  वधुनि दशानना, वरि जय, प्रभु अच्छमना[2].
'जय! जय!' बोलिले, कुसुमवृष्टि करूनि, सुर.
  द्रुहिण म्हणे, 'द्विजव्रज सुकर्म करू निर्सुर.' १८
दशवदनक्रिया करवुनि, प्रभु राज्यपदीं
  बसवि बिभीषणा सुचिर, [4]जेंवि झषासि नदीं.
मग करि दिव्य ती सुकृतकीर्ति, अनादि सती.
  दशरथ मेघ ते, सुत मयूर, जना दिसती. १९
रणमृत सैन्य तें अमृत वर्षुनि वांचविलें.
  सुरपतिनें यश प्रभुयशासम सांचविलें.
प्रभुवचनें करी सुगळसत्कृति फार बरी.
  धनदविमान दे, कवि बिभीषण पाय धरी. २०
बसवुनि पुष्पकीं, सबळ कीशपलाशपती,

१. कल्याणरामायण श्लोक १६ वा चरण ४ था टीप पहा. २. शुद्ध मन ज्यानें. ( मागील टीप पहा ). ३. निर्धास्त. ४. हस्तदोष–चेंवि.

बसुनि सदार सानुज, निघे प्रभु वायुगती.
रणमहि दाखवि प्रभु सतीस, सुवीरकथा
कथि, अवलोकवी नळकृताद्भुतसेतुपथा. २१
स्थळ कळवी, कथी, "मज बिभीषण देवि! 'जय'
प्रथम म्हणे 'रणीं अतुळ साधुनि दे विजय.'"
मग सुगळाप्तिची[1] हितकथा तिस आयकवी,
त्यजिल अशा रसा, इतर वर्णुनि काय कवि? २२
चिरविरहव्यथाशतकथा हि रसें कथित,
प्रथितयशा सुखी करि सतीमन, जें व्यथित.
स्थळ अनुभूत तें अखिळ दाखवि, ये नगरा,
प्रभु भरतासुखा उरवि, शंभु जसा, न, गरा. २३
करि अभिषेक या प्रभुवरासि वसिष्ठमुनी,
स्तवि विभुकीर्तितें कविसभा, तसि देवधुनी.
सुगळबिभीषणप्रमुख सर्व हि हर्षउनीं
गमवि गुणें उणें अमृत, सद्रस वर्षउनीं. २४
पवनसुतीं करी बहु दया, वर दे, शतदा
उपकृति आठवी, स्तवि हि तो वरदेश तदा.
अति सुखवि प्रजा सकळभक्तमयूरघन
त्रिभुवनपावनस्मरणकीर्तन सुज्ञघन. २५

इति श्रीरामनंदनमयूरविरचितं श्रवणामृतरामायणं समाप्तं ।

---

१. आप्ति–प्रमप्ति.

# वरदरामायण

( प्रमिताक्षरा )

त्रिजगीं[1] नगीं अखिल जो कनक, स्तविती जया शिव विधी सनक,
निजतत्वबोधनिधिचा खनक, प्रभु तो करी दशरथा जनक. १
शुभ 'राम' हें रुचिर नाम धरी, अनुज स्वयें भरत होय हरी,
मग लक्ष्मण प्रभु अरिघ्न हि, तें कारि सच्चतुष्टय समस्तहितें. २
कारि गाधिजक्रतुसुरक्षण हो! वदले जयें बहु सुर 'क्षण[2] हो.'
प्रभु उद्धरी मुनिवधू, कुशिला यश फार दे जननिच्या कुशिला. ३
त्रिपुरारिचें सकळयोधनुतें, मग मोडिलें प्रथित जें धनु तें.
वरिली रमा जनकजा नवरी, नव रीति जी न, इतरा न वरी. ४
मग लक्ष्मणासि जनकात्मभवा वरि ऊर्मिळा सुगुणसिद्धिभवा.
करि मांडवी हि भरतासि पती, श्रुतकीर्ति ही चवथियासि सती. ५
भृगुराम कोप करि, त्या कळवी निज भव्य तेज, भजनीं वळवी;
निजधर्ममार्गि हित तो धरवी परवीरहत्तिमिरयोधरवी[3]. ६
निववि प्रभु स्वविजयें पुर तें, सुख दाखवी गुरुजना पुरतें.
भरतासि मातुळ, पुसोनि नृपा, स्वपुरासि [ने], कारि उदंड कृपा. ७
युवराज राम करितां खवळे भरतप्रसू, विनवितां न वळे.
वर घे दिले, 'स्वसुत राज्य करू,' 'मनु अब्द राम वनवास वरू.' ८
नृप सत्यपुत्रविरहीं अडला. बहु वृद्ध तो म्हणुनि 'हा!' रडला.
वनवास मानुनि बरा मनिं, घे गुरुचा निरोप, रघुराम निघे.' ९
त्यजि लक्ष्मण क्षितिसुता हि न ती, प्रभु घे तयांसि करितां विनती.
करि शोक फार निघतां चि तिवें, 'हृदया!' म्हणे नृप 'तमांत रिघें.'
पुर 'हा!' वदे. निरखि पत्ति पथीं, बसवी सुमंत्र नरनाथ रथीं.
प्रभुतें सखा गुह सजी सुतरी, अमरापगापरतटीं उतरी. ११

१. सर्व त्रिजगरूप अलंकारांतील सोनें च असा म्हणजे त्रैलोक्याचें मूळस्वरूप असा. २. आनंदोत्सव. ३. परवीरनाशक योद्धा. ४. हस्तदोष—**मनि**.

फिरवूनि सूत, निजधर्ममखादृतचित्तवृत्ति, कवि, तातसखा,
सुमुनि प्रयागगत हर्षविला; स्वशिरीं दृगंबु बहु वर्षविला. १२
मग चित्रकूटनग धन्य करी, निववी न विप्र, हरि, वन्य करी.
कथि तें सुमंत्र; करितां स्मरण प्रभुचें नृपास घडलें मरण. १३
भरतासि ते सचिव आणविती; जननी तया अहित जाणवि ती.
तिस, आपणा हि, बहु निंदुनि घे, परि तद्यशस्तवनिं इंदु निघे. १४
नमि कोसलेंद्रतनयेसि कवी, कथि साश्रु, 'हा!' न तिस हें सिकवी.
धरि पोटिसीं दृढ सती, निववी, करि साधु बोध, भरता जिववी. १५
करुनि क्रिया, उचित साधुनि घे; फिरवावया प्रभुसि साधु निघे.
धरि वाट जो गुह तया वळवी, शपथादिकें स्वशुचिता कळवी. १६
नमुनि प्रयागगतसन्मुनितें, सुख दे अभीष्ट बहु जन्मुनि तें.
मग भेटुनि प्रभुसि साश्रु करी; पितृतर्पणावधि च धैर्य धरी. १७
प्रभुपादपद्मयुग तो कवळी; परि सत्यसंधमतितें न वळी.
समजाविती सुमुनि जे जवळि; प्रभु ही यशें त्रिभुवना धवळी. १८
'पितृसत्यवागवन तूं हि करीं, पण तों शिरीं अवनिभार धरीं.'
प्रभु यापरि प्रिय यथार्थ वदे, निजपादुकामिषमहोत्सव दे. १९
परते, परंतु नगरीं न वसे, गणि राज्यभोग हृदयीं शवसे.
प्रभु अत्रितें नमि, तदीय सती करि जानकीस चिर मुद्वसती. २०
वधिला विराध परि उद्धारिला, ऋषिनीं प्रहर्ष हृदयीं धरिला.
शरभंग, कुंभज, सुतीक्ष्ण मुनी प्रभुनें वनीं निववले नमुनीं. २१
बहु मानिला गुरुतसा चि जगज्जनकें पितृप्रिय जटायु खग.
धरि जीपुढें न दुरितादि तग क्षण, गौतमी वारिलि सिंधु मग. २२
दलगेह पंचवटिकेंत रची, सजि राक्षसी स्ववपु जेंवि शची.
प्रभुला हि दावि कुच पीनें, कटी; करि धीर लक्ष्मण तिला नकटी. २३
खवळे तिचा कुमति भावु खर, प्रभुनें ससैन्य वधिला प्रखर.

---

१. स्वधर्मयज्ञाचे ठिकाणीं सादर चित्तवृत्ति ज्याची असा. २. आनंदाचें माहेरघर. ३. नदी. ४. पुष्ट.

दशकंठ हेममृग दावि वनीं, धरवी सती धरुनि लोभ मनीं. २४
प्रभु धांवतां सभय एण पळे; कारि विद्ध, राक्षस मनांत कळे.
प्रभुच्या स्वरें खचर 'हाय!' वदे, धृति देवरोक्ति महिजेसि न दे. २५
'नसतां तुझ्या मदभिलाष मनीं, न उपेक्षितासि पतिघात वनीं.'
वदली असें जनकजा कटु, तें कारि साश्रु, खिन्न, दवडी पटुतें. २६
निघतां चि लक्ष्मण सतीस हरी दशकंठ, जेंवि हरिणीस हरी.
कारि भंग, सोडवि जटायु; परी खगपक्ष तोडि, तिस ने चि अरी. २७
प्रभु पावला प्रियतमाविरहा, वदला वनीं हुडकितां चिर 'हा!'
कळवि क्षतार्त खग, 'हानि घना घडली' वरी हि मग हा निधना. २८
प्रभु 'हा!' कृतातिखळकुत्स[1] वदे. मुनिमानसासि बहु उत्सव दे.
करुनि क्रिया पितृसखा सुखवी, शिव नंदनस्थ[2] न असे रुख वी. २९
धरि जो कबंध अशनार्थ तया प्रभु उद्धरी, करि असीम दया.
अनुगा मतंगमुनिची शबरी, गति दे तिला त्रिजगदीश बरी. ३०
सुख वातज प्रथम दे हरितें. धृतिनें भरी सुगळ देह रितें[3].
प्रभु त्या म्हणे, 'न सुख वाळिव, धा;' कारि तत्प्रियार्थ खळवाळिवधा.
म्हणता यमासि, 'गिळिल्या उगळ!' प्रभु तो कपीश्वर करी सुगळ.
श्रमले न देखति च योधकपी; स्वयशासि मारुति च शोधक पी. ३२
गणि वीर गोष्पद चि तो जळधी; सुखवी रमेसि, दुखवी खळधी.
हर हर्षवी परपुरीभसितें; स्वसितें[4] यशें करि जगें हसितें. ३३
मनि जी म्हणे, 'श्रम विरो' पतिचा, प्रभुला कथी हित निरोप तिचा.
कपि दे शिरोमणि, पदी[5] नमनें कारि, हर्षवी बहु अदीनमनें. ३४
चिर भेटला प्रभु तया कपिला; न असी सुतीं हि सदया कपिला.
श्रुतिगीत तो कविसम स्तवि त्या, गुरुसा चि दास हि समस्तवित्या. ३५
कपि जाणवी, 'अरि असामकर, ग्रसिता नसे परि असा मकर.
सजला कुधी धरुनि काम, रणा प्रभुजी! असत्तरु[6] निका मरणा.' ३६

---

१. अत्यंत दुष्टांना न निंदा केली आहे ज्यांची. २. कल्पवृक्ष. ३. निरुत्साह.
४. स्वतःच्या निर्मळ यशानें. ५. यमकार्थ निरनुस्वार? ६. विषवृक्ष—पंत.

अमितामरांशकपिसैन्ययुत प्रभु घे सखा सुगळ, सूर्यसुत.
द्रुत जाय सागरतटीं, उतरे; आरितें म्हणे, 'सकुळ हो हुत रे !' ३७
अपमानिला हित बरें कथिता; नमि तो बिभीषण गुणप्रथिता.
शिवतां पदांसि, पद दे व्यथिता प्रभु जो स्मराद्यरिचमूमथिता. ३८
प्रभु भीतसिंधुवचनें वळला, प्रणतीं न कोपुनि कधीं मळला.
करवूनि सेतु, कुतुकें उतरे; वदला अरीस 'न मदें उत रे!' ३९
खळ दावि चाप शिर ही लटिकें, धृतितें सती मनिं म्हणे 'न टिकें.'
समजे सती न कपटा परमा, कळवी बिभीषणवधू सरमा. ४०
प्रभुचा सखा निरखितां अरितें, करि तें रुचे बहुत जें हरितें.
उरगीं जसा गरुड तेंवि पडे, क्षण यापुढें अहिततेज दडे. ४१
न लवे दशास्य, कथि अंगद या, 'प्रभुची न वांछि तव भंग दया.
कर साम, आजिस न राम सजो; बुडतो अधर्मरत तामस जो.' ४२
दशतुंड पुंड खवळे, धरवी. परवीर ते वधुनि 'हा!' करवी.
प्रभुसीं भिडे. वरमदें खळ हा, बळहानिहेतु उभवी[1] कळहा. ४३
बळप प्रहस्त पाहिला खपला. घटकर्ण ही, जरि बरा तपला.
न घनध्वनीस जय ये कपटें, ज्वलदग्निबंधन घडे न पटें. ४४
अहिपाश पक्षिपतिनें हरिला, बळभंग दुःखित करी अरिला.
उडवी मरुज्ज अगदें सबळप्रभुशल्यमोह जरि हि प्रबळ. ४५
जनकात्मजानिधन दाखविलें; प्रभुला हि शोकविष चाखविलें.
वधि लक्ष्मण त्रिदशपत्यरितें, पडतें कुबुद्धिमह[2] सत्य रितें. ४६
सुतशोकतप्त दशकंठ 'असी न बरी' म्हणे, धरि वधार्थ असी.
फिरवी करूनि सचिव स्तुतितें, जगवि प्रभुस्मरण वस्तु[3] तितें. ४७
अरिनें मृत स्वकुळ आठविलें, प्रभुच्या वधा कटक पाठविलें;
प्रभुसीं बरें चि समरीं झटलें, विशिरस्क[4] ही अतिरसें नटलें. ४८
बुडतां हि संतति दशानन, ती, करि भेटतां तसि दशा, न नती,
न विलोकि आयु धन, हा लवला, न धरूनि आयुध न हालवला. ४९

१. उभारी. २. दुष्टबुद्धि अशाचें तेज. ३. वस्तुतः ४. कबंधरूपानें.

बहु कोटि मर्दुनि रणांत हरी प्रकटी महाप्रलयरीति खरी.
परमेश्वरानुजनिवक्ष अरी खरशक्तिनें दृढ हि विद्ध करी. ५०
कपि त्या सदोषधिरसें जगवी; मग वीर[1]राजद्युतितें तगवी.
जग वीतसे सहज जो अज, या रज याचिता हरि[2] गमे अजया. ५१
पविभृद्रथीं बसुनियां रिपुला निजशक्ति दाखवि रणीं विपुला;
दिन सप्त रात्र हि करी समर, प्रभु त्या म्हणे मरुदरींसे[3] 'मर'. ५२
शत मस्तकें उडवि राम, तरी दिसती तसीं च, न मरे चि अरी.
प्रभु आधितें स्वहृदयांत धरी, उपदेश कुंभज जयार्थ करी. ५३
रवि दे दशास्यदलनार्थ वर, प्रभु पद्मजा[4]स्त्रयुत योजि शर.
हृदया विदारुनि वधी अरितें, निववी रमेश हरितें, अरितें. ५४
वर दुंदुभिध्वनि उठे, करिती सुर पुष्पवृष्टि, नुति आदरिती,
अमरी विजेसि बहु लाजविती, पटु गाति, वाद्यशत वाजविती. ५५
वदले महेशविधिनारद 'या प्रभुची च तोषविति फार दया.
रति दे चि ना अशि वसु स्वरगों[5]; प्रभु नाशितो अशिव, सुस्वर गा.'
अरिदारशोक पहिला हरवी, मग तक्रिया हि बरवी करवी;
शरणागता चिरपदीं मिरवी, प्रभु पौर गौरवि, तया निरवी. ५७
करि दिव्य कीर्तिकर भूतनया, स्तविती सुरर्षि बहु पूतनया.
म्हणती, स्तुती न कवि नूतन या; नसती[6] अशा दुरित धूत नयाँ. ५८
मग भेटला दशरथ स्वसुता, अमृतें हरी हरिबळव्यसुता,
प्रभुच्या बिभीषण पदा विनवी, अणु रीति तो नत न दावि नवी. ५९
प्रभु पूजवी कपिचमूपतितें, करि तो बिभीषण महामति तें,
मग पुष्पकांत बसवि प्रभुला, वदले, 'यशा[7]' सुर सविप्र 'भुलों.' ६०
कपियातुप प्लवग ही अवघे निजपुष्पकीं जनकजाधव घे,

---

१. राम—**पंत**. २. पराभवहरिता कपि गमला—**पंत**. ३. देवशत्रूस. ४. ब्रह्मास्त्राभिमंत्रित. ५. कल्पवृक्षानें दिलेली संपत्ति. ६. जसी सीता दुरित धूती अशा गंगादि सरिता दुरित धूत नसती—**पंत**. ७. प्रभुयशाहूनी अधिक काहीं नाहीं असें अन्योन्य वदले—**पंत**.

मग तो निघे प्रभु ससीत[1] न या, जासि कीर्ति, भूमिचि तसी तनया.
परमादरें निरखि सेतुस ती, समजे तया विजयहेतु सती.
स्तवि वायुजा स्वभजनानळसा, न गणी मनीं पटु दुजा नळसा[3]. ६२
प्रभुच्या मुखें रणकथा परिसे, स्ववियोगवासर हि जे आरिसे,
विजयें निवे, बहु धरी रुचितें, तिस शोभवी यश महाशुचि तें. ६३
सुगळप्रियेस हि विमानवरीं बसवी समीप चि धरूनि करीं,
भरतासि मारुतिमुखें कळवी, प्रभु दर्शनें तदसुखा पळवी. ६४
अभिषिक्त होउनि पदीं बसला प्रभु, तों महोत्सव जगीं बसला;
भरतासि राम युवराज करी, सुयशें जगद्धृदयवृत्ति हरी. ६५
स्वरिपूंसि 'होउनि परासु गळा,' म्हणल्या सख्या हितपरा सुगळा,
करि पूजुनि स्तवुनि धन्यतम प्रभु नाशिता प्रकृतिजन्य तम. ६६
कवि ते मयूर नटवी, निववी, श्रितचातकांसि अमृतें जिववी,
भारि अंजनाभवनदास[4] महादय कंजनाभ वनदासम हा. ६७

इति श्रीरामनंदनमयूरविरचितं वरदरामायणं समाप्तं ।

---

# रामायणकथासुधा

(विद्युन्मालावृत्त)

श्रीभर्ता ब्रह्याच्या स्तोत्रा मानी, श्री दे भास्वद्गोत्रा[5];
कौसल्येच्या पोटा आला, स्वभ्राते हि स्वांशें झाला. १
भव्या रामाख्या स्वीकारी, संपादी सद्विद्या सारी,
आर्धी सद्यज्ञातें पाळी, साध्वीच्या प्राणस्वा टाळी. २
मोडी त्र्यक्षाच्या चापातें, वारी सीतेच्या तापातें,
वैदेहाच्या चौघी कन्या जोडी योग्या रम्या धन्या. ३

---

१. सीतेसह. २. बहुमता—पंत. अध्याहारार्थ पद. ३. नळवानरासारखा. ४. मारुतिरूप नदास. ५. सूर्यवंशाला.

ठावी होती ज्या न क्षांती[1] त्र्यक्षच्छात्रा त्या दे शांति,
मातेच्या पूज्यत्वा लक्षी, ताताच्या सत्यातें रक्षी[2]. ४
अग्न्याद्यपि प्रेमें वंदी ज्याचे वेद स्वर्गीं बंदी,
जो पारावारातें प्राशी त्या विप्रेंद्राच्या घे आशी. ५
गृध्रेंद्रा ताताच्या मित्रा भेटे, योजी लीला चित्रा,
... ... ... ... ... ... ...[3] ६
जीचा आशाकंठ भ्राता, जो दे कंप स्वर्गिव्राता,
त्या पापेची नासा खंडी; तीचे कैवारी ही दंडी. ७
मारीच स्वर्णैणच्छद्मा दिक्कंठ प्रेषी, त्या पद्मा
पाहे, स्वामीपासीं मागे, त्यामागे तो धन्वी लागे. ८
बाणें मर्मीं एणा हाणी, 'हा सीते! सौमित्रे!' वाणी
ऐसी बोले रामावाणी, ऐके, भी रामाची राणी. ९
सौमित्रीतें खिन्नस्वांता सांगे, 'जा, संरक्षीं कांता,'
तो प्रार्थी, 'हे रक्षोमाया स्वामीच्या वाणीची छाया.' १०
ती मानी त्या भक्ता खोटा, दे खेद क्ष्माकन्या मोटा,
रामातें सांगाया जोडी हस्त भ्रीतें, शाळा सोडी. ११
संन्यासीसा ये शाळेतें, ने दिक्कंठ क्ष्माबाळेतें,
ती स्त्री नेतां हाका फोडी, त्राल्या गृध्रा खड्गें तोडी. १२
कीशांमध्यें टाकी भूषा, पावे मंदत्वातें पूषा[6],
लंकेंत स्वारामीं स्थापी, दापी कामी क्रोधी पापी. १३
राम श्रीविश्लेषें शोका कोणाच्या तो दावी लोका,
विश्वाचा जो धाता तो या दे गृध्रेंद्रा ताता तोया. १४

१. सहनशीलता. २. सोडलेला पाठ—लक्षि. ३. या ठिकाणीं पूर्वीच्या आवृत्त्यांतून "**सांगे, 'गोदातीरीं प्राज्ञा! राहें.' वंदी त्याची आज्ञा.**" असा उत्तरार्ध आढळतो. पण पंतांच्या स्वदस्तूरच्या प्रतींत व चातुर्मास्यांच्या हि प्रतींत उत्तरार्ध नाहीं इतकेंच नव्हे, तर पांचवा श्लोक सहा चरणांचा दाखविला आहे!
४. दिक्कंठ (रावण). ५. सीता. ६. सूर्य.

ज्यो मूर्धा नाहीं तो[1] खाया पाहे स्वामी दे तोखा या,
दिव्या भक्ता भिल्ली केली, श्रीरामें स्वस्थाना नेली. १५
पाहे जेव्हां रम्या पंपा श्रीविश्लेषें पावे कंपा,
तो भेटे वाताच्या तोका, सुग्रीवाचा वारी धोका. १६
उद्धृत्ता[2] वाळीतें मारी, मित्रा दे राज्यश्री भारी,
तो राजा लावाया शोध श्रीचा धाडी मोटे योध. १७
वाताच्या पुत्रानें सीता केली हृष्टा चिंताभीता,
दे तीस स्वामीची मुद्रा, जाळी लंका, गांजी क्षुद्रा. १८
श्रीश श्रीच्या चूडारत्नें केला हृष्ट प्राज्यें यत्नें,
आलिंगी प्रेमें भृत्यातें, वर्णी त्याच्या त्या कृत्यातें. १९
‘कीशांच्या ऋक्षांच्या कोटी जीमध्यें ऐसी ती मोटी
सेना ने सिंधूच्या तीरा’ हें सांगे सुग्रीवा वीरा. २०
ज्याचे बाहु स्वर्गीं गावे तो पारावारातें पावे,
वंदी शत्रुभ्राता प्राज्यप्रेमें, दे त्या लंकाराज्य. २१
निर्मी पारावारीं सेतु स्वामी जो विश्वाचा हेतु,
मत्ता हंता तो भासेना, पावे फार क्षोभा सेना. २२
मानी मानीना सामातें, खोटें[3] मानेना रामातें,
मर्दी त्या द्वेष्ट्याचें सैन्य, स्वामी दे योद्ध्यांतें दैन्य. २३
सेनापाळा कुंभश्रोत्रा भंगी जैसा वज्री गोत्रा,
मेघध्वानाच्या ज्या माया मानी लीला विश्वें गाया. २४
तार्क्ष्यीं अक्षघ्नां[4] दे थोरी स्वज्ञाना सामर्थ्या चोरी,
लीलामर्त्य ब्रह्मस्रष्टा कीर्त्यर्थ स्वीकारी कष्टा. २५
द्वेषी मायासीता मारी, सौमित्री त्यातें संहारी;
पुत्राच्या शोकें दिक्तुंड श्रीतें मारूं पाहे पुंड. २६
त्यातें ज्ञाता मंत्री वारी. युद्धा धाडी सेना भारी,
तीतें सीताभर्ता मारी कल्पांतीं जैसा कामारी. २७

---

१. कवंध. २. मस्त, दांडग्या. ३. हस्तदोष-खाटें. ४. मारुतीला.

सौमित्रीतें वक्षीं ताडी दिक्कंठ, क्ष्मापृष्ठीं पाडी,
त्या श्रीभर्ता भंगी आधीं क्षोभे जेंवि व्याघ्री व्याधीं. २८
भ्रातृस्नेहें तो 'हा!' वाणी बोले अन्या जीवावाणी,
अक्षारी त्या शृंगा आणी, सौमित्रींची मूर्च्छा खाणी. २९
देवेंद्राच्या बैसे यानीं ज्याचे पाय ज्ञानिध्यानीं,
सप्ताहोरात्र क्रूरासीं भांडे स्वामी त्या शूरासीं. ३०
तच्छीर्षें बाणाहीं झालीं छिन्नें होतीं तैसीं आलीं,
वाटे स्वामीला कीं, काहीं शक्ति स्वांगीं शस्त्रीं नाहीं. ३१
कुंभोत्पन्नर्षि श्रीसूरा प्रार्थूं बोधी आद्या शूरा,
तो सांगे या, 'मारीं बा ! हूं भव्य त्रैलोक्या दे पाहूं.' ३२
योजी ब्रह्मास्त्रातें बाणीं तेणें तद्वक्षातें हाणी,
पाडी, मार्गों नेदी पाणी, झाले हर्षी सर्व प्राणी. ३३
नेतां अंता तो सर्वांधें झालीं उन्नादें स्ववांधें,
गंधर्वांहीं गातां कृत्य स्ववेश्याहीं केलें नृत्य. ३४
देवानीं पुष्पांच्या वृष्टी केल्या, हर्षें कोंदे सृष्टी,
ब्रह्मा आरंभी स्तोत्रा त्या प्रार्थी कैवारी हो! त्राल्या. ३५
केलें तैशाचें ही गात्र श्रीशें संस्काराचें पात्र;
तो ही लंकाभर्ता दास स्पर्शेना ज्या काळ त्रास. ३६
दिव्योत्तीर्णा सीता देवी स्वामीच्या वामांका सेवी,
भेटे वंदूं दे तो तात प्रेह्व[2] ज्ञानी ज्या होतात. ३७
त्या युद्धीं जे मेले होते शक्रें जागे केले हो! ते,
बैसे वित्तेशाच्या यानीं[1] स्वामी जैसा योगिध्यानीं. ३८
सेत्वालोकें चित्तीं हर्षे, प्रेमाश्रु श्रीदेवी वर्षे,
तारा सुग्रीवाची राणी जी तीतें त्या यानीं आणी. ३९
श्रीश श्रीतें गोदा दावी गावी जी सप्रेम ध्यावी,
विप्रांचीं ही भव्य स्थानें जाती पापें ज्याच्या गानें. ४०

१. रथांत. २. नम्र.

वालाच्या पुत्रातें ध्याल्या 'आलों' हें सांगाया आल्या
आधीं वात्सल्यें तो प्रेषी, ज्याचे होती मुक्त द्वेषी. ४१
शुद्धा बुद्धा सेवासक्ता भेटे श्रीश भ्रात्या भक्ता.
राजस्थानीं ठाके तातें जें द्यावें दे साकेता तें. ४२
तो वारी भूतापा राजा, 'संसाराब्धीच्या पारा जा'
हें सांगे, जो दासा मोरा ये द्याया मोदा सामोरा. ४३
रामात्मजें मयूरें हे रामायणकथासुधा
वाहिली रामचरणीं तर्पाया रसिका बुधा. ४४

इति श्रीरामायणकथासुधा संपूर्णा ।

---

# दोहासोरठारामायण

विधि विज्ञप्तिस्तुति करी दशमुख मारायास,
झाला दशरथसुत हरी त्रिभुवन तारायास. १
रामाख्य श्रीचा धणी, कौसल्येचा बाळ;
कैकेयीचा सन्मणी भरत साधुजनपाळ. २
सुगुण सुमित्रासुत कवी लक्ष्मण रघुकुळहीर,
आश्रितजननीरजरवी शत्रुघ्न दुजा वीर. ३
राम सलक्ष्मण गाधिजा सुखवी, रक्षुनि यज्ञ,
गुरु कथि राज्या आधि ज्या, तो प्रिय लक्ष्य नयज्ञ. ४
रामें उद्धरिली शिला गौतमभार्या तूर्ण,
आनंद त्रिजगा दिला, करुनि मनोरथ पूर्ण. ५
जनकपुरीं शिवसुधनुतें भंगी तो श्रीराम,
निजभुजतेजें बुधनुतें पुरवी सीताकाम. ६
तापे भृगुपति, परि हरी, योजुनि चापीं रोप,
लीलालेशें परिहरी त्याचा दारुण कोप. ७
जनकसुता प्रभुतें वरी, जीचें सीता नाम,

दुजी उर्मिळा ती धरी वरीं लक्ष्मणीं काम. ८
जनकानुजकन्या वरी मांडवी हि भरतास;
भर्ता श्रुतकीर्ति हि करी शत्रुघ्ना स्वरतास. ९
जिंकी राम प्रभु तया, देशिक[1] ज्याचा[2] शर्व,
अत्युग्रीं ही करि दया, 'धन्य!' म्हणति कवि सर्व. १०
साकेतीं उत्सव महा, नाकीं हि नवा होय;
दे सर्वां प्रभुयश महा, जैसें गंगातोय. ११
भरता आपुलिया पुरा मातुळ घेउनि जाय;
उवाळा कांता कापुरा लावी त्याची माय. १२
'राज्या! मनु वत्सर वनीं वसो मुनिव्रत राम,
युवराज भरत हो, मनीं माज्या ऐसा काम.' १३
मागे ऐसे दोन वर कैकेयी विषरूप,
समजुनि तीचा लोभभर, भी सत्यव्रत भूप. १४
सीतालक्ष्मणसह निघे सत्यरक्षणा राम,
तापससा हर्षें रिघे गहनीं जगदभिराम. १५
जातां राम प्रभु वना, म्हणे अयोध्या 'हाय!'
जेव्हां त्या निजजनधना[3] आज्ञा दे ती माय. १६
सचिवें सुरथीं वाहिला, भेटे सख्या गुहास;
वल्कलधर ही पाहिला तेणें राम सुहास. १७
फिरवुनि सुमंत्र, उतरला श्रीगंगेतें राम,
निश्चळ चित्ता सुतरला करिता जगदभिराम. १८
करी भरद्वाजर्षितें वंदन जेंवि छात्र,
तो ही हृदयें हर्षितें प्रभुला आशीःपात्र. १९
करी चित्रकूटीं नगीं जगन्निवास निवास,
पूजिति मुनि पाहुनि जगीं साक्षाज्जेंवि शिवास. २०
दशरथ सुतशोकीं पडे, मरे, खरा करि शाप;

१. गुरु. २. ज्या रावणाचा. ३. आपल्या आश्रितांचें धन अशा रामाला.

भरत आणिला तो रडे, स्मरुनि भ्राता बाप. २१
ताताची करुनि क्रिया, जाय शरण रामास,
अनादरुनि जननीप्रिया, त्यजुनि धराधामास. २२
फिरवि पादुका देउनीं सत्यसंध रघुवीर,
राहे त्यातें सेवुनीं नंदिग्रामीं धीर. २३
रामें सुतपःसदन मुनि अत्रि सुखविला फार;
सीतेनें ही पद नमुनि विनयें त्याचे दार. २४
'हाय!' म्हणों दे मुनिजना राम निराधारा न,
सेव्य करी सुतपोधना, वधुनि विराधा, रान. २५
हृदयें प्रेमळजनवशें गति दे शरभंगास,
लाजवि रघुवर निजयशें, दुग्धाब्धिवरभंगास[1]. २६
विभुला वैष्णवशस्त्रगण दे कुंभज हरिदत्त,
संहाराया करुनि पण, खळ खेचर[2] वरमत्त. २७
जो खग बहुमत शतमखा, ज्याचें जटायु नाम,
भेटे तातप्रियसखा त्या ब्रह्म घनश्याम. २८
गोदातीरीं मग वसे पंचवटींत सदार,
जो योग्यांस हि न गवसे, तो होय सुलभ फार. २९
दुर्मति दशकंठस्वसा शूर्पणखा धरि काम.
जीस अनय सर्वस्वसा, तीतें दंडी राम. ३०
खरमुख पातकशेवधी[3], जे कंपद अमरास,
लीलेनें प्रभु ते वधी, खळ येतां समरास. ३१
ज्याच्या स्त्रीचा जनक मय, कपट जयाचें वित्त,
करुनि खचर[4] मृग कनकमय, धाडी, भ्रमवी चित्त. ३२
पतिला मागे हरिण ती, लागे मार्गे राम;
लोभाचा हे परिणती[5], पावे राक्षसधाम. ३३

---

१. [दुग्धसमुद्राच्या] श्रेष्ठ तरंगास-पंत. २. रावण. ३. पापनिधि. ४. मारीच राक्षस. ५. फल.

हरिण, वेधितां उर शरें, प्रभुसा मारी हाक,
प्राणव्यसन गमे खरें, सिरे श्रीमनीं धाक. ३४
तो न धावतां, भाविला स्वाभिलाषरत दीर,
गांजुनि बाहिर लाविला सर्वसाधुमत धीर. ३५
जातां लक्ष्मण, ये अरी उटजीं यतिसा पाप.
भिववी सीतेतें, हरी, व्हाया कुललयताप. ३६
मोडी रथ गृध्राधिपति, सोडी श्रीतें रक्ष,
जोडी अघ अतिपापमति, तोडी खड्गें पक्ष. ३७
मूर्च्छित पाडुनि खगवरा, श्रीला म्हणवी 'हाय!'
भिववि धरा सवनाकरा[1], तीतें घेउनि जाय. ३८
उत्तरीयवस्त्रांत ती बांधी स्वालंकार,
गगनांतुनि सोडी सती, पाहुनि वानरवार[2]. ३९
श्रीस अशोकवनीं बळें तो ठेवी लंकेंत,
साध्वीतें हरितां छळें खळ न शिरे शंकेंत. ४०
सास्रु सुमित्रासुत पथीं भेटे, वंदी पाय,
त्यातें राम म्हणे, 'कथीं, वत्सा! झालें काय?' ४१
कथितां शोकीं प्रभु सिरे, धांवुनि उटजा जाय;
तें शून्य विलोकुनि विरे, वदे स्त्रैणसा 'हाय!' ४२
न निवे अनुजें बोधितां, भासे विरही कोकें[3],
दे बहु, गहनीं शोधितां, स्वजनकसख ही शोक. ४३
सांगे, 'नाहीं पावली रक्षण यापासून[4].
दशकंठें जसि बावली नेली, बापा! सून.' ४४
होवुनि खिन्न पराजयें, अंकीं सोडी प्राण.
सुतसा क्रिया करि स्वयें तो कृतकरिपत्राण[5]. ४५
गहनीं योजनभुज धरी, इच्छी घात कबंध,

१. अरण्यराजीसह. २. वानरसमूह. ३. चक्रवाक. ४. माझ्यापासून. ५. केलें आहे गजेन्द्राचें रक्षण ज्यानें असा राम.

तत्काळ प्रभुवर हरी त्याचा पातकबंध. ४६
विसरे पळ ही न शबरी, प्रभुला चिंती फार,
होय तिला गति वश बरी, सेवी यश ही सार. ४७
सेवुनि पंपातीर 'हा!' वदला विरही शूर,
देवुनि कंपा ती 'रहा' म्हणे 'विरागा[1]! दूर.' ४८
घन पवनतनयचातका, होय सुगळशाळीस,
वज्रपात कृतपातका शक्रसुता[2] वाळीस. ४९
कपिपति होवुनि आठवी, प्रभुनें केलें कार्य;
श्री शोधाया पाठवी भट रविनंदन आर्य. ५०
पवनतनय शत योजनें लंघी पारावार;
लंघूं चि नये जो जनें, भवसा दुस्तर फार. ५१
लंकादेवीचा करी तो लीलेनें भंग;
कीर्ति किंकरा दे बरी श्रीराम श्रीरंग. ५२
पुरी शोधितां भागला पटु पवनात्मज योध,
मग अशोकवनिं लागला श्रीसीतेचा शोध. ५३
तों तो कामी ये, वदे अश्राव्य असे बोल,
धैर्य सतीला देवें दे, होय न ज्याचें मोल. ५४
बहु धिक्कारी उद्धता देवी करि अपमान,
म्हणे तिची ती शुद्धता त्यां[3], 'तृण निजतप मान.' ५५
खळ जातां, ठेवी हरी चरणीं मुद्रा शीस,
पतिच्या जेव्हां ती वरी स्मरणीं मुद्राशीस[4]. ५६
कथुनि निरोप, श्री तया दे चूडामणि खूण,
म्हणे, 'करुत मजवरि दया प्रभुभुजकार्मुकतूण.' ५७
वन भंगी, करि युद्ध तें, निवधि बहु हरिस्वांत[5],
जरि पुर जाळी, उद्धतें गणिला न तरि स्वांत. ५८
सागर बहुयोजन कपी पुनरपि लंघी धीर,

१. वैराग्या! २. इन्द्र. ३. रावणाला. ४. आनंदाच्या राशीस. ५. इंद्रमन.

विश्वाचा तो जनक पी वृत्तसुधा रघुवीर. ५९
आलिंगी अत्यादरें राम पवनतनयास,
जैसा स्तव करिता भरें मेरु अवनत न यास. ६०
घे कटक मिळित आयतें जें कारि अग नग चूर्ण,
जाय विचारें आयतें, प्रभु जलधितटा तूर्ण. ६१
गुरुतम निजतप मानिलें, मत्तें प्रभुचें ऊन,
बंधुरत्न अपमानिलें, कुमतमद्य सेवून. ६२
लंकाराज्य बिभीषणा प्रभु दे नमितां पाय;
कनकाचळ चि करी कर्णा[2], कृपा वदावी काय? ६३
शर कोदंड प्रभु धरी, सजे म्हणाया 'संप'.
भेटे सिंधु, स्तुति करी, नमी चरण धृतकंप. ६४
सागरवचनें नळ रची शतयोजन[3] दृढ सेतु,
त्या पाहोनि म्हणे शची, 'हो देवविजयहेतु.' ६५
कपटी दशमुख पाहवी प्रभुचें मस्तक चाप,
सीताधृतितें वाहवी, देऊनि दुःसह ताप. ६६
बिभीषणस्त्री बहु बरी, सरमा जीचें नाम,
ती श्रीशोकभ्रम हरी, वर्णुनि विजयी राम. ६७
उतरुनि नळकपिकृतपथें स्वबळसहित जळधीस,
अजितें अतुळामळकथें, भय दिधलें खळधीस. ६८
सुगळें प्रथम चि तुडविला, गरुडें जैसा साप,
मुकुट शिरींचा उडविला, दिधला भंगुनि ताप. ६९
साम कराया धाडिला प्रभुनें अंगद दूत,
न वळे रावण ताडिला वचनें जैसा भूत. ७०
राम म्हणे, 'उतरील रण, हारिहो! याचा रेंच,
सकुळ भस्म वरमत्त पण, आरि हो या चोरें[4] च.' ७१
होतां संगर, राहिले व्यसु होवुनि बहु शूर,

१. विस्तृत, पोक्त अशा. २. रजःकणाला. ३. प. लि. हस्तदोष—सत. ४. चेष्टेनें.

दुस्तर खळखळ वाहिले शतशः शोणितपूर. ७२
तेज नुरे रक्षोगणीं, रणीं होय जरि भंग,
तारं हि खळांचा तो धणी, गणी हितें कुमतिसंग. ७३
मायावी घनरव अरी जो कपटमदें अंध,
तो सानुजविभुला करी अहिपाशानीं बंध. ७४
पाहुनि ते समरांगणीं मानी झाला अंत,
दोषें गणुनि लक्षणगणीं, सीता बोले 'हंत!' ७५
उडवि गरुड पक्षजरवें दारुण परम हि पाश,
प्रभुला दे सुख बळ नवें, नाशितपरमहिपाश. ७६
घटकर्णा मारवि बळें, करवी स्वापत्याग.
पितृमतिस हि म्हणतें 'चळें,' कुमतिस्वापत्याग. ७७
घननादानें ताडिलें, सप्रभु सर्व हि सैन्य,
मृतसें मूर्च्छित पाडिलें, देवांसि दिलें दैन्य. ७८
जांबवदुक्तें पवनसुत रामपदांबुजभृंग,
आणी शक्राद्यमरनुत दिव्यौषधिनगशृंग. ७९
सौषधिगंधें मारुतें उठले विशल्य सर्व.
पावी स्थानीं चारु तें महावेग गतगर्व. ८०
मायासीताशिर हरी घननाद महामाय,
'हा! हा!' वदले चिर हरी, म्हणे राम ही 'हाय!' ८१
कळवि बिभीषण कपट, मग मारवि अरिपुत्रास,
लक्ष्मण करि यश, निववि जग, उरवी न रिपुत्रास. ८२
दशमुख सुतशोकें जळे, श्रीस वधाया जाय;
न वळावा, परि तो वळे सचिवोक्तें खळराय. ८३
'नर वानर मारा' असें खळ सांगे कटकास,

१. हितकर व तारक हि गणी. २. जीं चिन्हें दिसलीं त्यांवरून दोष समजून. ३. नाशिली शत्रुराजाची जयाशा जेणें–हें गरुडाचें कीं बळाचें विशेषण–**पंत.** ४. दुर्बुद्धि जो आपला पुत्र त्याचा अपराध.

श्रमले वीर सुरारसें, वाळिति बहु भट कास. ८४
शलभपटळ तें बळ गमे, दीप्त दवानळ राम,
बहुकोटि समग्र हि शमे, अर्ध भरे जों याम[1]. ८५
नाचुनि कांपविती रसा बहुशत लक्ष कबंध,
करिल डसुनि गरुडा कसा भोगें तक्षक बंध? ८६
आपण दारुण रण करी, भेदी लक्ष्मणवक्ष,
शस्त्रास्त्रं वर्षुनि अरी कपि खपवी बहु लक्ष. ८७
अनुज शक्तिनें पाडिला पाहुनि कश्मलेंमग्न[2],
रामें दशमुख ताडिला केला हतबळ भग्न. ८८
आणी शृंग पुन्हां हरी[3], लक्ष्मण सावध होय,
दिव्यौषधिरस बळ भरी, सस्यांत जसें तोय. ८९
शक्रप्रेषितरथवरीं समरीं बैसे राम,
अरिस म्हणे, 'यमपथ वरीं पुरवाया सुरकाम.' ९०
कारिति कराया भस्म रण ते सप्त अहोरात्र,
ज्यांला कांही न स्मरण, जरि हि क्षतचितगात्र[4]. ९१
हरि[5] हरि दशदा दश शिरें, तरि अरि वारिना अंत,
म्हणे, 'प्रभुसि मोहीं शिरें;' 'हंत!' वदति सुर संत. ९२
घटजकथित 'रविहृदय'जप करिता झाला राम,
करवि न रवि बहु कठिन तप, पुरवी परवधकाम. ९३
विध्यर्थें शर मारिला श्रीरामें तत्काळ,
वक्ष विदारुनि मारिला दशग्रीव सत्काळ. ९४
सानुग सुरमुनि हर्षले, 'जय! जय!' वदले सर्व,
दिव्यें पुष्पें वर्षले करुनि स्तव विधिशर्व. ९५
सुरवाद्यें बहु वाजलीं, झालें गायन नृत्य,
भुवनें सुयशें साजलीं[6], प्रभुचें गाती कृत्य. ९६

---

१. प्रहर. २. मूर्च्छेमध्यें निमग्न. ३. मारुति. ४. क्षतांनीं व्यापलें शरीर ज्याचें असे. ५. राम. ६. हस्तदोष—साजली.

अरिदारांचें हरविलें दुःख प्रेरुनि आर्य,
करुणानिधिनें करविलें दशकंठोत्तरकार्य. ९७
लक्ष्मणहस्तें बसविला पदीं बिभीषण दास,
भाव तन्मनीं वसविला, तच्छत्रुगणीं त्रास. ९८
दिव्य श्रीसीता करी, वारी जनापवाद;
सानुज सांगन तो हरी ताताचे धरि पाद. ९९
अमृत सुदिरसा वर्षला पावुनि पद नाकीश,
नमि सर्व उठुनि हर्षला त्या सुखसदना कीश. १००
झाली रावणभू जिता, जेणें गेलें दैन्य,
त्याच्या तोषा पूजिता होय बिभीषण सैन्य. १०१
सुगळबिभीषणसह वरी पुष्पकनाम विमान,
[1]भरत पौर निववुनि करी सुरतरु राम चि मान. १०२
अभिषेक स्वीकारिला झाला राजा राम,
संसारी जन तारिला स्वयशें पुरवुनि काम. १०३
सबळ सुगळ बहु मानिला, दिधला निरवधि हर्ष;
भक्त बिभीषण वानिला, तें स्तवन अमृतवर्ष. १०४
मारुति रामें पूजिला, आठविले उपकार,
प्रसवे देवी भू जिला ती दे वर मणिहार. १०५
वधिला विप्राहित लवण शत्रुघ्नें बहु दुष्ट,
या विजयानें जन कवण झाला नाहीं तुष्ट? १०६
तीन कोटि गंधर्व खळ भरतें केले चूर,
जैसें प्रभुचें, बाहुबळ याचें गाती शूर. १०७
रामप्रमुखांचे तनय कुशप्रमुख जे आठ,
राजे केले ते सनय वेद जयाला पाठ. १०८
उघडुनि अनुकंपा दिली श्रीरामानें भुक्ति,
पुण्यकीर्ति संपादिली, देवुनि अंतीं मुक्ति. १०९

---

१. सुरतरु चि राम भरत पौर निववुनि मान करी–अन्वय.

'दोहारामायण' प्रेमें श्रीरामाच्या पदावरी
मयूरें वाहिलें, ज्याचा गाता हर्ष सदा वरी. ११०

इति दोहासोरठारामायणं संपूर्णं ।

---

# सद्रत्नरामायण

(अमृतध्वनि अथवा अश्वघाटी छंद)

मापाल देव विधिच्या पावला स्तुतिस; हा पावना रचि कथा.
क्षमापा, करि[1] स्वगुरुतापात्र, शक्रनुतचापाशुगा, दशरथा.
स्थापावया सुपथ, दापावया सदारि, बापाचिया प्रियसखा,
शापालसा[2] सुखवि, तापा हरूनि, नतपापारि, रक्षुनि मखा. १
क्षिप्र प्रभूत्तम हरी ग्रावभाव, बहु विप्रप्रियेसि निववी.
त्र्यक्षप्रसिद्धधनु लीलेकरूनि चुरि, रक्षक्षितीशे[3] भिववी.
सीता वरूनि, भृगुरामप्रतापदवभीतात्मतात जिववी.
पर्वामृतांशुशतगर्वापह[4] स्वयश सर्वां यथेष्ट पिववी. २
'रामा अरण्य, भरता यौवराज्य,' वर रामा[5] असे गुरु वरी.
राजा जऱ्ही विनवि, ऐकेचिना; हृदय भाजावया हठ करी.
लक्ष्मी न राज्य, पितृसत्यव्रता अजित रक्षी, त्यजी निजपटा.
भार्यानुजांसहित वल्की, निघे त्रिदशकार्या, शिरीं धरि जटा. ३
पेटे पुरीं असुख भारी, तारि त्यजुनि, भेटे गुहासि, विरवी[6].
पूता सुसांत्वुनि, सुमंत्राभिधा स्वगुरुसूता दयालु फिरवी.
गंगा तरे, मग भरद्वाजसन्मुनिस संगापहस्मृति[7], नमी.
या चित्रकूटनगवासी स्तवी, अभय याची कृपाब्धिस शमी. ४
शोकें मरे नृपति; होता सुधी भरत आधीं च मातुळपुरीं.
त्या आणिती सचिव; जाणोनि मातृकृत तो होय सक्षत उरीं.

---

१. आपलें पितृपद देई. २. शब्दार्थ? ३. रावण. ४. शेंकडों पूर्णचंद्रांच्या गर्वाचें हरण करणारें. ५. स्त्री (कैकेयी). ६. गहिंवरवी. ७. ज्याचें स्मरण संगाचा (आसक्तीचा) नाश करितें असा राम.

तातक्रिया करूनि भेटे, म्हणे, ‘परत, रक्ष प्रजा, कर दया.’
‘वर्षें चतुर्दश चि राहेन बा! न चिर,’ सांत्वी असें बरद या. ५
मागोनि घे, सुमति हा, पादुका, नमुनि मार्गे सखेद परते.
राहे पुरीनिकट, भक्षी फळें चि, विषयीं शुद्धबुद्धि न रते.
भेटोनि अत्रिस, विराधा समुद्धरुनि तो भाउ दंडकवनीं
घाली सुखांत, मुनि याच्या जगांत सुखशोभा उदंड कवनीं. ६
संगा त्यजूनि, सुतपोनिष्ठ साधु शरभंगादि जे मुनि सदा,
देवीसह प्रणत होवूनि, सानुजनि सेवी तदाश्रमपदा.
वंदी अगस्त्यचरणांतें, श्रुतिस्तुत हि बंदीतसा, स्तव करी.
चित्रा[१] चि रीति ‘गुरु’ गृध्रा म्हणे स्वगुरुमित्रा, सुतत्व चि धरी. ७
गोदावरीतट विलोकूनि, रम्य शुचि, मोदा वरी बहु मनीं.
शोभा करूनि, दशकंठस्वसा, विषयलोभा धरी मुनिधनीं.
नासा तिची असिस सौमित्रि दे, ऋषिजना ‘साधु! साधु!’ वदवी.
भ्राता तिचा खर हि सेवी रणीं, वरुनि घातासि, मृत्युपदवी. ८
मीनासि जेंवि गळ, सांगे जडा युवति ती नाशहेतु, ढवळी.
दावी विरूप मुख दिक्कंधरा, धृतमदा, वीतबुद्धि खवळी.
मायासुवर्णमृग धाडी, तयासि परमा याचि, राम अनुजा
देवीसमीप मग ठेवी, निघे, सुतनु दे वीरपा सुधनु ज्या.[२] ९
हाणी शरें कपट जाणोनि राम, मृग वाणी करी प्रभुपरी.
आणी अनिष्ट, विभुची ती, मनीं भिवुनि, राणी सुबुद्धि हि बरी.
खाणी विवेकसुगुणांची सदाप्तनुति[३], वाणी प्रभेदद वदे.
पाणी मुखीं नुरवि सौमित्रिच्या हि, तिजवाणी न खेद दव दे. १०
जाची, म्हणे, ‘मदभिलाषी न तूं उचित, जा चि,’ प्रभुप्रियतमा.
केला उदश्रु[४], कळवायासि तो असुख, गेला तया पितृसमा.

---

१. आश्चर्यकारक. २. तदा देव्या स्वयमानीय भर्त्रे शस्त्रं दत्तमित्यर्थः--पंत. तेव्हां सीतेनें आपल्या भर्त्याच्या हातांत स्वतः शस्त्र दिलें असा अर्थ. ३. निरंतर प्राप्त स्तुति जिला अशी. ४. साश्रु.

तों देवशत्रु हरि सीतेसि, दुःखतम कोंदे तिच्या मृदुमनीं.
ताडी, करी कपट जेव्हां त्यजूनि नय, पाडी जटायुस वनीं. ११
लंकापुरीं तिस अशोकीं वनीं वसवि, पंका[1] न भी, न मरणा;
अंका[2] म्हणे पदकें[2]; चंडांशुसीं, त्यजुनि शंका, सजे तम रणा.
[3]सांगे स्वताप गुरुतें. तो वदे, ‘सुमुखि! भांगेपरीस वरिलें
कां गे! कटुत्व? शिशुसें[4] कीं मुखीं सुवच रांगे सदैव धरिलें. १२
तो ‘हा!’ वदे, उटज पाहोनि शून्य धरि मोहा मनुष्यचरित;
श्रीला वनीं हुडकि, नाना विलाप, निजशीला त्यजूनि, करित.
वाटे जनांत अजित स्त्रैण, शोकरस दाटे, जगीं न कथवे.
क्षोणी भिजे; खग मृगांचे, वनीं चरति, कोणी उदश्रु, न, थवे. १३
आर्ता[5] पुसे पितृसखा; तो कथी अहितवार्ता, मरे; मग तया
दे तोय, पिंड, जनका तेंवि; ‘हाय!’ हि वदे, तोषवी, करि दया.
बंधा हरि प्रभु कबंधाचिया; दुरितगंधा हि राम नुरवी.
तारी द्रवोनि शबरीतें, तद्दिष्ट दुरितारि क्षणांत पुरवी. १४
पंपातटीं करि विलाप प्रियाविरहसंतप्तमानस हरी;
‘शंपावियुक्त घनसा मीं,’ म्हणे, ‘ध्वतिस कामाप्त[6] कोकिल हरी;
कंपावह श्वसन आलिंगुनीं हि लसदंभोजराजि[7] लहरी
संपादिना विजय कां होवुनि त्रिपुरकाळ स्मरद्विपहरी?’ १५
सौमित्रि बोध करि, ‘मारूं रणांत अरि, जाईल दूर जरि तो.
गांठी गजासि हरि, शोधूनि जीव हरि, जो मत्त मंतु[8] करितो.
आचार्यदत्त वर, आहेत, चाप शर; चिंतेंत चित्त न रतो.’
सांगे कबंध, ‘वर कीशस्वकार्यकर, हो स्वस्थ, शत्रु मरतो.’ १६
वातात्मज प्रथम भेटे, सुकंठ मग, या तापसव्रतधरा;

---

१. पातका. २. कलंकास च भूषण मानूं लागला असा भाव. ३. कर्ता ‘लक्ष्मण’. ४. मुखीं धरिलें सुवच सदैव शिशुसें रांगे कीं—असा अन्वय. ५. हस्तदोष—अर्ता. ६. मदनाचा नातलग. ७. शोभणाऱ्या कमळपंक्तीचें डोलणें (?) ८. अपराध.

झाला सखा अजित; पावोनि तो अभय, धाला इनात्मज[1] बरा.
द्रावी अलंकृति सतीच्या; तिला स्मरुनि 'हा!' वीतमोह हि वदे.
मित्रास, वालिदलनानें परंतु कारि वित्रास, राज्य शिव दे. १७
शोधासि पाठवि सतीच्या सुकंठ कपि; योधायुतें नव न भू
राहे न धुंडिलि, विलंघूनि सिंधु, तिस पाहे कृती पवनभू.
मुद्रा समर्पुनि महीजाकरीं, अतुळ मुद्राशि दे, खळबळें
मारी रणीं, दशमुखा तेज दाखवुनि भारी, म्हणे, 'खळवळें'. १८
अक्षा दशास्यतनया संहरी, कपटदक्षा धरूं घनरवा,
दे, हा अजास्त्र करि युद्धांत बद्ध जरि देहा, धरी न परवा;
मत्ता कथि क्षय, पुरारातिबाणबळवत्ता[2] शिरे गगनिं घे.
पाळी बिभीषणगृहातें मरुत्तनय, जाळी पुरी, मग निघे. १९
दे अंगदादिकपिचक्रा प्रमोदभर, शक्रा हि तो बहु बरा.
श्रीच्या शिरोमणिस अर्पी, कथी कुशळ, तर्पी तया प्रभुवरा.
भेटे मरुज्जनिस, हर्षे, हिमाश्रुजळ वर्षे स्वयें जरि धणी;
लागे विशुद्ध यश गाया, स्वभक्तिवशगा या असुप्रद गणी. २०
ज्यांच्या रजें रवि दिसेना, अशा प्लवगसेना सजूनि, सहिता
पावे समुद्रतट, तारावया त्रिजग, मारावयासि अहिता.
ज्ञाता बिभीषण नमी पाद; त्या पदसमीपागता वरद, 'या'
ऐसें म्हणोनि पद दे; हा करी विनयगेहा नतावर[3] दया[3]. २१
होवूनि ज्यासि नत गावें, सुसेतु शत गावें असा करविला.
साधूंसि हा सुमहिमा, ज्या नसे अवधि, माजानिनें भरविला.
रोमांच, सोडवुनि गर्वा, हरिप्रमुखसर्वा सुरा धरविला;
कोणी दिसे अमर अन्य त्रिलोकमत, धन्य स्वयें न रविला. २२
लंघी नदीपतिस, वेघे सुवेळनगशृंगीं सुकंठसहित,
प्रेक्षी सुवर्णमयदुर्ग प्रभु, प्रभुबळौघासि मोहि अहित.

---

१. सूर्यपुत्र सुग्रीव. २. शंकराच्या बाणानें बळावलेल्या. ३. मूळांत 'नतावरद या' अशीं पदें दाखविलीं आहेत; परंतु तो हस्तदोष दिसतो.

क्रोधें उडे सुगळ, ताडूनि तन्मुकुट पाडूनि, दावुनि बळ,
श्रीतें हरूनि, जय संपादुनि प्रथम, दे त्या खळा अघफळ. २३
जो वालिपुत्र, पटु पूतस्वभाव, धरि दूतत्व, अंगद वदे.
'राज्या! पहा, पवन तूळा, नगा सुदृढमूळा हि भंग दव दे.
पावो प्रभूत्तम न रोषा, हिता हि परयोषा न, साम कर गा!
अन्या असें समज, बापा! धरूनि मद चापा न रामकरगा.' २४
दुर्वार दुष्टमतिचा वेग, पापअहि चावे सुधा भरवित्या,
कोपे दशास्य खळ, सामा न मत्त पशुसा मान दे, धरवि त्या.
बाहू अरी धरिति जे, त्यां करी व्यसु, उडे तो हरी विवरसा.[२]
भारी जरी रिपु[३] पहाती, तरी न सुजनाभीतरी विवर[४] सा[५]. २५
मानी न साम वारि कोपोनि; राम धरि चाप स्वधाम करि जागें रणीं
भेरी बळें, अवनि रक्तें पळें भरवि, मेले छळें भटमणी.
तो शोणितें कुमति रंगे, नुरे कटक, भंगे, चमूपति मरे.
मागें सरे तन्हि न रागें भरे जन्हि, न आगें तरे बळ, सरे. २६
श्रीरामलक्ष्मण करी बद्ध मेघरव, चिंतेंत सर्व बुडवी.
श्री 'हा!' म्हणे; करि खगेंद्र प्रिय, त्वरित ते नागपाश उडवी.
जो कुंभकर्ण यमसा, त्यास हि प्रभु, रणीं ठाकुनि स्थिर, वधी.
दे शोक दुःसह दशास्या, तदात्मज हि मारूनियां निरवधी. २७
शल्यातें मूर्च्छित, ससैन्य प्रभुद्वय, रणीं[६], तो घनध्वनि करी.
कैलासपर्वतसमीपस्थओषधिनगातें मरुत्सुत हरी;
आणी सदोषधि, सुगंधानिळें सकळ झाले विशल्य सबळ;
श्रीरामलक्ष्मण, कराया, पुन्हां दशमुखाचा बळौघ, कबळ. २८
मायामयी जनकजा दाखवूनि, वधि जो मेघनाद कपटी,
त्यातें बिभीषणमतें राम बंधुशरकाळाननांत दपटी.
सीतावधार्थ उपसी, तापला खळ, असी; तारकां[७] पतिस ती

१ शोभा, टवटवी. २. गरुडाप्रमाणें. ३. षड्रिपु. ४. छिद्र. ५. या पाठानें वृत्तभंग होतो. ६. खोडलेला पाठ—घनध्वनि मूर्च्छित. ७. तारणाऱ्या.

चिंती; तया सचिव वारी; म्हणे, 'प्रभु चि तारी,' महामतिमती. २९
धाडी दशास्य चतुरंग स्वसैन्य, विभु पाडी तयास हरसा.
भारापहार करितां ईश्वरें बहु, निवे धातयासह रसा.
पाहे पुरीं सतत ओकें, मृतासपतिशोकेंकरूनि भरितें.
जें राक्षसीकृतविलापाप्रियश्रवण, साहे न तो सदरि तें. ३०
घेवूनि शेष बळकोटी, धरूनि धृति मोटी, दशानन निघे,
निर्मी असामकर वेगें, जसा मकर, सैन्यार्णवीं मग रिघे.
मारूनि शूरवर, सारूनि दूरवर, न स्वल्पसें क्षत हि घे,
तो मांसरक्तमयपंकें शतायुत, विशंकें मनें भरि, बिघे. ३१
तो शक्ति हाणुनि उरीं, लक्ष्मणास अरि तत्काळ मूर्च्छित करी;
तत्तेज जों प्रभु मरुत्पुत्र, तों चि भगवद्बंधुकश्मळ हरी.
दिव्यौषधि, क्षितिधराच्या, पुन्हां अतिजवें आणिल्या, सुशिस्वरें.
हस्तें, निजोनि उठल्याचें, सुवत्सळ सुहृग्युग्म, तो पुशि स्वरें. ३२
प्रेषी महेंद्र रथ, बैसे पवित्रकथ, देवद्विजारिमथना;
द्यायासि तृप्ति, नवि लावावयासि कविकोटि स्वकीर्तिकथना.
श्रीराम दिग्वदन दोघे परस्पर हि मोघेप्सित क्षणभरी
होती, क्षण स्वजय मानून हर्षति, न भोनूनमार्गण, अरी. ३३
छपन्न याम करि संग्राम राम, जरि तोडी शिरें शत, तरी
पावे न मृत्यु अरि, लीलामनुष्य हरि चिंता मनीं बहु धरी.
भेटे अगस्त्य कवि, सांगे सुमंत्र, रवि होय प्रसन्न, वर तो
दे, 'हो पराद्रिपवि, सत्कीर्ति नित्य नवि, अन्यत्र विश्व न रतो.' ३४
ब्रह्मास्त्रमंत्रितशरें, रामभद्र उर भेदूनि, शत्रुस वधी.
विश्रांत होय विजयें त्या सुखोदय, जयाला नसे चि अवधी.
तों पुष्पवृष्टिबहुवाद्यध्वनिस्तवजयध्वानगाननटनें
झालीं मनें शुचि, यशें या असीं सकळतीर्थांसिया न अटनें. ३५
ज्ञाता बिभीषण यथोक्त क्रिया रघुकुलेशप्रियास्तव करी.

---

१. निराश. २. उभयांचें विशेषण-पंत.

स्थापी तया मग पदीं, लक्ष्मणा कथुन, दीनानताश्रय हरी.
कीर्त्यर्थ दिव्य रचि सीता, सुरर्षिशतगीता, तितें प्रभु वरी.
प्रेतें बळें उठवि, लावी निजस्तुतिस, दावी कृपा बहु बरी. ३६
स्वर्गागता दशरथा, रामचंद्र करि थारा, [1]सदानवमहा.
वंदूनि पाय, अतिधन्या तया कळवि, अन्या सुखा अवम[2], हा.
जो चातकाचिपरि होता, सदा करुनि अत्यार्त 'आ', शुभरता
त्या, पुष्पकीं बसुनि ये, तो दयामुदिर दे भेट आशु भरता. ३७
माता, वसिष्ठ गुरु, बंधु, प्रधान, जन पौर, प्रजा, न वन तें;
भेटे वसंतविभु, झालीं [3]तया सकळ शोभा सुखें अवनतें.
सिंहासनीं बसुनि, ते हर्षवी, कारित होते सदा नवस जे.
श्रीकांतरंजन कराया, बहु द्रवुनि, होवूनि मानव, सजे. ३८
कामारिचित्तसुखधामा ! सुराहितविरामा ! समस्त[४]सदया !
नामा मुखीं वसिव, बा ! मागणें न बहु, रामा ! वळें चि सदया !
वामा स्वयें पुससि, सामोद्दता करिसि आमासि पक्क, रसदा !
सामान्य हा तुज असा, मान्य तूं, अतिथिसा मान किंकर सदा. ३९
'सद्रत्नरा[६]मायण' हें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणीं भावें वाहिलें कृतवंदनें. ४०

इति श्रीसद्रत्नरामायणं संपूर्णं । श्रीरामार्पितमस्तु ।

---

# पृथ्वीरामायण

(पृथ्वीछंद)

रमापतिस निर्जर स्तविति पीडितां रावणें,
'नसे उचित पन्नगें गरुडसंश्रिता चावणें;

---

१. नित्यनूतन अशा आनंदास. २. निकृष्ट. ३. वना–पंत. ४. सर्वसाधुशुभावह विधे–पंत. ५. सलोख्याच्या भक्तीचा आदर करणाऱ्या कच्चांस (अर्धवटांस). ६. सद्भर्मरामायणाप्रमाणें च या रामायणांत कांहीं नामावळि साधली असेल काय?

विपज्जळधिच्या तटीं प्रभुवरें नता लावणें,
तुला चि अतिवत्सळा! सुकर धावणें पावणें.' १
विधिप्रमुख आर्त जे, अभय दे तयांतें*; मग
स्वयें दशरथात्मज प्रभु हि होय, हर्षे जग.
सुनाम धारि 'राम' तो प्रथम दाविल्या विग्रहें[1];
दुजा भरत, लक्ष्मण स्तुत, चतुर्थ शत्रुघ्न हें. २
दिला कुशिकनंदना दशरथें नृपें राम हा.
महास्त्रशत घे मुनिप्रवरदत्त, पोषी महा.
महा गुरुसि दे पथीं, वधुनि ताटका, वासवा,
सवा जपुनि, हर्षवी, मथुनि सेविते आसवा. ३
तयावारि, समुद्धरी पदरजें अहल्या शिळा,
यशें कथि असें, 'जळो अघ, मदंघ्रिसीं या, मिळा.'
प्रताप कारि शत्रुचा, हरधनुष्यभंगें, शिळा.
वरी जनकजा[2], बळें निववि तो भृगूंचा[3] टिळा[3]. ४
पुरासि चवघी सुना जनकजा[4] नृपें आणिल्या.
महोत्सवसुधाह्रदीं सकळ हि प्रजा न्हाणिल्या.
वसिष्ठमुनिला, किती दशरथा, किती गाधिजा,
किति स्तविति त्या पुरा, रघुकुळा, त्यजी आधि ज्या. ५
स्वमातुळकुळा सुधी भरत जाय[5], पृथ्वीहिता
प्रभूसि युवराजता गुणनयज्ञ योजी पिता.
न केकयसुतेसि तें सुखद होय, राज्यामिता[6]
भुले; सुतमणीस दे वन, वरें वराया चिता. ६
प्रभूत्तम मनीं म्हणे, 'परमवत्सळा मावली,
पितृव्रतसुरक्षणें यश मिळावया, पावली.
चतुर्दश समा वसों विपिनिं.' सर्वपापारि घे

---

१. शरीरें. २. हस्तदोष–**जनका**. ३. परशुराम. ४. हस्तदोष–**जनजा**. ५. हस्तदोष–**जा**. ६. अमर्याद राज्यविस्तारला. * हस्तदोष–**तयातें**.

प्रियानुज, हरावया सकळविप्रतापा रिघे. ७
पिता स्वरथ पाठवी, वारि सुमंत्र वाहे, रिते
निकाय पडले, तदा वदति पौर 'हा!' होरिते[1]
रथा फिरवि, पावुनि प्रभु सुरापगेच्या तटा.
वटा हि करि धन्य त्या, रचि पयें जयाच्या जटा. ८
गुहें उतरिला प्रभु त्रिदशसिंधुपारा, तया
दयार्णव पुसे, निघे; करि सुखी भरद्वाज या.
तरूनि यमुना नदी, वरुनि चित्रकूटाचळा
पळाश भिववी, महामुनिजनांत आणी कळा. ९
सुमंत्र कळवी, 'जटा रचुनि चित्रकूटीं नगीं
कुमार वसले' असें; नृप न लाभ पाहे जगीं.
म्हणे, 'वससि काननीं प्रियकरा शिशो! केंवि रे!'
मुखें म्हणत 'राम!' हा सुकृतराशि शोकें विरे. १०
नृपें असु विसर्जितां, भरत आणिला सत्वर.
प्रसू कथि तया कृत, द्रुत, न[2] लंघितां चत्वर[2].
तिची, तनय तो, करी, जरि हि साधु, कुत्सा; हया
केशा[3] तसि, विलंघना कुमति[4] दे चि उत्साह या. ११
तिला त्यजुनि जाय तो सुमति राममातेकडे,
रडे नमुनि तत्पदें, विकळ होय; मोहें पडे.
'दडे न निजकर्म, बा! दुखवितात कांटे[5] खडे[5];
घडे विधिबळें' म्हणे; न सुविवेक तीचा दडे. १२
यथाविधि सुधी करी गुरुमतें स्वतातक्रिया.
निघे, शरण जाय तो, प्रणतवत्सळा स्वप्रिया.
पथीं प्रभुसखें गुहें अडवितां, म्हणे, 'हाय!' तें
शुचित्व कथि; जाह्नवी उतरि नौ[6]पथें आयतें[6]. १३

---

१. प्रेक्षक. २. आंगण ओलांडून वाड्यांत पाऊल ठेवतो न ठेवतो तों च. ३. चाबूक. ४. मातेची–**पंत**. ५. लघु हि दुःख कर्मज–**पंत**. ६. विस्तृत नौकामार्गें.

परीक्षुनि निरोप दे पदनता भरद्वाज ही.
'न' लक्ष्मण 'भला' म्हणे, धरि धनुष्य, कांपे मही.
तया प्रभु म्हणे, 'उगा. भरत हा नसे वावगा.
मला फिरविणार, या सुमतिचा, असा भाव गा!' १४
वसिष्ठ जननी पुढें करुनि, अग्रजा वंदन,
प्रसन्न मति व्हावया, करि तसा, जसा नंदन.
स्वतातगति जी कथी भरत, आग्रके साश्रु ती,
'अशोक' म्हणती जया, कवि जगन्निवासा श्रुती. १५
पित्यासि जळ अर्पिल्यावरि, पदद्वयातें धरी;
करी विनवणी [१]दयामृतनिधीस नानापरी.
तयासि समजावुनि प्रभु म्हणे, 'वर्मी सारितों
चतुर्दश समा चि. यो न तव लोचनीं वारि तों.' १६
असें चि ऋषि बोलती त्रिदशविप्रकाळक्षया.
मनीं धरुनि जाहल्या स्वगुरुपादुका लक्ष या.
'जळेंन दहनांत मीं, अवधि लंघितां, हा पण
प्रभुप्रति कथी, निघे नमुनि तो, म्हणे 'हा!' पण. १७
द्विजादिवदनें, पुरी जरि जपोनि बाहे रहा-
वया, तरि वसे जटाधर तपोनि बाहेर हा.
वरी, [२]प्रभुनमस्कृत प्रिय सदार जें, अत्रि, [३]तें
वशीकृत, न एकतें सुयश, न द्वितें, न [३]त्रितें. १८
नमी जनकजा प्रिया बहु, जसी सुता धाकुटी;
महामुनिसती हि दे तिस अयात[४]यामा उटी;
तसी च कुसुमावली, तिलक, कांति वेणी, रुची.
निघे नमुनि ती, गमे अदिति[५]वर्धितश्री सची. १९

---

१. हस्तदोष—दयामृत. २. रामचंद्रानीं नमस्कार केलेला. ३. तें (प्रिय) नुसतें एकपट, दुप्पट, तिप्पट सुयश झालें असें च नव्हे, तर मोठें वशीकरण झालें (?). ४. नवी ताजी. ५. अदितीनें (देवमातेनें) वाढविली आहे शोभा जिनी अशी.

धरी जनकजेसि जो खळ, मृगीसि जैसा हरी,
कर। सुपदपात्र त्या, वधुनियां, विराधा, हरी.
गतीच्छु शरभंग भूसुर, तयासि दे राम [1]ती;
नतीकरुनि उद्धरी शुचितपीं जयांची मती. २०
सुतीक्ष्णघटजानुजप्रमुखतापसांचीं शतें
नतें, त्रिजगदीश्वरें निववि‍लीं, गुणौघें [2]ततें.
न तें सुख यश व्रती [3]वैरिति; हें कवींच्या मतें,
[*]यतेंद्रियमनस्क जे, म्हणति ते, '[4]मिळालीं [5]क्षतें'. २१
जयार्थ धनुरादि जें शतमखें दिलें आणुनीं
सुशस्त्र, घटयोनि दे, प्रभुसि तत्वता जाणुनीं;
जटायु गुरुचा सखा सुखउनि, स्वयें गौतमीं
तटीं वसुनियां, तिला म्हणवि, 'जाहल्यें धौत मीं.' २२
कुधी दशमुखस्वसा कपटसुंदरी ये, 'वरा'
वदे; तदपराध तो खवळि जानकीदेवरा.
करी महिसुतेहुनि स्वगुणवर्णना साहसा.
सुरांप्रति म्हणे सुधी, हरुनि कर्णनासा, 'हसा'. २३
खरा हि मथि, जो, वधी मुनिजना वनस्था, नया
त्यजी. 'जय असो', म्हणे 'प्रभुवरा' जनस्थान 'या'.
सुवर्णमृग दाखवी दशमुख, अमाया सती;
धरूं पतिस पाठवी द्रुत [6]अदभ्रमायास ती. २४
वनीं न मृग, यातु, हें समजतां चि, मर्मीं खरें
शरें क्षत करि प्रभु; क्षितिसुता, [7]तदार्तस्वरें
खरें व्यसन मानुनि प्रभुसि, 'हा!' म्हणे; देवरें
बरें हि कथितां, वदे कटु, जया नमावें गरें. २५

१. गति–**पंत.** २. विस्तृत अशा. ३. यापूर्वीं–**पंत.** ४. भरून आली. ५. **कामकृतपीडा** आतां शमली–**पंत.** ६. अत्यंत कपटी अशास. ७. रामस्वरसम **राक्षसकृतार्तस्वरें–पंत.** * इंद्रियें आणि मन ताब्यांत ठेवलेले.

त्यजी उटज लक्ष्मण, स्मरुनि रामभद्र क्षण,
स्वधैर्यसह, जी वदे बहु दुरुक्ति, तद्रक्षण.
तशांत दशकंठ, जो परमदुष्टधी, तो यति-
स्वरूप धरि, ये, हरी; सुविकळा सती होय ती. २६
तदार्तरव ऐकतां, धरि जटायु धी मारणीं;
सुनेसि[1] लघु सोडवी, करुनि भग्न भीमा रणीं.
कृपाण वरि, जावया, वरुनि उग्र पाप, क्षया;
करी विकळ, खंडुनि त्वरित, गृध्रपा, पक्ष, या. २७
जन्ही विरथ विक्षत, क्षतज धैर्य तें ही गळे;
पळे खळ नभःपथें, हरुनि तीस, पापें मळे.
त्यजी, प्लवगपंचकीं जनकजा, अलंकार; ती
अशोकवन पावली, खळहृता अलंकांरती.[2] २८
वधूनि कुणपाशना रघुपति त्वरेनें फिरे.
स्वदुःख कथि लक्ष्मण, प्रभु हि ऐकतां तें विरे.
विलोकुनि विशोक ही उटज शून्य, शोकीं शिरे,
विलाप करि; ऐकतां हृदय देवतांचें विरे. २९
वनीं हुडकितां, क्षताकुळ जटायु तो देखिला,
मनीं परम घात त्या परमवत्सलें लेखिला;
'दशास्य हरि मत्स्नुषा करुनि मद्गरुच्छेदना,'[3]
असें कथि, मरे; वधूहृति तसी न त्या वेदना.[4] ३०
तया करुनि दाह, दे प्रभु हि पुत्रसा पिंड तो.
अशा परमवत्सळा न भजता भवीं हिंडतो.
कबंध धरि सानुजा भुवनरंजना भक्षणा;
तशा हि गति अर्पितां, न लवि[5] कंजनाभ क्षणा. ३१
वरुनि सुविमान तो रवि, 'सुता सुकंठा सखा

१. थोडा वेळ. २. नाहीं लंकेस रति जीपासून—**पंत.** ३. माझ्या पक्षच्छेदनाला. पृष्ठ २३ टीप ५ पहा. ४. बाधे—**पंत.** अध्याहारार्थ पद. ५. लावी—**पंत.**

करीं, करिल कार्य,' हें कथुनि जाय लंघून खा.
तसी च शबरीस ही गति बरी दिली पावनें.
हितें गमति नंदनापरिस तीं दिलीपा[1] वनें. ३२
असह्यविरहीं गमे प्रभुमनास पंपा दिती,
निजप्रसववैभवें असुख होय संपादिती.
मरुत्तनय भेटतां सुहित कंजनाभास, ती
यशेंकरुनि जाहली, अदिति अंजना, भासती. ३३
मरुत्तनय राघवा तरणिसूनुसीं भेटवी.
करी सुगळसख्य तो, सविधि अग्नितें पेटवी.
समस्त नग दाखवि प्रभुसि, रक्षिले आयते.
कथी अनुज नूपुरें. म्हणविती तया 'हाय!'[2] ते. ३४
करी बहुत सांत्वन प्रियसखा, तया तो म्हणे,
'त्यजीं न निजधैर्य बा! सकळधीरचूडामणे!
प्रिया हरुनियां जपे वडिल बंधु अंता पहा,
तऱ्ही कपि हि साहतों, धरुनि धीर, संताप हा. ३५
तुजी प्रियतमा तुला, वधुनि रावणा सानुगा,
असंशय रघूत्तमा! त्वरित भेटवीतों; उगा.'
पुसे प्रभु, सविस्तर व्यसन ऐकवी आपलें
सुकंठ करुणाब्धिचें हृदय ऐकतां तापलें. ३६
वधू हरुनि, ज्या खळें अनुज भक्त ही वाळिला,
करूनि सुगळा पुढें, प्रभु वधी तया वाळिला.
सख्यासि कपिराज्य दे, सुमति ती हि तारा; वया
विलोकुनि असें करी; कळवि तेजे[3], तारावया. ३७
दयालु, युवराज ही करि तदात्मजा अंगदा.
सुकंठ मग मेळवी कपिचमू द्विषद्भंगदा.
'सत्तीस हुडका,' म्हणे करुनि एकमासावधी,

---

१. दिलीपवंशज रामाला. २. नग–पंत. ३. प्रभुत्व–पंत.

निदेश चुकतां चि जो परम उग्र दासा वधी. ३८
कपि भ्रमुनि दिक्त्रयीं श्रमुनि खिन्न ते पातले
कृतावधिविलंबनें; इतर संकटीं वातले.
[1]प्रवृत्ति कथि, जी म्हणे निजअसूंसि 'संपा'; तिनें
'पहा उडुनि सागरा.' मरण वारि संपाति तें. ३९
उडे पवनसू; म्हणे मनिं तयासि मैनाक '[2]वि-
क्षितीश'. करितां स्तुती गमति कीरें[3] मैना कवी.
शिरोनि सुरसामुखीं, वधुनि सिंहिकेतें, हरी
समुद्र शत योजनें करुनि गोष्पद, [4]श्री वरी. ४०
पराभव करुनियां, प्रथम जोडी लंका[5] करा.
सतीस अवलोकि, त्या दशमुखा हि पंकाकरा.
[6]तिरस्कृतकुधी निघे, स्तवि यशः[7]समुद्रा, हरी
श्रमश्रम हि, दे कृती नमुनि तीस मुद्रा हरी. ४१
करी हारि, तुरे वनीं तरु, रणीं चमू अक्ष, तें.
घनध्वनिस सांपडे मग कळेवरें[8] अक्षतें.
जऱ्हीं अजित, मान दे कपि पितामहास्त्रा रणीं,
वृथा विकळ होय, तो पटु न बंधनातें गणी. ४२
सभेंत वचनें वदे जनकसा अघातोचितें.
दटावुनि कथावया पटु, तया अघा, तो चि, तें.
बिभीषण वधूं न दे, गणुनि[9] तुच्छ. तो खापर
स्ववक्त्र करुं, पेटवी धरुनि पुच्छ तोखा परं. ४३
पलाशधृति ने, पुरीप्रति करुनि होळी, लया.

---

१. पूर्वीची हकीकत. २. खगराज—**पंत**. ३. पोपट. ४. यश. ५. लंकादेवी.
६. तिरस्कृत केला आहे दुष्टबुद्धि रावण ज्यानें तो. हस्तदोष—**तिरस्कृत कुधी**.
७. रामचंद्राला. ८. शरीराला यत्किंचित हि दुखापत झालेली नाहीं अशा स्थितींत.
९. मारुतितें तुच्छ गणुनि तो पर संतोषातें धरुनि स्ववक्त्र खापर करूं पुच्छ पेटवी—**पंत**.

म्हणे द्रुहिण, 'धन्य तूं. इतर कोण घोळील या?'
सुगीतिहुनि निर्जरश्रुतिस हर्ष दे हाक पी,
सुरर्षि यश तें करी अमृतवर्ष, देहा कपी. ४४
महेशशरदीप्त जें, विझवि पुच्छ तें अर्णवीं.
रमा पदनता म्हणे, 'यश महन्मुखें वर्णवीं.'
जयें निववि अंगद[प्रमुख] सर्व ही तो हरी;
करी, प्रभुवराधि जो गुरु गिरी, तया मोहरी. ४५
कथी कुशळ, देवुनि प्रभुवरासि चूडामणी.
प्रसन्न बहु होय त्या वरदवत्सळग्रामणी.[1]
सुदुर्लभ मुनींस जो प्रभु, कपीस तो खेंव दे;
तदीय भुजविक्रम स्तवुनि, 'धन्य!' तोखें वदे. ४६
निघे प्रभु म्हणे 'अरी वरमदांध हो घाबरा.'
सुकंठ भर दे निजा बळसरस्वदोघा वरा.[2]
कपी करिति गर्जना प्रलयमेघसे, नाचती,
गमे गिळिल, त्या बळासह खळास, सेना च ती. ४७
अतित्वारित पावला[3] रघुकुळेंद्र पृथ्वीतटा,
तया लवणसिंधुच्या, कपिबळाब्धि, वेष्टी तटा.
सभेंत अपमानिला, विहित सांगतां, रावणें,
बिभीषण नमी, म्हणे, 'शरण आलिया पावणें.' ४८
तया करवि, लक्ष्मणा कथुनि राम, लंकापती.
न मर्त्य, करितां यशश्रवण हें, भवीं कांपती.
भयें जलधि भेट दे, करवि सेतु, तो टाकवी
स्वभान,[4] रचिता नळ प्लवग होय मोटा कवी. ४९
प्रशांत खळ दाखवी प्रभुशिरोऽब्जचाप स्वयें.
जयें करुनि आपल्या, स्ववश व्हावया ती, भयें.

---

१. ग्रामणी=उत्तम; श्रेष्ठ. २. सैन्यसागराच्या ओघास. ३. हस्तदोष-पाव.
४. निजदेहभान देखल्यांकरवीं-पंत.

महाधि सरमा हरी, पुसि विभूतिनेत्रें शयें,
'नयें शिव असे' म्हणे, 'प्रभु जयाहें आहे अयें[1].' ५०
ससैन्य उतरे सुखें, अजित सेतुमार्गें, बळें.
खळें खचर धाडिले बहुत पक्षिकीशे[2]च्छळें.
बिभीषण तयां धरी, प्रभु महानुकंपा करी.
निरोप बळ पाहिल्याउपरि दे, नया आदरी. ५१
सुवेळशिखरीं चढे, कनकदुर्ग हा हेरि तें;
म्हणे प्रभु मनांत, 'हें त्वरित होत आहे रितें.'
दिसे दुरुनि रावण; प्लवगराज कोपें उडे;
तयास चि न कांपवी, सकळ ही पुरीचे हुडे[3]. ५२
पराभवुनि शत्रुला, सुगळ ये, तया 'साहसें
अनर्थ घडतो,' म्हणे प्रभु, 'जनीं न हो बा! हसें.'
अरातिपुर वेष्टवी; मग, 'करीं' म्हणे 'साम' हें
न वालिसुतसूक्त घे; करवि[4] भूप हासा महें[5]. ५३
कुधी धरवि बाहु; जे धरिति मत्त चौघेजण,
व्रण स्ववपुला न घे, वधि तयां, न लावि क्षण.
महाधनसभालयाप्रति हि होय तो भंगद;
प्रभूसि कळवी, 'करी अरि न साम,' हें अंगद. ५४
बळें[6] वारिति उत्सवें मनुजविग्रहाज्ञा[6] नतें.
सुधी म्हणति, "काय जें रुचवि विग्रहा, ज्ञान तें.
सतीहरणकर्म हें परम नीच मूढा! 'लहा[7]
लया' म्हणविल, क्षया वरुनि हे चमूढाल 'हा!'" ५५
भटांसि खळ तो म्हणे, 'नर न हा निघो, राहवा
प्रहार न, करी हठें वरुनि हानि, घोराहवा.'
कबंध बहु नाचले, पललपंक ही सांचले,

---

१. भाग्यानें. २. पक्षी व वानर यांच्या सोंगानें. ३. बुरूज. ४. हस्तदोषं-**कारिवि**. ५. तेजें–**पंत**. ६. नतें वळें लीलानराज्ञा–**पंत**. ७. पावं.

पलाश खपले रणीं बहुत, थोडके वांचले. ५६
गभीर रुधिरौघ त्या बहु रणांगणीं वाहिले,
सुरर्षि वदले, 'अहा! न च कधीं असे पाहिले.'
सुदुःसह सुरांसि जे, कपिरणीं न ते राहिले.
अतिक्रम[1] करावया; चरित ईश्वरें साहिले[2]. ५७
घडे स्मरण तों चि, जो पुरवि नागपाशा[3], हरी
दयार्णव, तयाचिया गरुड नागपाशा हरी.
कवी म्हणति, 'मृत्युसीं परम उग्र जोखा यशें
तशा हि वधि उद्धता प्लवगवीर, जो खाय शें.' ५८
मरुत्तनय ओषधि क्षितिधराचिया घेउनि,
क्षणांत शिखरासि, ये, पुनरपि स्थळीं ठेवुनीं.
असें सुयश वाढवी वरुनि शल्यमोहादि; 'जे
अरी, जय,' म्हणे, 'तयां,' अजित[4] देव तो, 'हा दिजे.' ५९
दशास्यसुत दाखवी तसि[5] च रूपशोभा, वधी.
जऱ्ही समजली स्वयें, कपट सर्व तो भाव, धी[6],
म्हणे प्रभु, 'अहा!' तया सफळ कर्म तें वाटवी.
यशोनिधि बिभीषणा करि, यशें भवा आटवी. ६०
तयाउपरि लक्ष्मणें घनरवाचिया मारणें
सुराधिपतिदृष्टिचें रुचिर फेडिलें पारणें.
न तत्वमित[7] याम तों धृति उरों दिली या रणें
सुरांत. न अनुष्ठिलें श्रवण वारणें[8] वा रणें[9]. ६१
म्हणे दुरित दिङ्मुखा, 'वरुनि पुत्रशोका जळें.'
मळे अपयशें, गमे सकळ लिप्त तो काजळें.

---

१. नागपा[श] बंधादि–**पंत**. २. यशोऽर्थ–**पंत**. ३. गजेन्द्रेच्छा. ४. ब्रह्मदेव. ५. अगदीं सीतेप्रमाणें. ६. रामचंद्राची बुद्धि. ७. २४–**पंत**. हा आंकडा तत्त्व शब्दावर च कवीनें लिहून ठेविला आहे. ८. चोवीस प्रहर. ९. युद्धनिवारणानें किंवा युद्धानें.

निघे जनकजावधा, असि धरी करीं नागवा.
स्वनाथचरणांसि ती विनवि ' संकटीं वागवा. ' ६२
सुपार्श्वसचिवाननें प्रभु दशानना वारवी,
पुन्हां हि बहुकोटि तो प्रभुकरें बळें मारवी.
तया परम जाहलें* पुर विलापसंतापद,
स्वजीवित नको, जसें जारि समृद्ध, संता पद. ६३
समस्त उरलें बळ स्व चतुरंग घे सच्छळ-
प्रवीण शर तो, जळप्रद तसा चि, वर्षे खळ.
न दे कळ पडों, पळ प्लवगसैन्य कावी पळ.
प्रभूत भारि तों पळक्षतजपंक पृथ्वीतळ. ६४
बिभीषण वधावया प्रखर शक्ति जी सोडिली,
स्वभक्तहितलक्ष्मणें तद्वना रणीं तोडिली.
म्हणोनि तदुरीं दुजी त्रिदशशत्रुनें अर्पिली,
यशोर्थ निजशोणितें रघुवरें हि ती तर्पिली. ६५
प्रभूत्तम दशाननावरि तदा बहु क्षोभला,
विशस्त्र विरथ क्षणें करुनियां जयें शोभला.
पुन्हां शिखर, वायुचा सुत तसा चि आणी शवा-
वरूनि कुसुमापरि, स्तवुं शके न वीणीश या. ६६
महौषधिरसें व्रण क्षण न लागतां ही शमे;
उठे मुदित लक्ष्मण प्रभु, निजोनि तैसा, गमे.
हरि स्वरथ पाठवी; प्रभु, दशास्य तो ही श्रमे.
न सप्तदिन संगरीं सुरमुनींद्रचित्त भ्रमे. ६७
शिरें दश हि संहरी प्रभु रणीं दहादा; परी
तसीं च दिसती; अरि व्यसु पडेचिना भूवरी.
नरत्व कुतुकें धरी तदनुरूप, चिंता करी.
' रविस्तुति ' कथी बरी घटज; तेज भास्वान् भरी. ६८

---

१. पृष्ठ २३ टीप ५ पहा. २. ब्रह्मदेव. ३. सूर्य. * हस्तदोष—जाहले.

रत स्वजनरक्षणीं, असुरवायुचा जो फणी,
  पुराणवर मार्गणीं कमळजास्त्र योजी रणीं.
चिरूनि उर तत्क्षणीं, सकळराक्षसांचा धणी
  वधूनि असुखें खणी, वरदवीरचूडामणी. ६९
अशेष सुर हर्षले, कुसुमराशितें वर्षले;
  जयध्वनि हि माजले; अमित दुंदुभी वाजले;
बहु प्रभुयशोरतें नटति अप्सरांचीं शतें.
  सुरर्षिसह पर्व तें, अहित[1] गाति गंधर्व तें. ७०
बिभीषण विभुप्रिया करि बरी दशास्यक्रिया.
  तया परिसें[2] हा अया प्रभु. न गाति कां या अया[3] ?
अरीस हि महोदया अजित दे, न सोडी दया.
  म्हणे, 'करिन भव्य, या, गति सुखें वरा अव्यया.' ७१
बिभीषण वरासनीं बसविला; मग क्ष्मासुता,
  तया[4] पुसुनि आणवी, स्वदयिता त्रिलोकस्तुता,
स्वदिव्यचरितें हरी जडजनापवादास ती.
  निवे प्रियतमांकगा, द्रुहिणपूज्यपादा, सती. ७२
पिता दशरथ स्वयें निजविमान ये सोडुन,
  प्रियानुजसह प्रभु द्रववि, हस्त, या[5], जोडुन.
निवे, निवति पाहते सुरशिवादि, कीं, तोलवे
  न यच्चरणरेणुसीं सविधि अंड ही, तो लवे. ७३
प्रियार्थ विभुच्या, हरी उठवि सर्व मेले हरी.
  समाधिरतं[6] आदरी नुति, म्हणे तदा, 'हा !' दरी.
बिभीषण सभाजना विनवि त्या रमाभाजना;
  नये, भरतकामना न पुरतां, प्रभूच्या मना. ७४

१. जें प्रभुचरित्रपूजित–**पंत**. २. त्या लोहास स्पर्शमणी–**पंत**. ३. पृष्ठ ६६ टीप १ पहा. ४. बिभीषणा–**पंत**. ५. ताता–**पंत**. ६. सर्व योगी–**पंत**. ७. शून्या होवून–**पंत**. ८. श्रीनिवासास–**पंत**.

'ससैन्यसुगळार्चनें मुदित मीं,' वदे, तो हि तें
प्रभूक्त करि. या श्रितीं कृत चि वत्सळा मोहितें.
नमी, बसवि पुष्पकीं; भरतदर्शना हा बरा
उपाय रचि, कीं, महोदय मनीं न हो घाबरा. ७५
बिभीषण सुकंठ हे सबळ तो रमाजानि घे.
सबंधु निववावया स्वपुर सत्समाजा निघे.
म्हणे, 'सुदति! निर्मिता नळ कृती न हा सेतुला,
प्रिये! जरि न पावतों, तरि सुधांशु हासे तुला.' ७६
स्मरे भरत, आइला करुनि जेंवि 'आ' लेंकरूं;
तया मुदित, पुष्पक प्रभुसमेत आलें, करूं.
विमान बहु मेळवी शुचियशा तदा वीनता
धरी; प्रभु निजानुजा परम शांत दावी नता. ७७
मरुज्ज भरता कथी प्रथम, 'राम आला, पहा
सुखा.' भुलवि त्या मृगा परमहृद्य आलाप हा.
तया तृषितचातका जलदनाद तो टाकवी
सखेदपण. तत्सुखा कथि असा न मोटा कवी. ७८
स्वहार्दनिधिच्या भरीं भरतवत्सल क्षिप्र ज्या
नता उपगता, जसा भरत वत्स लक्षि प्रजा.
समर्चि करुनि स्वयें कुसुमवर्ष देवा; सवा-
परीस बहु तो महोत्सव चि हर्ष दे वासवा. ७९
'वसिष्ठजननीमहीसचिवबंधुपौरादि जे,
तयां सुख,' म्हणे प्रभू, 'यश कुळा हि सौरा दिजे.'
परेश अभिषेक घे करुनि, होय राजा चि तो.
सदा सकळ रंजवी; इतर सोयरा जाचितो. ८०
कधीं विधिपदा न ते वरिति रामराज्या स्तव,
प्रमोद भजला चिर प्रचुर पामरा ज्यास्तव;

१. भक्तार्चन–**पंत**. २. गरुडत्व–**पंत**. ३. सुख–**पंत**. ४. प्रेम–**पंत**. ५. सूर्याच्या.

बिभीषण सुकंठ ही न हनुमद्यशा लाभला,
त्यजी प्रभुकथेतरा, गणुनि मद्यशाला, भला. ८१
समस्त कपि गौरवी, यश सुधांशुसें गौर वी;
दुरापपण[1] हारवी, हरि भजत्तमा[2] हा रवी.
प्रभु स्वरग लाजवी, सदयता भली गाजवी;
नमी निपट जो भवी जन तया पदीं शोभवी. ८२
'पृथ्वीरामायण'[3] प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामाच्या पादपद्मीं अर्पिलें कृतवंदनें. ८३

इति श्रीपृथ्वीरामायणं संपूर्णं।

---

# स्रग्विणीरामायण

(स्रग्विणीवृत्त)

श्रीश जो चिंतितां मुक्ति दे वारणा, प्रार्थिला पद्मजें तो व्यथावारणा.
दिग्रथाच्या गृहीं जन्मला तारणा, दुर्जया रावणाच्या रणीं मारणा. १
च्यार रूपें धरी, राम हें नाम या ठेविलें भूमिनाथें अजानामया[4].
स्थापिलें मध्यमेच्या सुताला रसें, ज्या 'भ' आधीं 'र' मध्यें 'त' अंतीं असें.
लक्ष्मणाख्या तृतीया, चतुर्थास ही सत्य शत्रुघ्न; हे हर्ष पावे मही.
भूप डोले सुखें जेंवि नादें फणी, न स्वभाग्यापुढें शक्रभाग्या गणी. ३
चालवी सच्चरित्रा महानाटका, कौशिक छात्रता घे, वधी ताटका.
राक्षसोपद्रवें तापवी आधि ज्या, त्या करी हृष्ट यज्ञावनें गाधिज्या. ४
वांछिती सर्व मोटे सदाचार ज्या, पावली त्या अहल्या पदाच्या रजा.
होय भव्यप्रभा श्रीसमाना, शिलाभाव जो फार होता समा नाशिला[5]. ५
वक्ष फाटे भयें ज्याचिया दर्शनीं, न क्षम स्वर्गपाळादि ही स्पर्शनीं,

---

१. दुर्लभता. २. भक्तांच्या अज्ञानांधकाराला. ३. हस्तदोष—**पृथ्वी**. ४. जन्मरहित व नामरहित अशा. ५. जो बहु वर्षं होता तो नाशिला—**पंत**.

त्र्यक्षचापा तया शक्तिलेशें चुरी; दक्ष[1] बंदी करी लक्ष[1] गाती सुरी. ६
नाम सीता जिचें राम तीतें वरी; लक्ष्मणें उर्मिळा केलि कांता बरी;
मांडवी केकयेशात्मजेच्या सुतें, तत्स्वसा त्या अरिघ्नें हि विश्वस्तुतें. ७
होय उत्पात तों मार्गि वात्या[2] वरी, राम भंगी क्षणें भार्गवा; त्यावरी
सर्वपुत्रस्नुषायुक्त राजा पुरा आपल्या ये, यशें लाजवी कापुरा. ८
ने युधाजित्स्वसेच्या सुता सानुजा; 'वंशभूषा' म्हणे सद्गुणा भानु ज्या.
यौवराज्य स्वपुत्रासि देतां नृपा तापवी स्त्री, त्यजी प्रीति लज्जा कृपा. ९
'यौवराज्य स्वपुत्रासि एकें वरें दे, वनीं वास मन्वब्द रामा परें;
हो दिलें तें वरद्वंद्व राज्या! खरें; होत नाहीं च सत्यच्युताचें बरें.' १०
'तातधर्मी नसावी' म्हणे 'हानि'; घे वल्कलें, राम, मातृप्रिया हा निघे.
जानकीलक्ष्मण स्वामिला जोडिती हस्त, न त्यागितां संपदा सोडिती. ११
राय शोकीं बुडे माय ही, तो तरी पाय वंदूनियां जाय धैर्यें हरी.
कायभा न त्यजी, 'हाय!' बोले पुरी, गायसी काळजा खाय चिंतासुरी. १२
दिग्रथ स्वप्रधाना म्हणे 'स्यंदन क्षिप्र ने, पादचारी नसो नंदन.'
तो सुमंत्र स्वयें त्यांसि वाहे रथीं, भेटला जो सखा त्या गुहातें पथीं. १३
शृंगिबेरीं रची सानुजन्मा जटा यत्पयें, धन्य लोकीं करी त्या वटा.
दे निरोप प्रधानासि 'ताताकडे जा' असा, तो महासाधु शोकीं पडे. १४
त्या निषादा गुहा श्रीश आज्ञा करी; साश्रु आणी स्वयें रम्यरूपा[3] तरी[3].
ज्या उदारासि लाजे घनाची[4] घटा[4], त्यासि ने तो परा जह्नुकन्यातटा. १५
जाय राम प्रयागीं, भरद्वाज या वंदितां बोलिला, 'पाव वत्सा! जया.'
चित्रकूटीं करी पर्णशाळा बरी, तापसांचे हरी ताप सारे हरी. १६
तें सुमंत्रें नृपा ऐकवीलें पुरीं, तों क्षतीं क्षारसें होय त्याच्या उरीं.
साश्रु 'हा राम! हा राम!' ऐसें वदे, स्वांत सप्राण अन्यत्र जावूं न दे. १७
मातुळाच्या पुराहूनि वेगें पुरा भक्त तो आणवीला अयोध्यापुरा.
वृत्त ऐकोनि मातेसि गांजी, वदे, 'निस्त्रपे! तूं न मेलीस कां? जीव दे!' १८
संपवी दाहपिंडोदकादि क्रिया, जाय आणावया त्या स्वचित्तप्रिया;

---

१. दक्षलक्ष–पंत. २. वावटळीला. ३. शोभिवंत नौका. ४. मेघसमुदाय.

ने वशिष्ठ-प्रधान-स्वतातस्त्रिया, व्या[१]कुलात्मा ववंदाग्रजं स ह्रिया. १९
'हा!' म्हणे राम, तातासि दे तोय ती रीति रम्या, तिला चित्त देतो यती.
पादुका दे, प्रजापालना पाठवी; प्रेमळा त्या प्रभु प्रीतिनें आठवी. २०
'नंदि' संज्ञा धुरे 'ग्राम' तेथें वसे तो तपस्वी जसा होति मंत्री तसे.
सानुजें श्रीयुतें ब्रह्मशंभुस्तुतें वंदिला अत्रि तो तात जैसा सुतें. २१
होय सत्य स्तुता 'पर्ण'[२]पूर्वा '[३]कुटी'; श्रीस दे अत्रिभार्या स्वहस्तें उटी.
उद्धरी त्या विराधासि आधीं कुटी; तापसव्रात या मूर्तभाग्या लुटी. २२
दंडकारण्य तें मग्न केलें सुखीं, तापसांच्या उरीं दे न 'हा!' हें मुखीं;
जाय न स्वांत त्यांचें सुरांच्या [४]रुखीं, जेंवि होतां कण प्राप्त तुच्छीं[५] तुंखीं. २३
जिष्णुनें आपल्या आश्रमीं ठेविलीं, दैत्यकोट्युग्रतेजें जिहीं सेविलीं,
कुंभजें जीं दिलीं तीं स्वशस्त्रें वरें घेतलीं आदरें भूमिकन्यावरें. २४
जो पित्याचा सखा गृध्र भेटे वनीं हृष्ट केला जटायु प्रभूनें मनीं.
सेविलें रम्य गोदावरीचें तट, प्रीतिचें पंचसंख्याक जेथें वट. २५
रावणाची स्वसा ये, कुचेष्टा करी; साधु सौमित्रि तत्कर्णनासा हरी;
त्या हि मारी तिच्या राम भावा खरा, कीं, कधीं ही नये खड्गभा वाखरा.
पाठवी रावण क्षुद्र नक्तंचरा नाम मारीच ज्या, तो मृगाचा बरा
वेष घे, स्वर्णरूपा तया भूमिजा 'द्या धरा' हें म्हणे प्राणनाथा निजा. २७
लक्ष्मण स्थापुनि क्षोणिकन्यावना रंकुमागे निघे, जाय अन्या वना;
प्र[६]द्रुता स्वातिदोर्विक्रमा जाणत्या श्रीश जाणोनि हाणी खळा बाण त्या. २८
'हा प्रिये! हा सख्या! लक्ष्मणा!' यापरी उच्च रामस्वरें हाक मारी अरी.
ऐकतां जानकी जाहली घाबरी; 'धांव' दीरा म्हणे ती, वदे 'हा!' वरी.
ती म्हणे 'देवरा! आर्यपुत्रा! वना धांव बा! वाटतो घात माझ्या मना.'
तो वदे, 'त्या मृगें राक्षसें दाविली भीति मिथ्या; खरी त्वां कसी भाविली?'
ती म्हणे, 'इच्छिसी स्वामिच्या हानितें; मत्परस्वांत तूझें बरें[७] मानितें.

१. तो व्याकुलात्मा (भरत) लज्जेनें अग्रजाला वंदी. २. अग्रभाग. ३. पर्णकुटी. ४. कल्पवृक्षावर. ५. तुच्छ कोंड्यांत. ६. पळपुत्या. ७. रामहानितें बरें उत्तम—**पंत.**

जी कृतघ्ना[1] भजे ती न मीं संपदा; होय पापें गति प्राप्त जी कंपदा.' ३१
'हाय !' बोले, निघे, जाय रामाकडे; तों फळ श्रीस त्या बोलण्याचें घडे.
एकटी राहतां रावणा सांपडे; संकटीं न च्छळें साधुच्या कां पडे? ३२
सोडवी गृध्रराज स्नुषेला बळें, पक्ष तोडूनि तो भग्न केला खळें;
मोडतां स्यंदन व्योममार्गें सती शीघ्र नेली; करी भस्म दुष्टा न ती. ३३
ऋष्यमूकीं कपी पांच पाहे, मग क्ष्मासुता आपले त्यांत सोडी नग;
श्रीस तो ने जसा आमिषातें खग; क्षिप्र लंकेसि पावे अघांचा नग. ३४
तीस ठेवी अशोकाभिधानीं वनीं रक्षणा राक्षसी ही न ज्यांच्या मनीं.
जेंवि बाळा मृगी तेंवि ती; लांडग्या[2] वाट ती रोधिती निर्दया दांडग्या. ३५
अग्रजा ऐकवी ताप तो आपला; 'हा!' म्हणे त्याहुनि श्रीश ही तापला.
शीघ्र लीलानर स्वोटजा ये, तया शून्य पाहे, पडे, दे मुनींतें भया. ३६
स्त्रीवियोगें गमे धैर्य पावे लया; श्वापदाला हि आली प्रभूची दया.
साश्रु शोधी, म्हणे, 'हा प्रिये! हा सये!' या विलापा भर प्राज्य मोहास ये.
शोक सौमित्रिला ही न तो आवरे, जेंवि लोभी तसा मानसीं वावरे,
मूर्च्छिता तातमित्रा पहातां रडे, वाक्य त्याच्या मुखें अर्ध कर्णीं पडे. ३८
रावणानें प्रिया कीर्ति नेली कळे, तातघातें ढळे धैर्य वाटे गळे;
पुत्रसा तत्क्रिया विश्वभर्ता करी, तो पुन्हा शोधशोकव्रतातें वरी. ३९
काळसा क्रूर भक्षावया जो धरी, राक्षसा त्या कबंधा वधी, उद्धरी.
तो विमानीं बसे देवसा[3] आघवा अर्थ भावी कथी ईश्वरा राघवा. ४०
जाय भिल्लीकडे, ताप तीचा झडे; व्योमयानीं[4] चढे. सर्व[5] देवी दडे;
कीं[6], उणी भा पडे. मुक्तियोगें घडे जी न ती सांपडे कीर्ति चित्तीं जडे. ४१
राम पंपातटीं जानकीतें स्मरे, तद्वियोगाकुळस्वांत शोकीं भरे.
धैर्य दे बंधु, वर्णी प्रतापा; वनीं भेटला ऋष्यमूकायनीं पावनी[7]. ४२
भानुचा पुत्र सुग्रीव भेटे बरी अग्नि ठेवूनि साक्षीस मैत्री करी.
ते अलंकार दावी, म्हणे, 'मी स्वयें भेटवीतों तुला त्वत्प्रिया निश्चयें.' ४३

---

१. भरता—**पंत**. २. लांडगिणी. ३. सर्व. ४. चढे. ५. वीज—**पंत**. ६. मुक्तियोगें जी कीर्ति घडे ती न सांपडे; [परि] चित्तीं जडे. ७. वायुपुत्र.

बंधुभार्येसि, जो धर्म वाळी, हरी, मारिला तो इनें[1] मत्त वाळी हरी.
वानरांचें दिलें राज्य मित्रास, 'हा!' दे म्हणो न प्रभुस्नेह वित्रास हा. ४४
मेळवी वानरांचीं[2] असंख्यें बळें; शोधवी तीस, नेली सती जी खळें.
शोध सांगे जटायुद्विजेंद्राग्रज प्राणदानें करी हृष्ट कीशव्रज. ४५
सागरातें विलंघी बळी वातभू; दे स्वकन्याप्रवृत्त्युद्यता[3] हात भू-
नागमातेसि वंची महात्मा हरी, अद्रि मैनाक जो त्यासि बंदी[4] करी. ४६
सिंहिकेतें वधी सावली जी धरी; यापुढें सिंधु ही गोष्पदत्वा वरी.
त्या हि लंकाधिदेवीस्मयातें[5] चुरी; सूक्ष्मरूपें सुधी सर्व शोधी पुरी. ४७
श्रीस पाहे अशोकीं वनीं, तो जगीं आपणा धन्य मानी दडे ही नगीं.
ये निशीथीं पलाशेंद्र तेथें; तया श्री दटावी, स्वतेजें न पावे भया. ४८
होय हर्षप्रद क्रूर भग्नाशया, ती हि मुद्रासिनें मोदमग्नाशया[6]
श्री स्वचूडामणी दे खुणेला सती, तत्प्रतापानळें ते उणे लँसती[7]. ४९
लक्ष शाखी बळें ही खळाचीं चुरी, अक्ष मारी उरों दे न कांहीं उरी[8];
सांपडे तेज दावूनि जाळी पुरी, हर्षवी फार शच्यादि सर्वा सुरी. ५०
सिंधु लंघी पुन्हां योजनें शंभर; प्रीत झाला ससुग्रीव विश्वंभर.
धन्य आलिंगनें ही करी, या स्तव स्वाननें ऐकवी, लाजवी यास्तव. ५१
सर्वदेवांशकीशर्क्षसेनाशतें घे, निघे तो सुकंठा सख्याच्या मतें.
सिंधुतीरा बळें राम रोधी ततें तत्सुमाहात्म्य ये त्या जडात्म्या न तें. ५२
'दे सती, मत्त वाळी पळें मारिला,' सांगतां हें खळें साधु धिक्कारिला.
शुद्धधी तो नमी स्वापदांधप्रजा[9] रामपादा, त्यजी त्या जडा अग्रजा. ५३
त्यासि लंका चि दे राम आपंगुनीं[10], लंघिजे यद्बळें मेरुला पंगुनीं;
सिंधु सांगे, 'नळा सांग, बा! सेतुला बांध; हा शत्रुसा काय भासे तुला?'
सेतु पांचा दिसां बांधिला योजनें तो शत, प्रेक्षिला देवसा जो जनें;

---

१. स्वामीनें; रामानें. २. हस्तदोष–**वानरांची**. ३. आपल्या कन्येच्या शोधार्थ सिद्ध झालेल्या मारुतीला. ४. भाट. ५. गर्वातें. ६. आशय=अंतःकरण. ७. शोभती. ८. शिल्लक. ९. भक्तांच्या आपदा नाहींशा करणारे रज ज्यान्चे त्या. १०. आश्रय करून.

श्रीस मायामय श्रीशमूर्धा धनु क्रूरधी दाखवी; 'हा!' म्हणे क्ष्माजनु. ५५
सिंधु लंघूनि पारासि पावे सुखें राम, तो वाळवी[1] राक्षसांचीं मुखें.
दुर्ग पाहे सुवेळाद्रिशीर्षीं चढे, शत्रु पाहोनि सुग्रीव कोपें कढे. ५६
क्षिप्र सुग्रीव पक्षींद्र तैसा उडे, ताडितां त्यासि लंका हि मोहीं बुडे;
कांपवी हेमरत्नाढ्य वाडे हुडे, ते तसे भंगले राक्षसींचे चुडे. ५७
त्या म्हणे राम, 'नाहीं बरें साहसें, कार्यनाशें न व्हावें जगीं बा! हसें.'
त्यावरि श्रीश लंकापुरी रोधवी, अंगद प्रेषुनि स्वारितें बोधवी. ५८
शत्रु शक्रादि ही ज्यापुढें लोपला, तो पलाशेंद्र संबोधितां कोपला;
मूढ पाहे वधाया हिता अंगदा, रंगीं[2] दावी तया द्विट्चमूभंगदा. ५९
तो उडे, च्यार बाहुद्वया झोंबले राक्षस, ज्याळसे ते नभीं लोंबले.
दोर्बळें झाडुनि क्ष्मातळीं लोळवी, बोळवी, हात दिक्कंधरा चोळवी. ६०
"श्रीशें[3] बोले नें[3] अन्या असा रामें[3] 'रे! कां उपेक्षूनि धन्या असारा! मरे?
शत्रु जोडूनि या हात सामा वळो, न प्रधामा जसा हा तसा मावळो. ६१
दोष आम्हांकडे मारितां काय हो! प्रेत तो राक्षसांचा रणीं राय हो.'"
होय आज्ञा कपींतें असी मारणा, वीर आरंभिती ते असीमा रणा. ६२
सैन्य अन्योन्यघातें रणीं भंगलें, शोणितें तोय पाथोधिचें रंगलें;
मांस युद्धांगणीं पंकसें सांचलें, शत्रुचें सैन्य आलें, न तें वांचलें. ६३
मेघनादें दशास्यात्मजें सानुजा बांधिलें नागपाशें स्तवी[6] भानु ज्या;
जी 'त्रि'पूर्वा 'जटा' जानकीचा हरी मोह ती, तार्क्ष्य ही सभ्रातें वरी. ६४
संकटीं कुंभकर्णा अरी जागवी, तो महायूथपातें रणीं नागवी;
त्यासि, सुग्रीव नासा हरी, कोपवी, त्या नगीं होय विश्वेश जो तो पवी. ६५
गुप्त राहे, न भी मेघनाद, श्रमीं सर्व घाली, म्हणे, 'रे घना! दभ्र मीं.'
बाण वर्षे, करी विद्ध तो राम ही, होय रात्रींत अत्यंत घोरा मही. ६६
जांबवत्प्रेरित क्षिप्र तो अंजनापुत्र गेला कराया जगद्रंजना;
शृंग आणी महौषध्यगाचें पळें, तीं विशल्यें करी सेश्वरें ही बळें. ६७

१. हस्तदोष—बाळवी. २. सभागृह. ३. अद्वितीय असा सीतापति राम. ४. नीचा! ५. रविः—पंत. ६. हस्तदोष—स्तावि. ७. रामासह असा.

आणिलें शृंग जें तें स्थळा पाविलें. वायुजें सर्व सैन्य स्तवा लाविलें;
जानकीरूप मायाबळें दाविलें, तद्वधें 'हा!' म्हणाया खळें लाविलें. ६८
वर्ण वाहे 'बिभी' यापुढें जो 'षण' क्षिप्र शोकाब्धिचें तो करी शोषण;
त्या वधीं लक्ष्मण स्वर्गिघोरामया, फार वर्णी जगद्गीत तो राम या. ६९
जाय सीतावधा रावण क्षोभला, त्यासि वारूनि मंत्री यशें शोभला;
सैन्यकोटी बहु प्रेपिल्या रावणें, तन्मनीं रामनाशें जया पावणें. ७०
मारिल्या दों मुहूर्तांत त्या लाघवें राघवें, तद्यश प्राशिलें आघवें.
राम अत्यद्भुत त्र्यक्षसा दाखवी, सच्चरित्रामृत स्वाश्रितां चाखवी. ७१
क्रूरकर्मा स्वयें तो निघे काळसा, जो धरीना चि भंगे तरी आळसा.
युद्ध भारी करी, फार मारी अरी, लक्ष्मणाच्या उरीं शक्ति हाणी अरी. ७२
राम भंगी तया, बंधुमोहें भया पावतां हर्पवी वायुदायाद या.
शृंग वातात्मजें तें पुन्हां आणिलें, कश्मळ स्वोषधीच्या रसें खाणिलें. ७३
भासला स्पष्ट सुप्तोत्थित; स्वानन व्योम राहो उणें दे जयस्वान न.
वासवाच्या रथीं श्रीश बैसे रणीं, मान्य केली शचीनें मनीं सेरणी. ७४
दिव्यशस्त्रास्त्ररूपा महासंपदा दाखवी हेरथीं देव दकंपदा;
लोटले याम चाळीस सोळा रणीं, राम पाहेचिना सिद्धि केल्या पणीं. ७५
तो मरेना शिरें तोडितां शंभर, ग्लानि चिंता धरी देव विश्वंभर;
कुंभज स्तोत्र दे तेज रामा रवी, वक्ष भेदूनि दिक्कंधरा मारवी. ७६
दिव्य वाद्यें नभीं, वाजलीं हर्षलें शंकरादि प्रसूनोत्करें वर्षले;
गाति गंधर्व ही, अप्सरा नाचती, स्तोत्रवाग्वृष्टि जी वर्णवेना च ती. ७७
स्वाम्यनुज्ञा शिरीं बंधुभावें धरी, अग्रजाची क्रिया पुत्रसा तो करी;
बैसवी त्यासि भद्रासनीं, वासरा माय दे देवदासा तसा आसरा. ७८
आणवी श्रीस, तीतें म्हणे, 'राहणें पापगेहीं, घडेना तुझें पाहणें;
सर्व लोकापवादा नव्हे साहणें; जा सुखें; म्यां निजांकीं कसें वाहणें?' ७९
गाय वाल्मीकि भर्गप्रभ व्यास, ती ऐकतां हें करी दिव्य भव्या सती.
हर्ष सर्वांस ही दे, वदे 'वास्तव'. त्र्यक्ष ही ऐकवी देवदेवा स्तव. ८०

१. देवांच्या भयंकर रोगाच अशा. २. जयघोष. ३. सरणी (?) ४. उत्कर=समूह.

तात भेटे स्वपुत्रा जगन्नायका, गाति देवर्षि त्यांच्या सती बायका;
शक्र मेले रणीं जे तयां वांचवी, कीर्ति भव्या सुधेच्या व्ययें सांचवी. ८१
भक्त लंकेश पूजार्थ जोडी कर, श्रीश सांगे, 'प्लवंगर्क्षपूजा कर;
भेटिव भ्रातृरत्नें सदा कष्टती; मत्सपर्या जगीं होय बा! स्पष्ट ती.' ८२
तो मसैन्या सुकंठासि पूजी, म्हणे, 'पुष्पकीं बैस बा स्नेहिचूडामणे!'
सप्रधाना तयातें रमाजानि घे, त्या सुकंठा ससेना हि राज्या निघे. ८३
आक्रमी पुष्पकें निर्जरांच्या पथा, श्रीश सांगे प्रियेला रणाच्या कथा,
दाखवी शंभुपादप्रभा सेतुला; हें पुसे कीं, 'कसा देवि! भासे तुला?' ८४
श्री म्हणे, 'हा प्रबोध प्रभो! वारिता सर्व संताप, आत्माश्रिता तारिता;
मूर्त आर्यप्रसाद स्वयें पातला, शत्रु येणें चि काळाननीं घातला.' ८५
पुष्पकीं ती हि तारा सती वाहिली जानकीनें वयस्या[1] तसी पाहिली.
वंदि ती हस्त जोडूनि गोदावरी, यत्पयप्राशनें सर्व मोदा वरी. ८६
चित्रकूटा नगा जानकी दे वर, 'देव रक्षू' म्हणे ज्या शचीदेवर[2].
आदरें राम दावि प्रयागा तितें ऐकवी कामदा विप्र या गाति तें. ८७
श्रीभरद्वाज आलिंगनें हर्षला, तो प्रमोदाश्रु आशीःसुधा वर्षला.
पाठवी वातजा सर्वसाक्षी प्रभु; जाय लंघूनियां तार्क्ष्यसा क्षिप्र भू. ८८
त्या गुहाला कथी 'राम आला' असें, हर्षवी चातका मेघ जैसा रसें;
तोषवी[3] नाचवी भूमिज्यांदेवरा; त्या सुदीना गमे, शंभु हा दे वरा. ८९
पूर्ण केला पण; श्रीप्रयागीं दुज्या वासरीं भेटला वत्सळ स्वानुजा,
तत्प्रसंगें जगा श्रीश दे हर्ष, तो चातकीं मेघ अन्यत्र ही वर्षतो. ९०
फार साकेत तें सद्यशें साजलें, त्या पुरा सत्य वैकुंठ ही लाजलें;
होय विश्वप्रिया राम राजा चि, तो काळ भी जो बुधा पामरा जाचितो. ९१
रामराज्या न लोकत्रयीं ही तुळा, भास्कराच्या कविश्रेष्ठ गाती कुळा;
या परा अंतर प्राज्य जैसें सुधा राब यांला, कळे स्पष्ट भक्ता बुधा. ९२
राम लंकाधिपा वानरेंद्रा बळा गौरवी, त्यांसि सेवेचिया दे फळा.
स्नेह सर्वत्र ही वातजीं आगळा, कीं, भरी त्या दयासिंधुचा हा गळा. ९३

---

१. वडिल माणसासारखी. २. हस्तदोष–**शची देवर**. ३. खोडलेला पाठ–**हर्षवी**.

सर्वदा सुज्ञ योगीं तपीं जागती, साधुसंगीं च सप्रेम जे वागती,
सद्गुरूपासना आदरें लागती, मागती, श्रीश दे ती प्रजेला गती. १४
रचिलें स्रग्विणीवृत्तें हें रामायण वंदनें
करूनि रामचरणीं अर्पिलें रामनंदनें. १५

इति श्रीस्रग्विणीरामायणं संपूर्णं ।

---

# सद्वित्तरामायण

(इंद्रवज्रा, उपेंद्रवज्रा, उपजाति वृत्तें)

ब्रह्मस्तुत श्रीपति दिङ्मुखातें मारूनि द्याया त्रिजगा सुखातें
दिक्स्यंदनाच्या सदनासि आला, प्रेमें चतुर्मूर्ति यशोर्थ झाला. १
ठेवी पिता ज्येष्ठसुतासि नाम श्रीराम हें होउनि पूर्णकाम,
पुत्रा द्वितीया भरताभिधान स्थापी, तिजा लक्ष्मण सन्निधान. २
चतुर्थ शत्रुघ्न; कुमार ते ज्या न साम्य त्या दाखविति स्वतेज्या;
न्यावा जसा चंदनवास वातें मागोनियां त्या नरवासवातें ३
ने गाधिजन्मा; हित वाट[1] केला रामें पथीं मारुनि ताटकेला;
रक्षःक्षयें क्रत्ववनें महर्षी झाला फळी[2] पाहुनि नेम हर्षी. ४
म्हणे पति क्षुब्धमना 'शिला हो'. श्रीशें सतीचा श्रम नाशिला हो!
नाशूनियां गौतमविप्रतापा अन्या उणा तो गमवि प्रतापा. ५
जाणें प्रभूचें मिथिलापुरीतें, भाग्यें करी त्या तिथिला पुरी[3] तें;
'खंडी नृपांच्या स्मरचापला[4] जो, त्या[5]' ही[6] म्हणे, 'हा हरचाप लाजो.' ६
होतां पित्याचा पण पूर्ण, धन्या श्रीशा स्वकांता वरि भूमिकन्या.
तिघांस ही तीन सुता विदेहाधिनाथ भूजा जासि तेंवि दे हा. ७
प्रसाद नाशी अनुगाधि ज्याचा, प्रताप वर्णी नृप गाधिजाचा.

---

१. यज्ञस्थान. २. सफल. ३. पौर्णिमा. ४. मदनबाधेनें झालेल्या चलबिचलीला.
५. रामचंद्राला. ६. सीता.

भाग्यें मिळे दिग्रथ सोयरा ज्या मोटा तया उत्सव होय राज्या. ८
क्षत्रघ्न जो भार्गवराम दापी, त्याच्या प्रभु क्रूरतरा मदा पी;
भंगी, करी हृष्ट तथापि त्याला; गायासि लावी स्वकथा पित्याला. ९
हर्षे, म्हणे ती स्वमना अयोध्या, 'रामा यशप्राज्य असें च यो, ध्या.'
कोणी पुसेना कवि सत्यलोका, साकेत वैकुंठ चि सत्य लोका. १०
मामा युधाजित् [1]पविभृत्प्रभाच्या मतें पुरा ने मग त्या स्वभाच्या.
राजा हि योजी अतुळप्रभावा रामासि द्याया युवराजभावा. ११
तों मंथरादूषितबुद्धि [2]चंडी ती मध्यमा स्त्री पतिचित्त खंडी;
मागे दिले जे वर ते वदोन [3]क्ष्वेडोग्र शोकीं बुडवून दोन. १२
राज्य स्वपुत्रा, वनवास रामा मन्वब्द, मागे पतिच्या विरामा;
संप्रार्थितां ती न वळे चि रामा, नें बोलवे[4] सद्व्रततत्परा 'मा'. १३
सत्यव्रतभ्रष्ट पिता न हो, तें श्रितां सुधावर्षि [5]वितान होतें;
स्वामी म्हणे, 'न व्रतहानि घाला घालू यशीं' वत्सळ हा निघाला. १४
घे वल्कलें, भूषण वस्त्र सोडी; पित्यासि मातेस हि हस्त जोडी.
निघे प्रभु त्यागुनि राज्य, भार्या छाया सुटे लक्ष्मण ही न आर्या. १५
न [6]पत्तिता भूप शके सहाया, सांगे सुमंत्रा स्वरथीं वहाया.
जातां वना राम पुरी वदे 'हा!' पाहे न गेहा जन तो न देहा. १६
भेटे सख्या राम गुहा निषादा, दे त्यासि निर्मूनि जटा विषादा.
सांगे पित्याच्या सचिवास, 'देवा द्यावा तुवां तोष करूनि सेवा.' १७
नौकेंत बैसोनि सुरापगेला लंघूनि तेथूनि दुराप गेला.
प्रेमें भरद्वाजपदांसि वंदी तो देव, ज्याचे विधि वेद बंदी. १८
निघे प्रयागाहुनि राम, पाहे श्रीचित्रकूटीं मुनिवृंद राहे.
तें सूत सांगे नगरींत राया त्या पुत्रशोकीं न गरीं तराया. १९
सत्पुत्रशोकें वरि हानि शाप; [7]स्वर्भानु वाटे, नृप हा निशाप.
मंत्री तया साधुसि आणवीती; येतां चि पुत्रा कृत जाणवी तो. २०

---

१. इंद्राप्रमाणें तेजस्वी अशा दशरथाच्या. २. ताठ. ३. विषाहून उग्र असें. ४. 'नाहीं' असें म्हणवेना. ५. छत. ६. पायीं चालणें. ७. राहु.

दे शोक तातार्थपदानुगां जी तीतें न संकोच धरूनि गांजी.
वाढी सुधेतें लवडूनि कांजी; ज्ञाता तिची भीड धरील कां जी!?[1] २१
ज्येष्ठामना जोडुनि हात दे हा संतोष संस्कारुनि तातदेहा
गुर्वादिसर्वांसह, तो करी ती मातेपुढें जी प्रियतोकरीती. २२
ज्याच्या न राहे प्रखराघ वार्ते त्या चित्रकूटस्थित राघवातें
भेटे, कथी मृत्युकथा पित्याची; धी तापवी शांत तथापि त्याची. २३
ताता महातृप्तिदसारतोया[2] दे पादुका सांत्वुनि फार तो या;
राहे समानव्रत साधु नंदिग्रामीं, जसा शंभुवियुक्त नंदी. २४
त्या चित्रकूटा जगदीश सोडी, पुण्याश्रमीं अत्रिस हात जोडी;
त्याची सतीवर्णितकीर्ति भार्या दे अंगराग क्षितिजेसि आर्या. २५
करी विराधा शुचि राक्षसा जो यशें न कां तो रुचिराक्ष साजो?
तें दंडकारण्य असाध्वसत्वें[3] त्या नंदना पूज्य असाधवसत्वें[4]. २६
दे हर्ष सर्वां हि तपोनिधीतें, झाला न जो प्राप्त तपोनि धीतें;
कीं, नाम सांगे, करि वंदनातें, 'आशी' म्हणे 'द्या मज नंदनातें.' २७
केला अगस्त्याख्य महर्षि तातें ब्रह्मयाचिया हृष्ट; न हर्षितातें
देह स्फुरे, ब्रह्म महातपा तें पी, हालवीना च पहात पातें. २८
सखा पित्याचा पितृतुल्य रामा झाला वनीं पूज्य जटायुनामा.
गोदेसि मातेसि तसें चि पाहे; पर्णालयीं पंचवटींत राहे. २९
गळां पडे शूर्पणखा, परातें पाहे वराया, पण खापरातें
तो सद्गुणाचा वरिना करंडा, प्रहृष्ट दंडें करि नाक रंडा. ३०
सौमित्रि खड्गें हरि कर्णनासा, ज्याच्या करीती गुणवर्णना सा;[6]
पावेल त्या केंवि तसी कुशीला, पुण्यें न येतां क्षितिच्या कुशीला? ३१
खरा ससैन्या हननार्थ धाडी, लीलेकरूनि प्रभु त्यासि ताडी,
छेदी शिरें, सर्व परोर फाडी, सेना जनस्थान हि ओस पाडी. ३२
स्वदुर्गुणें पावुनि ताप, भावा दशानना ती कथि पापभावा.

---

१. कौसल्येच्या मनाला. २. श्रेष्ठ उदकाला (तिळांजळीला). ३. निर्भयपणामुळें. ४. दुष्ट राक्षस नाहींसे झाल्यानें. ५. परमेशातें. ६. षट्शास्त्रें.

'स्त्रीरत्न घे, होउनि निःस्व साहो न शोक वैरी, मुदिता स्वसा हो.'
मारीच मायामृग शत्रु दावी, श्री त्यासि हेमाकृति सत्य भावी;
मागे, धराया दयितासि लावी; मनुष्यलीला प्रभुची च गावी. ३४
मर्मी तयातें शर राम हाणी, तों तो खळ श्रीरमणाचिवाणी
'हा! हा!' असी तारतरातें[1] वाणी बोले; भ्रमे श्री न जसी शहाणी. ३५
सौमित्रितें भावुनि घात, भीता 'धांवें' म्हणे 'पत्यवनार्थ' सीता.
तो जाणवी सत्य भला शमाया तत्रास, 'हे देवि! पलाशमाया.' ३६
कोपे, म्हणे ती, 'प्रभुनें मरावें, पापा! तुझा काम मला हरावें;
दायाद कीं तूं न चपापशील, क्रौर्यें अघा भी न च पापशील.' ३७
सांत्वें हि तापे, न सती निवे; कीं कोपोदयीं सत्व नुरे विवेकीं.
निघे, वदे 'साधुसहायशास्त्री रक्षी, न रक्षी[2] हि महायशा स्त्री.' ३८
प्रजावतीनें[3] बहु खिन्न केला, आर्या कथाया निजदुःख गेला.
तों एकटी श्री उटजांत पाहे, रथीं बळें रावण तीस वाहे. ३९
'हा राम! हा लक्ष्मण! या शशातें मारूनि रक्षा हरिहो! यशातें.'
हाका अशा ऐकुनि गृध्र कोपे, तें यापुढें रावणतेज लोपे. ४०
केला चि वैरी विरथ क्षणानें, देहाचिया कंपित तक्षणानें.
सीतेसि भंगोनि रणांत सोडी, खड्गें अधर्मे मग पक्ष तोडी. ४१
पक्षक्षयें गृध्रपयत्न राहे, सतीस आंगें खपथांत वाहे.
नेतां, नगीं वानर पांच पाहे, टाकी अळंकार, म्हणोनि 'हा!' हे. ४२
लंकेत नेवूनि अशोकनामीं ठेवी वनीं, तीस न ने स्वधामीं.
बंधूक दे धैर्य उरों न रामीं, म्हणे, 'म्हणों काय तुला हि बा! मीं?' ४३
बोले कुटी पाहुनि ओस 'हाय!' जो दे मुमुक्षूप्रति ओ, सहाय,
तो दाखवी ताप विलाप रानीं, जाणों खरा तापविला पैरानीं[4]. ४४
पाहे तसा तातसखा दुवस्था[5], पुसे, 'असो कां घडली अवस्था?'
शोची, निवेदूनि परा, सुनेतें, जें धैर्य होवूनि परासु ने[6] तें. ४५

---

१. अति उच्च व पीडार्त. २. विवेकें अविवेकें—**पंत.** ३. भावजयीनें. ४. कानरावगानों—**पंत.** ५. कष्टांत पडलेल्या. ६. हरिता झाला—**पंत.**

अस्वास्थ्य निःसीम, तथापि त्याची, धरूनि तो साधुपथा, पित्याची
तसी, क्रिया सांग करी, रमेला रक्षू न चिंतूनि शरीर मेला. ४६
बहूग्र काळाहिपरीस खाया धरी कृपासिंधु करीसखा, यां[1],
म्हणे समर्पून विमान, 'साजें, दे ज्ञान, माने कविमानसा जें.' ४७
तो शक्रसा भास्वररूप सीताविश्लेषदीप्तिस्मरबाणभीता,
सांगे, 'पहा जा शबरीस आधीं, कीशा सुकंठा मग, कार्य साधीं.' ४८
भेटोनि आधीं शबरीस, उक्ति प्राशूनि, दे मुक्तिद तीस मुक्ति.
श्रीराम सेवूनि मुहूर्त पंपा स्त्रैणत्व दावी मिरवूनि कंपा. ४९
प्रार्थी तया लक्ष्मण, 'ऐक आर्यां! धैर्यें प्रयत्नें करिसील कार्यां.
विलाप तेजोहर हा रहावा; सुग्रीव आधीं प्रभुनें पहावा.' ५०
हितावह स्वानुजबोध तो घे, त्या ऋष्यमूकाप्रति जाति दोघे.
सुग्रीव भी पाहुनि चापपाणी, वालीष्ट[2] ऐसें हृदयांत आणी. ५१
धाडी पुढें वातसुता स्वयोधा त्यांच्या कराया मतिशक्तिशोधा,
भेटे तयां तापसवेषधारी; तरे स्वयें, त्या सुगळा हि तारी. ५२
सुग्रीवरामांसह सख्य होय; क्षीर प्रभु, स्वच्छ सुकंठ तोय.
तो देव्यलंकार सवस्त्र दावी, त्यांतें प्रभु क्लेशनिमग्न भावी. ५३
पुसे, 'प्रियेचे नग काय बा! हे?' भ्राता म्हणे, 'नूपुरयुग्म वाहे
आर्यापदाब्जद्वय तें चि आहे.' साश्रु प्रभु श्रीविरहा न साहे. ५४
सुग्रीव बोले, "जरि मीं वियोगी, वाली बळें मद्दयितेसि भोगी,
न 'हा!' म्हणें, धैर्य धरूनि आहें कपी हि; तूं कां त्यजितोसि बा! हें?
म्हणों नको 'हा!' मज पाव; शील त्यागूं नको, बा! प्रिय पावशील.
भेटेल यत्नें तुज तूर्ण आर्या; करीन मीं या प्रियमित्रकार्या." ५६
पुसे प्रभु 'स्वाग्रज ही अराती कां?' हे कथा; तो हि सविस्तरा ती
सांगे, "बिळीं दैत्यवधार्थ गेला; बा! हा बिळद्वारप बंधु केला. ५७
होतों तया सेवित मीं बिळाला, वर्षें हि वाली न मला मिळाला.
शिळा बिळीं ठेवुनि साश्रु आलों, मंत्र्याग्रहानें कपिराज झालों. ५८

---

१. कबंधा—**पंत**. २. वालीचे मित्र.

ये शत्रु मारूनि, मला न पाहे, शिळा बिळीं; द्वेष मनांत वाहे.
फोडी मुठीनें हि महोपळाला; म्हणे, 'वधावें चि तया खळाला.' ५९
मार्ते विलोकी स्वपदीं, न साहे; तत्सांत्वनाला न उपाय राहे.
दंडी प्रधानासि, मला हि पाहे मारूं; कथा तों इतुकी च बा! हे. ६०
या ऋष्यमूकीं च मतंगशापें आहें सुखी तत्सुतपःप्रतापें;
मरेल येथें शिरतां चि वाळी, म्हणोनि तो या अचळासि वाळी. ६१
'स्थानीं वडो मृत्यु,' म्हणे 'तुला या,' कीं हा ज्ञुगारी असुरा[1] लुलायां;
शुद्धाश्रमा दूषिति रक्तबिंदु; ज्ञाता न शापू, मग कां न निंदु?" ६२
श्रीराम बोले, 'वधितों खळाला; वाळी न वांचेल जऱ्ही पळाला.'
तत्प्रत्यया दाखवितां बळाला; वैरी गमे काळमुखीं गळाला. ६३
एकें चि बाणें हृदयांत ताडी श्रीराम, वाळीस पळांत पाडी.
दे बंधुचें राज्य, कळत्र, मित्रा. गातात कृत्या कवि या विचित्रा. ६४
देवांश कीशर्क्ष असंख्य आणी, म्हणे, 'प्रभूची अतितूर्ण राणी
शोधूनि मासांत चि या चि; वाणी विलंघितां हे, न चुकेल हाणी.' ६५
जो दक्षिणेला युवराज गेला, तेणें ससैन्यें बहु शोध केला;
न नाथदत्तावधि मास राहे, काळीं करूं[2] पाहति आसरा हे. ६६
जटायुचा अग्रज गृध्र शोध प्रेमें कथी, हर्षवि सर्व योध.
लंघी मरुन्नंदन सिंधु गावें शत क्षणें, तद्यश भव्य गावें. ६७
मैनाक ये आश्रय यास दे, यां[3], 'बा! पावलों[4] स्पर्शुनि' हें वदे हा;
वंचूनि हर्षीं सुरसेसि घाली, ती सिंहिका ही गिळितां निमाली; ६८
शोधूनि लंकेंत, वनीं अशोकीं, पाहोनि 'मीं धन्य' म्हणे 'त्रिलोकीं'.
प्रार्थी कुधी रात्रि, तयासि दापी साध्वी; तिची सूक्तिमहासुधा पी. ६९
चिंती मनीं दुष्टलयार्थ रुद्रा, जातां कुधी, दे तिस नाथमुद्रा;
सांगे शिव श्राव्य चरित्र पूता, संदेश चूडामणि दे स्वदूता. ७०
वंदूनि सीतेसि पुसोनि भावें, मोडी वन द्वेषि बळप्रभावें;
परासु होतां सुत अक्ष, रुष्टें आज्ञापिला ज्येष्ठ कुमार दुष्टें. ७१

---

१. महिषासुराला. २. जीव देवूं पहाती. ३. मैनाकाला. ४. आश्रय–**पंत.**

ब्रह्मास्त्र योजी घननाद मानी, त्या सांपडे अस्त्रवरास मानी.
बांधूनि नेला अरिनीं सभेला; तो कौतुकी न प्रकटी प्रभेला. ७२
म्हणे, 'पचेना प्रभुरत्न चोरा; रे! कोपवावें भुजगें न मोरा.
सामें जगीं होसिल फार गोरा; सद्भार्य मुक्तांत सिरोनि दोरा. ७३
तो आठिव त्र्यंबकचाप, लाजें, मना निवारीं वश चापला जें.
सुधाघटाच्या तुकरीं बुडाला. रे! उद्धतत्वें खर कीं बुडाला.' ७४
ये राक्षसांच्या बहु राग राया; पाहे वधाया बळसागरा या.
बिभीषण प्रांजळि पूतभावा वारी स्वयें वर्णुनि दूतभावा. ७५
म्हणे कुधी, 'दीप्त करूनि पुच्छा सोडा पुरींत भ्रमवूनि तुच्छा.'
तैसी च चेष्टा करिती पलाश; क्षोभे, उडे जो तपनीं[1] फलाश. ७६
बिभीषणाचें गृह मात्र रक्षी; पुच्छाग्नि लंकानगरीस भक्षी.
नभीं गमे मारुति तार्क्ष्य पक्षी कांपे, न या राक्षससर्प लक्षी. ७७
पुच्छाग्नि सिंधूंत करूनि शांत, ध्यानांत आणूनि विभूतिकांत,
करी पुन्हा गोष्पद अर्णवातें; संपूजिला तन्मुखवर्ण वातें. ७८
प्रेमें नमी ऋक्षवरासि आधीं; तो त्या म्हणे, 'कीर्ति असी च साधीं.'
करी सुखी तें बळ संगदानें, सत्कारिला वर्णुनि अंगदानें. ७९
वंदूनि चूडामणि दे प्रभूतें; भेटे महें तो कपिला प्रभूतें.
मानी तया स्वासुप[2] कारभारी; म्हणे, 'फिटेना उपकार भारी.' ८०
निवे प्रियेचा प्रभु हा निरोपें करावया दिङ्मुखहानि रोपें;
पयोधितीरा रघुराज पावे, यत्पादपद्म द्रुहिणें जपावे. ८१
"देवूनि साध्वी व्यसनीं तरावें; आधीं स्मराच्या न भरीं भरावें.
बळें विष प्राशन कां करावें? सर्वस्व होतें अनयें परावें. ८२
एकें चि केला पुरदाह दूतें. झाली च सैन्यें 'परि'पूर्व'भूतें'.[3]
बा! साम, जैसें अघ गांग, धूतें, नमूनि अर्पी प्रभुच्या वधूतें." ८३
म्हणे असें सांगुनि, जो 'नमो' त्या, बोधा न घे, अंध जसा न मोत्या.
धिक्कारुनि क्रव्यभुगीश बोले, जें तें विषासीं च सभेंत तोले. ८४

---

१. सूर्याचे ठायीं. हस्तदोष-तपनी. २. आपला प्राणरक्षक. ३. पराभूत.

बिभीषण प्राज्ञ निघे, अरण्या दवावृता त्यागुनि त्या शरण्या;
श्रीशा नमी, श्रीगळनिष्क[1] लंका तया समर्पी नतिनिष्कलंका[2]. ८५
महास्त्रतेजें बहु ताप पेटे; श्रीशासि तेव्हां जळराशि भेटे.
तत्प्रार्थनें तो जगदिष्टहेतु श्रीराम निर्मी वचनें चि सेतु! ८६
श्रीस प्रभूचें धनु शीर्ष दावी, 'हा! हा!' म्हणाया खळ तीस लावी.
बिभीषणस्त्री सरमा निवारी 'माया' असें सांगुनि खेद भारी. ८७
त्या सेतुमार्गें उतरोनि पारा पावे महाकीशसमूह सारा;
चढे सुवेळीं प्रभु, दुर्ग पाहे, सुग्रीव, वैरी दिसतां, न साहे. ८८
उडोनि गांठूनि खळासि ताडी; त्यातें, तयाच्या मुकुटा हि, पाडी.
सामार्थ राम प्रभु दूत धाडी, तो शत्रुतें मान हरूनि नाडी. ८९
सभेंत राजा परभंगदातें सामान्य हें मानुनि अंगदातें,
चौघांसि सांगे, धरवी रयज्ञा; उडे, करी हा परवीरयज्ञा. ९०
स्वामी म्हणे, 'त्या जरि काम सामीं नसे, नसो; मारिन तामसा मीं.
हो हेत जो यूथपहो! मनाचा; करा सुखें राक्षसहोम, नाचा. ९१
आज्ञेसि माथां बहु मानवे घे, दुर्गीं चमू सिंधुसमान वेघे.
आरंभिती ते परमारणातें हर्षें, करीती परमा रणातें. ९२
निघे स्वयें रावण उद्धतत्वें; न वर्णवे अद्भुत युद्ध तत्वें.
रणांगणीं रक्तनद्या वहाती; कबंधनृत्यें अमरी पहाती. ९३
प्रहस्त सेनापति मुख्य मेला; रामें लयातें बहु वीर नेला.
भंगोनि दिक्कंठ फिरोनि गेला, तथापि कांहीं न विचार केला. ९४
दे मेघनाद त्रिदशांसि दैन्य ध्वंसूनि सारें कपिवीरसैन्य.
तो नागपाशें प्रभुला हि बांधी, श्रीची न मोहांत बुडेल कां धी? ९५
दे स्वावनाचें यश पक्षिपातें, त्याच्या पळाले अहि आक्षिपातें[3];
होतां हरि स्वस्थ ससेन, माया सोडूनि येती न ससे नमाया. ९६
तो कुंभकर्णासि करूनि जागा म्हणे, 'वधीं ते नर कीश जा गा!'
भासे कपींला निजकाळ साचा, न त्याग केला जन्हि आळसाचा. ९७

---

१. श्रीकंठभूषण (राम). २. नमस्कारानें निष्कलंक अशा बिभीषणा. ३. दृष्टिपातें.

धरी [1]सुकंठासि, बळी न सोडी; सुटोनि तन्नाक सकर्ण तोडी;
फिरे, गिळी तो सगळे चि कीश, छेदी तदंगें प्रभु जानकीश. ९८
श्रीरामसौमित्रि ससैन्य यत्नें शल्यार्त केले समरीं सपत्नें.
मेघस्वनें योजुनि अस्त्रमाया लोकेश पावोनि भय अमाया. ९९
ऋक्षाधिराजें हितबोध केला, अक्षुन्न कैलाससमीप गेला;
घेवूनि ओषध्य[2]गशृंग आला, जीवातु रामप्रमुखांसि झाला. १००
सांगे पित्यातें, 'रथ दिव्य होमीं निर्मूनि वैरी वधितों अहो! मीं.'
पुन्हा हि तो प्राज्यमद अमाया सारे करी शत्रु अदभ्र माया. १०१
मायामयी श्री समरांत दावी, मारी, म्हणाया 'बत! हंत!' लावी.
बिभीषणें तो भ्रम दूर केला, सौमित्रिनें शत्रु लयासि नेला. १०२
पावे सुतांतें दशकंठ तापा, घे खड्ग चिंतूनि मनांत पापा,
सीतावधा जाय महोग्रकर्मा, ती भी, स्मरे रामपदा, स्वधर्मा. १०३
सुज्ञें सुपार्श्वें जरि भंगदायी तो वारिला बोधुनि आततायी.
शची म्हणे, 'त्वद्व्रत शुद्ध बाई! स्त्री काय या? हा खळ खाय गाई.' १०४
धाडी वधाया बहुकोटि सेना, जय स्वनेत्रांसि जरी दिसेना.
रामें त्रिनेत्रं तसि लोळवीली, काळाकडे सांत्वुनि बोळवीली. १०५
तो 'हा!' म्हणे राक्षसदारदैन्यें, स्वयें निघे घेवुनि सर्व सैन्यें,
कल्पांत तैसें भय दे, वसेना तयापुढें ती जसि देवसेना. १०६
तो शक्तिनें लक्ष्मणवक्ष भेदी, त्या राम भंगी जन्हि होय खेदी;
केला पुन्हां सावध ओखदानें, त्या चि क्षणें श्रीपतितोखदानें. १०७
सारूनि अन्योन्यबळांसि दूर, श्रीराम दिक्कंधर रक्तपूर
युद्धांगणीं वाहविती प्रशूर, क्षोणीतळीं भासति दोन [3]सूर. १०८
द्वेष्टा रथीं, भूवरि नाथ पाहे युद्धांत देवेश्वर, तें न साहे;
प्रेषी निजस्यंदन सूत तूर्ण, स्वामी तयाचा करि काम पूर्ण. १०९
ते युद्ध अत्यद्भुत, साठ याम [4]श्रुत्यून, वीरेंद्र दशास्य राम,

---

१. हस्तदोष—सुकंसि. २. संजीविनी (वांचण्याचें औषध). ३. सूर्य. ४. वेदाहून उणें (चार उणें साठ=छपन्न).

अजस्रकोपें करिती, न शस्त्रें रक्तार्द्र ही भग्न कृती, न अस्त्रें. ११०
शिरें शत च्छेदुनि राम पाडी, मर्मीं शराहीं जरि फार ताडी,
तऱ्ही विराजे दशमस्तकाहीं दिक्कंठ, लाजे प्रभुहस्त काहीं. १११
भेटे अगस्त्याख्य महातपा या 'आदित्यहृत्स्तोत्र' कथी जपाया,
दे दर्शन क्षिप्र जपावसानीं, बैहीस तो हर्ष न पावसानीं. ११२
श्रीभास्करप्राप्तमहावरानें ब्रह्मास्त्र योजूनि महाशरानें
भेदूनि वक्ष प्रभु त्या अशास्या करि व्यसु क्रूरतमा दशास्या. ११३
जयस्वनें स्वस्तरुपुष्पवर्षें दत्ताभया पूजिति देव हर्षें,
गंधर्व गानें, अमरी हि नृत्यें, वर्णूनि देवर्षि उदारकृत्यें. ११४
क्रिया तयाची करवूनि रामें, बिभीषणाला पद पूर्णकामें
सौमित्रिला सांगुनि देववीलें, छत्रादि सल्लक्षण सेववीलें. ११५
शुद्धस्तवा दिव्य करूनि देवी मग प्रभूत्संगपदासि सेवी;
भेटे पिता, जे समरांत मेले जीवंत शक्रें कपि ऋक्ष केले. ११६
लंकेंत सुग्रीव ससैन्य नेला, बिभीषणें पूजुनि हृष्ट केला,
श्रीपुष्पकें श्रीश पुरासि आला, प्रमोद भारी भरतासि झाला. ११७
न त्या महाला त्रिजगांत जोडा, असे समाधींत परंतु थोडा;
अन्योन्य योगी म्हणते 'न सोडा'; दुराग्रहें हें जनहो! न खोडा. ११८
राज्याभिषेक प्रभुनें विधीनें स्वीकारिला सांग दयानिधीनें;
तें फार सिंहासन शोभवीलें, यशोमृतें विष्टप लोभवीलें. ११९
काळा वदे होउनि राम राजा "म्हणें जनातें न खरा! 'मरा जा.'"
करी प्रजा भाउनि रंजनातें, मानी प्रजा भाउ निरंजनातें. १२०
पूजी स्वयें त्या सुजना कपींना, सुधा यशा सोडुनि नाक पीना,
मरुत्सुता राघव दे वरा, ज्या ये ऐकतां लाघव देवराज्या. १२१
चौघांस झाले सुत आठ, वाहे त्यां राम सुश्री स्तुत, आठवा हे.
दे सर्व सेवापर मागती तें, राम प्रजा ने परमा गतीतें. १२२

---

१. मोरास. २. मरणाशिवाय ज्याला योग्य अशी शिक्षा च नाहीं असा. ३. हे सत्यप्रतिज्ञ (काळा)!

'सद्धित्तरामायण' हें मयूरें रामनंदनें[1]
श्रीरामचरणीं प्रेमें वाहिलें कृतवंदनें. १२३

इति श्रीसद्धित्तरामायणं संपूर्णं ।

---

# रामायणपीयूष

(मालिनीवृत्त)

विधिसह सुर विप्र प्रार्थिती विश्वपाळा
अवतरुनि वधाया रावणा लोककाळा.
दशरथसुत झाला तो घनश्याम, 'राम'
श्रुतिबहुमत ऐसें ठेविलें त्यासि नाम. १
सुत भरत दुजा हा मध्यमेचा तदंश,
त्रिभुवननुत जेणें जाहला सूर्यवंश.
गुणनिधि तिसरा तो लक्ष्मण प्राज्यधामा,[2]
कविमत चवथा ही साधु शत्रुघ्ननामा. २
दशरथ सुत होतां वृद्ध भावांत हर्षे,
बहु धन, घन जैसा तोय तैसें चि, वर्षे.
करि उपनयनें तो योग्यकाळीं, जगातें
सुखवि, दुखवि दानें पारिजाता नगातें. ३
स्वमखसमवनार्थी गाधिजन्मा महर्षी
नृपतिस सुत मागे; होय राजा न हर्षी.
कुळगुरुवचनें दे तत्करीं पुत्र दोघे,
परम मुदित आशीराशि अर्पूनि, तो घे.
मुनिवर शत अस्त्रें रामभद्रासि दे हा,
प्रथम शिकवि विद्या, क्लेश व्हाया न देहा.

---

१. खोडलेला हस्तदोष–रामनंदनें. २. अत्यंत तेजस्वी.

वधुनि गुरुनिदेशें राघवें ताटकेला,
　परम सुगम विघ्नध्वंसनें वाट केला. ५
अनुजसह मुनींच्या आश्रमीं राम पावे,
　त्यजुनि भय महर्षि स्वस्थचित्तें तपावे;
कुशिकसुत म्हणे, 'ते दुष्ट यावे खपावे;
　तव भुज रघुवीरा! आज यज्ञा जपावे.' ६
कटकसह सुबाहु क्रव्यभुक् प्रेत केला,
　उडउनि शरवातें *दूर मारीच नेला.
अतिविकळ पडे तो सागरीं, सासु राहे;
　स्वहित शम चि पाहे, त्रास चित्तांत वाहे. ७
रघुपतिवरि विश्वामित्र वर्षे वराशी,
　मुदिर हि उदकाच्या तेंवि गोत्रीं[1] न राशी.
जनक निजसवातें तो पहायास बाहे,
　विमळ यश, अहल्या, रूप ही भव्य, लाहे. ८
दृढ हि धनु शिवाचें ओढितां राम मोडी,
　पण पुरवुनि सीतारूप सद्रत्न जोडी.
भरतमुख तिघे जे त्यां तिवी आत्मकन्या
　जनक नृप समर्पी, पावल्या तोष धन्या. ९
'पळभरि भलता जो देवदेवा जपे यां
　स्वसुकृतफळ वर्णीं दे,' वदे 'वाजपेयां[2].'
जनक, अजित हा, हें व्यक्त जाणे सुतत्व,
　प्रकट दशरथाच्या धीस बाणे सुतत्व. १०
मग दशरथ राजा मैथिला अत्युदारा
　पुसुनि तनय घे, ज्या जोडिल्या तत्सुदारा.
फिरुनि निजपुरा ये, तों पथीं राम भेटे,

---

१. पर्वतावर. २. स्वनाममंत्राच्या प्रतिवर्णीं स्वसुकृतफळ दे वाजपेया असें म्हणणारा—**पंत**. वाजपेय=यज्ञविशेष. * हस्तदोष—**दुर**.

यमसम बहु कोपें, मोडितां चाप, पेटे. ११
दशरथ गुरु तो हि त्रासला क्षत्रकाळा,
प्रभुसि परि जयश्री दे तया शांतिमाळा.
प्रमुदित नगरीतें पावला, लोक सारे
म्हणति निजमनीं, 'बा! भंगिला तो कस रे!?' १२
अनुजसह पुराला मातुळें साधु नेला
भरत हि, गुरुवाक्यें तत्प्रियार्थें चि गेला.
धरि मति युवराज ज्येष्ठपुत्रा कराया.
परि हित दयिता ही तें करूं दे न राया. १३
'ऋषिसम मनु[1] वर्षें राम रानीं वसावा,
भरत निजपुरीं या राजभावें असावा.
स्मर वर, कर साचे, हे चि तूं देव दोन.'
श्रम पतिहृदया ती स्त्री असें दे वदोन. १४
सुरहृतमति सोडी आग्रहा बायको न.
प्रभुवर जननीचें इष्ट तें आयकोन.
अनुजजनककन्या घे, निघे, अंह[2] राया
तिळभरि न सिवाया, रावणा संहराया. १५
अनुजसहित नेसे वल्कलें मातृदत्तें,
नमुनि गुरुसि, सोडी राज्य, जें स्वैगर्वत्तें[3].
दशरथ कथि सूता, 'शीघ्र ने स्यंदनातें,
बसिव अनुजयुक्ता स्त्रीयुता नंदनातें.' १६
निरुपमतम शोकीं होय साकेत मग्न.
क्षितिपति बहु लाजे त्या जना, जेंवि नग्न.
करुनि सुरहितार्थे स्वाश्रितेच्छेसि भग्न,
त्वरित विभु निघे तो, जेंवि साधूनि लग्न[4]. १७
न बिपुळ हृदयीं ही दुःख मावे, उते तें.

१. हरताळलेला हस्तदोष—मुनि. २. पातक. ३. स्वर्गवत् तें. ४. सुमुहूर्त.

त्यजुनि नृपति गेला केकयाच्या सुतेतें.
सुविकळ महिषीच्या सेवटीं जाय गेहा,
रडत तिस म्हणे, 'न प्राणहा[1] काय गे! हा?' १८
प्रभु गुहकनिषादा भेटला शृंगबेरीं.
कथि गुरु सचिवातें, 'जा स्वनाथासि हेरीं.'
तरुनि सुरधुनीतें शीघ्र पावे प्रयागा,
नतिस, नुतिस, झाला श्रीभरद्वाज जागा. १९
प्रभुवर करि हर्षे चित्रकूटीं निवास;
प्रमुदित भजती त्या साधु, जैसे शिवास.
गुहचर कळवी तें, सूत सांगे पुरांत
क्षितिपतिस, तयाच्या वज्र झालें उरांत. २०
प्रभुवरजननीतें शाप सांगोनि, भूप
त्यजि वपु सुतशोकें, होय देवार्च्य[2]रूप.
पतिनिधन जनौघीं तें, जसें वज्र शैलीं.
सचिव, भरत ये तों, स्थापिती प्रेत तैलीं. २१
न कथुनि भरतातें दूत घेवूनि आले
दुरित, समजतां ते बंधु शोकार्त झाले.
सुतर[3]चितनिजांबाधिकृतें साधु धाले.
किमपि न च तिचें तें त्यापुढें कृत्य चाले. २२
करि सकळ पित्याचा अंत्यसंस्कार, साहे
अपयश न, म्हणे, 'या काय दासा रसा हे?'
निघुनि शरण गेला साश्र तो साधु, आर्यां
नमुनि, परतवाया ने चमू, तातभार्यां. २३
गुह बळ करि सिद्ध, क्रुद्ध होवूनि घाट
त्रिदशनुतनदीचा तो धरी, दे न वाट.
विषम समजला, कीं जातसे अत्ययातें;

१. प्राणघातक. २. अर्च्य=पूजेस योग्य. ३. रचित=केलेल्या.

उतरि[1] भजक ऐसें जाणतां सत्य यातें. २४
करुनि वरि परीक्षा श्रीभरद्वाज आर्धी,
मग सुखउनि आज्ञा दे, म्हणे, 'कीर्ति साधीं.'
प्रभुचरण नमी, जे लोकपाहीं नमावे,
यदमलयश अंडामाजि काहीं न मावे. २५
स्वजनक मरणातें पावला आत्मशोकें,
श्रवण करुनि रामें, प्राकृतें जेंवि तोकें,
भरुनि नयनपद्में, पिंड, बोलोनि 'हंत!'
स्मरुनि गुण, दिले; हें वर्णिती सर्व संत. २६
भरत, परतवाया स्वाग्रजा, हात जोडी.
बहु बहु समजावी; न प्रभु प्रेम मोडी.
चरणकमळपूता पादुका दे, वदे हा,
'अवधि टळालिया, मीं या न वाहेन देहा.' २७
फिरुनि वसवि नंदिग्राम तो साधु, वन्या
प्रभुपरि वरि वृत्ति; श्रीशचिंता, न अन्या.
बसवि वरपदीं ज्या पादुका त्या विधन्या[2].
कवितति च न वर्णी तद्यशा, जह्नुकन्या. २८
अतुळ सुखयशांच्या, अत्रिला देव, राशी,
स्तवुनि नमुनि, अर्पी. तो हि या दे वराशी.
शुचिमति अनुसूया शोभवी जानकीला;
रचि वरतनुरागा[3], क्षोभवी ज्या न कीला[4]. २९
हरि महितनया जो, त्या विराधासि मारी;
हरुनि सकळतापा, उग्र शापाघ वारी.
निववि विभु तपस्वी दंडकारण्यवासी,
गति सतत उपासी ज्यांसि होवूनि दासी. ३०
वरगति शरभंगा दे अगस्त्या हि, पेटी

---

१. पैलतीरास पोंचवी. २. विशेषेंकरून धन्या. ३. उत्तम उटण्याला. ४. ज्वाळा.

मणि भरुनि तसी, घे मूर्ति नेवूनि भेटी.
स्वपितृसखजटायु, ख्यात गृध्रेंद्र जो, त्या
सुखवि भुवनहर्म्यां[१] या, तया तो हि जोत्या. ३१
निववि मुनिहिता जी सिंधु गोदावरी ती;
करुनि वसति तीरीं प्राज्य मोदा वरीती.
दशरथसुत लीलामानुष, स्वर्गजांचें[२]
स्तवि यश, गुरु[३] चंद्रक्षीरधिस्वर्गजांचें. ३२
दशमुखभगिनी ये, हारवी नाक कान.
स्ताविल निवुनि तेजें ईश्वरा नाक कां न?
सखरमनु[४]सहस्रप्राण घे, देव धाया,
यश करि विभु, आज्ञा स्वाशुगां दे वधाया. ३३
दशमुख भगिनीची दुर्दशा ती न सोसी,
गमलि विधिस त्याची त्यावरि श्री नसोसी[५];
अवनिजनि हराया हा करी ज्या सहाय,
प्रबळ......वदे तो त्रस्त मारीच 'हाय!' ३४
कनकहरिण झाला, पंचवट्याश्रमाला,
चकितहृदय, आला, श्री विलोकी तयाला.
विनवि मृग धराया तत्प्रिया, तें कराया
प्रभु हि खळ मराया जाय, विश्वा तराया. ३५
कपटहरिण तो ने त्या नृसिंहासि दूर
क्षणभरि; मग ताडी त्यासि लोकैकशूर.
प्रभुपरि महिजेला, लक्ष्मणा, हाक फोडी.
मग निजवपु सोडी, तन्मनीं आधि जोडी. ३६
परिसुनि बहु देवी व्याकुळत्वासि दावी;
उचित, शुचि, तरी त्या देवरा दुष्ट भावी.

---

१. विश्वाचा आधार राम त्याला. २. देवांचें. ३. चंद्र, क्षीरसमुद्र व ऐरावत यांचे गुरु–या सर्वांपेक्षां उज्वल असें. ४. मनु=चौदा. ५. नसो अशी.

वदुनि कटु, पिटूनि स्वोटजांतूनि लावी,
तव दशमुख ये, ने तीस, जी माय गावी. ३७
श्रवण करि सुनेच्या तो महासत्व हाका
दशरथतनुजांचा गृध्रभूपाळ काका.
विरथ करि अरीतें, दे महाहर्ष नाका,
मिरवि विशदता तत्कीर्ति, तैसी न राका. ३८
असि धरुनि अधर्मै दुष्ट तत्पक्ष तोडी,
पळवि, जिस मुहूर्तै त्रस्त होवूनि सोडी.
गिरिवरि कपि पाहे पांच, ती त्यांत पाडी
नग पटसह; जाणों त्यांकडे दूत धाडी. ३९
खळ जलधिस लंघी, ने स्वलंकेंत देवी,
भय न गणि, अशोकीं काननीं गुप्त ठेवी.
प्रतिदिन शतयज्ञप्रेषितात्पान्न सेवी,
सतत पतिपदाब्जध्यानपीयूष सेवी. ४०
नमुनि अनुज सांगे साश्रु तें वृत्त रामा,
त्वरित म्हणत 'हा!' ये आपुल्या पर्णधामा.
उटज चि न तदा तो, विश्व, निश्रीक पाहे,
कपटमनुजरूप स्त्रैणसा शोक वाहे. ४१
विरहविकळसा तो श्रीस सर्वत्र शोधी,
प्रभुसि बहु सुमित्रापुत्र दे धैर्य, बोधी.
विनवुनि बहुयत्नें शोकवेगासि रोधी,
नयन पुसुनि सांगे, 'बा! न मोहीं शिरो धी.' ४२
विपिन हुडकितां तो देखिला गृध्र तात,
त्यजुनि धृति म्हणे 'हा!', दे स्वयें वारि वात.
विकळ हि कथि, 'केला रावणें हा स्वघात;'
व्यसु मग खग होय श्रीमुखातें पहात. ४३
सकरुणवर लावी त्याचिया हात दाहा,

स्मरुनि न वदला [1]स्वप्रेयसी हा तदा 'हा!'
सुतसम चि यथोक्त श्रीश दे पिंडतोया.
विसरुनि जन [2]पुत्री ही भवीं हिंडतो या. ४४
तदुपरि धरि जाया सानुजा; तो कबंध,
[3]क्षपवुनि जगदीशें तत्क्षणीं शोकबंध,
सुरवरसम केला. सिंधुतें याद ये तें.
[4]कविमन विभुतेजें ऐकतें या दयेतें. ४५
प्रभुसि हित कथी तो, पाय वंदूनि भावें,
'निववुनि शबरीतें ऋष्यमूकासि जावें.
तरणितनुज आहे कीश सुग्रीवनामा,
करिल, सुखवितां, हें त्वन्महाकार्य रामा!' ४६
वरगति शबरीतें दे मतंगाश्रमांत;
[5]प्रकटि निजकुळा जो त्या पतंगा श्रमांत.
सुखवुनि सुगळातें हर्षवी राम, हातें
धरि, करि अमृताचें वर्ष वीरा महा तें. ४७
पवनतनुज सीताजानिचा होय दास
प्रथम; मग यशस्वी, राघवा तोयदास
विकळ सुगळ बहीं भेटवी हा सखा या;
सुहित पवन दावा जेंवि कक्षास खाया. ४८
रविसुत नग दावी, पाहतां अश्रु गाळी
प्रभु, सुगळ सदुक्तें शोकमोहांसि टाळी.
परिसुनि अपराध, क्रूरता, मत्त वाळी
व्यसु करुनि, पदीं त्या स्थापुनि श्रीश पाळी. ४९
कपि बहु शतकोटि क्रूर देवांश गोळा
करि सुगळ, म्हणाया राक्षसां 'हात चोळा.'

---

१. आपली प्रियकारिणी (सीता). २. पुत्रवान्. ३. नाहींसा करून. ४. जसें तसें–**पंत**. ५. अन्वयार्थ ?

पटु कपि हुडकाया पाठवी त्यांत आर्या;
निरखि पवनजन्मा. ये कृती तो चि कार्या. ५०
जळधि उडुनि लंघी, नावरे अंतराया.
शतमखमुख गाती देव या संतराया.
उसळवि निजवेगें सिंधुचें तोय, शोधी
परपुर विभुमुद्रा श्रीस दे तो यशोधी. ५१
पुसुनि कुशळ सांगे, तो धनुर्बाण तूण
स्तवुनि, नमुनियां घे सुज्ञ मागोनि खूण.
उपवनतरु मोडी, शत्रुपुत्राक्ष मर्दी.
निशिचर पशुसे, हा त्यांत भासे कपर्दी. ५२
मग घनरव योजी ब्राह्म, दे त्यास मान
श्वसनसुत सुतेजें भानुसा भासमान.
अजित अजितसा जो सांपडे, तो खपावे
पर म्हणुनि, न जाणे हें कुधी, तोख पावे. ५३
दशवदनसभेला, हानिच्या कामनेला
धरुनि, न समजोनि प्राज्य तें धाम नेला;
कथि कवि वदवीतां, भावि जें सत्य यातें,
खचरपति तयाच्या खड्ग घे अत्ययातें. ५४
तदनुजनि, 'बिभी' हे ज्याचिया वर्ण नामीं,
मग 'षण,' न कराया सुज्ञ तद्वर्णना मीं.
विनवुनि वदला तो वाक्य अत्यंत पूत,
प्रभुस तुज नव्हे बा! सर्वथा वध्य दूत.' ५५
त्यजुनि नय, पटानीं वेष्टिलें पुच्छ, तैलें
भिजवुनि, उजळीलें रावणें पापशैलें,
खचरततिस केला 'न्या पुरीं,' हा निदेश,
उसळुनि पुर जाळी काळसा हानिदेश[1]. ५६

---

१. हानिदांचा ईश—पंत.

द्विषदनुजगृहातें मात्र तो सुज्ञ पाळी.
वरकड दशकंठाद्यालयें सर्व जाळी.
सिकवुनि ससुता त्या, 'हा!' वदाया खळाला,
उडुनि जलधितीरीं, ये महेंद्राचळाला. ५७
विनवुनि विजयातें सांगदा कीशचक्रा,
मधुवन लुटवी, भी वानरांच्या न शक्रा.[1]
मुदित करि तया, जो दे गजा मुक्ति, नक्रा
वधुनि, नुरवि काळीं तेज, यद्दृष्टि वक्रा. ५८
निरखुनि दयितेच्या भव्यचूडामणीतें,
प्रमुदितमति भेटे त्या कपिग्रामणीतें.[2]
स्तवि बहु, उपकारा आठवी जानकीश,
प्रियकर शिव साक्षात्तो[3] गमे ज्या, न कीश. ५९
'निवटुनि खळ, रक्षा मानवित्ता, सजा च;
त्यजिन तनुसि, सोसे या न चित्तास जाच.
पटु हि न करिती कां शत्रूची हानि रोप?'
श्रवण करि सतीचा सन्मुखें हा निरोप. ६०
रघुपति घटिकेच्या ही विलंबा न साहे,
अनुजसह निघे; त्या वायुचा पुत्र वाहे.
रथपण युवराजें[4] लक्ष्मणाचें हि केलें,
कपिबळ सुगळें तें सिंधुतीरासि नेलें. ६१
कथिति वरमदांधा रावणा मेघनाद-
प्रमुख खळ, 'न द्याची जानकी.' ते कुवाद
परिसुनि, नयधर्मीं जो सदा एकनिष्ठ,
स्वमत कथुनि बंधु क्रोध त्या दे, कनिष्ठ. ६२
'प्रबळयुवति साध्वी द्या जयाची तया हो!
स्वकुळ न बुडवा. त्या ईश्वराची दया हो.

---

१. सुग्रीवाला. २. ग्रामणी=श्रेष्ठ. ३. साक्षात् तो. ४. अंगदें. हस्तदोष—युवाजें.

अपटु सकळ एका वानरा आवराया,
बुडवितिल कुधी हे संगरीं नाव, राया! ६३
नमन करुनि, आर्या आर्यवर्यासि अर्पी.
हरधनु चुरि जो, त्या दावितां काय दर्पा?
गरुड न कवणा ही जिंकिला जाय सर्पा.
न कुळपललरक्तें गृध्रकाकांशि तर्पी.' ६४
करुनि दुरभिमानी बंधुधिक्कार, यातें,
त्यजि; कवि विटला त्या, जेंवि हिक्कारयातें[1].
विहग अमरवृक्षा, प्राप्तदावा अरण्या
त्यजुनि, शरण आला तेंवि रामा शरण्या. ६५
अनुज दशमुखाचा मानिती सर्व खोटा.
पवनसुत म्हणे, 'हा या जगीं साधु मोटा.
प्रभुमतरघुवंशा ज्या महावज्रकोटा,
भजति सभय, यावा तद्यशाला न तोटा.' ६६
द्विषदनुज नमी त्या, विश्व जो देव वीतो;
कथुनि अवरजातें[2], राज्य तें देववी तो.
रघुतिलकनिदेशें सेतु केला नळानें,
दळसम धरिला तो सागराच्या जळानें. ६७
धनु शिर हि विभूचें दाखवीलें छळानें[3],
वडिभारि महिकन्या साश्रु केली खळानें.
प्रभुसह कपिसेना सेतुनें जाय पारा,
द्विगुणित उतराया लागले याम बारा. ६८
सुगळसह सुवेळीं राम वेघोनि राहे,
कनकरचित लंकादुर्ग दूरूनि पाहे.
अरिस निरखि, धांवे, क्रुद्ध सुग्रीव पाडी
मुकुट, गरुड जैसा पन्नगा, तेंवि ताडी. ६९

---

१. उचकीच्या वेगाला. २. धाकट्या भावातें. ३. कपटानें.

फिरुनि सुगळ येतां त्या म्हणे राम, ' राहें,
स्थिर, असुसह रक्ष. स्वर्गपा सामरा हें.
श्रित[१] बुडविति, मोहीं सेविती साहसा जे.
दहन पवन संगीं घे, करी दाह, साजे. ७०
कपिकटकसमुद्रें राम लंकेसि रोधी.
मग दशवदनाची क्षिप्र सामीं शिरो धी,
म्हणुनि सजुनि धाडी वाळिजा अंगदातें,
हित कथि, परि माने त्या न सत्संगदा तें. ७१
धरवि वध करावा* अंगदातें विरोधी,
रघुपतिविशिखाहीं खंडवाया शिरोधी[२].
वधि निशिचर, वेगें बाहु झाडूनि, च्यार.
प्रभुसि रण करावा हा चि माने विचार. ७२
समर समरयाहीं मांडिला फार भारी,
तपति खपति पापें शत्रुचे कारभारी.
परम पर मदानें अंध कांहीं वळेना,
सुचिर रुचि रणाची, घात होतां कळेना. ७३
क्षितिवरि रुधिराची वाहिली जी नदी, न
द्विप हि तरति, चिंतासी च ते जीन दीन.
नटति बहु कबंध, स्वर्ग आला पहाया,
मुनिहरिण म्हणे त्यां, 'काय आलाप हा या?' ७४
नरतनु करि दोघे बद्ध ते, कीं भ्रमावे,
खरविषधरपाशीं बंधु फार श्रमावे,
सकृदपि भवमोहा जावया जे नमावे.
खळ घनरव कर्मे या त्रिलोकीं न मावे. ७५
सुधृति जनकजेला दे 'त्रि'पूर्वा 'जटा,' 'हो
स्थिर,' विभु[३] विप[४] ये जों, तों, म्हणे, संकटा हो!

१. स्वजनातें—पंत. २. शिरांचा समुदाय. ३. पराक्रमी. ४. गरुड. * करावा(?).

कारि अहिगुणबद्धा मुक्तिदात्यासि मुक्त.
प्रभुसि सुयश द्यावें, सेवका हें चि युक्त. ७६
प्रभु पुनरपि मारी संगरीं सैन्य कोटी,
उठवि अनुज, होतां आपली हानि मोटी.
कपिबळ पळवी तो काळसा कुंभकर्ण,
प्रबळपववेगें वाळलें जेंवि पर्ण. ७७
विकळ करि, धरी, ने, तो सुकंठासि मार्गें;
हरि हरिवर नासाकर्ण तत्काळ रागें;
गिळि कपि सगळे चि; क्रुद्ध होवूनि आगें,
प्रभुशर म्हणती, 'घे नीज, वीरा! न भागें;' ७८
विखरि गगनवर्ती शस्त्रजाळादि, सेना
घनरव खिळि सारी, विश्वपाळा दिसेना.
द्विषदनुज हनूमान् मोहिले हे न दोघे;
म्हणुनि दशमुखास्यें 'धन्य' तत्पुत्र तो घे. ७९
कविवर, बळशाली सर्वसन्मौलिरत्न,[१]
श्वसनसुत हनूमान् जांबवत्प्रोक्त यत्न
करि; झडकरि ओषध्यद्रिचें शृंग आणी,
उडवि सकळ शल्यें मोह; तद्गंध खाणी. ८०
व्रणकण हि पहाया एक देवा न राहे,
विपुलतर सुधेचा सेक दे वानरा, हे
जगदसुसुतलीला[२] जिष्णुची गाय काहीं,
न उणि वारिलि, जैसी विष्णुची, गायकाहीं. ८१
स्मरहरगिरिपार्श्वीं शृंग पावूनि आला,
स्वधनु धरुनि युद्धा सिद्ध जों नाथ झाला;
प्रभुवरविशिखांच्या त्या न साहे समूहा.
त्यजुनि धृति, म्हणे ती राक्षसांची चमू 'हा!' ८२

---

१. सर्वसाधुशिरोमणि. २. वायुपुत्र मारुतीची लीला.

वध जनकसुतेचा दाखवी, दुष्ट मोही;
सुरमुनि वदले, 'हा!' देव निर्माय तो ही.
कथि पति सरमेचा, 'सिद्धि पाहो मयाचा
न कपटपटु नातू. राहवा होम याचा.' ८३
निवटवि चुलता त्या लक्ष्मणाच्या करानें.
स्तवुनि निवविला तो बंधु सीतावरानें.
प्रियसुतवध लावी त्या वदायास 'हाय!'
स्वजन न उरला हो! एक ही या सहाय. ८४
दशमुख सुतशोकें क्षोभला; कार्य मानी
वध जनकसुतेचा, जीस्तव स्वासुहानी.
सचिव विनवि, 'कैसा मारिसी बा! असीतें?
पतिवरि च इच्या या योज उग्रा असीतें.' ८५
बहु बळ चतुरंग प्रेपिलें पंक्तितुंडें,
कथुनि, 'अरि वधा, खा, जा,' असें स्पष्ट पुंडें.
विखरुनि शर भारी निर्जरध्वंसकारि
प्रभु पुरहरसा तें दों मुहूर्तांत मारी. ८६
परिसुनि बहुकोटि स्त्रीजनांचे विलाप,
त्यजुनि पुर निघे तो राक्षसांचा कलाप;
प्रभुवरि निजसेनासिंधु नेवूनि लोटी,
प्रलयपवनसा तो दाखवी शक्ति मोटी. ८७
भगवदनुजवक्षीं शक्तिनें शत्रु ताडी;
विकळ करुनि ती त्या सर्पिणीसी च पाडी.
प्रभु हि दशमुखातें, सैन्य मारूनि, मोडी.
श्रम उडवुनि शृंगें मारुती हात जोडी. ८८
शतमखवचनें ये मातलि क्षिप्र, देवा
विनवि बहु असें, 'या स्यंदनीं पाय ठेवा.
प्रभुजि! मज घडावी दुर्लभा आजि सेवा.

इजसम हितकर्ती ती न गंगा न रेवा. ८९
प्रभुसह खळ भांडे तो अहोरात्र सप्त;
त्रिदश मुनि हि झाले, युद्ध पाहोनि, तप्त.
उडवि शत शिरें जों, तों चि आलीं नवीनें;
बहु नवल कथावें काय हो! तें कवीनें? ९०
प्रभु करि बहु चिंता, जों श्रितस्वांत शोधी,
'रविहृदय' जपाया तों अगस्त्यर्षि बोधी.
दिनकर वर दे, या ईश्वरातें घडाया
विजय, अरि पडाया, कीर्ति विश्वीं जडाया. ९१
[1]कुळकरमिहिराशी घे असी मारणातें.
करुनि, सुख सुरांतें दे, असीमा रणातें.
रघुपति वर बाण, ब्राह्म योजूनि, सोडी,
कठिनतर अरीचें वक्ष तत्काळ फोडी. ९२
समर करुनि होतां प्रेत देवर्ष[2]भारी,
सुरतरुकुसुमाचें तोष दे वर्ष भारी.
नभ भरिति सुरर्षि स्फार[3]सर्वस्वनाहीं,
म्हणति, "[4]बहु तुला बा! भक्त, सर्वस्व नाहीं. ९३
तवचरण चि रामा! सर्वदा ते जपावे;
प्रणत अखिल याहीं सर्वदा तेज पावे.
म्हण, 'अहित सुरांचे संहरा मानवाचें,'
दृढ हि तवपदाहीं [5]अंह रामा! न वाचें." ९४
मुखर करिति वाद्यें देव, संगीत नाना
करिति बहु असंगी, जेंवि संगी तनाना.
'श्रितहित विभु,' ऐसें गाय नाकर्षि नातें.

---

१. कुलपुरुष सूर्याचा आशीर्वाद ज्याला तो राम. २. देवश्रेष्ठांचा शत्रु रावण. ३. स्फूर्तिदायक अशा सर्व प्रकारच्या जयघोषानीं. ४. भक्तांइतकें तुला तुझें सर्वस्व हि प्रिय नाहीं हा भावार्थ. ५. मागें श्लोक १५ टीप पहा.

प्रभुयश कवणाचें चित्त आकर्षिना तें ? ९५
प्रभु न दशमुखातें दोष लावि, क्रियेतें,
करवि, न धरि शौर्यें तोषला विक्रियेतें.
मग अनुजकरानें लेववी निष्क. लंका,
धरि रुचि, जसि तारा पावतां निष्कलंका. ९६
वरि, करुनि महीजा दिव्य, देवस्तुतीतें.
श्रुतिबहुमत जें, तें, संग दे, वस्तु तीतें.
दशरथनृप भाग्यें भेटला नंदनांतें,
प्रमुदितमति वंद्याच्या हि घे वंदनांतें. ९७
अमरवर[1] म्हणे, "त्वां मोडिली मद्यशाला,
रचिलि अमृतशाला; श्री दिली मद्यशाला;
प्रिय वर, वरदांच्या नायका ! माग, साजो,
'गुरुगुण' न म्हणों दे भव्यकामागसों[2] जो." ९८
रघुरमण म्हणे, 'बा वत्सळा ! देवराया !
मृत सुभट उठावे सर्व ही, दे वरा या.'
उठवि अमित कोटि प्राज्यपीयूषवर्षें,
प्रभुसि नमिति, गाती कीर्ति, ते कीश, हर्षें. ९९
नमुनि विनवि लंकानाथ, 'भूजावरा ! या,
स्वपदनत[3] कराया धन्य, पूजा वराया.'
प्रभु कथि, 'कपि पूजीं; यांत मत्तोष पूर्ण.
त्यजुनि भरत आलों, त्यासि भेटीव तूर्ण.' १००
सबळ सुगळ पूजी भक्त, आज्ञेंत राहे.
नमुनि सकटकातें पुष्पकामाजि वाहे.
परममुदितचित्ता जानकी[4] सेतु पाहे,
सुख बहुत चि तारा भेटतां श्रीस लाहे. १०१

---

१. हें पद लिहितांना 'म' ऐवजीं 'र' लिहिला गेला तोंच त्याचा 'म' केला आहे. २. जो भव्यकल्पावृक्षाधिक—**पंत.** ३. हस्तदोष—**स्वपदन.** ४. हस्तदोष—**जनकी.**

स्तवुनि नमिलि गोदा, जीस गाय त्रिलोकी.
परिचित पहिले, त्या आश्रमांतें विलोकी.
अघ न, नमुनि भास्वज्जह्नुकन्यांस, वांचे.
कथि गुण, धरिती या सर्व धन्या, सर्वांचे. १०२
नमुनि मुदितचित्त श्रीभरद्वाज केला.
पवनसुत विभूक्तें तूर्ण तेथूनि गेला.
गुहभरतमनींचा ताप अंतासि नेला.
सुयश हिमकराचा हें मिळालें न भेला[1]. १०३
प्रभु सुखवि गुहा त्या; अर्क तो वारिजातें;
अधन निववि़ला कीं वत्सळें पारिजातें.
प्रिय घन भरता या चातका भेट दे, हो[2],
'निरवधि[3]' म्हणणारा 'पावकीं पेट देहा!' १०४
स्वगुरु सचिव माता, आप्त शत्रुघ्न पौर,
प्रमुदित करि; गाती तद्यश क्षीरगौर.
स्तवन, नटन, वाद्यध्वान, सत्पुष्पवृष्टि,
त्रिदश करिति, कोंदे उत्सवें सर्व सृष्टि. १०५
करवुनि अभिषेक श्रीश घे, होय राजा,
प्रिय करुनि म्हणे त्या स्वप्रजांतें, 'विराजा'.
प्रभु निजविभवानें वालिदिक्कंठबंधु,
स्वसम करि, करावे सागरें जेंवि [4]अंधु. १०६
प्रभु 'निजयश जों, तों वांच' या दे वरा ज्या,
पवनतनय झाला पूज्य तो देवराज्या.
त्रिभुवनजननी ही श्री करी हा, रैया[5], तें
स्मरुनि भजन, अर्पी आपुला हार यातें. १०७
घटजमुनिमुखानें आयके जन्मकर्म

१. प्रभेला. २. भरत—**पंत**. ३. कृतमर्यादोल्लंघनें अग्नींत देहास दग्ध हो ऐसें म्हणणारा—**पंत**. ४. कूप. ५. त्वरेला.

प्रभु दशवदनाचें अश्वमेधादि कर्म
श्रुतिमत कारि, होय स्वप्रजावज्रवर्म;
स्तुतिनतिनिरतां दे निस्तुळ प्राज्य शर्म. १०८
हें 'रामायणपीयूष' मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणीं भावें वाहिलें कृतवंदनें. १०९

इति रामायणपीयूषं संपूर्णं ।

---

# भावरामायण

(मंदाक्रांतावृत्त.)

श्रीशा प्रार्थी विधि, 'अभय या सृष्टिला दे, वधाया
दिक्कंठा हो नर रविकुळीं, देवभूदेव धाया.'
तों पुत्रार्थी दशरथ करी वाजिमेधा[1], तयाच्या
भार्या आर्या सुखवि वचनें सन्मतें धातयाच्या. १
अग्निप्राप्त द्विजमनु[2]बळें जें, तया पायसाचे
घेती साध्वी सुकवळ तिघी, जे शिपो[3] पाय साचे.
कौसल्येला प्रथम सुत जो होय तो रामनामा,
कैकेयीचा भरत बहु दे जन्मतां धाम धामा. २
दोघे पुत्र समरशतनुत श्रीसुमित्रेसि झाले,
राजा, त्याचा कुळगुरु, तयां पाहतां फार धाले;
ठेवी ज्येष्ठा मुनिवरमतें 'लक्ष्मण' प्राज्यधाम,
प्रेक्षी भाग्यें तदवरज जो त्यासि 'शत्रुघ्न' नाम. ३
हर्षें केलीं तदुपनयनें, त्यांसि भूदेवशिष्ट
प्रेमें विद्या जपुनि सकळा निर्मळा दे वसिष्ठ.
तों[4] त्या वृद्धा दशरथनृपा तद्विवाहाधि लागे,

---

१. हस्तदोष—वाचिमेधा. २. मनु=मंत्र. ३. शब्दार्थ ? ४. ह. दां.—तो.

विश्वामित्र क्रतुसमवना रामचंद्रासि मागे. ४
गुर्वाज्ञेनें नृप मुनिकरीं दे सुतप्राण दोघे;
त्याला अस्त्रें शत कथुनियां, सद्यश प्राज्य तो घे;
सांगे विद्या प्रथम चि बळा जी निवारी क्षुधेतें,
तृड्बाधाघ्नी मग अतिबळा लाजवाया सुधेतें. ५
जी मारूं ये, स्वगुरुवचनें त्या वधी ताटकेला;
तीणें स्वर्गीं स्तुति करि शची ही असा थाट केला;
पावे सिद्धाश्रम शमधनध्येय, दे आधि ज्याला,
त्या हर्षे द्विट्क्षयमखमहासिद्धिनें गाधिजाला. ६
विश्वामित्रा जनक नृपति स्वाध्वरा तों चि बाहे,
त्यातें प्रार्थी प्रभु, 'शिवधनूरत्न पाहोत, बा! हे.'
जातां तारी स्वचरणरजें गौतमस्त्री शिला, हो!
भंगे भर्गप्रभुधनु, म्हणे, 'श्रीपति श्रीसि लाहो.' ७
अर्पी माळा, पण पुरवितां [2]चापभृत्कोटिगीता
सीता रामा निवविं बहु ती कीर्तिसंसारभीता.
विप्रेंद्रोक्तें भरतमुख जे, त्यांस ही भूप धन्या
अन्या दे तो सगुरु मिथिलेमाजि आणूनि कन्या. ८
उल्कापात, त्यजि रवि रुचि, क्ष्मा चळे, मार्ग वात्या
रोधी; क्रोधी त्रिनयनधनुःखंडनें भार्गवा त्या
जिंकी राम प्रभु; दशरथा हर्षवी; पुत्रलोभी
क्षत्रघ्नातें निरखुनि, धरी देहभाना न, जो भी. ९
हर्षे पीतां प्रभुविजय हा सार साकेत कानें
प्राचीनें या न विसरविजे सारसा केतकानें.
हंसें जैसा, मह तदितरें काय होतो खगानें?
कीं जो सामें कविमतिस तो काय हो! तोख गानें? १०

---

ण—पंत. २ कोट्यवधि धनुर्धाऱ्यानीं गायलेली.

नेला प्रेमें भरत सदना मातुळें भूरिभागें.
भूपें द्यावें प्रभुसि युवराजत्व, हें कार्य मागें.
गुर्वाद्याप्तप्रिय हि करितां मंथरानाम दासी
कैकेयीतें कुमति शिकवी, जाचवी कामदासी. ११
मागे, 'राम, त्यजुनि नगरा या, अरण्यास जावा;
चौदा वर्षें भरत चि धरापालनाला सजावा.'
स्त्रीच्या सत्यव्रत कुळज तो आग्रहीं[1] कोंडला. जे
तैसे, त्यांचें, वचन वदतां अन्यथा, तोंड लाजे. १२
कैकेयीचें प्रिय न करवे, होय तो आर्य साधी.
तत्सत्याचें समवन करी; मुख्य तें कार्य साधी.
विप्रालां दे धन; विनवितां, राम घे जानकीला,
त्या भ्रात्या ही विरहशिखिची, सोसवे ज्या न कीला. १३
साहों वाहों धृतिस न शके, तो वदे राय 'हा!' तें,
पाहे जेव्हां दयिततनया वल्क दे माय हातें.
भोगूं जातां अनघ हि तसा तो वनाला विपत्ती.
स्वक्षैणत्वें बहु खरखरा तन्मना लावि, पत्ती. १४
सांगे सूता नृप, निजरथीं त्या तिघांतें वहाया;
कौसल्येच्या, विकळमति तो जाय गेहीं रहाया.
झाले पौर क्षम, न पळ ही, तद्वियोगा सहाया,
त्यांतें सोडी प्रभु हि; न शके तन्मुखांतें पहाया. १५
श्रीगंगेच्या श्रितहिततटीं शृंगिबेरीं गुहातें
भेटे मुक्तिप्रदपद, जसा मेघ पृथ्वीरुहातें[2].
तेथें माथां हरि करि जटा, दाखवी शार्वरीति,
[3]मेह्राविद्या परिहरि; गमे सूर्य तो, शर्वरी[4] ती. १६
जाया, भक्ता जनकसचिवा त्या सुमंत्रासि, मार्गे,
सांगे, 'राहो नृपतिभजनीं सर्वदा चित्त जागें.'

१. हस्तदोष—आग्रही. २. रुह=वृक्ष. ३. क्षुद्र विद्या. ४. रात्र.

गंगापारीं उतरि गुह; ये रामभद्र प्रयागा;
तो जिह्वेतें हित कथि भरद्वाज सद्विप्र, 'या गा.' १७
त्या आर्यातें पुसुनि, करि तो चित्रकूटीं निवास,
ध्येय, प्राण्या परमकृपणा वित्तसा, जो शिवास.
मंत्री ऐके, गुहचरमुखें तें कथी त्या प्रभूतें.
देह त्यागी, म्हणत वदनें 'राम!' शोकें प्रभूतें. १८
उग्रीं शोकीं, नृपति मरतां ती अयोध्या बुडाली.
सर्वांची ही मति, गति तसी प्राप्त होतां, उडाली.
स्थापी ज्ञाता गुह शव धराजानिचें तैलपूर्ण
द्रोणीमध्यें; पिटुनि चर ते आणवी पुत्र तूर्ण. १९
येतां, वृत्त श्रवण करितां, फार मातेसि निंदी.
'खर्जूरीसी गमलिस कसी तूं सुधीरा हि सिंदी?
बा शत्रुघ्ना! न च निरखिजे तोंड या पापिणीचें,
जीच्या नेत्रीं खर गर वसे, त्या बरें सापिणीचें.' २०
कौसल्येच्या, रडुनि पडला, तों, गळां, साधुरीती
त्या मातेची, निववि भरता या, सुधामाधुरी ती;
आचार्योक्त, श्रुतिमत, करी सांग तातक्रियेतें;
राज्यश्रीतें त्यजुनि, विनवूं जाय साधुप्रियेतें. २१
नौका दे तो गुह, शुचि असें जाणतां सत्य यातें.
आज्ञा, येतां, मुनिवर भरद्वाज हि, प्रत्ययातें.
भेटे आर्यां, पितृमृति कथी, राम दे पिंड वन्यें.
धन्यें भूपें बरवि वरिली तृप्ति, तैसी न अन्यें. २२
घाली प्रेमें, भरत परतायासि तो देव, रांडा.
प्रेमार्द्रांचा तिळ हि रुसवा श्री न ती दे वराडा.
स्वादु श्रीमद्वच, अमृत जें तें हि न स्वादु कांहीं;
सांत्वोक्तीहीं बहु निववि‌ला भक्त तो पादुकाहीं. २३

---

१. रामा–पंत. २. गंगा–पंत. ३. हस्तदोष–जाणता. ४. पसारा, घाट.

नंदिग्रामीं परतुनि वसे, कीं मनीं ताप सांचे.
सेवी धर्म, स्थिरमति सदा, जें वनीं तापसांचे.
त्या स्थानासि त्यजि विभु; तया स्वाश्रमामाजि अत्री
पाहे, हर्षें बहुत चि, जसा मानसा हंसपत्री. २४
तद्भार्या श्रीतनुसि निववी अद्भुतें अंगरागें,
जेणें द्यावा श्रम न च घडों, जेंवि संत्संग रागें.[1]
सांगे 'श्लोकें,[2] धरुनि न भया या विरा, धा;' हिमारी[3]
स्पर्शीं, जैसा सहज पतगा, त्या विराधा हि मारी. २५
ब्रह्मानंदीं मुनि बुडविले दंडकारण्यवासी,
मुक्ति, 'प्रेक्षा,' विनवुनि असें, ज्यांपुढें तोंडें[4] वासी.
वंदी सीता दयितघटजा, गृध्रपा, बाणभंगा;[5]
राहे तीरीं, सुखवि बहु या, मायसी वृद्ध गंगा. २६
तेथें आली कुमति विधवा रावणाची स्वसा, या
श्रीरामाच्या शुचितम[6]महीजोचितांकीं बसाया.
नासाकर्णद्वयविरहिता लक्ष्मणें ती अशीला
केली. ज्ञाते म्हणति, 'उचिता दुर्दशा हे अशीला.' २७
वाता भ्राता खर सपलभुक्सैन्य अत्युग्र चंडी
प्रेषी द्वेषी; करि समर तो, तच्छिर[7] श्रीश खंडी.
सांगे, 'कां गे! रडसि?' म्हणतां, रावणा वृत्त; सोडी
शंका; लंकापतिस जुरवी जें, असें वैर जोडी. २८
श्रीतें वर्णी बहुवहु, म्हणे, 'रत्नभोक्त्या! हरावी
ती; स्त्रीरत्न स्ववरमहिषी त्वां समर्थें करावी.
स्वःपुष्पस्रक्[8] तसि च, हृदयीं सर्वदा ही धरावी;
बा! सर्वस्व त्यजुनि चतुरें मुक्ति तैसी वरावी.' २९
त्या मारीच स्तवुनि कळवी स्वानुभूतप्रतापा,

---

१. प्रीतीनें. २. यशें–पंत. ३. अग्नी–पंत. ४. हस्तदोष–तोड. ५. शरभंग–पंत. ६. हस्तदोष–शुतितम. ७. पृष्ठ २३ टीप ५ पहा. ८. कल्पपुष्पमाला.

‘श्रीरामाच्या विशिखपवनीं तेज निःसीम बापा!
तेणें गावें शत उडविलों मीं, जसें पर्ण वातें;
मेलों होतों, जरि न मिळतों, रावणा! अर्णवातें.’ ३०
त्यातें दापी दशमुख, म्हणे, “हो मृग स्वर्णवर्ण,
स्त्री ती मोहीं; मग उसळ तूं शीघ्र जैसा सुपर्ण.
व्हावी प्राप्त द्रुत मज वनीं एकली; हो सहाय.
बोलेना हा मंदासि[1], अवशा[*] पाडितां ओस, ‘हाय!’” ३१
चित्तीं चिंती, ‘प्रभुवरशरें मृत्यु ही लाभ मोटा.
दिक्कंठाच्या जरि वध करें, स्पष्ट अत्यंत खोटा.’
झाला मान्य प्रबळ कपटी, तो धरी एणतेतें,
व्हाया विश्वीं यश, करिति ते कर्म, जें नेणते, तें. ३२
‘द्यावा स्वामी! कनकमृग हा,’ प्रार्थिती हें सुदार;
प्रेमें बोले वच ‘बहु बरें,’ यापरी तो उदार.
गेला, श्रीच्या अनुज अवना ठेउनि, न्यंकु[2]मार्गें;
जाणो रामाप्रति मन म्हणे, ‘त्या उरीं शंकु[3] मार्गें.’ ३३
‘हा सीते! हा अनुज!’ असि, तो, ताडितां वक्ष बाणें,
फोडी हाक, क्षितिजानि म्हणे, ‘लक्ष्मणा! क्षिप्र जाणें.’
‘मिथ्या रक्षश्छळ,’ कथि असें[4]; ती न तें सत्य मानी.
बोले, ‘मातें वरिन म्हणसी; वांछिसी आर्यहानी.’ ३४
तो सीतेला त्यजुनि उटजीं, पावला ताप, गेला,
जैसा हंसद्विज खवळल्या[5] श्रावणीं आपगेला.
ने आर्येतें, टपत चि दशग्रीव होता दडाला.
वाटे, केलें हितकर भलें कर्म तें, त्या जडाला. ३५
रोधी क्रोधी दशरथसखा तो जटायु प्रतापी.
भंगी युद्धीं रथ, महिसुता सोडवी, त्यासि दापी.

---

१. माझें खड्ग. २. हरिण. ३. खिळा, टोंचणी. ४. हस्तदोष—**असे.** ५. हस्त-दोष—**खवल्या.** * आज्ञा न मानणाऱ्याला.

जेव्हां पावे जय, झटुनि ही, धर्मयुद्धीं न पापी,
तीक्ष्णें खड्गें, [1]क्षतशतचित, क्रूर, तत्पक्ष कापी. ३६
शोकें बोले श्वशुर पडतां, साश्रु होवूनि, 'हाय!'
क्ष्मापुत्रीतें उचलुनि, नभोमार्गी लंघूनि, जाय.
पाहे पांच प्लवग, नग ती स्वोत्तरीय स्वहातें
सोडी त्यांत; श्रवण करिती जें [2]तदास्योत्थ 'हा!' तें. ३७
लंकेमध्यें दशमुख, वनीं ती अशोकाभिधानीं
ठेवी देवी; प्रभु [3]मनिं जिच्या, यक्ष जैसा निधानीं.
तो सौमित्रि प्रभुसि गहनीं वृत्त भेटोनि सांगे;
बोले दुःखें प्रभु, 'नव असें त्वन्मुखीं कूक्त कां गे!?' ३८
'हा! हा!' ऐसें म्हणत उटजीं ये. प्रियेतें न पाहे.
वाहे खेद प्रभु मृदु मनीं, तद्वियोगा न साहे.
लाहे कोठें हि न पद तिचें, नाम घेवूनि बाहे.
'हा!' हे [4]वाणी निमिषभरि ही श्रीमुखींची न राहे. ३९
देखे गृध्रा वन हुडकितां मूर्च्छिता छिन्नपक्षा;
सामें कष्टें हळु वदवितां [5]शोकानिर्भिन्नवक्षा,
'नेली वत्सा खळदशमुखें; त्या वधीं दुष्टरक्षा,
प्रक्षाळाया मदपयश बा शत्रुसंहारदक्षा!' ४०
तातप्रेमेंकरुनि उजवी दे तया श्रीश मांडी.
श्रीमद्वक्त्राप्रति निरखितां तीवरि प्राण सांडी.
[6]आंगें मोक्षप्रद हि, सुतसा तत्क्रिया सांग मांडी.
जो या सोडी, इतर करी, तो स्पष्ट कोंडा चि कांडी. ४१
श्रीश श्रीतें हुडकित फिरे रानसा, बंधुयुक्त.
ग्रासाया जो धरि हरि, करी त्या कबंधासि मुक्त.
त्याच्या बोधेंकरुनि, शबरी जी, तिला भेट थोरें

---

१. शेंकडों जखमानीं व्याप्त. २. तिच्या मुखांतून निघालेले दुःखोद्गार. ३. ह. दो. **मनि.** ४. ह. दो. **वाणीं.** ५. शोकानें विदीर्ण आहे हृदय ज्याचें त्या. ६. ह. दो. **आंगे.**

तत्प्रेमें दे सुगति हि, दयासिंधु, भक्षूनि बोरें. ४२
पंपातीरीं प्रकटि परमानंद तो, जे विलाप,
स्पष्ट स्वाह्वाप्रथम, न तिहीं तेधवां ठेविला, पं.[1]
भ्रातृस्नेहें अनुज शुचिधी धैर्य या दे; वदावी
रीति, प्रेमें बहु, कविशतें ती, जितें देव दावी. ४३
आधीं भेटे पवनतनुज ब्रह्मवेषें रमेना;
[तो] अन्यत्र, त्यजुनि पळ तत्पादपद्में, रमेना.
हा सुग्रीवा दिनमणिसुता भेटवी; साधि तोया,
जैसा यत्नें तृषित कपि हि; श्रीश ही साधि तो या. ४४
दोघे तुल्यव्यसन करिती सख्य; सुग्रीव दावी
ते सीतेचे नग; मग जगन्नाथ वक्षासि लावी;
होय श्रीश स्मरुनि दयिता साश्रु; सांत्वी कपीन;
स्वक्लेशातें कथि. विभु म्हणे, 'शोक माझा न पीन.'[2] ४५
स्वामी सांगे, 'व्यसन हरितों हें तुझें[3] सर्व आधीं;
हो किष्किंधापति, मग सख्या! तूं हि मत्कार्य साधीं.
कां तो चेंडू अचळ करिना? कीश कां पाळिना शें?
सूर्या देतों सुख, असुख मीं वासवा, वाळिनाशें.' ४६
पादांगुष्ठें उडवुनि दहा योजनें दैत्यदेहा,
भेदी सप्त द्रुम गिरि शरें, त्या सख्या शैत्य[4] दे हा.
मित्रा सांगे, 'विभय,[5] समरा त्या महाबाहु बाहे.'
पाहे दोघे सम, विभु उगा दूर वृक्षांत राहे. ४७
भंगे युद्धीं, पळुनि कपि तो ऋष्यमूकासि गेला.
वल्ली कंठीं खुण करुनियां सिद्ध युद्धासि केला.
एकें बाणें रघुकुळवरें मारिला वीर वाळी.

---

१. 'परमानंद' या आपल्या नांवांतील पहिलें अक्षर जें 'प' तें टाकविलें म्हणजे रमानंद झालें. रमा हा च ज्याचा आनंद तो नाहीं तेव्हां हा आनंदशून्य—शोकविह्वळ झाला हें तात्पर्य. २. पुष्ट, अधिक. ३. हस्तदोष—तुझे. ४. कांपरें. ५. निर्भयपणें.

किष्किंधेतें सुगळ भगवद्दत्तसामर्थ्य पाळी. ४८
वर्षाकाळीं प्रभु नगगुहेमाजि राहे उगा चि,
श्रीविश्लेषी त्रुटि हि विभुला आलि झाली युगाची.
वाटे चिंता, पण विसरला तो कृतघ्न; प्रभावा
दावायाला विभु कपिकडे पाठवि क्षिप्र भावा. ४९
सौमित्रीला सुगळ बहु भी; साम योजूनि, तारा
ने प्रासादीं; विनवुनि म्हणे, 'हा सखा साधु! तारा.'
प्रार्थायाला स्वगुरुसि, तया कीशपाळासि तो घे;
आले स्वामीजवळि शिबिकेमाजि बैसोनि दोघे. ५०
आल्या, देती रविस हि दिसों ज्या न, कीशादि सेना,
धूळिव्रातें यदवधि तया जानकीशा दिसेना.
राजा मासावधि करुनियां तो, करायासि शोध
प्रेषी, आले परतुनि दिशा तीन धुंडूनि, योध. ५१
शोधीं केला अवधि टळला; दक्षिणाशेंत वीर
प्राणत्यागा धरुनि बसले ते महेंद्राब्धितीर.
तों संपाती क्षुधित सहसा पातला गृध्रहीर,
श्रीचें होते वदत हरण, व्यग्र ते कीशधीर. ५२
खाऊं आला, अनुजसुकृता ऐकतां, हृष्ट झाला.
सांगे शोध. प्लवगबळ जें तोय सेवी न पाला.
दे ऋक्षेश स्तव, नव महोत्साह वातात्मजाला;
एकाकी च, स्वबळ कळतां, वायुसा तो निघाला. ५३
मैनाकाद्रि त्रिदशवदनें क्षिप्र बाहेर आला;
मानी विघ्न श्वसनज, उरें पाडिता होय त्याला.
देवाज्ञेनें अडवि सुरसा नागमाता हि यासी,
ग्रासायाला द्विगुणशत ही योजनें तोंड वासी. ५४
ती, 'ब्राह्याचा वर मज असे,' यापरि स्पष्ट बोले.

१. अल्पकाळ.

तद्वक्त्रीं तो लघुतनु शिरे, जाय; देवेंद्र डोले.
जी आकर्षी जलनिधिगता सिंहिका सावलीला,
तीतें पोटीं सिरुनि निवटी, कीर्ति दे मावलीला. ५५
लंघी लीलेकरुनि शत तो योजनें सिंधु, पारा
पावे वेगें; चकित हृदयीं होय पाहोनि वारा[१].
लंकादेवीपरिभव करी; देवदारोग्रकारा
शोधी; पाहे उपवनगता, सेवटीं स्वामिदारा. ५६
तों ये रात्रि, स्मरविकळ तो केवळ क्रूरकर्मा
प्रार्थी, 'माझी सुमुखि! महिषी हो, सदा पात्र शर्मा.'
काडी मध्यें करुनि वदली श्री, 'विलंघूनि धर्मा,
होसी वध्य प्रभुधनुसि कां त्यागुनि न्यायवर्मा?' ५७
पापी बोले, 'उडतिस बळें त्या चि अद्यापि कां गे!?
वेड्ये! झाले बहु मजपुढें देवतायत्त पांगे;
इच्छी, पावे न च विधुसि, जो आंगणीं* बाळ रांगे;
पावे व्यर्थ व्यय वय तुझें. हें बरें, कां न, सांगे.' ५८
क्रोधें आज्ञा करि खळ असी राक्षसींतें, 'अगे! या
स्त्रीतें सांमा हितपथ, हठा हे न पोषू अगेया[२].
बोधा, शोधा, अवधि दिधला दोन जाणून मास;
ग्रासायाला मग मज इचें द्या चि आणून मास.' ५९
गेला ऐसें वदुनि. कारिती राक्षसी गंजना ज्या,
देतें झालें बहुत चि तया ताप तें अंजनाज्या;
काढी वेण्युद्ग्रथन मग ती स्वीकृतोद्बंधनाशा[३].
जी, चिंतावी विमळमतिनीं, मुक्तिदा, बंधनाशा. ६०
वृक्षीं वर्णी हळु चि कवि तो सद्गुणांच्या समुद्रा
रामा; त्याची, करुनि नमन, स्तोत्र, दे तीस, मुद्रा.

---

१. वायु, पिता. २. निंद्य अशा. ३. धरिली आहे गळफांसाची इच्छा जिणें अशी. * हस्तदोष—आंगणी.

सीता हर्षे; कुशळ पतिचें, देवराचें विचारी.
रुग्णा जैसें अमृत, हित तें वृत्त तो तेंवि चारी. ६१
'बैस स्कंधीं घडि हि न भरे, सद्गुणांच्या खने! तों
पक्षींद्राचे, करुनि चकित, स्वांत ते पार्श्व नेतों.'
देवी बोले, 'सकुळ असतां पाप हा सासु, नेसी
कैसा वत्सा! यश न करितां दिग्रथाच्या सुनेसी?' ६२
या श्रीवाक्यें कपि कवि निवे, शास्त्र तैसें गणी तें;
घे संदेश. स्तवुनि महिजा दे स्वचूडामणीतें.
मोडी शाखी, निशिचरबळें तो महाबाहु झोडी.
फोडी मस्तें बहुत परिघें दक्ष, अक्षायु खोडी. ६३
ब्रह्मास्त्रातें वनरव रणीं तद्विनाशार्थ योजी.
होय छद्में वश कवि, मनीं तो तयातें न मोजी.
त्या मूढानें कपिवर महारज्जुनीं बद्ध केला,
नेला राज्याजवळ मदनारातिचा योग्य चेला. ६४
'तूं कोणाचा? उपवनवर ध्वंसिलें कां अरे! तें?
कां रे! केलीं निशिचरबळें मर्कटा! त्वां प्रेतें?'
ऐसें कोपें दशमुख पुसे; कीं, रणीं अक्ष मेला,
त्याच्या शोकेंकरुनि वशधी होय तो अक्षमेला. ६५
त्या वाताचा सुत कथि, 'असें दूत मीं, रामभार्या
आर्या येथें दिसलि सुकृतें; पातलों या चि कार्या.
आलों द्वारें तुजजवळि या, बा! करायासि बोधा.
क्रोधा कामा त्यज; वश नया, नित्य धर्मा हि हो, धा. ६६
सत्ता दत्तावरि करि असा कोण योगींद्र आहे?
मत्ता! लत्ताप्रद अहिवरा कोण कल्याण लाहे?
लोभा शोभासुमति हरि, त्या सुज्ञ चित्तीं न वाहे.
हो भा क्षोभास्तव न च उणी; भाग्य पापें न राहे.' ६७

१. पंख. २. प्रेतें.

इत्यादि स्वप्रभुभुजबळें मारुती जों दटावी,
तों घे हस्तीं खळ असिलता, जी सुरौघीं नटावी.
'सोडी मारूं कुमति, इतरा जेंवि,' तद्वत्सळातें[1]
वारी भ्राता स्तवुनि; न रुचे कर्म सद्वत्सळा तें. ६८
विश्वप्राणप्रियतनय जो, त्यासि मानूनि तुच्छ,
स्नेहीं वस्त्रें भिजवुनि, तिहीं वेष्टवी दीर्घ पुच्छ.
क्रोधें, बोधें रहित, करवी दीप्त तें. होय भीता,
प्रार्थी अग्निप्रति तद्वना ती दयासिंधु सीता. ६९
सांगे, 'यातें धरुनि फिरवा सर्व लंकेंत, सोडा.
व्हावा दंड प्रणतसरमाकांतमानार्थ थोडा.'
नेतां बद्ध[2] स्वभुजयुग तो वायुचा प्राण झाडी.
पाडी द्वेषी; कपि दव गमे, स्पष्ट लंका हि झाडी[3]. ७०
होळी लंका गमलि, धडके वाळली जेंवि मोळी.
घोळी रक्षोगण बहु; दशग्रीव तो हात चोळी.
पोळी व्योमीं दहन, न टिके देवतांची हि टोळी.
चोळी साडी हि न धड; शिव्या स्त्री दशास्यासि तोळीं[4]. ७१
लंकेशाचा अनुज दुसरा साधु, तद्गेह पाळी;
आळी, लक्षाधिक सुसदनें ज्यांत, त्या सर्व जाळी.
जाळी, मुक्तामणिगणमिषें, पेटतां अश्रु गाळी.
चाळी नेत्रें; न रिपु घुबड? स्पष्ट हा अंशुमाळी. ७२
पारावारीं विझवि मग तें पुच्छ, देवीस वंदी;
नंदी भासे; करि, तरुनियां सिंधु, ते कीश बंदी.
त्यांला लावी मधुवन लुटायास; बोभाट साच
क्रोधें सांगे दधिमुख; गमे साधु तो भाटसा च. ७३
श्रीचा चूडामणि पतिपदीं अर्पुनि, स्वंग दे, हा
श्रीभर्ता ही पवनजनिच्या त्या परिष्वंग देहा.

१. त्यावर प्रेम करणाऱ्या रावणाला. २. हस्तदोष—बद्ध. ३. अरण्य. ४. मोजी.

वर्णीना त्या बहुबहु कृतज्ञेश कां जीवदाना?
स्वामिप्रेमा 'अमृत', अमृता 'कांजि', कां जी! वदाना? ७४
श्रीसंदेशा, सदरिकुमता, ऐकतां, राम वीरा
आल्या, त्या ही पुसुनि सुगळा, जाय पाथोधितीरा.
मत्तत्यक्ता द्विषदवरजा सत्सभामूर्धहीरा,
लंकाराज्य, स्वपद नमितां, दे दयासिंधु, धीरा. ७५
सिंधु प्रार्थी, नळ कवि रची सेतु. लंकेंत पापी
श्रीला दावी प्रभुशिर, म्हणे, 'मद्बळाधीश कापी.'
'माया' ऐसें हळु चि सरमा सांगुनि श्रीस रक्षी,
तीस प्रेमें जनकतनया माय तैसें च लक्षी. ७६
धाडी, श्रीमान् करुण धरिले साधुनें, हेरणारे.
बोले, 'शत्रो! मम भुज पहा, पातले हे रणा रे!'
वारा जैसा, त्वरित बळवान् पावला तेंवि पारा.
स्वप्राकारीं चढुनि निरखी सैन्य तो तें विपारा. ७७
दुर्गं प्रेक्षी चढुनि शिखरीं तो सुवेळाचळाच्या.
क्षोभे चित्तीं सुगळ बळवान् दर्शनें त्या खळाच्या.
स्वामीतें ही न पुसुनि उडे तार्क्ष्यसा, त्यासि ताडी,
पाडी खालीं; मुकुट मद ही, बाहुयुद्धांत झाडी. ७८
मित्रा प्रार्थी प्रभु, "न भजती साहसा सुज्ञ नेष्टा.
यूथाधीशांप्रति निजमुखें सांग, 'लंकेशि वेष्टा.'"
तो कीशौघ, प्रबळ दुसरा कोट दुर्गासि, झाला.
तेणें रक्षःप्रसर, जळदें दाव तैसा, विझाला. ७९
धाडी आधीं प्रभु रिपुकडे वालिपुत्रासि सामा;
कामासक्ता कपि दशमुखा भेटला गर्वधामा.
आमा बोध प्रिय न, मरत्या बाळका जेंवि आमा.
'या मारा,' हें कथि; धरिति ते मूढ नेणोनि धामा. ८०

१. विरूप—पंत. २. राक्षससमुदाय. ३. कच्च्याला—मूर्खाला.

कीशेंद्राचा सुत गरुडसा आक्रमी पुष्करातें.[1]
तत्कर्मातें स्तवि कविशत प्रीतिनें, दुष्करातें.
प्रासादातें, सजव उडतां तो महासत्व फाडी,
पाडी नाडी करुनि शिथिला, शत्रु, जों बाहु झाडी. ८१
मोटे खोटे अहित चवघे मारिले अंगदानें,
तेजें केले चकित अवघे दुष्टधी, भंगदानें.
युद्धारंभ प्रभु करि तदा, तो न शंके; शवांचे
राशी पाहे तरि बहु बुडायासि लंकेश वांचे. ८२
सेनानाथ प्रथम चि मरे पावुनीं भंग; रामीं
नृत्व प्रेक्षी; 'वधिन चि' म्हणे, 'सोडिना संगरा मीं.'
मेघध्वान प्रखर फणिभृत्पाश[2] घालूनि बांधी
दोघे बंधु; त्रुटित जय जो कौतुकें त्यासि सांधी. ८३
देवी मोहे; तिस बहु भली राक्षसी सत्य सांगे.
"तेजस्वी हे व्यसु न; म्हणसी साध्वि! तूं 'हाय!' कां गे!?"
तों ये तार्क्ष्य; त्यजिति अजिता सानुजा नाग धाकें.
केला स्तोत्रास्पद हरि करीशावनीं जेंवि नाकें. ८४
बंधक्षुब्ध[3] प्रभुवर वधी संगरीं यातु कोटी.
चिंता लागे, निजपरिभवें, राक्षसेंद्रासि मोटी;
मोठ्या कष्टें उठवि अनुजा, न त्यजी बुद्धि खोटी.
त्या दाटूनि प्रलयदहनीं कुंभकर्णासि लोटी. ८५
त्याच्या, होता भर पसरला, विग्रहीं, आळसाचा;
सुग्रीवाच्या, तरि हि कटका भासला काळ साचा.
पाडी मोहीं; धरुनि, परते, वाळिचा भाव जीव;
स्वामी तेव्हां निजमनिं म्हणे त्यासि,[5] 'बा! भा वुंजीव.'[4] ८६
लंकेमध्यें अहित शिरतां, मोह सोडी हरींना,

---

१. गगन.–पंत. २. नागपाश. ३. खोडलेला हस्तदोष–बंधु. ४. उजळ कर.
५. वानरेंद्राला.

नासा तोडी; सुटुनि मग तत्कर्ण कां तो हरीना?
कोपे मार्गे फिरुनि कटका लागला घोळसाया.
झाला दावा कपिनिकर तो टोळसा, मोळसा[1], या. ८७
कुंभश्रोत्र प्लवग सगळे तो गिळी, जेंवि, पेढे,
हा दावाग्नि प्रबळ भवते स्पष्ट कीशौघ मेढे.
त्याचे बाहू चरण मग तन्मस्तक श्रीश तोडी;
जोडी शोकीं मन न. कर ती दुष्ट खोडी न सोडी? ८८
पुत्र, भ्राते, सचिव, खपले, पीडिते विष्टपा हे;
हानि स्पष्टा निरखि, फिरलें आपलें दिष्ट[2] पाहे.
झालें शापस्मरण तरि ही दुष्टधी तो लवेना,
कोणासीं ही हठमठ[3] शठश्रेष्ठ हा तोलवेना. ८९
दिक्कंठातें घनरव म्हणे, "निर्मितों संगरा ज्या
'कल्प' ज्ञाते म्हणतिल; करीं इच्छिला संग राज्या!
बा! चिंतेतें करुनि म्हणसी, 'तेज नाशो,' कसा हो!?
स्वस्थ प्राज्ञा! तव मन, सुखी व्हावया, शोक साहो. ९०
बाणव्रातें कपिबळ खिळी, तो नभीं गुप्त राहे.
त्याचें व्हाया यश, वश तसा सानुज, श्रीश साहे.
ते शल्यातें प्रभुसह जसे सर्व मोहीं बुडाले,
वाटे प्राण क्षणभरि भयें जिष्णुचे ही उडाले. ९१
रात्रीं उल्काधर ससरमाजानि तो वातभूतें
पाहे, जोडी बळसमवनाकारणें हात भूतें.
ऋक्षाधीश[4] स्तवि, कथि तया, 'ओषधी आण, जा, गा!
बा! नाहीं भी लव; अससि तूं आमचा प्राण जागा.' ९२
तो कैलासाजवळ निमिषें जाय; दे हर्ष बाळा.
भ्याल्या, देती झडकरि न त्या ओषधी भेटि बाळा.
ज्ञाता ओषध्यगशिखर चि क्षिप्र घेवूनि आला;

१. तृणविशेषाप्रमाणें. २. दैव. ३. हट्टाचें घर न असा. ४. वानरविशेष.

झाला स्वस्थ प्रभु सबळ, या सद्यशें फार धाला. ९३
होतें तेथें, पवनतनुभू, नीट ठेवूनि शृंग
स्थापी; ये तो परतुनि पुन्हां रामपादाब्जभृंग.
झाले स्वस्थ प्लवग सुभट; क्षोभले सेश माया-
युद्धें सारें; वधित सुटले राहिले ते शमाया. ९४
मायासीता घनरव करी, ने रणामाजि पापी;
दावी आधीं, मग शिर तिचें, खड्ग हाणोनि, कापी.
'नाहीं स्त्रीचें अवन घडलें काय? तूं क्ष्वेड जा पी,'
श्रीरामातें खळमणि असें, प्राकृता तेंवि दापी. ९५
तेव्हां बोले पवनसुत 'हा!' राम 'हा!' बंधु तो 'हा!'
राजा ही 'हा!' शतमख हि 'हा!' पावले सर्व मोहा.
सांगे साधुप्रवर सरमाजानि, 'कां खेद? माया
हे कीं रामा! अनुज समरीं त्या खळा दे दमाया. ९६
अग्न्युत्पन्न प्रवर अमरत्वप्रद, प्राप्त होमीं
मेघध्वाना रथ विधिवरें, चिंतितों, या न हो, मीं.
गेला दुष्ट भ्रमवुनि तुम्हां, कार्य साधावयाला,
सेना त्याला करु, करि जरा जेंवि, बाधा, वयाला. ९७
आर्याज्ञेनें सकटक निघे वीर सौमित्रि; तूर्ण
प्रत्यूहातें करि झटुनि; दे होम होवूं न पूर्ण;
मारी त्यातें; अनवरत तें युद्ध चोवीस याम.
प्रेमें बोले, व्रणचित वपु प्रेक्षितां, 'हाय!' राम. ९८
वार्ता येतां, दशमुख मनीं भाजला पुत्रशोकें,
क्रोधें भारी तळमळ करी, देखतां ओस ओकें.
सीताघाता, धरुनि असितें, काळसा जाय हो! तो.
भी ती; बोले, 'वध रघुपते! हा असा काय होतो?' ९९
त्यातें प्रार्थी, सचिव, 'हरितो शर्म हें का; यश स्त्री-
घातें जातें. प्रभुजि! करिती कर्म हें काय शस्त्री?

सर्वस्वें कीं वरिलि, वधितां ईस कां? जीव धावा
जीर्णें, आधीं वर नर इचा, तो न कां जी! वधावा?' १००
आयुःशेषें चि परतविला हो! न तो मंत्रिबोधें[1];
हें चि स्पष्ट स्वमत विमळें स्थापिलें साधुशोधें.
माराया त्या सुगळसहिता सर्वथा रामराया,
धाडी सैन्यें बहु, कुमतिचा सर्व थारा, मराया. १०१
सद्बाणांचें, विखरुनि महासंगरीं, जाळ, तो 'खा'
ऐसें सांगे. प्रभुगुणरवें तों धरी काळ तोखा.
क्रव्यादांचे अगणित रणीं नाचले हो! कबंध,
क्रूरांचें हि प्रभुवर हरी तत्क्षणीं[2] शोकबंध. १०२
तो कर्णांहीं सकळ पृतनाहानिची ती कथा पी;
आंगें भांडे[3] जरि हि, असकृत् भंग पावे तथापि.
मोडी कीशप्रवरकटकें, दारुणा शक्ति सोडी,
फोडी वक्ष, स्मृति हि उरवी लक्ष्मणीं ही न थोडी. १०३
तेव्हां ही तें पवनतनुजें आणिलें शृंग; नस्यें
तेणें शोभा वरिलि अधिका, वारिदें जेंवि सस्यें.
युद्धीं पत्ति प्रभु, पर रथी, तें न शक्रा पहावे;
धाडी जैत्र[4] स्वरथ; न खळोत्कर्ष थोरा सहावे. १०४
बैसे श्रीमान् सुरपतिरथीं, तापवी यातुपातें;
पेटे, वाटे दहन, गिळि तत्सैन्य जें, या तुपातें.
नाकी जे त्या गमति म्हणते भक्त ते 'ओ' घनाचे,
कीं, तो त्यांचा शर, विखरितां, रावणीं ओघ नाचे. १०५
शस्त्रें जीं जीं दशमुख, रणीं क्रुद्ध होवूनि, सोडी,
तीं तीं राम प्रभुवर, शर क्रूर योजूनि, तोडी.
अस्त्रातें ही पविभृदरिच्या हा यशोराशि, खंडी;
दापी, व्यापी अजित, भुजगा जेंवि घोरा शिखंडी. १०६

१. हस्तदोष—बोधें. २. हस्तदोष—तत्क्षणी. ३. हस्तदोष—भाडे. ४. विजयशाली.

खंडी रामप्रभु शत शिरें, तो तरी ही न आटे;
वाटे गेलें स्वबळ, विभुच्या आधि चित्तांत दाटे;
फांटे धाकें हृदय अरिचें तों अगस्त्यर्षि आला;
झाला देता 'रविहृदय' तो; भक्तिनें भानु धाला. १०७
भास्वान् बोले, अवघड तुला काय? कामारिशील
श्रीशा! तूं या, शिरवूनि उरीं सायका, मारिशील.
लागो विश्व स्तवरचनिं, घोराघ वारो, पहा हो!
कीर्ति ध्यानांतुनि न च निघो. राघवा! रोप राहो. १०८
साधी, व्हाया मुदित ससुरा ही रसा, राम होरा;
भेदी, ब्राह्मप्रखरविशिखें, हीरसारा[1] महोरा[1].
अंता, संतापद म्हणुनियां, पाठवी राजराज्या.
द्याया श्री, दे विधिवरबळें पाठ वीरा जरा[2] ज्या. १०९
सत्पुष्पांची, प्रभुवरि तदा, वृष्टि केली सुराहीं;
प्रेमाश्रूंची समनुभविली सन्मुनींच्या उराहीं.
झालीं[3] वाद्यें परम[3] मुखरें[3], दिव्य नृत्यें सगीतें;
आनंदाचें, किमपि शकली, पर्व वर्णूं, न गी, तें. ११०
जाला भारी स्वसम रण जो, तो अहोरात्र सप्त;
स्वर्गेशादि त्रिदश, मुनि ही पाहती त्रासतप्त.
सर्वांचा ही, प्रभुवरजयप्राप्तिनें, ताप गेला,
जैसा जातो सकळ भजतां याचिया आपगेला. १११
तद्भ्रात्यातें कथुनि, करवी तत्क्रिया सांग तो; या,
श्रेष्ठश्रेष्ठें, विसरवि, यशें पावनें, गांगतोया.
स्थापी भक्ता, स्थिर चिर, पदीं. होय हा निष्क लंका-
वक्षीं. स्वांकीं मिरवि मग ती स्वप्रिया निष्कलंका. ११२
'बा! देणारा यश, कविशता, तूं महाबाहु, ल्याया.

---

१. वज्राहून हि कठिण अशा मोठ्या उराला. २. जरेति सर्वशक्तिनाशहेतूप-लक्षणम्-**पंत**. ३. मोठा आवाज देती झाली.

मन्नेत्रांच्या, अतुळचरितें, तोषल्या बाहुल्या, या.
वज्र व्रीडा त्यजु, न मृति, जें दे, शरीरा वणातें.
अंता नेता, न पटु दुसरा तों शरी, रावणातें.' ११३
ऐसें शंभु, द्रुहिण वदले, शक्र, अत्यंत हर्षें.
युद्धीं मेले प्लवग उठवी प्राज्यपीयूषवेर्षें[1].
भेटे राजा दशरथ, तया बंधुसीतासमेतें
श्रीशें केलें नमन; अमृताहूनि भारी गमे तें. ११४
लंकाकीशाधिपसह बसे पुष्पकीं, दे वरा ज्या,
श्रीश भ्राल्या सुखवि भरता, त्या जसा देवराज्या.
राजा होय; त्वरित पुरवी सर्व ही आस; राया
रंका प्रेमें निववि. कारि जो तापला 'आ' सरा या. ११५
पूजी आंगें कपिनिशिचरक्ष्माप हो! ते ससेन;
स्नेहें बोले, 'प्रबळ हरिसे शत्रु होते, ससे न;
गात, प्रेमेंकरुनि तुमचें सार साहित्य, जावें.
भृंगें, स्वर्द्रुस्तबक मिळतां, सारसा हि त्यजावें.' ११६
प्रेमें पूजी पवनतनया; जाणता वत्समान
स्वामी दे त्या; कथि, 'अचळता जाण तावत् समान,
यावत् साधो! मम यश; जळीं मीनसा, मज्ज नामीं;
बाधों देता अरि, विटुनि सामीं, न सा मज्जना मीं?' ११७
दीन त्राणोचित सतत ज्या; धर्मसे विप्र ज्यातें
होती पात्र, श्रमुनि सकळा, शर्म सेवि प्रजा तें.
त्या श्रीरामा, नमुनि, यश हें लेश वाहे मयूर,
प्रेमाश्रूहीं भिजवि शशभृद्वक्षसें[2] जें मयूर[3]. ११८

---

१. हस्तदोष-**वर्षें**. २. चंद्रहृदयवत्. (हा हस्तदोष मानून 'शशिभृद्वक्षसें' असा उद्दिष्ट पाठ मानल्यास चंद्रशेखर शिवाच्या हृदयाप्रमाणें असा अर्थ). ३. तुरंगवदनः किन्नरः-**पंत**. स्वर्गीय गायक.

'भावरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
अर्पिलें रामचरणीं असकृत्कृतवंदनें. ११९

इति श्रीमद्भावरामायणं संपूर्णं ।

---

# सच्छ्लाघ्यरामायण

(हरिणीवृत्त)

दशरथ महीभर्ता[1] कर्ता[1] सुरप्रिय तो यजी,
दशमुखवधा त्याचा साचा सुत प्रभु होय जी!
अनुज हि तिघे अंशें; वंशेंदु तो भरतादि जे,
विधि विनवि कीं, 'भव्या स्तव्या गति स्वरता दिजे'. १
प्रथम सुत जो कौसल्येचा घनप्रभ, नाम या
करि दशरथ प्रेमें श्रीराम हें चि अनामया;
भरत तनया कैकेयीच्या, तिजा सुत लक्ष्मण,
प्रियगुण सुमित्रेचा शत्रुघ्न ही शुभलक्षण. २
सकळ शिकले हृद्या विद्या कळा गुरुच्या मुखें,
समधिक सखा शक्रा भासे चतुर्गण[2] या सुखें
तदुपयम[3] जे, त्यांची चिंता नरेंद्र मनीं धरी,
कुशिकसुत तों भेटे, वाटे महेश दया करी. ३
निजमखपरित्राणा मागे सलक्ष्मण राम हा,
विरह गमला त्यांचा, वृत्धा मनुष्यवरा महा;
स्वगुरुवचनें दे ते दोघे, मुनींद्रकरीं, असु-
प्रिय, सुकृपणें जैसें द्यावें सदर्थिजना, वसु. ४
अनुजसहिता क्षुत्तृड्बाधाशमार्थ, पथीं दया
करुनि शिकवी विद्या नामें 'बळातिबळा' तया,
अजित निवटी मुन्याज्ञेनें सुदुर्मति ताटका,

---

१. हस्तदोष–भर्त्ता, कर्त्ता. २. चौपट (?). ३. त्यांचे विवाह.

वरुनि अतुळें अस्त्रें, दावी द्विषद्वधनाटका. ५
धनु धरि, उभा राहे सिद्धाश्रमीं [1]बळशेवधीं,
प्रभुवर, सुबाह्वादि क्रूर क्षपाचर, ते वधी.
विशिखपवनें मारीचातें क्षणें शत योजनें
उडवि; सुपद स्तोत्रा केला पराक्रम तो जनें. ६
जनक[2]यजना जातां ने त्या, महामुनि, सानुजा;
हरि तम मुनिस्त्रीचें पादें, करें हि न भानु [3]जा.
पुरहरधनु ध्वंसी तें, ज्यापुढें तृणता पवी
धरि, नृपशता जें, निर्द्रव्या जसें ऋण, तापवी. ७
प्रभुसि वसुधाबाळा माळा समर्पुनियां वरी.
कुशिकतनयें आज्ञा केली तया जनका बरी;
सविधि दिधल्या धन्या कन्या तिघांस तिघीजणी.
कवि दशरथा पुत्रिश्रीमद्गुणीं पहिला गणी. ८
कळवि पहिल्या रामा राम स्वतेज, न ज्या तुळा.
सुयश भृगुच्या जें, तें घे, दे स्वयें रघुच्या, कुळा.
सम चि विभु तो देता झाला महा जनका पुरा.
भजुनि चरिता या, चिंतीना महाजन कापुरा. ९
अवनिपतिच्या सत्या अत्यादरें चि मनावरि
स्वसुरतरु घे; प्राज्या राज्या त्यजूनि, वना वरी.
प्रभु सदुटजद्वारा, दारानुजांसह, तो भजे;
सुतसम तपःसक्तां भक्तां नमी, गतलोभ जे. १०
'महित महि तत्पादस्पर्शें,' असें बुध वानिती.
अहित अहि तद्दृक्पातें ही विमुक्त चि मानिती.
सदय सदयस्वामी, त्या स्वर्ग दे हरिणा; महा
विजय निजयज्ञापूर्वांचा भला परिणाम हा. ११
स्वपि[4]तृसख, जो पक्षी, झाला तयाप्रति मानद.

१. बळाचा सांठा च असा. २. ह. दो.–**यजनां**. ३. ज्या. ४. हस्तदोष–**प्रितृ**.

प्रभु गण महान् पीयूषाचा, न तत्प्रतिमा नद.
प्रभुपरिचर्ये मोदा गोदावरी सहसा वरी.
श्रितहित करी; जे वंशींचि, तयांसह सांवरी. १२
कुमति विषयासक्ता भक्ताहिता वरि शोभली.
शुचिरुचि रमा जाया ज्या, या म्हणे, 'भज.' लोभली.
श्रुतिसह तिची नासा, नासावया अघ, खंडिली.
मग पललभुक्सेना सेना रणीं[1] बहु दंडिली. १३
कनकहरिण प्रेषी द्वेषी दशास्य; तयास ती,
समजुनि मनीं, मागे, देवद्विजाद्युदया, सती;
प्रभु हि हरिणामार्गे लागे वनांत, खळा बरें
मरणदशरें ताडी; केला तऱ्हीं छळ त्या खरें. १४
प्रभुसम चि, 'हा! सौमित्रे! हा! प्रिये महिजे!' असी
कपटिमणि तो मारी हाक, श्रुतींत गभे असी.
भय धरि सती, धीरा वीरा वदे कटु, वालवी;
अभयपथ दे घोरा चोरा, प्रदीप चि मालवी. १५
तव दशमुखें, नेली, व्याघ्रें मृगी तसि, आगतें[2];
समजुनि, करूं दे त्या दुष्टा, तदंतक, आग तें.
विरथ करुनि क्रूरा, शूराधिराज, करी रिणी
खगतिलक तो देहत्यागें, सुमुक्ति शरीरिणी[3]. १६
नग नगवरीं टाकी, नेतां, कपींत नभःपथें;
आरि हारि; मुनिस्वांतें झालीं अतीव धृतव्यथें.
वसवि मळधी लंकेमध्यें अशोकवनीं पुरी.
त्वरित बुडवी या किंवा ती भरी जठरीं सुरी. १७
अनुज मनुजच्छद्मा पद्मादुरुक्त कथी, रडे.
प्रभु हि गणुनि स्वांत, स्वांतव्यथेंत बळें पडे.
पळत उटजा आला, झाला, न पाहुनि, घाबरा;

---

१. हस्तदीप—रणी. २. [ तितक्यांत ] आलेल्या. ३. मूर्तिमंत.

सहजधृतिला सोडी; जोडी नृभाव चि हा बरा. १८
जसि च विरहीं स्त्रैणा, शून्या गमे महि, मानवा,
तसि च विभुला; दावी, गाया असा महिमा नवा.
तरुस हि पुसे, गोदेला ही, करूनि विलाप, हा
विनवि अनुजा, सांगे, 'बापा! मला न, तिला पहा.' १९
कळवि, 'विरही ऐसें शोकें उरीं उलतात, मीं
सदय न बुडों दे ताताचा सखा, चुलता, तमीं.'
सुतपण वरी, पक्षी लक्षी पित्यापरि, तत्क्रिया
करि बरि, म्हणे, 'बा! हा!' दाहादि साधुनि, सत्प्रिया. २०
अनुजसहिता भक्षाया जो कबंध वनीं धरी,
सदय तदघा सारी, मारी, सुराहि तया करी.
प्रथम शबरी तारी. वारी दिवाकरनंदन
प्लवगसुगळत्रासा; हा तो महोरग चंदन. २१
प्लवगपति जो वाळी, वाळी मदें अनुजा; तया
निवटुनि, सख्या पाळी; टाळी क्षणांत महाभया.
कथि रविसुता, 'बा! जा राजा असें स्वपदीं, नया
न विसर;' करी मोटी, कोटीस्तुतांघ्रि[1] असी, दया. २२
उपकृतिस तो राजा चित्तीं निरंतर आठवी;
कपि सुभट, ती श्री शोधाया, दिशांप्रति पाठवी.
श्रमुनि इतरां, लागे, ठावा जन्हीं नय, शोध न;
श्वसनतनया[2] दैवें, जें हें, परा न यशोधन. २३
दशमुख जया युद्धीं, पृथ्वीसुताहरणीं, मथी,
खग वडिल तद्भ्राता संपाति शोध भला कथी.
पवनतनुभू अत्युत्साहें उडे शत योजनें
जलधि; गणिला द्विर्ये रामप्रताप चि तो जनें. २४

---

१. कोट्यवधि लोकानीं स्तुति केली चरणांची ज्याच्या तो (राम). २. पर-लिखित हस्तदोष–श्वशन. * हस्तदोष–सागें.

हुडकुनि पुरी, मुद्रा रुद्रावतार सतीस दे;
    कुशळ कळवी; ती ही संदेश जो हित, तो वदे.
मग रण करी मेघध्वाना; बळें कपि सांपडे.
    खळ न वळतां जाळी लंका; दशास्य मनीं रडे. २५
पुनरपि उडे, ये श्रीरामासमीप महामति;
    प्रभुसि मणि दे; सांगे ते जे निरोप कथी सती.
प्रलय कळवी, जें तत्पापद्रुम प्रसवे फळ;
    'छळपटु नसे सामा मान्य प्रमत्त कुधी खळ.' २६
वचननिरत, ब्रह्याला ही सुदुर्लभ जो पिता;
    प्रभुवर तया झाला आलिंगन प्रिय ओपिता.
पडुनि च गळां जैसा, तैसा गमे उपकार हा
    स्तवुनि, भगवान् फेडी, बोले, 'सुखी चिर बा! रहा.' २७
जलनिधितटा गेला, नेला मरुत्तनयें, रथें;
    किति कपिबळें अत्युत्साहें उडोनि नभःपथें.
सदाळि कमळीं तैसा, रामीं बिभीषण ये, रते.
    न लवति असे जे श्रीरामा बळी पण येर ते. २८
चरण नमितां, लंकाराज्य प्रभूत्तम देववी,
    श्रुतिनुतिबळें ज्याच्या, विश्व प्रजापति देव वी.
विनवि कुपिता श्रीशा, भेटोनि, सिंधु, 'नसे तुला
    जड; करिव, या बाणें दुष्टांसि विंधुन, सेतुला.' २९
नळ कपि रची सेतु, क्षारोदकीं शत योजनें.
    रडविलि सती तेव्हां मायाशिरें पळभोजनें.[1]
अजित उतरे पारीं, वेघे सुवेळनगावरी.
    तंव निरखिला त्या दुर्गीं तो, कपिप्रवरें, अरी. ३०
सुगळ उडुनि क्रोधें त्याच्या गळां चि बळें पडे;
    मुकुट उडवी, मोडी छत्रें; नियुद्ध भलें घडे.

---

१. राक्षसें (रावणानें).

परिभव तया भावी दावी बळीं, परते जया
 मिळवुनि. शके दावायाला न तो पर तेज या. ३१
रघुपति म्हणे, 'बापा! तापावहा, बुध, साहसा
 न वरि; न तुला, साधो! बाधो पराभव दाहसा.
रचिव अहितीं दैन्या सैन्या खळावरि पाठिव.
 स्वहितवच हें, राज्या! माज्या सख्या! मनिं आठिव.' ३२
परपुर बळें रोधी, शोधी मनीं, पटु अंगदा
 कथुनि हृदय प्रेषी द्वेषिक्षपाचरभंगदा.
अहित न वळे सामा, रामा 'मनुष्य' म्हणे[1] तमें-
 गरळरससा, काढा गाढा गतायु जना, गमे. ३३
करिति समरारंभा, रंभादिमानस जो हरी.
 प्रभुसि, 'हरितों बाधा; बा! धा जयें,' म्हणती हरी.
दशमुख महामानी मानी स्वसिद्धि, म्हणे, 'असी
 किति कपिचमू? मारा, [2]भारारिदत्त असे असी.' ३४
प्रथम चि रणीं मेला भारी प्रहस्त चमूपती.
 दशवदन ही भंगे, कांहीं दिसे न बरी गती.
वनरव करी उग्रा माया, वृथा जरि होय ती.
 तरि मन म्हणेना, 'श्री दे, कीं जगन्नुत होय ती.' ३५
उठवि अनुजा कुंभश्रोत्रा; तया खपवि प्रभु,
 प्रखर करिती, ज्या उग्राच्या क्षया, तप वि[3]प्रभू.
सकळ सुभट, भ्राते, पुत्र, प्रधान हि मारवी.
 'अतुळ विभुचा, दिक्कंठाचा' म्हणे 'महिमा,' रवी. ३६
वनरव महामाय व्योमीं दडे निकरें अरी
 बळसह ससुग्रीवा रामा शरार्त रणीं करी.
पवनसुत तों आणी दिव्यौषधीशिखर क्षणें,
 वर यश वरी भ्रात्यासैन्यासहप्रभुरक्षणें. ३७

१. आत्मश्लाघां करोति–पंत. २. महादेवानें दिलेला. ३. ब्राह्मण व पृथ्वी.

मग खळ वधी मायासीता; सुरांसि गमे खरें.
मुनि हि वदले, 'हा! हा! केलें सुदुष्कर या खरें.'
सुगळसह त्या सर्वांचें ही भ्रमे मन घाबरें,
क्षण न गमलें, लीलामर्त्या, जिणें, अनघा, बरें. ३८
करि करिवरत्रात्या धात्या बिभीषण सावध;
'भ्रमकर तुम्हां झाला मिथ्या चि, सत्य न हा वध.'
करवि सहसा होमीं विघ्न स्वयें, पर मारवी.
रघुवरकरें, त्या दे आशी तदा, परमा, रवी. ३९
स्वतनुजनिच्या शोकाग्नीनें दशानन भाजला,
असि धरुनियां जातां सीतावधासि न लाजला.
सचिव फिरवी यत्नें, धाडी चमू पर मारणा.
प्रभुवर करी, तेव्हां तीच्या वधा, [1]परमा रणा. ४०
हतपललभुग्दारांचे त्या विलाप न सोसती.
म्हणति, 'पळ ही रुद्धा क्रुद्धा पुरींत नसो सती.
प्रिय परम जे भ्राते, पुत्र, प्रधान, तयांविणें
मरण चि बरें. मानध्वंसी अयोग्य जगीं जिणें.' ४१
सकटक निवे, आंगें न्हाया रणीं शव, शेवटीं.
खवळुनि गमे, शाखाछेदें, न यक्ष वसे वटीं.
कपिबळ वधी, भेदी सौमित्रिचें उर शक्तिनें.
परवश तसा तो मूर्च्छेनें, जसा शुचि भक्तिनें. ४२
रघुपति महादुष्टा रुष्टा करी विरथ क्षणें,
विकळ हि शरव्रातें त्यातें, [2]कळेवरतक्षणें.
पवनज जपे दास्या [3]लास्यावहा बहु विष्णुच्या;
नुति रुचि हि दे आस्या, हास्यामृतासह जिष्णुच्या. ४३
पुनरपि कपिश्रेष्ठें शृंग [4]क्षणांत चि आणिलें,

---

१. हस्तदोष—परामा. २. शरीरच्छेदनेंकरून. ३. आनंदानें नाचावयास लावणाऱ्या. ४. हस्तदोष—क्षणात.

भगवदनुजस्वास्थ्यानंदामृतीं बळ न्हाणिलें.
सुरपवचनें बैसाया दे, महारथ मातली,
प्रभु परचमू मर्दी, लंघूनि जी पथ मातली. ४४
मग सदरिसीं सत्रात्यासीं महारण मातला.
सुरपति जयाच्या संदेहीं क्षणक्षण घातला.
प्रभु शत शिरें खंडी, योगें वरें, तन्हि जोडिलीं
दिसति दश हीं; वाटे गेली स्वशक्ति[1], न तोडिलीं. ४५
घटज मुनि ये, जो या विश्वीं प्रसिद्ध महातपा,
'रविहृदय' दे, त्याच्या लावी जगद्गुरुला जपा.
रवि हि वर, देव क्षोभे, दे; वधी दशकंधरा,
गिरिशनयनें, प्रेमाश्रूनीं भरी प्रभु, पंधरा. ४६
दशमुख पडे, वार्ता लंघी महागिरिचे कडे,
बहु भय जडे शत्रुस्वांतीं, यशांत शशी दडे.
कलिबळ झडे; माया मुख्याश्रयापगमें[2] रडे.
अघटित घडे; पृथ्वी हर्षे, करी मणि, जे खडे. ४७
प्रभुवर दिसे सत्पुष्पांच्या मुहूर्त न वृष्टिनीं[3].
मग कवळिला देवर्षींच्या अवारितदृष्टिनीं.
सकळ भरिलें तों ब्रह्मांडोदर स्तवसृष्टिनीं,
अजितकृतिनीं झाले, जैसे स्वतर्णक गृष्टिनीं. ४८
मधुर विविधध्वानें वाद्यें नभीं बहु वाजलीं,
पटुमतिकृतें गानें नृत्यें हि, फार चि साजलीं.
स्तवन हि करी, नाचे, गाय, प्रियंवद नारद,
प्रभुगुण जना शोभा देती, जसे वदना रद. ४९
रघुपवचनें त्या संस्कारी, बिभीषण उद्धता
वरुनि आरिता; तैशाला ही मिळे अतिशुद्धता.
प्रभु मळ, जसा कांहीं राहे मनीं न तसा, धुतो.

---

१. हस्तदोष—**स्वाक्ति**. २. मुख्य आश्रय नाहींसा होतां. ३. खोडलेला पाठ—**वृष्टिनें**.

मग बसविला प्रेमें सिंहासनीं नत साधु तो. ५०
अनिलजमुखें ऐके स्वस्वामिच्या विजया सती.
'अभिमत पदें देखावीं,' हें कथी निज यास ती.
अजितवदनें ने देवीतें बिभीषण पूजुनी;
म्हणति, 'विभुची लंका सासू नवी;' कवि, 'भू जुनी.' ५१
प्रभु तिस म्हणे, "तूं होतीस द्विषत्सदनीं चिर,
व्रत मग तुझें कांते! कैसें असेल शुचि स्थिर?
निजकुळयशासाठीं[1], नेलें लया आरिचें शिर.
त्यजिलिस, म्हणेना मीं लोभें तुला, 'निलयीं शिर.'" ५२
क्षितिजानि म्हणे, 'स्वामी! हा मीं स्वदेह हुताशनीं
भसित करित्यें; आलें ऐसें कसें तुमच्या मनीं?
झडकरि रचीं बा सौमित्रे! मदर्थ बरी चिता.
न गणुनि तसीं तीं दुर्वाक्यें, करीं सुगुणा! हिता.' ५३
असु, वसु, सुखें तत्कार्यां तो दयाकर वेचिता,
रचवि गुरुता, न स्वातंत्र्यें तया करवे, चिता.
शिरलि, पतिच्या ध्यात प्रेमें तदा चरणास ती,
ज्वलितदहनीं, तज्ज्वालासी, सदाचरणा सती. ५४
सशपथ करी दिव्य, ख्याता जिची महि माय ती.
हरविधिमुख ज्ञाते गाती, महामहिमा, यती.
बसवि दहन श्रीरामांकीं जगत्रयसंपदा.
बहु निजपदीं शोभे सीता रमा कालेकंपदा. ५५
निववीलि रमा प्रेमें रामें करूनि अनुग्रहा.
यश करि जगीं; तैसें बोले, परंतु अनुग्र हा.
दशरथ नृप प्रेमें भेटे सुतांसि, निवे; दिला
बहुमह शिवें, तो त्या विश्वस्तुतांसि निवेदिला. ५६
नमिति, रडती, हें, भक्तांची सभा, परिसून, तीं;

---

१. हस्तदोष—साठीं.

कारि, गुरुपदा साक्षाद्विश्वप्रसू, परिसू, नती.
प्रभु विनवि, 'दे कैकेयीतें अभी, भर तापवी
बहुत, न च हो, शोकाचा बा! नगा भरता पवी.' ५७
दशरथ म्हणे, 'रामा! माझें असें[1] मन भावितें,
सकळ घडलें शापें, होतें चि जें बळि भावि तें.
दशमुखवधा, देवानीं या, सभापदका[2]! मति
श्रमविलि तिची; यामूळें बा! धरी पदकाम ती. ५८
नरपति, महाबाहो! बा! हो; असो वर; विप्र ज्या,
चरित रच तें, गाती ध्याती मनीं; वरवि प्रजा.
पुरवि सकळा कामा, रामा! करीं मुनिरंजना.
स्थिर यश असो; बापा! तापा हरो सुनिरंजना!' ५९
विधिगुरु हि त्या अत्यानंदें[3], 'अवश्य' असें वदे;
हृदयगत जो पुत्रप्रेमा तयासि ढळों न दे.
पुसुनि सगुणब्रह्मातें तो विमानवरीं बसे.
शतमखसख स्वर्गीं देहें, मनें अजितीं वसे. ६०
सुरप, अमृतें, मेले होते रणीं बळ सर्व तें
उठवि; हनुमान् जैसें पूर्वीं महौषधिपर्वतें.
प्रभुसि कळवी पूजायाची, बिभीषण, कामना.
प्रिय विभु कथी जें, तें त्याच्या न येइल कां मना? ६१
'सबळसुगळा पूजीं बा! या; न त्या भरताविना,
वद, मम मना तत्तापाचा कसा भर ताविना?
मदपचिति हे त्याची, तर्पावया असु, खेंव दे.'
प्रभुवर असें, जाया, सारीं, लया, असुखें, वदे. ६२
सबळसुगळा पूजी प्रेमें, जगज्जनका मग;
द्रविणपतिचें, दे बैसाया, विमान हि कामग.
अनुज, दयिता, किष्किंधेश, क्षपाचरनायक,

---

१. हस्तदोष—असे. २. सभालंकारा! ३. हस्तदोष—अत्यानंदे.

प्लवग हि, नभोयानीं घे तो प्रभु प्रियदायक. ६३
रघुपति जयें त्रैलोक्यातें प्रहृष्ट करूनि घे.
अवनिजनितें अंकीं आल्या प्रहृष्ट करूं निघे.
रणमहि तिला दावी, लावी कथा; विरहव्यथा
कळवि, पुरवी, गानें पानें हि, जी सुमनोरथा. ६४
प्रभुवर म्हणे, 'प्रेक्षीं शोभा, सुधानदि! सेतुला.
सुपटु नळ हा, याला कोठें बुधा न दिसे तुला.
सुकवि रचिता, त्वत्प्राप्तीच्या न या, जरि, हेतुतें,
सखि! निरखिते माझे डोळे कसे तरि हे तुतें? ६५
सुमुखि! मज या स्थानीं भेटे बिभीषण आडवा;
विजय चि गमे, किंवा आमंत्रणोत्सव वाडवा[1].
सुगळ हि सखा झाला, या ऋष्यमूकनगीं भला;
सुदति! जय हा या साधूनें द्रवोनि दिला मला.' ६६
जनकतनया स्वस्वामीतें मनोगत जाणवी,
सुगळदयिता तारा तारावयास्तव आणवी.
मुदितहृदया आली, आली तसी बहु मानिली;
उपकृति मुखें सख्या अत्यादरें बहु वानिली. ६७
अजित कथि, "हे पंपा, संपावया श्रम, सेविती
बहु मुनि इतें, आले, धाले सदा, तरि देवि ती
न तवविरहीं रीति प्रीतिप्रदा मज आढळे;
न निववि मना, रामे[2]! वामे[3]! धृति त्यजि या, ढळे. ६८
सति! ममगुणासक्ता, भक्ता, तपोनिधि पाहिली;
अनुदिन हि मद्धयानीं ज्ञानी[4] जसे, तसि राहिली;
मधुर बदरें अर्पी, तर्पी, प्रिये! मज मायसी;
तदपचितिनें धाली, झाली मति, क्षण, हायसी[5]. ६९

---

१. भिक्षुक ब्राह्मणाला. २. प्रिये! ३. सुंदरि! ४. हस्तदोष-ज्ञानीं. ५. निवांत अशी.

सति ! धरि मला खाया, वत्सा हि, राक्षस या वनीं.
परि पर मरे; भारी तेज व्रतीं तव पावनीं.
भुज उतरिले दोघानीं दोन जे गुरु योजन;
त्रिदशपतिसा झाला ग्रासाखिलामिषभोजन. ७०
सुतनु ! दनु तो त्वत्प्राप्तीचा उपाय मला भला
कथि हित; तयाऐसा कोणा हि साधु न लाभला.
तरणितनया सुग्रीवासीं महासति ! भेटलों,
खळबळवनीं, या वातें, मीं दवानळ पेटलों. ७१
मतिमति ! सति ! प्रेमें गोदावरीस पहा, नमीं.
तट 'गुरु' म्हणे ईचें, 'सर्वा हि सिद्धि लहान, मीं.'
तव उटज तें, जें प्रासादाधिक प्रिय लेखिलें,
खगमृगशत स्नेहें जेथें अपत्य चि लेखिलें. ७२
स्मर, करि परित्राण, त्यागूनि देह, जटायु, तें,
नत समुकुटें शीर्षें जेणें, तसीं च जटायुतें.
दशरथ तसा, पावे कांते ! तिलोदक पिंड तो.
निपटुनि भिदा गेली, जीणें भवीं जन हिंडतो." ७३
घटजमुनिच्या स्थाना, नानालताद्रुममंडिता,
निरखुनि नमी लोपामुद्रासतीसह पंडिता.
प्रभु मग तिला दावी त्या चित्रकूटनगा महा,
'सुचपळमना मत्ताश्वाचा, वरोरु ! लगाम हा.' ७४
रघुपति म्हणे, "हा तीर्थेंद्र प्रयाग, असा धुतो
दुरित, भजतां यातें, होतो चि साधु असाधु तो.
सतत यमुनागंगा संगा न सोडिति याचिया.
म्हणति पतितां जीवां, 'तारूं पळांत चि, या चि या.'" ७५
उतरुनि भरद्वाजा वंदी, मुनींद्र गळां पडे,
दशरथ तसा, प्रेमें गोंजारुनि प्रभुला, रडे.

---

१. येथील यमक एकार्थक अतएव सदोष आहे. २. सुंदरि !

पवनतनया धाडी स्वामी गुहाभरताकडे.
पर किति? सुखीं त्या योग्यांचें समाधिज ही दडे. ७६
करुनि चवदा वर्षें पूर्ण, प्रयागपदीं गुहा
निवावि, मग त्या भक्ता भ्राल्या, महेश जसा गुहा.
सुखविलि पुरी रामें, मेघें मही अखिला जसी;
शचि मनिं म्हणे कैकेयीतें 'वृथा सखि! लाजसी.' ७७
स्वगुरु, जननी, भ्राते, पौर, प्रधान, तथा रसा,
सुखवि सकळां, प्याया लावी पवित्रकथारसा.
करुनि करुणा, राजा होय प्रजापरिपाळणा.
जग मुल म्हणे[1], 'कैसें त्राल्या म्हणों' परि 'पाळणा.' ७८
प्लवगखचरक्ष्मापाळांचा करी प्रभु गौरव,
स्मरण चुकवी ज्या देवाचें सुदुस्तर रौरव.
जनकतनया कौसल्येनें जसी बहु मानिली,
सुगळमहिषी तारा प्रेमें तसी बहु वानिली. ७९
प्रभु करि मरुत्पुत्रीं प्रेमा, तदर्ह[2] असीम हा;
सुभजक जसी पावे पूजा, न अन्य असी महा.
'स्वशुचियश तों वांच, प्राशीं यथेष्ट यशा वरा!'
प्रभुवरमुखें पावे सद्वृंदवंद्य अशा वरा. ८०
तिळ हि उरवी मूळाविद्याज दैन्यभयाघ न,
स्वजनहृदयीं स्वर्भ्री ही सन्मयूरदयाघन.
न लवति कुधी कामी लोभी, जऱ्ही पर मागती,
न च, गुरु जना तैशां ही दे स्वयें परमा गती. ८१
'सच्छ्लाव्यरामायण' हें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें. ८२
इति श्रीसच्छ्लाव्यरामायणं संपूर्णं।

---

१. हस्तदोष—**म्हणें**. २. त्याला योग्य.

# सौम्यरामायण

(सौम्यावृत्त)

श्रीभर्ता ब्रह्याचा कर्ता झाला भक्ताविद्याहर्ता,
द्रुहिणगिरिशसुरमुनिवरशतनुत सकळवरदवर दशरथनृपसुत. १
स्थापी राजा प्रेमें नाम श्रीकौसल्यापुत्रा राम;
प्रमुदित करि मन कविजनशिखिघन यतिपतिमतिधन सुभजकझषवन[1]. २
कैकेयीच्या पोटा आला, ठेवी रम्या आख्या त्याला,
रघुवर दशरथ भरत असि सुकवि, अहितमुख सुकवि, कुगतिस हि चुकवि.
स्वाद्या[2] मित्रा[2] तीचे दोघे, तज्जन्में धन्यत्वा तो घे.
स्तुति शतमख करि, सुगति चरण धरि, जगदघ परिहरि, सुयश भुवन भरि. ४
यन्नामीं 'लक्ष्मा' च्या अंतीं 'ण' प्रेमानें घ्यावा संतीं;
प्रथम तनय नयरत ततगुण शुचि, उचित निपुण निजरुचिजितहिमरुचि[3]. ५
याचा शत्रुघ्नाख्य भ्राता, कैकेयीपुत्रांघ्रिध्याता
रघुकुळहितकर सकळपुरुषवर नयनहृदयहर विमळगुणनिकर. ६
विश्वामित्राच्या यज्ञातें संरक्षी सर्वा तज्ज्ञातें;
भुलवि सुखभरित, सकळभय हरित, अरिहृदय करित अतिविकळ चरित. ७
वारी पादस्पर्शें तापा, तारी साध्वी, नाशी शापा;
पुरवि जनकपण, चुरि पुरहरधनु, वरि विभु महिजनु सुरुचिरतरतनु. ८
श्रीरामभ्रात्यांला धन्या दे वैदेहक्ष्माभृत् कन्या,
धन गज हय रथ; कविवरमतकथ धरि भृगुपति पथ, वरि भय दशरथ. ९
जिंकी लीलेनें श्रीराम क्षत्रघ्नाला, दावी धाम.
अतुळ विजय करि, पुरजनमन हरि, भवजलनिधितारिपद नरतनु हरि. १०
देवांच्या कार्यातें लक्षी, ताताच्या धर्मातें रक्षी;

---

१. उत्तम भक्तरूप माशांचें जीवन असा राम. २. सु आद्या मित्रा=सुमित्रा. ३. चंद्र.

वन वारि [1]सदवरजमहिजनिसहित, आहितदलनरुचि सुहृदयमहित. ११
गोदातीरीं हर्षें राहे, मोदा राम स्वांतीं वाहे;
खलपलभुगधिप [2]तदवरजनि धरि कुमतिस, नकटि भगवदनुज करि. १२
तज्ज्ञाता जो ये माराया, त्या विप्रत्रासा वाराया,
प्रभुवर खरतर विखरुनि शरवर, वधि निरवधिबळ, जरि अरि खर खर. १३
कोपे रक्षोराज द्वेषी, मोहाया श्रीचित्त प्रेषी
कपटकनकमृग, रघुपतिस चकवि, हरि तिस; गति असि घडलि कथि [3]सुकवि.
वैरी जो गर्वातें झाडी, खड्गें त्या गृध्रेंद्रा पाडी,
विरथ तारि पळवि, न कुमतिस वळवि, कुळवदन मळवि, सुरधृतिस ढळवि.
त्या लंकेंत श्रीतें रोधी द्वेष्टा कामी लोभी क्रोधी
हरि पदनततम जरि विधिगुरुतम, तळमळ करि शमनिधि हि विषयिसम.
शोकाग्नीचें वाटे [4]शौची लागे, बाष्पें दाटे, शोची,
हुडकि अजित घन 'अहह!' म्हणत वन, खग मृग मुनिजन रडवि, भुलवि मन.
गृध्रेंद्राच्या पाहे मोहा जो ज्ञानात्मा बोले तो 'हा!'.
कथि दशमुखकृतअवनिजनिहरण, वरि भगव[5]दुरुग पतगपति मरण. १८
[6]ताताच्या शुद्धा मित्रा त्या सीतेच्या [7]मुद्धामि [6]त्रात्या
वसवि, सुकृतिशतमहित करुनि, सुरपरमसदय भजदमरतरु [8]निर्सुर. १९
दोघांतें कल्पी सुग्रास, स्वामी तारी त्या उग्रास;
मग वरदचरण म्हणति 'सुयश वरि करु रुचिर वरुनि सुचिर गति शबरि.' २०
पाहे रम्याकारा पंपा, तीच्या तीरीं वाहे कंपा,
स्मरुनि अवनिजनु कुतुकमनुजतनु, निववि कथुनि अनुजनि हित, धरि हनु.
वाताचा पुत्र श्रीरामा भेटे विश्वाच्या विश्रामा.

---

१. उत्तम कनिष्ठ बंधु लक्ष्मण व पृथ्वीकन्या सीता यांसह. २. त्या रावणाची कनिष्ठ बहिण शूर्पणखा. ३. वाल्मीकि. ४. ज्वाळा. ५. भगवान् जो राम ह्याच्या मांडीवर असणारा. ६. दशरथाचा मित्र व सीतेचा त्राता जो जटायु त्याला आनंदगृहीं ठेवी. ( रामानें जटायूस उत्तम गति दिली. ) ७. यमकार्थ निरनुस्वार. ८. निष्काळजी.

रविसुत सख करि विभुसि सुगळ हरि; कळवि हरुनि हरिजनि[1] धन परिहारि.
जो मत्त भ्रात्यातें वाळी, बंधुस्त्रीतें भोगी वाळी,
तदसु अजित हरि, रविज सकळहरिमहिपति पति करि, लववि अखिल भरि.
लावी तो सीतेच्या शोधा, लज्जा सर्वां अन्या योधा.
कनकरचित मणिखचित पुर भसित करुनि, अवनिजानिमुखविधु हि हसित.
आश्लेषें[2] स्वामी दे त्यातें श्रीचूडाभूषा देत्यातें,
त्रिजगदवनकर बळनिधि महिधर, विभु रविकुळवर गणि उपकृतिभर. २५
नम्रा शत्रुभ्रात्या प्राज्य प्रेमें देता झाला राज्य;
जलधि कथित करि, अमित शिखरि वरि, रुचिर कुसुमतरिशततति सम धरि.
सेत्वध्व्यानें[3] नेला पारा सेनासिंधु श्रीशें सारा;
तरि कुमति नमन न करि, कलिशमन करवि बळदमन यमसदनगमन. २७
केलीं सीतानाथें युद्धें भारी दिक्कंठें हि क्रुद्धें.
प्रभुस विजयफळ वरि परिभव खळ, अनुजतनुजबळ बुडवि जरि सबळ. २८
ज्या ज्या दुष्टें माया केल्या त्या त्या सर्वा वाया गेल्या;
प्रभुसि पतगपति पवनसुत जपति कपिकुळप तपति, पर सकळ लपति. २९
रामस्वामी कुंभश्रोत्रा ध्वंसी जैसा वज्री गोत्रा.
तदनुज हरिदवजलधरघनरववध करि, रणभव यश करि अभिनव. ३०
दिक्कंठ श्रीशाच्या ताडी भ्रात्यातें, शक्तीनें पाडी.
प्रकटुनि विभु बळलव, न लवुनि पळ, भुवनकमळजळ यश करि, दमि खळ.
ओषध्यद्रीच्या तो आणी शृंगा, त्याचा मोहा खाणी;
प्रभुवर मग हरिविजयद रथ वरि, अतुळ समर करि, अरि हि न भय धरि.
सप्ताहोरात्र श्रीराम क्रूरासीं मांडी संग्राम;
करवुनि समर अमरनुत चिर, वधि, भरवि निजविजयसदमृत निरवधि. ३२
श्रीरामीं पुष्पांच्या वृष्टी झाल्या, हर्षें कोंदे सृष्टी.
प्रभुनुति नवि नवि करिति रसिक कवि, धरि निज रुचि रवि, गतनिजधृति पवि.
झालीं वाद्यें नृत्यें गीतें, तत्सन्नादें पापें भीतें.

---

१. इन्द्रपुत्र वाळी. २. आलिंगन. ३. सेतुमार्गानें.

स्तुति नतिहुनि बहु न, भगवदपचिति समजति बुधवर गुरुतर तप चि ति.
जेता झाला स्वामी प्रेता त्या सिद्धि श्रेष्ठाभिप्रेता;
त्वदनुज शुचिमति निजपदकृतनति करि निशिचरपति अतिसुचरितरति. ३६
दिव्योत्तीर्णा सीता देवी श्रीरामाच्या अंका सेवी.
स्तवि सविधि दहन, गुरु इतर मह न, निजविपदसहनविभुचरित गहन. ३७
भेटे स्नेहें बोले राजा पुत्रांतें, 'कीर्तीनें साजा.'
प्रभु विधिगुरु, पण मिरवी तनुजपण, करि नमुनि चरण विरहदवहरण. ३८
अर्कें सुग्रीवाचे मेले युद्धीं योद्धे जागे केले.
खचरपतिस रघुवर कथुनि बरवि सकटककपिपतितदपचिति करवि. ३९
पुष्पाख्य श्रीदाचें यान श्रीशा दे तो लंकेशानें[1];
स्वरतभरतमति निववि अजित अतिकरुण गरुडगति दिनकरकुलपति. ४०
श्रीशें त्रैलोक्याशा पूर्ण भ्रात्याची ही केली तूर्ण.
नृपतिपण वरुनि, भवजभय हरुनि, निविविलि च करुनि यश अवनि वरुनि.
रामस्वामी दासा मोरा ये विद्युत्वान्[2]सा सामोरा;
निववि भजकमन, रुचिर करि भुवन, वनमधु शमधनजनहृदयभवन. ४२
'सौम्यरामायण' प्रेमें असकृत्कृतवंदनें
वाहिलें रामचरणीं मयूरें रामनंदनें. ४३

इति सौम्यरामायणं संपूर्णं।

---

# एकश्लोकीरामायण

(जलोद्धतगतिवृत्त)

रमापति दयानिधि प्रभु हरी, पिता दशरथ क्षमापति करी,
दशाननवधा नराकृति वरी, यशास्तव धरी, जगद्भय हरी. १

इति एकश्लोकीरामायणं संपूर्णं।

---

१. लंकानाथ बिभीषण. २. मेघसा.

# गदग्ररामायण

(रथोद्धतावृत्त)

दिग्रथ क्षितिपनाथ तो यजी[1], श्रीश तत्तनय राम होय जी !
मौलिरत्न करि भानुवंश ज्या, बोलती भरत हें तदंशजा. १
लक्ष्मणाभिध अरिघ्न सन्मती, दोन हे भगवदंश जन्मती,
या महीं बहु मुदश्रु वर्षले सर्व देव मुनि, भक्त हर्षले. २
कौशिक क्रतुविघातशांतिला ने नवीनघनसांद्रकांतिला[2],
दे शतास्त्रधन या तपोनिधी; हर्षवि प्रभु वचा जपोनि धी. ३
गौतमर्षिदयितेसि पद्रजा देव दे, म्हणति साधु 'भद्र' ज्या,
तत्क्षणीं करुण उद्धरी तितें, गाति या सुकवि शुद्धरीतितें. ४
ज्या जगीं स्वकरयुग्म जोडिलें, रुद्रकार्मुक सलील मोडिलें.
भूमिजा प्रभुगुणासि लोभली, स्वप्रिया वरुनि फार शोभली. ५
कौशिकें जनकभूप बोधिला, याज्ञवल्क्य मुनिनें हि शोधिला;
दे तिघांस निजकन्यका, मना, ज्याचिया न तिळ अन्य कामना. ६
क्षत्रकाळ धारि मार्ग वाघसा, देखतां कुपित भार्गवा घसा
दाटला, दशरथ क्षमाप न प्राज्ञ ही करुं शके क्षमार्पन[3]. ७
जाणवि स्मय लहान, टाकवी; गाति या बहु महानटा कवि;
कीर्ति शीतकरकांति बाणवी स्वामिचा, मुनिस शांति बाणवी. ८
तो यशंकरुनि निर्स्व कापुरा, पुत्रयुक्त नृप ये स्वका पुरा
हृष्ट पौर हि सुवर्ण वेचिती, उत्सवास्थिति न वर्णवे चि ती. ९
साधु मातुल परा[6] युधाजितस्नेहसिंधु भरता युधाजित
ने गृहा करुनि यत्न सानुजा, मानवे ससुर रत्नसानु ज्या. १०
नंदनासि युवराजभाव दे, तों हठा धरुनि वल्लभा वदे,

१. [पुत्रकामेष्टीनामक] यज्ञ करी. २. नवमेघश्यामसुंदरा (रामाला). सांद्र=सजल. ३. [परशुरामाकडून रामास] क्षमा करविणें. ४. तेजोहीन. ५. श्रेष्ठ अशा. ६. युद्धांत जिंकलेल्या शत्रूशीं अत्यंत स्नेहानें वागणाऱ्या.

“मुख्यलोकहित सत्यें[1], रक्ष या, कीर्ति यास्तव चि होय अक्षया. ११
‘दोन देइन वर’ स्वयें कृपा दाखवूनि वदलासि, हें नृपा!
यौवराज्य भरता वरें असो, राम ही मनु समा वनीं वसो; १२
वल्कली, जटिल, वन्यसेवनीं होवु सादर मुनी जसे वनीं.”
स्त्री धरी कुगतिची च वाट, ती मृत्यु होय नृपतीस वाटती. १३
यावया करि हि तो दया स्तव, ज्ञानवान् तरि हितोदयास्तव,
बोलिली न अनघा ‘बरें’ नती घे न, सांत्वि मन घाबरें न ती. १४
ऐकतां चि अभिषेक सोडुनि, श्रीश हस्त जननीस जोडुनि
भ्रातृदारयुत जाय हा वना, पावना पितृवरव्रतावना. १५
दुःख तें जनमनीं न माय हो, बोलिले, ‘असि परा न माय हो!’
बोलती धृतिसहाय ‘हा!’ यती, कां पुरी न म्हणु ‘हाय! हाय!’ ती?
प्राप्ति होय, अटवीपथा वरी, त्या सुमंत्र बसवी रथावरी;
जाय भेटुनि निषादपा वना, त्या सिवे चि न विषाद पावना. १७
जी करी शुचि सुरापगा तितें जाय, जें हित सुराप गाति तें;
तोय सेउनि रची जटा विती, त्या सुशांतिस भवा दटावि ती. १८
जो प्रधान बसवी रथावरी, तन्मनासि रघुवीर थावरी[2],
पाठवी जनकसेवना; वदे त्या गुहासि मग देव, ‘नाव दे.’ १९
स्वर्णदी उतरित्या गुहा ‘सहा ताप’ यापरि वदे सुहास हा.
भेटवी प्रभुवरा तया भरद्वाजिनाममुनिनें दयाभर. २०
चित्रकूटरचितोटजीं हरी तापसव्रत निवास तो करी,
वर्तमान गुह सर्व आणवी; तें सुमंत्र नृपतीस जाणवी. २१
तापला बहु दवांत तापतो नाग तेंवि, महिषीस शाप तो
ऐकवी, स्मरुनियां परा सुता, पावला नरपती परासुता. २२
श्रीवसिष्ठ भरतासि आणवी, त्यासि माय कृतकार्य जाणवी,
फार तीजबरि धीर कोपला, जी करी मृदुल हीरकोपला[3]. २३
तो म्हणे स्वजननीस, ‘हा जडे!’ आठवूनि सुतवत्सला रडे;

---

१. हस्तदोष-रत्य. २. सांत्वी. ३. हिन्याला.

पिंड दे, मग निजाग्रजाकडे जाय, दंडसम त्यापुढें पडे. २४
शुद्ध बुद्ध गतशोक आयतें ब्रह्म केवळ, तथापि ‘हाय!’ तें
बोलिलें करुनियां निवाप, या प्राशुनि ज्ञजनहो! निवा पया. २५
त्या म्हणे भरत, ‘पात्र पावना! या वना न भज विश्वभावना!
पीडितो विरह बा! पुरा सदा, रासदा[1]! परचमूदुरासदा!’ २६
त्या म्हणे प्रभु असें, ‘नर क्षण त्यागु धर्मगतिचें न रक्षण;
न स्मरोनि निजजन्मलालन त्यागिजे जनकवाक्यपालन. २७
बा! चतुर्दश समा वनांत[2] मीं लोटितों, न बुडवीं मना तमीं.’
‘दे’ म्हणे भरत ‘पादुका, नया जाणती, धरुत बा! दुकान[3] या. २८
अन्यथा करिल कायहोम हा, या पदांपरिस काय हो! महा?’
भक्तवत्सळ म्हणे, ‘अवश्य हो.’ कीं न तो सुसुकृता अवश्य हो! २९
वे शिरीं च भरत प्रभावहा पादुका, मग महाप्रभाव हा
वास बाहिर चि तापसाहुनीं चालवी नियम ताप साहुनीं. ३०
चालतां म्हणवि पत्रिपा दहा वेळ ‘हाय!’ धरि अत्रिपाद हा,
श्रीमनासि मुनिची महासती दे समर्चुनि वनीं महास ती. ३१
राघवें मग विराध तारिला, तन्महोग्रतर शाप वारिला.
नाशिला सुचिर ताप सांचला. देवता म्हणति तापसां, ‘चला, ३२
हृष्ट संप्रति न जीव कां? चला.’ ‘कां’ विमान म्हणतात ‘कांचला?’
सर्व निर्भय मुनींद्र बोलती; रामदर्शनसुतृप्त डोलती. ३३
जो स्वतातसख त्या जटायुतें तो नमी प्रभु शिरें जटायुतें.
पीति या चि कवि साधुरीतितें जी सुधा न असि माधुरी तितें. ३४
जी सुरांसि कथि धौत मीं नद्या, स्वर्ग यांसि जिणि गौतमी नद्या,
तत्तटीं प्रभु रची दलालया, नाक जो कवि म्हणे पलाल या. ३५
जो अलभ्य इतरा परस्वसा, त्या म्हणे वरिन मी परस्वसा.
घेववी अजित कांन नाक हा, तें म्हणेल अजि! कां न नाक ‘हा!’? ३६
ये सराक्षससमूह आहवा, जो म्हणे अरिसि ‘अंतपा हवा.’

---

१. आनंददायका! २. हस्तदोष—**जनांत**. ३. राज्यपसारा (?).

त्या वधूनि रुधिरांत वाहवी; शत्रु एक हि न राम राहवी. ३७
दाखवी कथुनि ती नरा वणा, साहवे तसि दशा न रावणा;
आयके युवतिरत्न सानुजा त्यास हि, प्रणत रत्नसानु ज्या. ३८
दाखवी कनकरंकु तो अरी; श्री म्हणे, 'मृग धरा, प्रभा बरी.'
त्या हरी अनुसरे जसा हरी, [1]अभ्रचंद्रगतिरीति तो धरी. ३९
शत्रु जाणुनि शरासनीं शरीं, श्रीश विद्ध गहनीं तया करी;
'हा प्रिये!' खळ म्हणे, गमे खरी राघवोक्ति, भय भूमिजा वरी. ४०
ईशशक्तिचरितार्थ ती हि भी, यूथपाकुळरवें जसी [2]इभी.
देवराशि कथि, 'धांव बा! पहा धर्म, जा, मज सिवो न ताप हा.' ४१
तो म्हणे, 'सति! न मान सत्य या राक्षसोक्तिस; करील अत्यया
कोण शूरमणिच्या नवा? उगी. मंदिरा सुमति! हे न वाउगी.' ४२
श्री वदे, 'मदभिलाष नांदतो त्वन्मनांत, परि कांत चांद तो;
तूं कुधी मलिन काजवा खरा. रे! न होय आसिकाज [3]वांखरा.' ४३
'स्वोटजांतुनि निघोनि जा चि' ती त्या म्हणे, बहुत होय जाचिती.
साश्रु वंदुनि म्हणोनि 'हा!' निघे, ती वदे कटु म्हणोनि हानि घे. ४४
जो द[4]शास्य खळ होय तो यती, दे भला म्हणुनि पीठ तोय ती,
तों करी प्रकट हा निजाकृती, मानिती सुकृतहानि ज्या कृती. ४५
जानकीस खळ घे रथावरी आग्रहें, मग नभःपथा वरी;
जी दया न करि हा कदापि ती, होय मारुनि हि हाक दापिती. ४६
हाक ऐकुनि जटायु ये, 'रहा, रे!' म्हणे 'करि अधर्म येर हा.'
मोडितां स्वरथ खड्ग तो धरी, पक्ष तोडुनि पुन्हा सती हरी. ४७
आक्रमी गगन, चोर तो पळे, पर्वतस्थकपिपंचका कळे,
स्वोत्तरीयपटबद्ध भूषणें, त्यांत ती त्यजि निरस्त[5]दूषणें. ४८
तीस ने खळ पुरींत आपल्या; देवता म्हणति 'हंत!' तापल्या.

---

१. अभ्र आले असतां चंद्र कसा पळतो हें लहान मुलांस हि ठाऊक आहे! २. हत्तीण. ३. खुरप्याला. ४. परलिखित हस्तदोष—**दशास्य**. ५. टाकिला दोष ज्यानीं अशीं.

तो अशोकवनिकेंत रोधवी, राक्षसींस कथि पाप, बोधवी. ४९
काननीं प्रभुसि बंधु भेटला, शोकवह्नि हृदयांत पेटला.
जेधवां उटज शून्य देखिलें, विश्व हीं निपट शून्य लेखिलें. ५०
जो चराचरनिवास 'हा सये!' तो म्हणे, बहु [1]शिवास हास ये.
वर्णिती सुर सदा विलाप हा, कीं म्हणे, 'सुरस दाविला पहा.' ५१
शोधितां वन जटायु देखिला, वत्सलें परम घात लेखिला;
बोलिला, 'क्षतअसावधान हा! योग्य मद्गुरु असा वधा न हा.' ५२
गृध्रपा करुनि राम सावध, 'प्रास घातकरतामसा वध
हो' म्हणे, मग पुसे तया परा, रावणा कळवि तो दयापरा. ५३
'रावणें हरिलि जानकी' असें सांगतां खग रडे दयारसें.
पाहतां स्वसुखमूर्तिस त्यजी देह, ती कुशलपूर्ति सत्य जी. ५४
पुत्रसा चि करि राम तत्क्रिया, तातसा चि वरि गृध्र सत्क्रिया.
गाति या सुकवि रामरीतितें, जी सुधा म्हणति पामरी तितें. ५५
योजनायतभुज प्रभा हरी, सानुजप्रभुसि राहुसा धरी;
त्या करूनि वध राम उद्धरी, शुद्धरीति कविबुद्धि मोहरी. ५६
गोड रीति शबरीसि तारि ती, हे करी यश बरी सिता रिती,
पाडिली किति सुधा हि ताकसी, होय हो! मग बुधाहिता कसी? ५७
'पं' असा प्रथम वर्ण, 'पा' मग, स्पष्ट दोन चि यदीयनामग,
होय ती सुसरसी हि तापदा, त्या पयोधिजनिच्या हिता, पदा. ५८
मारुति प्रथम भेटला, भलें सागरांत गुरु बेट लाभलें;
[2]सूर्यनंदन सुकंठ तोखदा पावला, सगद जेंवि औखदा. ५९
त्या सखा करि कपीस हा मग, क्षिप्र ते सपट दाखवी नग;
ऐकवी प्रभुसि विस्तरें कथा, तो समव्यसन, मानसीं [3]व्यथा. ६०
ज्या खळें हरुनि दार वाळिला बंधु, त्या मथि मदांधवाळिला,
दे सख्यासि कपिराज्यसंपदा, होय ती दशमुखासि कंपदा. ६१
शोधितां कपिसमूह भागला, शोध मारुतिस मात्र लागला;

१. ब्रह्म रडूं लागलें म्हणून शंकर हसूं लागले. २. ह. दो.—सुर्य. ३. 'ऐकवी'चें कर्म.

तोयराशि शत योजनें उडे, न प्रभु स्मरुनि संकटीं पडे. ६२
लंकिका[1] हुडकिली मनोजवें, घेतलें वपु कपीश्वरें नवें;
श्री अशोकवनिकेंत देखिली, जी सुभक्तहृदयांत रेखिली. ६३
तों दशास्य खळ कामदास ये, 'हो' म्हणे 'सुमुखि! कामदा सये!'
श्री वदे, 'उचित रामराज या, पावसील न च पामरा! जया.' ६४
श्रीसुधिकृत निघोनि तो खलाधीश जाय. बहु कीश तोखला,
मुद्रिका स्तवुनि शुद्धभाव दे, ती हि युक्त अतिशुद्धभा वदे. ६५
दे शिरोमणि, कथी निरोप ती, "काळसा खळबळीं शिरो पती.
बोलिला मुख[2] 'न दोन मास खा,' येवु सत्वर, वदो न 'मास खा'." ६६
बोलिला कपि, 'मनोगदा सहा, योग्य शत्रुदलनीं न दास हा.
कोटिकोटि कपिसैन्य आणिल, स्वामिराज खलराज्य खाणिल.' ६७
तो अशोकवनवर्तिसन्नगां संहरी, गरुड जेंवि पन्नगां.
मारुती वधुनि अक्ष, मारि तें सैन्य, होय वश अक्षमारितें. ६८
त्या म्हणे कपि, 'अरे दशानन! प्रार्थुं ती तुज अरे! दशा न, न
वांचला ... विषयांसि लोभला, शोभला हि न सुशील तो भला. ६९
भस्म होसिल महासतीव्रतें; दाखवील चि महास तीव्र तें.
रक्षि तो प्रभु पदानता, रितें भाग्य तों धृतमदा न तारि तें. ७०
धिक्करूनि कपिसत्तमा, रणा ऐकुनी हि, अतिमत्त मारणा
खड्ग घे, निशिचरेंद्र काळसा, व्याळसा, कुपितमूढबाळसा. ७१
त्या बिभीषण म्हणे, 'अजी अहो! वध्य दूत न, अधर्म बा! न हो.
जाणते न वधिती च बा! चरा; जें यशा उचित, तें चि आचरा.' ७२
जो अनंतबळ विश्व चेष्टवी, तत्प्रियैकसुतपुच्छ पेटवी;
त्यासि अग्नि दशकंठ भेटवी, तैल सिंचुनि बळें चि पेटवी. ७३
राक्षसांसि कथि कीं, 'अशास न क्रूरतेस्तव असो अशासन;
न्या पुरींत, फिरवा बरा, धरा पापबुद्धि, मग मुक्त हा करा.' ७४
स्थूलदीर्घगुणबद्धबाहु ती द्विट्पुरी शिखिमुखांत आहुती

१. लंका. २. दशमुख.

तो करी, सुटुनि वीर टोळसे जाहले किति पलाश कोळसे. ७५
बोलिले दशमुखादि तुच्छ 'हा!' सागरांत विझवी स्वपुच्छ हा.
श्रीस वांचिक पुन्हां नमूनि घे; लाजवूनि पलभुक्चमू निघे. ७६
सिंधु लंघुनि सलील पातला, वानरौघ सुमहांत घातला;
तज्जयें प्रभु हि पावला सुखा, भेटला, निरखि तातसा सुखा. ७७
दे शिरोमणि, कथी निरोप हा; बोलिला प्रभु न, ते हि रोप 'हा!'
ऋक्षवानरबळाब्धि नावरे, तो म्हणे प्रभुसि, 'चाल पाव रे!' ७८
जाय सिंधुवारि सिंधुसा, महा दे सुरांसि जगदीश राम हा.
'दाखवी' म्हणति 'आर्य साधिता कीं उपाय चि न कार्यसाधिता?' ७९
जे विलंबिति कुधी सदा नया ते सुतादि, कथिती अदान या,
तों बिभीषण म्हणे, 'अवा तरे नीतिनें, हित तिचा न घात रे! ८०
साम जें हित करील आजि तें, रे! मराल चि करूनि आजितें.
भव्य धर्म, नय होय, राजया! दे न बंधु सुत, सोयरा जया. ८१
पंडिता! कपिचमू न सावळी, ते महाबळ तुम्हीं नसा बळी.
जीवनप्रद दुजा उपाय न, क्ष्मासुतेस चि करीं उपायन. ८२
दूत एक कपि तो हि नावरे; संगरांत बुडवाल नाव रे!
भ्या चि ऐकुनि नरा खराहवा. हें करा कुळ न राख, राहवा.' ८३
'वांचती न नर, वानर क्षण; स्वामिचें उचित मानरक्षण.
तूं मृतीस जडनायका! तरें, नीच, जा चि, हित काय कातरें?' ८४
त्या म्हणे, 'नमिन मीं नरा महा, राजभक्ष्य मृग मी, न राम हा.
ठावुके सकळ देव वेद या, हे न कीं यतिस देववे दया?' ८५
'धिक्!' सभेंत म्हणतां हि तो कवी शांतकोप न दुरुक्त ओकवी.
ये जगद्गुरुकडे चि तापला जावया सकळ ताप आपला. ८६
पावला गज दवार्त या नदा, मानला अहितबंधु मानदा,
दे पदीं न शरणागता रिता, अन्य या प्रभु असा न तारिता. ८७
दुःख होय सुख जें निवेदिलें, तो हि, राज्यपद ही, निवे, दिलें.

---

१. निरोप. २. हस्तदोष—तिच्या. ३. खरासुरयुद्धास. ४. रामास.

भक्ति देउनि म्हणे, 'उशी[1] रहा स्वस्थ; राम न करी उशीर हा.' ८८
सागरें अचळसेतु वाहिला, भास्करें भुजगसा चि पाहिला.
नीळवारिरुहहार[2] वाटला; त्रस्त सागर उरांत फाटला. ८९
लांब सेतु शत योजनें, दहा रुंद, सुंदर विलोकितां, महा
विस्मया त्रिदश पावले, 'अहा! वर्णवे न' म्हणति 'प्रताप हा.' ९०
त्या तशा गुरुपथें हि ती अहोरात्र तनि उतरे चमू अहो!
श्रीस रामशरचाप दाखवी, कांतशोकविष दुष्ट चाखवी. ९१
जी विभीषणवधू महासती, शोक सर्व हि हरी सहास ती;
होय आश्रय महाविभूतिला, 'श्री' म्हणे 'बहु वहांवि' भू[3] 'तिला.' ९२
सिंधुपारग सुवेळनाम या पर्वतीं सुगळ ने अनामया,
बैसला प्रभु पहात दुर्ग तें, ज्यापुढें सुरपुरें हि दुर्गतें. ९३
दुर्गवर्ति दशकंठ देखिला, कीशपें परम तुच्छ लेखिला;
कोपनें उडुनि शत्रु ताडिला; शीघ्र तन्मुकुट तो हि पाडिला. ९४
वेष्टवी अजित शत्रुची पुरी; तेधवां बहुत हर्षल्या सुरी.
पाठवी कथुनि साम अंगद न्यायधर्मपटु शत्रुभंगद. ९५
त्या म्हणे, 'शिव सदा विवेक वी; रे! पदें न भुजगा शिवे कवी.
न्याय धर्म निपटूनि सोडिले; दोष काय समजोनि जोडिले? ९६
सोड खोड, यश शुद्ध जोड, बा! भव्य सद्गुणमणींस हो डबा;
दे, हिरण्यकशिपूसि तो तुला, व्याघ्र काय न गिळील ओतुला? ९७
श्रीविदेहतनयेसि सोडुन, प्राणद प्रभुसि हस्त जोडुन,
वांच कां चळसि? शत्रु आंच ती लागतां सदिषुची, न वांचती.' ९८
तो वदे 'स्वअसु रक्ष माकडा! मेरुचा तुज न लंघ्य हा कडा.
शत्रुला भजुनि साश्रु हो; पित्या काय रे! म्हणति धांस ओपित्या? ९९
लाजतास उलतास, दार[4] ते, ज्यासमेत चुलता सदा रते;

---

१. सुखरूप. २. हा उत्तरार्ध मागाहून समाविष्ट केल्यामुळें पूर्वीचीं एकशेंएक-पर्यंतचीं क्रमांकस्थानें हरताळलीं आहेत. ३. भूमि म्हणे—**पंत.** ४. [पाहून].

त्या हि तत्प्रियसखा हि तार[1] या, किं[2] त्वया जड! तया हि तारया[3]?' १००
'मत्त केवळ म्हणोनि मारिला, वारिला सकळ दोष, तारिला.
हा जगद्गुरु अघा असा धुतो, जो असें न समजे, असाधु तो. १०१
शुद्ध ये प्रभुचिया मनास जें, शुद्धिची धरुनि कामना सजें.
तूं हि हो प्रणत, पातका तरें; जोडिजे प्रभुसि हात कातरें.' १०२
'मत्प्रभावजित तर्क टाकिती देव, मर्त्यबळ मर्कटा! किती?
बोलसि प्रभुपुढें असार, हा दुर्गुण त्यजुन, तूं असा रहा.' १०३
'सोडु बालिशतशासनक्षमा? रे सुबालिश! तशास न क्षमा.
बोल पावुनि न खेद? हा! शिरें न्हींत, न त्यज सखे! दृहा शिरें.' १०४
कोपला बहु कुधी, म्हणे 'धरा'; च्यार झोंबति जसे फणी धरा[3].
वीर अंगद उडे, बळी पुरा; बाहु झाडुनि करी तया चुरा. १०५
तद्भरें परसभा हि फाटली; ती तदा पविहता चि वाटली!
लाज राक्षसपतीस लागली; तन्मनीं तसि बळीं हि वागली. १०६
वालिसूनु कळवी असाम या, 'छद्म गर्व न असे असामया.
सिद्धि होय रघुसत्तमा! रणें, बा! तुला उचित मत्तमारणें.' १०७
देखती कपिपती मुखाकडे, त्यांस हा प्रभुनिदेश सांपडे;
'व्हा घरट्ट[4], पर ते नवे गहूं पिष्ट होउत, धरा न वेग, हूं!' १०८
राक्षसप्लवगवीरयुद्ध तें मांडिलें परिभवार्थ उद्धतें.
रक्तपूर बहु दूर वाहिले ज्यांत अश्व गज ही न राहिले. १०९
भंगला दशमुख स्वयें, तरी मूढ युद्ध चि पुनःपुन्हां करी;
त्या रणीं बहु कबंधनर्तनें; वीरपादभुजशीर्षकर्तनें. ११०
मेघनाद सुरपाळ जो धरी, सानुजप्रभुसि बद्ध तो करी;
नागपाश खगपाळ ते हरी, जानकीस बहु शोक दे भरी. १११
कुंभकर्ण उठवूनि सर्व तें वृत्त ऐकवुनि, दोषपर्वतें
धाडिला, जन्हि धरूनि आळसा ये, गमे तरि कपींस काळसा. ११२

१. मला वालिमित्र रावणाला. २. मूर्खा! त्या तारेशीं तुला काय कर्तव्य आहे?
३. पर्वत—पंत. ४. घिरट; जातें.

संगरीं बहुत तो वधी हरी; पाडुनि प्लवगपाळका धरी.
हा हरी सुटुनि कर्णनासिका, निर्जरांसि कथि 'वर्णना सिका.' ११३
तो सकोप शतशः कपी गिळी; सर्व वानरचमू पडे शिळी.
तों करि प्रभु तदंगकर्तन. [1]स्वःसदांत बहु होय नर्तन! ११४
ऐकतां खळ म्हणे, 'असावध स्पष्ट तो, तरि च हा असा वध;
बोलिता हरिस [2]लक्षहायन.' स्वाननीं शिरवि दक्ष 'हाय!' न. ११५
धैर्य दे दशमुखा, मिशा पिळी, मेघनाद सबळा अजा खिळी.
जिष्णुस प्रळयकाळ वाटवी; तोय तो यममुखस्थ आटवी. ११६
आणि मारुति महौषधि क्षमाभृन्महाशिखर, त्या हरि श्रमा;
सर्व होवुनि विशल्य कोपले, त्यांपुढें अहितवीर लोपले. ११७
तो रणीं कपटजानकी वधी, फार 'हा!' म्हणवि, ज्या न कीव धी
त्या बिभीषण खळास मारवी; होय लक्ष्मण तया तमा रवी. ११८
घे दशास्य बहु तापला असी; 'जी विनाश करि आपला असी
हे वधावि च' म्हणे; सती हि भी; सिंह पाहुनि पुढें जसी इभी. ११९
तो सुपार्श्वसचिवें निवारिला. आयु वांचवि तया शिवारिला.
तत्प्रयुक्त बळ ये समक्ष, या पाठवी हरतसा यमक्षया. १२०
'मारणें चि मरणें चि' हा पण, स्वाननें करि, निघोन आपण;
ऋक्षवानरमहाबळ क्षया लागतां, यश मिळे [3]वलक्ष या. १२१
शक्ति हाणुनि उरांत लोळवी लक्ष्मणास, तनुभान बोळवी;
शृंग लक्ष्मणहिता तदा हि तें आणिलें पवनजें सदाहितें. १२२
राम भूमिवरि, तो रथीं अरी, यास्तव स्वरथ पाठवी हरी;
मानद प्रभु चढे तयावरी; निस्तुळाहव सुरारिशीं करी. १२३
राम रावण रणांत कोपले, तों परस्पर बळौघ लोपले.
पाहणार बहु दूर थोपले, आधिनें सुरमुनींद्र चोपले. १२४
रामरावणकृता रणा कवी रामरावणरणापरि स्तवी,
'रीति दाखविलि अद्भुता नवी आजि आजिसुमखीं' म्हणे रवी. १२५

---

१. देवसभेंत. २. लक्ष वर्षे. ३. शुभ्र; पांढरें.

एक एक शतदा असीं दहा तोडिलीं, तरि तसीं च तीं! महा
विस्मय प्रभु हि पावला. 'अहा!' बोलिला हि कुतुकी महा महा. १२६
भेटला घटज पूर्ण जो तपें; 'भानुचें हृदय' दे, म्हणे, 'जपें';
सुप्रसन्न रवि होय यावर, क्षिप्र दे करुनियां दया वर. १२७
ब्राह्म योजुनि महाबळें शरें भेदिलें दशमुखोर मावरें;
पाडिला हि; पवनें जसा नग, स्वस्थ होय बहु सर्व ही जग. १२८
पुष्पवृष्टि जगदीश्वरीं पडे, स्तोत्रगाननटनें चहूंकडे,
दुंदुभिप्रमुख वाद्य वाजलें, गाजलें सुयश, विश्व साजलें. १२९
तत्प्रताप बहुवार वानिला श्रीवरें, मग न शत्रु मानिला,
तत्क्रिया तदनुज्याचिया करें सांग चालविलि त्या दयाकरें. १३०
तो बिभीषण तया पदावर स्थापुनि, 'स्थिर असें सदा' वर
दे असा प्रभु महादयाकर. स्वारि ते, जुळिति जे न या कर. १३१
पाठवी पवनजा सतीकडे; श्रीस हर्ष जयसेवनें वडे.
तत्प्रिय प्रमुसि कोश जाणवी, यातुपा कथुनि तीस आणवी. १३२
श्रीस ईश्वर म्हणे, 'यशीं रुचिसें* चि सत्वर करावया शुची
युद्ध, लाविन तुला न हात मी, कीं न मग्न कुळ हो महातमीं. १३३
शुद्धि तों परवशीं न राहुन स्त्रीस; चाखिल सुधा न राहु न.
जा, रुचेल तुज जो तया वर; क्रोध जानकि! करीं न यावर.' १३४
ऐकतां चि धरि फार कांप ती, श्री म्हणे, 'कठिन आजि कां पती?'
उग्र दिव्य करि साधुबुद्धि तें, जें जगा हि कळवी स्वशुद्धितें. १३५
पावकांत न उटी हि वाळली, कुंडपंकजकुटी[1] हिंवाळली[2]
माळसी गमलि, वर्णिली अजें, शंकरें, सुरमुनीश्वरव्रजें. १३६
अग्नि तो जनकसा विवाहसा, दिव्य[3] काळ[3] वदला 'निवा, हसा,'
ये, करी भगवदंकगा तितें; जावया सकळ पंक गाति तें. १३७
भेट शक्रसख[4] दे परा सुता, ती मृषा चि गमली परासुता!

१. अग्निकुंडांतील कमलाप्रमाणें लालभडक ज्वाला. २. थंडगार अशी. ३. दिव्य केलें तो समय. ४. दशरथ. * अर्थ काय?

बोलिले कवि, 'यश निवाल या सेवितां बहु महाशिवालया.' १३८
सर्व युद्धमृतवीर वांचवी; सूर्यसा यश महेंद्र सांचवी;
हें चारित्र कवणा न लांचवी? वाटलें नृपति पुत्र पांचवी[1]! १३९
पूजना विनवि यातुराज या, जो जगा अतिभयातुरा जया
लाविता हरुनि ताप, गावया, जावया भव लया, भजावया. १४०
त्या म्हणे, 'भरत मार्ग लक्षितो, कंदमूळफळशाक भक्षितो[2],
दर्शनार्थ चि असूंसि रक्षितो, केवळ प्रिय मदीय अक्षि तो. १४१
त्याविणें मज नको चि अर्हणा, जेंवि मानिपुरुषासि गर्हणा;
मीं ससैन्य सुगळाचेनें मही[3], भेटवी भरत, रक्ष नेम ही.' १४२
गौरवी प्लवगनायका, मग श्रेष्ठ पुष्पक विमान कामग
दे, तयांत नुति आयकों बसे, कंदसा चि विभु, भक्त कोंबसे. १४३
जी प्रीयालि सरमा तिची कळा, कन्यका, हितकरी गुणोज्वला;
ती 'त्रि'[4]वर्णसहिता 'जटा' बरी, तो सुपार्श्व, वर दे तयां हरी. १४४
... ... ... ... ... ... ...*
आक्रमी वर विमान तें नभा, भानुहूनि मिरवी उणी न भा. १४५
श्रीस दाखवि रणाध्वरावनी[5], तीपरीस हरिची[6] वरावनी
तन्मनासि न गमे च, सेतुला त्या म्हणे मग 'तुला नसे तुला.' १४६
जें बिभीषणसमागमस्थळ श्रीस दावि हरिता मनोमळ,
ऋष्यमूक मग दाखवी, वदे, 'या नगीं मज सखा रडों न दे.' १४७
गाय मित्रमणिच्या सुरीतिला, दाखवी प्रभु गुहा, पुरी तिला,
अंगदाराणिस[7] भूमिजानि घे पुष्पकीं, मग पुरा निजा निघे. १४८
'चिंतिलें पुरविता महामणी, या स्थळीं द्विडसुवायुचा फणी

---

१. रामचरित्र हा च कोणी पांचवा पुत्र. २. हस्तदोष—**क्षक्षितो**. ३. आनंदी. ४. त्रिजटा—**पंत**. ५. रणयज्ञभूमि. ६. इंद्रलोक. ७. तारेस. *मूळ प्रतींत पूर्वार्ध लिहिण्याचें राहून गेलें आहे. काव्यसंग्रहकारानीं मात्र येथील उत्तरार्धाचा पूर्वार्ध करून "**अंकिं घेउनि रमेसि राम तो, स्वानुजासह सुवीर वानितो.**" असा उत्तरार्ध आपल्या प्रतींत समाविष्ट केला आहे.

भेटला पवनपुत्र, हा खणी आधितें, म्हणुनि मीं तुझा धणी!' १४९
हें कथूनि सरसी हि पाहवी, जी मुहूर्तभरि अश्रु राहवी,
प्रेमराशि शबरी तिची कथा ऐकवी, नुरवि जी भवव्यथा. १५०
'खावया धरि कबंध देवरा, यातुच्या हृतमनोगदे! वरा
मारितां, वरुनि शापमुक्तितें तो कथी विरहशांतियुक्तितें. १५१
गौतमी सुमुखि! हे पहा, नमीं, मुक्ति जीहुनि म्हणे 'लहान मीं.'
पांच तापहर साधुसे वट, प्रार्थितां करिति गोड सेवट. १५२
जो तुझा श्वशुर गृध्रराज, तो देवि! शक्रभवनीं विराजतो;
हा तदीय साति! मित्रसा वड, 'प्राज्य पुण्य' म्हण यासि 'सावड[1]'.
कुंभजाश्रम सुलोचने! पहा, अत्रिचा सुमुखि! सन्निवास हा,
चित्रकूट सखि! पोषि तो महा, हा प्रयाग म्हणतो मला 'रहा'. १५४
ती दिसे निजपुरी पहा सये! जींत नित्य भरतें महास ये.
तातमित्रमुनिपादवंदना, पुष्पका! उतर, *साधुनंदना!     १५५
जोड हस्त; यमुना, सरस्वती, जाह्नवी अवनिचें वरस्व[2] ती
वाहती, खगरवें खुणाविती, प्रीति फेनहसितें दुणाविती.' १५६
स्वाश्रमीं प्रभुसि राहवी मुनी, ती हि तत्पदभवा महाधुनी.
वातपुत्र भरतागुहाकडे पाठवि प्रभु; यथोक्त तें घडे. १५७
मारुति प्रचुर हर्ष दे गुहा, भानुचा कर जसा सरोरुहा.
राममेघरव शीत वात कीं होय तो भरतबाळचातकीं! १५८
तो यथोक्त वनवास सारुनि, स्वर्गिभूमिसुरताप वारुनी,
घे निरोप मुनिचा, निघे हरी, त्या गुहासि पहिलें सुखी करी. १५९
मोरसा भरत भक्त वाटला, मेघसा प्रभु रसें चि दाटला.
भेटला करुनि यत्न सानुजा स्वांघ्रिपद्मरज रत्नसानु[3] ज्या. १६०
हर्षले, विषयसेवना गर मानिते अवनिदेव, नागर;
वेचले विरहकुत्स वासर, हा म्हणे इतर उत्सवा 'सर'. १६१
वाद्य, गान, बहु नृत्य माजलें, उत्सवें पुर उदंड साजलें.

---

१. गोळा कर. २. श्रेष्ठ द्रव्य. ३. ज्या भरताला. * साधूंना सुखविणाऱ्या!

यासि देवपुर सर्व लाजलें; कीं यशें पर असें न गाजलें. १६२
श्रीवसिष्ठ गुरु फार हर्षला; त्यांसि भेटुनि मुदश्रु वर्षला.
कीशयातुपति भेटले तया बंधुयुक्तभरता महोदया. १६३
श्रीस कीशपवधूस दाविती प्रेम, तुल्य चि मनांत भाविती,
फार गौरविति सर्व सासवा, ज्या मता आदितिशा चि वासवा. १६४
बंधुयातुकपिराज शोभवी राम, काम नयनें हि लोभवी,
वेष घेउनि पुरीं, कळेवरीं जीवसा चि सिरला, प्रभाधरीं. १६५
श्रीवरीं गुरुमुखार्षि हर्षले, तीर्थतोय विधियुक्त वर्षले,
राजराज विभु होय, कामितें दे; समर्पिल उदार कां मितें? १६६
यौवराज्य भरतासि देव दे; मारुतिप्रति 'अभीष्ट घे' वदे,
तो 'यशश्रवण तों चि सासुता,' हें वरी, प्रभु हि दे जसा सुता. १६७
प्रीति नित्य बरवि प्रजावनीं, त्यांत चित्त वरविप्र जो वनीं,
सर्वदा नवनवा सवा सजी, सेवु दे न वन वासवास जी! १६८
श्रीरिपुघ्न लवणासुरा रणीं संहरी, पुरवि विप्रपारणीं;
तीन कोटि भरतें ही मारिले मत्त शत्रु, बहु साधु तारिले. १६९

(शार्दूलविक्रीडित)

झाले पुत्र कुशादि आठ, दिधलीं त्यां आठ राज्यें नवीं,
केलें धन्य चरित्र, हस्त बुडतां सर्वांसि दे तें भवीं;
स्फारीं गांगसुधारसीं गुण वसे जो तो चि नांदे लवीं,
सारें पाप समूळ भस्म करितें, हे शक्ति नाहीं दवीं. १७०
'गदघ्नरामायण' हें मयूरें रामनंदनें,
श्रीरामचरणीं भावें आर्पिलें कृतवंदनें. १७१

इति श्रीरामनंदनमयूरविरचिते (तं?) गदघ्नरामायणं संपूर्णं।

---

१. मदन. २. ज्या. ३. विपुलीं.

# *सुरामायण

(सूरावृत्त)

देवर्षिहीं संप्रार्थिला तो, उद्धरी जो वारणा,
सूर्यान्वयीं जन्मे स्वयें दिक्कंधराच्या मारणा.
शक्राचिया ख्याता सख्या दिक्स्यंदना[1] दे तातता
झाला चतुर्मूर्तित्व जें तेणें मेहा[2] देता तेता[2]. १
ज्येष्ठात्मजा ठेवी वसिष्ठाच्या मतें तो राम हें
नाम क्षितीचा वल्लभ श्रीमान् सुधी थोरा महें.
आधीं 'भ' या वर्णापुढें यावे 'र' 'त' स्थापी, असें
जी केकयाची नंदिनी तन्नंदना राजा रसें. २
दोघे सुमित्रा जी तिचे जो पूर्वजन्मा लक्ष्मण,
श्रीरामचंद्रासीं तया साहे न विश्लेष क्षण.
शत्रुघ्न या नामें दुजा रामानुजीं हा सादर,
स्पर्शों न दे ज्याचें यश स्वप्नांत ही दासा दर. ३
जागा तिळ श्रीशोदयीं राष्ट्रीं पुरीं खेदा नसे,
संस्कारिले दोघे सुत श्रीकौशिका दे दानसे.
ज्याच्या जयें अत्यद्भुतें चित्तीं धरी कंपा दिती,

---

* रामायणांच्या १ ल्या खंडांत पृ० ३९५–४०५ पर्यंत भुजंगप्रयात वृत्तांतील या च नांवाचें एक रामायण छापलें आहे. यावरून या रामायणाचें कव्युद्दिष्ट नांव कांहींतरी वेगळें असून नजरचुकीनें 'सुरामायण' असें च नांव पुन्हां दिलें गेलेलें दिसतें. पूर्वीच्या मुद्रकानीं वृत्तानुरोधानें 'सूरारामायण' हें नांव दिल्यामुळें ही अडचण व्यक्त झाली नाहीं; तथापि अखेरच्या अनुष्टुप् श्लोकांत 'सूरारामायण' हें पद कवीच्या पाठाप्रमाणें समाविष्ट होऊं शकत नाहीं. अगदीं अखेरच्या संस्कृत समाप्तिवाक्यांत हि 'सुरामायणं' असें च स्पष्ट लिहिलें आहे. १. दशरथा. २. अत्यानंदाला.

श्रीगाधिजापासूनि ते अस्त्रें पथें संपादिती. ४
कृत्या तसी क्षोभे, पथीं रोधी तपस्यां[1]हाटका,
त्याच्या निदेशें मारिली श्रीराघवें ती ताटका.
सिद्धाश्रमीं श्रीगाधिज स्वस्थें मनें यागा सजे,
ते राक्षस व्यापादिले कर्ते बळें आगास जे. ५
श्रीगौतमें शापूनियां केली महामाना शिला,
तो ताप ही तो लौकिक स्पर्शें पदाच्या नाशिला.
श्रीकंठचापारोपण श्रीमैथिलें केला पण,
श्रीश क्षणें तो पूरवी भंगूनियां त्या आपण. ६
'सीता रमा रामा वरी, तीच्या तिघी भव्या स्वसा,
त्या ही तिघां रामानुजां दे, धन्य हो राज्या!' असा
तो मैथिल श्रीगाधिजें आज्ञापिला तें आदरी,
च्याऱ्ही विवाह प्रोत्सवें भ्रात्यासह प्रेमें करी. ७
स्वर्णांबरें रत्नें हरी[2] सुस्यंदन क्षोणीवरी
भारी सुरेभाच्या परी दे जावया राजा करी[3].
पुत्र स्नुषा घेवूनियां राजा निघे, मार्गीं भया
दे काळसा, ज्याच्या मनीं नाहीं कधीं काहीं दया. ८
दावी स्वतेजाची कळा राम प्रभु क्रूराशया
रक्षी, स्वधर्मीं बोधुनि स्थापी जगद्भर्ता तया.
हर्षें अयोध्या स्वामिच्या भाग्योदयें[4] हे साजली,
ऐसी सुरेशाची जयें नाहीं कधीं ही गाजली. ९
'योग्य स्वपुत्र क्षमावनीं झाला' म्हणे राजा मनीं,
रामीं जसे वर्हीं वनीं कीं एण सारे सुस्वनीं[5].
त्या यौवराज्य क्षमापती देवूं सजे, त्याची सती,
स्वार्थोत्सुकीं देवी अतिभ्रांता तिची केली मती. १०

---

१. तपोधनास—**पंत.** २. घोडे. ३. हत्ती. ४. हस्तदोष—**भाग्योदेयें.** ५. **सुस्वरीं.**

'द्यावे वर प्रेमें दिले जे सत्यवाक्चूडामणे !
मत्पुत्र हो राजा, वनीं राम,' प्रिया ऐसें म्हणे.
सत्यव्रता राया जऱ्हीं संप्रार्थिली न स्त्री वळे,
तत्काळ तें मान्य प्रभु स्नेहें करी जेव्हां कळे. ११
ताताचिया सत्यावना जाया वना, ती पावली
वेला भली श्रीशा गमे कीर्तिप्रदा झेंपावली.[१]
सीता सती राहेल कां? कीं स्वामिची ती सावली.
सौमित्रिच्या तों मानसीं हें बाप तो, ती मावली. १२
'द्विःसप्त वर्षें तों वनीं वन्यें रहा, वल्कें वहा,
साकेतसें तूं अन्य ही मध्यें असेंव्यतवें पहा.'
माता असें मोहें वदे; श्रीराम घे आज्ञा, निघे
हा काननीं जैसा तसा शोक प्रजाचित्तीं रिघे. १३
मंत्री सुमंत्र स्यंदन प्रेषी पिता पुत्राकडे,
तोकासु[२] तो वृद्ध क्षमाभर्ता महाशोकीं पडे.
'भक्ता गुहा श्रीदर्शन स्वःसिंधुच्या तीरीं घडे,
स्थानीं भरद्वाजा स्वयें सद्ब्रह्म जें तें सांपडे. १४
वैकुंठवासी आदरें श्रीचित्रकूटीं राहिला,
तेथील जे योगी तिहीं भाग्योदयीं हा पाहिला.'
सांगे गुहाचा चार हें मंत्री पुरीं दिक्स्यंदना,
ज्येष्ठालयीं देह त्यजी शोकें, म्हणे, 'हा! नंदना!' १५
जीच्या महालोभें श्रितस्वर्द्रु क्षणें हा खाणिला,
तद्बंधुच्या होता पुरीं तत्पुत्र जो तो आणिला.
तेणें प्रसू धिक्कारिली, केली बरी तातक्रिया,
संप्रार्थिलें भेटोनियां याया पुरा विश्वप्रिया. १६
स्वामी वदे, 'स्यां त्वां हि बा! संपादुनी आज्ञा, पित्या
पुत्रें सदा द्यावें सुख.' श्रेयःक्रिया आज्ञापि त्या.

---

१. प्राप्त झाली; ठेपली. २. पुत्र च प्राण ज्याचे—पंत.

‘वत्सा! तुझ्या हृन्नीरजा संताप हा न व्यापु, न्हा
बोधामृतीं, मद्दर्शनें पाव प्रिया नव्या पुन्हा.’ १७
सिंहासनीं पूजावया तो पादुका मागोनि घे,
त्यांतें शिरीं स्थापूनियां तत्सेवनीं जागों निघे.
‘नंदी’ असें यन्नाम त्या ‘ग्रामीं’ वसे वन्याशि, या
वृत्तें जगा तारी, करी ख्यात स्वका[1] धन्याशया. १८
स्वामी वनीं अत्र्यादि जे कुंभोद्भवांत क्षमासुर,
प्रेमें तयां भेटे, करी विश्वीं महत्त्वें भासुर.
गृध्रा सख्या ताताचिया मानी पिता, मोदा वरी,
राहे तटीं, मावे यशें कोंडीं[2] न ती गोदावरी. १९
जी रावणाची ये स्वसा, पाहे हरूं सीतापदा[3],
नासाश्रुतिच्छेदाकुळा केली कुधी ती तापदा.
भ्राता तिचा नामें खर क्रोधें वधूं आला खर.
स्वर्गीश ज्या भी सामर, श्रीशापुढें तो पामर. २०
लीलालवें चि श्रीश तो आधीं वधी त्याच्या बळा,
श्रीरुद्र जैसा अंधका मत्ता मग द्वेष्ट्या, खळा.
दिक्कंधर क्षोभे जनस्थाना पहातां ओस, हा
बोले, ‘अरे रामा! महादुःखा, वियोगी हो, सहा.’ २१
मारीचनामा राक्षसा स्वर्णैणता दे, शोभवी,
धाडी बळें रामाश्रमीं, तो जानकीतें लोभवी.
ती त्या धराया पाठवी, स्वामी निघे, जाणों वश,
भ्रात्या कथी स्त्रीरक्षण, स्वर्गीं जगीं व्हाया यश. २२
खोटा मृग त्रासे मनीं, प्राणावना वेगें पळे,
ताडी शरें मर्मीं प्रभु, क्रव्याद हें जेव्हां कळे.
‘हा भूसुते! हा लक्ष्मणा!’ फोडी असी हाक, क्षया
पावे, विलंबी संमतें देवा दवा हा कक्ष या. २३

---

१. स्वकीयाला. २. ब्रह्मांड—**पंत**. ३. सीतेची पदवी.

भी भूमिजा, नाथावना जाया कथी ती देवरा,
तो 'हे' म्हणे 'माया, नसे चिंता जगीं धन्वीश्वरा.'
बोले कटु, क्रोधें नता त्या प्राकृतस्त्रीसारखी,
कार्यी सुरांच्या ईश्वरी झाली स्वभक्तीं पारखी. २४
साश्रु त्यजी सीतोटजा तो, कीं म्हणे त्या 'जा चि' ती;
आर्याकडे गेला वनीं, झाली परासी जाचिती.
तों ये कुधी दिक्कंधर, श्रीतें हरी, वाहे रथीं,
गांठी तिच्या आर्तस्वरें गृध्रेंद्र या पापा पथीं. २५
बोधें स्नुषा सोडूनि दे अत्याग्रही तो मंद न,
क्रोधें चुरी चंचुप्रहारानीं जटायु स्यंदन.
सोडी सती, उग्रासिनें तोडी खगाच्या पक्षती,
मोडी नयातें, दुष्क्रिया जोडी, बळें ने दक्ष ती. २६
नेतां नभोमार्गें त्यजी भूषा निजा कीशांत ती,
लंकापुरींत स्थापिली पापें अशोकाह्वीं सती.[1]
सौमित्रिच्या वक्त्रें वनीं श्रीचीं कटूक्तें सेवुनीं,
शून्या स्वशाला देखता झाला त्वरेनें येवुनीं. २७
लीलामनुष्य स्त्रैणसा 'हा! हा!' वदे, शोधी वनीं,
बाहेर भारी शोक, न श्रीवल्लभाच्या तो मनीं.
गृध्राननें 'दिक्कंधरें नेली' असें ऐके, तया
तातापरी संस्कारुनि श्रीश स्वयें पाजी पया. २८
या प्रार्थना वारावया कांहीं न बंधा लागली,
तत्काळ दे खाया धरी जो त्या कबंधाला गती.
मोटे कवी गाती सदा हे मोहभिल्लीला भली,[2]
थोरें रसें बोरें हि दे, ती मुक्ति भिल्ली लाभली. २९
पंपातटीं 'हा! हा!' वदे तें वर्णितां मोहा हरी,
जो वायुभू जो सूर्यभू केला सुखी तो हा हरी.

---

१. हस्तदोष-सतीं. २. मोहनाश करणारी लीला.

श्रीवल्लभें ते क्षाळिले स्वास्त्रें[1] अलंकार क्षण,
केलें सख्याचें वारुनि त्रासा कलंका रक्षण. ३०
शक्रात्मभू कीश क्षमापाळ स्वयें वाळी बळी,
गर्वें करूं येतां कळी दिक्कंधरातें जो छळी.
स्त्रीतें हरी, भ्रात्यासि ही मारावया पाहे अरी,
त्यातें वधी, तद्राज्य दे भक्ता सुकंठा श्रीहरी. ३१
खव्योमपृथ्वी योजनें पाथोधितें लंघी हरी,
वातात्मभू मुद्रा सतीतें दे, मति स्वस्था करी.
रक्षश्चमू शाखी चुरी, जाळी बळें लंकापुरी,
आनंदवी नागी सुरी होय द्विषद्वक्षीं सुरी. ३२
श्रीराघवा आणूनि दे भूयोनिचा चूडामणी,
स्वामी निवे भेटोनियां त्या. चंदना जैसा फणी.
वर्णी प्रतापा सद्यशा प्रेमें त्रिलोकीचा धणी,
साक्षात् स्वजीवातु[2] स्वयें या अंजनापुत्रा गणी. ३३
देवांश जे मोटे बळी ऋक्षप्लवंगांचे पती
नेले समुद्राच्या तटीं, ज्यांची महा संख्या गती.
ये रावणभ्राता, नमी, त्या राज्य दे, भी सागर,
प्रार्थी निदेशातिक्रमें, जैसा स्वनाथा नागर[3]. ३४
सेतु प्रतापें निर्मिला, अत्यद्भुतश्री पाहिला,
माथां समुद्रें हारसा अत्यादरें जो वाहिला.
पावे अहोरात्रत्रयें पारा बळाकूपार[4] हा,
गर्जे, म्हणे, 'आलों, उगा तुच्छा खळा कूपा! रहा.' ३५
सुग्रीव त्या दिक्कंधरा 'भंगा' म्हणे 'आर्धी सहा,'
जो बोलवी शक्रादिकां देवूनियां आर्धीस 'हा!'
वाल्यात्मजें दूतें प्रभूक्तें बोधिलें जें अंगदें,

---

१. आपल्या आसवानीं. हस्तदोष–स्वास्त्रे. २. आपलें वांचण्याचें औषध. ३. नागरिक. ४. सेनासमुद्र.

नाहीं च तें स्वीकारिलें दिक्कंधरें सद्गंगदें. ३६
आरंभिलें दुर्मंत्रितें अत्याग्रहें जें उद्धतें,
एके दिसीं ही न स्थिरा स्वल्पा जया दे युद्ध तें.
तसीं जसीं लोहीं जळें नाहीं च तीं झालीं बळें,
मेघस्वनें स्वामी खळें केले रणीं बद्ध च्छळें. ३७
ते नागपाश स्वस्वनें[1] नागांतकें नेले लया.
त्या सानुज स्वामी म्हणे, 'बापा! तुवां केली दया.'
कुंभश्रवा मोहीं धरी, सुग्रीव तन्नासा हरी;
क्षोभे रणीं, भक्षी हरी, त्या ही व्यसु स्वामी करी. ३८
मेघध्वनि ध्वंसी बळें, मोही, खिळी स्वामीस ही,
शल्यार्त पाडी, सर्व ही तेव्हां भयें कांपे मही.
वातात्मभू ओषध्यगाच्या आणुनीं शृंगा 'रहा,
तेजा' म्हणे; झाला जयश्रीचा महाशृंगार हा. ३९
मायामयी सीता रणीं तो शक्रजित् पापी वधी,
'हा! हा!' म्हणे, मानी खरें ज्ञानामृताचा शेवधी[2].
केला 'बिभी'पूर्वें 'षणें' बोधूनियां हा सावध,
भ्राता महेशाचा करी त्याचा शचीहासा वध. ४०
पुत्राचिया शोकें बहु क्षोभे कुधी, तो घे असी,
सीतावधा धांवे, म्हणे, 'वांचो न हे दुष्टा असी.'
भ्याली सती, 'हा!' बोलिली, हस्तीश जेणें तारिला
चिंती तया नाथासि, तों सुज्ञें सुपार्श्वें वारिला. ४१
द्वेषी पुन्हा मारावया प्रेषी महासेनाशतें,
भ्यालीं, न जीं आलीं पुढें, धालीं रसें, झालीं हतें.
साहे विलापातें, न तो राहे पुरीं, पाहे बरें,
बाहेर ये, बाहे रणा, 'हा!' हे चमू बोले दरें. ४२
सौमित्रिला तो शक्तिनें ताडी उरीं, पाडी अरी.

---

१. आपल्या गर्जनेनें. २. निधि.

श्रीराम ही क्रोधें तया भंगी, गजा जैसा हरी.
ओषध्यगाचें शृंग तें आणी पुन्हां, त्या वांचवी,
श्रीमारुति स्वच्छें यशें जीं दुर्लभें तीं सांचवी. ४३
स्वस्यंदन श्रीशा रणीं बैसावया धाडी हरी,
युद्धक्रतु श्रीराम दिक्तुंडासह क्रोधें करी.
छपन्न याम क्रूर तो न श्रांत झाला, तोडिलीं
जीं मस्तकें, योगें शत क्षिप्र प्रसन्नें जोडिलीं. ४४
चिंता करी श्रीराम तों श्रीकुंभभू या भेटला,
तो मंत्र दे, त्याच्या जपें वातें शिखीसा पेटला.
सूर्यें दिला देवा वर, ब्रह्मास्त्र हा योजी शरीं,
तो रावणीं झाला तसा जैसा पवि क्षोणीधरीं. ४५
तैसा पडे उन्मूळिला वातें जसा मोटा नग,
ब्रह्मा सदेवर्षि स्तवी, आनंदलें सारें जग.
वाद्यें सुरांचीं वाजलीं, वर्षे प्रसूनांचा घन,
प्रेमें तसे ही नाचले ज्यांचें तपस्या हें धन. ४६
'जैसा तुझा माझा हि बा! तैसा चि हा; याची क्रिया
सांगा करीं, सांत्वूनियां मंदोदरी राजप्रिया.'
ऐसें नवा लंकेश्वरा सांगोनि दे त्याला गती,
गाया कवी शश्रूस ही कल्याणदेत्या लागती. ४७
लंकापुरींत स्थापिला सौमित्रिहस्तें तो भला,
विश्रांत या रामप्रभूत्तंसप्रसादें शोभला.
दीप्तानळीं न्हाली सती, देवर्षिनीं ती वानिली,
अग्न्यादिदेवांच्या मतें श्री श्रीवरें संमानिली. ४८
ये दिव्यरथ स्वर्गाहुनि, श्रीशा सुता भेटे, निवे,
तेव्हां शिव प्रेमें वदे, 'धन्य स्तवावा हा शिवे!'
स्वामिप्रिया सेनायुता कीशेश्वरा पूजी, नवा
लंकापती, दे पुष्पक श्रीच्या धवा, पावे स्तवा. ४९

सत्पुष्पकीं बैसोनियां सर्वांसह स्वामी निघे,
जो दुर्वह क्षमाभार तो भ्रातृद्वया भेटोनि घे.
राजा स्वयें होय, प्रजा सर्वा प्रजाशा रंजवी,
आर्धी जगत्स्रष्ट्या अजा यन्नाभिज श्रीकंज वी. ५०
लंकापती तारापती सत्कारुनि प्रेमें 'कथा
जों तों' म्हणे, 'वातात्मजा! न त्वन्मना स्पर्शो व्यथा.'
स्वामी करी सर्वांचिया पूर्ण स्वयें चेतोरथा,
दावी जिणाया मन्मथा मुक्तिप्रदा पूता पथा. ५१
'सुरामायण' हें भावें मयूरें रामनंदनें,
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें. ५२

इति श्रीरामनंदनमयूरविरचितं सुरामायणं समाप्तं ।

---

# सत्स्वरामायण

(शार्दूलविक्रीडितवृत्त)

श्रीश ब्रह्महरामरर्षिवचनें सूर्यान्वयीं जन्मता
झाला; सर्वजगीं यशें करि सदा सारा मही सन्मता.
कौसल्याज यतीड्य राम जैयतां वारी यमोपद्रवा,
ज्याचें भावुकराशि नाम रुचलें अत्यंत दुर्गाधवा. १
कैकेयीसुत तो चि होय भरत, श्रीला वरामत्र हा;
पावे नंदन जन्मतां यैम सुमित्रा ही उदारा महा;
तेजस्वी नयधर्मजन्य यश ज्या सेवी सुधी लक्ष्मण,
श्रीशत्रुघ्न दुजा, विराजति, मना देती जनाच्या क्षेण. २
श्रीमान् गाधिजराज या दशरथा मागे महात्मा सखा
ओजस्वी तनय, क्षपाचरहता राखावयाला मखा
दे व्हाया जय रामलक्ष्मण जगच्छ्रेयस्कर क्षमापती.

---

१. मनोरथा. २. विजयी असो. ३. कल्याणराशि. ४. जुळें. ५. आनंद.

ते रात्रिंचर मर्दुनी, निववितो त्या कौशिकाची मती. ३
श्रीतें पाववली पुन्हां पदरजें दारा महर्षींदुची;
गाती सद्विज हें यश द्रुत करायाला मनाला शुची.
जेथें बाहुजयत्न कुंठित, जगन्नाथ प्रिय ख्यात या,
कांडी दिव्य शरासन प्रभु, मथी दोःशक्तिलेशें तया. ४
श्रीसीता प्रभुला पराक्रमजिता प्रेमें वरी; दे सुता
हर्षें तीन तिघांजणा; करि यशा राजा महाविश्रुता;
जिंकी राघव बाहुजक्षयकरा रामा, जय क्ष्मासुर
ध्याती, वर्णिति, 'हा नरामर जगीं झाला महाभासुर.' ५
श्रीज्ञ क्षोणिवरा पित्या हि मग दे धन्यत्व सत्यावनें,
सस्त्री सानुज जाय, राज्यपद तें सोडूनि, हृष्ट मनें.
तों राज क्षय जन्मदान यम हा दुःखें प्रभूतें नमी
धीरार्थस्तुत पादुका भरत घे, मध्यें[१] च राहे[२] श्रमी. ६
श्री सेवी न, धरावनीं परि मन स्थापी, तपस्वीपण
स्वीकारी, निज्ञनिश्चय स्थिर धरी, राहे महें आपण;
भक्तज्ञानिमुनिव्रजाप्रिय करी, दे तेज, नाशी भय,
क्रूरारति मथी, प्रिया हि हरवी, त्याचा कराया क्षय. ७
श्रीसंत्राणकरा जटायुस महाप्रेमें गती दे हरी;
हा निर्व्याजदय स्मरासम[३] अतिक्रूरा कबंधा करी.
पूजी जी शबरी, जगत्र्ययमता[४] जन्मात्ययव्यापदा-[५]
हीना तीस करूनि, पावलि वरा निःसीम[६] भव्या पदा. ८
श्री दे मारुतिला; तसी च सुगळा तारा हि दावी महा;
तेज स्वीय हरादि गाति महिमा, अन्यत्र कोठें न हा.

---

१. नंदिग्रामीं. २. ह्या कवितेचा उत्तरार्ध व पुढील कवितेचा पूर्वार्ध नजरचुकीनें लिहावयाचा राहिला, तो अकराव्या कवितेच्या पुढें लिहिला आहे. ३. मदनाप्रमाणें जाळून टाकी. ४. हस्तदोष–जगत्रय. ५. जन्ममरणदुःखविमुक्त. ६. हस्तदोष–निःशीम.

शोधी भूजनितें, प्रभुप्रिय करी, साधी जय, द्वेषिपू[1]
जाळी; रावणसैन्य पुत्र हि मथी, चिंतेंत घाली रिपू. ९
श्रीचें हृष्ट करावया मन निघे, घे कीशसेनाशतें,
भारानें जगती धरी भय तदा, राजा हि; मस्तें[2] नतें
झालीं. जों जळधीस ये, प्रयतें[3] तों बद्धांजळी तो यदा,
जैसा मोर तसा बिभीषण नमी, सारा मनोज्ञा पदा. १०
लंका श्री खचरा नमस्कृतिपरा दे देव, दावी दया;
बांधी सेतु जळांत आयतवरा[4], गावें महेंद्रें जया.
शस्त्रास्त्रें रजनीचरक्षय करी, जन्यांत अन्यास्त्र शें
ज्यांचे, त्यां गति दे प्रभु, श्रुतिपरा मर्त्या हि धन्या यशें. ११
श्रीकंठा चतुरानना अमरभूपा जो न मानी, तपा
नाशी, जन्म खळा वियच्चरवरा[5] मांसाशना मद्यपा
मारी राम मुकुंद; तैं 'जय! जय!' ध्वानें स्तवें दाटलें
ब्रह्मांडोदर; सर्वसज्जननरामर्त्यां बरें वाटलें. १२
श्रीतें घेउनि राक्षसारि सुमनोयानीं बसे, ये पुरा,
सद्भक्तानुजहृत्प्रिय प्रभु करी राज्यें महीच्या सुरा.
सर्वां ही निववी जगासि सुयशें, अर्पी निजश्रेय तें,
राजीवाक्ष कवींद्रकोटिमहितें तारी चरित्रें तर्तें. १३
'सत्स्वरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. १४

इति श्रीसत्स्वरामायणं समाप्तं।

---

१. शत्रुपुरी (लंका). २. मस्तकें. ३. शुद्ध. ४. लांबरुंद; विस्तीर्ण. ५. राक्षसेंद्रा.

# मंत्रिरामायण

## बालकांड

(अनुष्टुप्वृत्त)

श्रीश ब्रह्मादिदेवाहीं प्रार्थिला, दिग्रथात्मज
  होय, चार धरी मूर्ती, जो रक्षी संकटीं गज. १
राम ज्येष्ट महातेज्या कौसल्योदरसंभव,
  कैकेयीपुत्र भरत समर्त्यांचा नाशिता भव. २
महिला तिसरी, तीचे दोघे सद्गुण नंदन,
  नामें लक्ष्मण शत्रुघ्न शीलनिर्जितचंदन. ३
जगतीपति दे दोघे राम लक्ष्मण गाधिजा,
  देती सुबाहु मारीच क्रतु ध्वंसुनि आधि जो. ४
यज्ञावनें हृष्ट केला गुरु रक्षोबळक्षयें,
  गौतमस्त्रीसमुद्धारें पापांचीं नाशिलीं भयें. ५
राजकोदंड भंगूनि वरिली जानकी सती,
  न केवळ तिची च क्ष्मादेवीची हर्षली मती. ६
महर्षि देववी कन्या तिघां रामानुजांस त्या
  तिघी दिल्या मैथिलानें ऊर्मिळादि महासत्या. ७
जनका दिग्रथा विश्वामित्रें संबंध जोडुनीं,
  सिद्धाश्रमासि गमन केलें, तें पुर सोडुनीं. ८
यमसा गुरुचापाच्या भंगें भार्गव कोपला,
  रामापुढें, रविपुढें दीपसा, परि लोपला. ९
जय पावोनि, साकेता बहु हर्षवि, दिग्रथ
  योग्य पुत्रस्नुषालाभें हर्षे, होय गतव्यथ. १०
यश गाती पार तैसें स्वर्गीं राहून देव ही,

---

१. ज्या.

साहुकारां उत्सव तों बांधूं पाहूं न दे वही. ११
राजाज्ञेनें मातुळ ने सानुजा भरता पुरा,
जो तापशमनें स्वच्छें यशें लाजवि कापुरा. १२
मनोरथाच्या साफल्यें सुख सर्वत्र दाटलें.
धन्या दशरथा राज्या सत्य साकेत वाटलें. १३

## अयोध्याकांड

स्व श्री देतां रामभद्रा, कैकेयीच्या नये मना,
राज्य पुत्रास घे, रामा धाडी चौदा समा वना. १४
सु रा नीं व्हावया कार्य दशास्यवध, काढिला;
मरे शोकें, वियोगाचा साहे हा न धका ढिला. १५
स म न्यु मंत्री भरता आणिती, साधु तो तिला
गांजी, म्हणे, 'विषरस स्वजनास्यांत ओतिला.' १६
दे ज ळादि पिल्या, होय आर्यांच्या विरहें श्रमी;
फिरवाया चित्रकूटीं रामपादांबुजें नमी. १७
प्रि य भ्रात्या सांत्वुनि दे पादुका, फिरवी बळें,
मुनि ही म्हणती, 'आज्ञापालनीं धर्म बा! वळें.' १८
न रा हेल चि मुन्यब्द सरतां, कायहोम हा
करील चि, म्हणे 'तापज्वलनीं काय हो! महा?' १९
'स म यीं भेट देईन, कष्टी होऊं नको, रहा
स्वस्थ' राम म्हणे, कीं तो चंद्र, भक्त चकोर हा. २०
तो ज पे बहु राज्यास, रामचंद्रपदास ही,
नंदिग्रामीं वसे वल्की, पाहे माता तसी मही. २१
भ य जें राक्षसोत्पन्न मुनींचें सर्व तें हरी,
अत्रितें वंदुनि पदें पुत्रसा चि सुखी करी. २२
न ज या शुष्कता, श्रीतें अंगराग सदाम ती
दे अत्रिस्त्री, ज्या धरितां हृष्टा राहे सदा मती. २३

१. येथें कवीच्या हातून बालकांड पुरें झालेलें दाखवावयाचें राहिलें आहे.

प्र[1] य ता अनसूया या हर्षवी श्रीस मायसी,
सांगे, 'स्त्री पतिच्या संगें, स्पर्शांच्या[2] जेंवि आयसी.[3]' २४
ध रा ज्या पुसतां सांगे स्वयंवरकथा स्वयें,
जावें सोडूनि यद्धानें जना संसृतिच्या भयें. २५
श्री म स्तकें नमी प्रेमें अनसूयापदें नतें;
वदवे न कवींद्रा जें यश, काय वदेन तें? २६

अयोध्याकांड:

## अरण्यकांड

हरिश्री तें त्या विराधा राक्षसा राम दे गती,
जी दया हृदयीं रोधी क्रोधाचा नित्य वेग ती. २७
जें ध रा सुरसंकीर्ण दंडकारण्य सर्व तें
पुण्य केलें, न गणिला मेरु तत्रत्य[4] पर्वतें. २८
प्रणा म शरभंगादिघटजांतमहर्षितें
करी सानुज सश्रीक चित्तें श्रीराम हर्षितें. २९
सखा ज टायु ताताचा, गृध्र जात्या, तथापि त्या
म्हणे 'त्वद्दर्शनें गेली वियोगादि व्यथा, पित्या!' ३०
विज य प्रदनामा तो पाहे पंचवटी बरी,
गोदावरीतटीं राहे, पर्णशाला सुखें वरी. ३१
स्वसा रा क्षसराज्याची पापा शूर्पणखा, 'मज'
श्रीरामातें म्हणे, 'कुस्त्री सीता सोडूनियां भज.' ३२
माया म नोहरतनू ती चाळवुनि दंडिली,
श्रीलक्ष्मणें तिची नासा, कर्ण खंडुनि, खांडिली. ३३
कोपे ज नस्थानवासी, न धरी परवा खर,
भंगे, सबळ रामेषु पवि तो, पर वाखर. ३४
क्षोभे य क्षेशानुजन्मा, कपटें नवल क्षण
स्वर्णेण दावी, श्री चोरी बुडाया अवलक्षण. ३५

---

१. शुद्ध, पवित्र. २. स्पर्शमण्याच्या. ३. लोखंडी वस्तु. ४. तेथील.

मनु ज त्व स्त्रैण[1]भाव प्रभु दाखवि 'हा!' वदे,
तो विलाप वना तैसा जैसा संताप दाव दे. ३६
सद य प्रभु दे गृध्रा पुत्रसा परमा गती,
मागती जी यती, शोधी श्रीपदीं परमाग ती. ३७
उद्ध रा या कबंधातें सांपडे भगवान् बळें,
शबरीतें अमृत दे, बहु मानी तिचीं फळें. ३८
दुग्धा म लयशा स्वामी मुग्धाच्या रीतितें धरी
पंपा[2]तीरीं; भक्तशोक संपाया 'हा!' म्हणे हरी. ३९

अरण्यकांड:

## किष्किंधाकांड

मारुवि श्री वरा भेटे, सुग्रीवा मग भेटवी,
तो सखा होय, हा ही त्या दहना वायु पेटवी. ४०
रघुवी रा अलंकार सीतेचे दाखवी हरी,
'नूपुरें तीं च' सौमित्री म्हणे, राम उरीं धरी. ४१
त्या अर्थ म सुत प्रार्थी, "सख्या! होवूं नको श्रमी.
हारिलि स्त्री[3] अग्रजानें 'हा!' म्हणें हारि ही न मीं. ४२
तुझी तु ज प्रिया यत्नें भेटवीन चि, अत्यया
करूनि त्या रावणाच्या, मदुक्ता जाण सत्य या." ४३
श्रितश्रे य स्कर म्हणे, 'तूं असावासि साधि न,
सख्या! मीं तों तुझें आधीं सर्वथा कार्य साधिन.' ४४
भार्याह रा हंतुकामा प्रमत्ता वाळिला वधी,
त्याची श्री स्त्री दे सुकंठा, म्हणे, 'धर्मीं च लाव धी.' ४५
धाडी स म र्थ प्लवग श्रीशोधा सुगळ स्वयें.
लंघितां मास, मारील, या चित्तीं कांपले भयें. ४६
ते महा ज व शोधूनि आले आशात्रयाप्रतीं,
अवध्यतिक्रमें झाली अन्यांची व्याकुळा मती. ४७

---

१. हस्तदोष–स्त्रैयभाव. २. हस्तदोष–पंपातिरीं. ३. हस्तदोष–श्री.

तयां प्रा[1] य गतां सांगे जटायुज्येष्ठ शोध हो !
‘सिंधु शंभर गावें, ती सीता लंकेंत योधहो !’ ४८
तो अंड ज स्वपक्षांच्या दाहाची ऐकवी कथा,
तत्काळ पक्षोत्पत्तीनें दे प्रत्यय, हरी व्यथा. ४९
वातका य ज ऋक्षेंद्रें पुराणें ब्रह्मसंभवें
केला स्वशक्तितत्वज्ञ वरादिकथनें स्तवें. ५०
महाप रा क्रमज्ञान जांबवान् दे जसा गुरु,
म्हणे, ‘बोध महामोहा परगर्वा तसा चुरु.’ ५१
निज सा म र्थ्य कळतां उत्साहें कपि दाटला,
शतयोजन पाथोधि स्पष्ट गोष्पद वाटला. ५२

किष्किंधाकांड:

## सुंदरकांड

चिंतूनि तो श्री रामातें महेंद्रा ढांसळी, उडे;
फुटले तों राक्षसींचे, सीतेचे दाटले चुडे. ५३
ताडी महो रा मैनाका, ठकवी सुरसेस ही,
सिंहिकेतें वधी, लंघी लीलेनें सागरा मही. ५४
लंकादेवी म द हरी, योगें होय लहानसा,
पावे श्रीदर्शन, जसा क्षुधाकुल महानसा. ५५
अशोकीं रा[2] ज खळ ये, जें देवीसीं वदे कटु,
साहे, महावीर होता जऱ्हि तन्मथना पटु. ५६
जे धर्मन्या य युक्त श्रीवाक्य तेणें निवे कपी,
तापे धूर्तें ज्वरीसा जो खळ नष्ट विवेक पी. ५७
दुष्ट सांगे रा क्षसींला, ‘इला शिक्षा करा बरी,
मासद्वयांत न वळे प्रातराशार्थ हो तरी.’ ५८
उद्बंधनें म रूं पाहे, जातां पापी, महासती.
स्तवी मारुति, दे मुद्रा, वंदी, पावे महास ती. ५९

---

१. प्रायोपवेशन करून बसलेल्यांस. २. खळराज रावण.

चूडामणी ज नकजा दे संदेश कथी, मग
अशोकोपवनांतील मोडी सर्व महानग. ६०
सैन्याचा क्ष य अक्षाख्यकुमाराचा हि हा करी;
ब्रह्मास्त्राला सांपडे, या इंद्रजित् क्षोभला धरी. ६१
लावी धनं ज य पुरा, पुच्छ पेटावितां खळें.
'जळें' म्हणे मनीं, 'द्वेष्ट्या!' विलंघी सागरा पळें. ६२
अंगदादि य शा गाती त्या मानी हित राम ही,
भेटे, घे अधमर्णत्व[1], देता ही इतरा मही. ६३
सांगे समी रा त्मज तो मार्गदुर्ग दुराग्रह
श्रीचा निरोप, स्वकृत न राक्षिति पुरा ग्रह. ६४
बिभीषण म हासाधू तयाची सरमा वधू,
त्रिजटा राक्षसी, बाधू भव, काळ न या वधू. ६५

सुंदरकांड:

## युद्धकांड

सुग्रीवयुक्त श्री राम बहुकीशबळासह
उतरे सागरतटीं, होय त्यासि भयावह. ६६
सांगतां हित रा गेजे, 'धिक्!' सभेमाजि ऐकवी,
बिभीषण निघे, भेटे, वंदी रामासि तैं कवी. ६७
लंकाराज्य न म स्कारें दे, सेतु करवी हरी,
प्रभुचापशिरें दावी श्रीस 'हा!' म्हणवी अरी. ६८
केला रक्षोरा ज भंग देखतां चि कपीश्वरें,
न मानिलें रावणें जें अंगदें कथिलें बरें. ६९
बहु रक्षक्ष य घडे, न चाले इंद्रजिच्छळ[2];
कुंभकर्ण मरे, साम तरी तो न करी खळ. ७०
सनाथ वान रा नीक मेघनाद रणीं खिळी,
स्वौषध्युपायें हनुमान् उठवी, मोह ज्या गिळी. ७१

---

१. ऋणीपणा. २. पृष्ठ २३ टीप ५ पहा.

मोहार्थ माया म यभूकन्याशिर कुधी हरी,
विभीषण भ्रांति वारी, लक्ष्मण व्यसु त्या करी. ७२
मंत्री वारी भू ज नितें वधितां रावणा खळा,
वधार्थ प्रेरिलें तेणें जें त्या प्रभु वधी बळा. ७३
सौमित्रिहृद य क्रोधें भेदी रावण शक्तिनें;
पुन्हां सावध केला तो त्या चि निःसीमभक्तिनें. ७४
सप्ताहोरात्र ज न्यांत बसोनि हरिच्या रथीं
प्रभु मारी दशग्रीवा जेव्हां रवि म्हणे 'मथीं'. ७५
देववी त्या तो य आधीं, प्रभु स्थापी नता पदीं.
शोभली अग्निच्या कुंडीं श्री जैसी पद्मिनी हृदीं. ७६
रक्षःप्लवग रा ज्यातें पुष्पकीं घे, पुरास ये;
स्वःपू म्हणे अयोध्येला, 'त्वत्प्रताप पुरा सये !' ७७
वैकुंठ झाला म हिप, यश वी गौर, विप्र ज्या
अर्थी इच्छिति त्या सर्वा पुरवी, गौरवि प्रजा. ७८

युद्धकांड:

## उत्तरकांड

प्रभूतर्षिस्तुत श्री स स्वयशें नाशिता व्यथा,
दशास्य वाळी हनुमान् जे यांच्या आयके कथा. ७९
श्रीरामें पूजिले रा जे जनकप्रमुख स्वयें,
केला हनूमान् विश्रांत धन्य धन्य महादयें. ८०
ज्ञाता स्नेही पर म ही गर्भिणी स्वप्रिया सती,
अपवादें त्यजी, दोष न लावी स्वप्रियास [1]ती. ८१
सीतेसि वाल्मीकि ज पे स्वाश्रमांत पिता तसा,
पुत्र तीचे कुश लव प्राशिती सद्यशोरसा. ८२
दोघे दोघे तन य त्यां तिघांचे गुणसागर,
चौघांतें तेंवि आठांतें वर्णिती वन्य नागर. ८३

१. येथें लेखकानें अखेरची पंक्ति अर्धवट च सोडून विश्रांति घेतलेली दिसते.

शत्रुघ्न मारी क्रू रा त्या लवणा मधुरा करी,
जे तीन कोटि गंधर्व वधिले भरतें अरी. ८४
न्यायेंकरूनि र म वीं श्वान गृध्र उलूक हीं,
मृत विप्रापत्य रक्षी, सद्यशें निववी मही. ८५
अश्वमेधीं आत्म ज ते वाल्मीकिच्छात्र हर्षले,
आदिकाव्यामृत प्राज्य सम सर्वत्र वर्षले. ८६
द्यावया प्रत्य य जना पुन्हां ती जानकी, 'धरे!
असेन शुद्धा तरि घे' म्हणे तदुदरीं भरे. ८७
आठां राज्यांसि भ ज ते झाले आठ कुमार ते,
पुण्यकीर्ति सदा रामीं, शिवीं जेंवि उमा रते. ८८
सत्यप्रतिज्ञत्व य श प्रभुनें निज रक्षिलें;
भाक्षिलें वन्य, वेदोक्त गुरूक्त सम लक्षिलें. ८९
भक्तकल्पद्रुमा रा में रामें रंजविलें जग,
एकादशसहस्राब्द पुर उद्धारिलें मग. ९०
चारित्रीं विश्व र म लें, शमलें, सर्व पातक,
श्रीराम मेघ गमला भक्त ते मोर चातक. ९१
'मंत्रिरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें,
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ९२
इति श्रीरामनंदनमयूरविरचितं मंत्रिरामायणं समाप्तं ।

---

# नामांकरामायण

(गीतिवृत्त)

राजीवोद्भव विनवी विश्वहितदशमुखासि माराया;
मधुकैटभारि दशरथसुत होय, त्रिभुवनासि ताराया. १
रामप्रभु कौसल्यासुत, कैकेयीकुमार तो भरत,
महितगुण सुमित्रात्मज लक्ष्मणशत्रुघ्न कीर्तिलोभरत. २

राज्यासि रामलक्ष्मण गाधिज मागे स्वयाग रक्षाया.
मनुजेंद्र, गुरुनिदेशें, दे प्रिय ही प्रणतभद्रदक्षा या. २
राहुनि आज्ञेंत सदा सादर, मारूनियां पर, महर्षी,
मख संरक्षुनि, केला श्रीरामें, सानुजें, परम हर्षी. ४
रामा गौतममुनिची हर्षविली, पदरजें हरुनि शापा;
मग जनकपुरीं सीता, लीलेनें राघवें चुरुनि चापा. ५
'[1]राकेशमुखी सीता रामाला, तदनुजां तिघी अन्या
महितगुणा दे' ऐसें सांगुनि, मुनि जाय, मैथिला धन्या. ६
राजा जनक दशरथा आणुनि, सानुज तदीयतनयांतें,
मणिकनकभूषिता दे कन्या; 'बहु धन्य!' म्हणति जन यांतें. ७
रागेजे हरकार्मुकभंगें भार्गव, तया करी शांत.
[2]मन्यु त्यजुनि, म्हणे 'बा! तूं तो, जो चुकविता करीशांत!' ८
राहुविमुक्त शशीसा दशरथराजा विशंक धरि तेजा.
मन [3]कश्मळांत बुडतां क्षण, म्हणती व्यसु चि बोध करते ज्या. ९
राव गमे इतराची, रामाची, पुरजनासि, कीर्ति सुधा;
मधुरत्वादि यश परा न भजे, जें काय कामधेनुदुधा. १०
राज्यासि पुसोनि, युधाजिन्मातुळ ने सहानुजा भरता;
मतिमाजि विचार असा [4]होय नृपाच्या जगद्धिता भरता[4]. ११
[5]राज्यभरोद्वहनोचित, सद्गुणसंपन्न, राम, लोकांस
मत, युवराज करावा; करिल महें पूर्ण हा [6]सदोकांस. १२
राजप्रियेसि सांगे सुरदूषितबुद्धि मंथरा दासी,
'मन हृष्ट कां? सपत्नीसुतराज्यें दीनतेसि कीं जासी. १३
राबीव सपत्नीतें, स्वसुता मागोनि राज्य घे च वरें;
मन्वब्द राम वरु वन, उडवुत भरतीं सपत्न [7]हे चवरें.' १४
राज्ञी तसें चि करि ती; मागे वर; सत्यसादरा अडवी.

---

१. पूर्णचंद्रानना. २. क्रोध. ३. मोहांत. ४. शिरला; आला. ५. राज्यकार-भार वाहण्याला योग्य. ६. सज्जनांच्या गृहाना. ७. हस्तदोष—हें.

मधुरतमा हि तिची मति, गी झाली लोभदूषिता, कडवी. १५
राहे यत्न नृपाचा; सीतालक्ष्मणसमेत राम निघे.
मतिमान्, गुरुवचनावन सर्वसुखाधिक, असें बरा मनिं घे. १६
राहवि अभिषेका ती, घे वस्त्रें, प्रभुसि वल्कलें ओपी.
'मज सेवा भरताहुनि माते!' प्रभुवर म्हणे, 'दिली सोपी.' १७
रानासि, राम वंदुनि सर्वगुरुजनांसि, जाय उत्साहें,
महिषीगृहासि राजा; धरि भय, करितील लोक कुत्सा, हें. १८
राजा सुमंत्र धाडी; तो स्वामिरथीं तिघांजणा वाहे;
मरता सर्व हि शोकें, प्रभु करुण म्हणोनि, सासु जन राहे. १९
रानट निषाद गुह, परि परम प्रेमळ सखा तया भेटे.
मरुदागमें दहनसा, वनवासें शोक तन्मनीं[1] पेटे. २०
राजीवनयन सानुज, मागुनि वटवृक्षपय, जटा बांधी.
मस्तक संकपर्द[2] तसें तें न विमोहील साधुची कां धी? २१
राजभजन सचिवा हित न गमे, प्रभु उचित जाणवी, तरि तें.
मन करि विकळ गुहाचें, जेंव्हां[3] जगदीश आणवी तरितें. २२
राशि जगद्भव्याची जी गंगा, प्रभु तितें उतरला, हो!
मग त्या म्हणे गुहातें, 'येतों बा! न तव धी सुतरला हो.' २३
राजसखभरद्वाजा सानुज, सस्त्रीक, राम, येवून,
मत्स्यवर जसा डोहा, भेटे; सानंद होय सेवून. २४
राकानाथ चकोरा, राम तसा चित्रकूटवासिजना,
मधु जेंवि मक्षिकांच्या, मुनिराजींच्या तसा चि होय, मना. २५
राहे सुमंत्र; भेटे तों महिषीच्या भजोनि गेहातें;
महिला वियोग नृप दे, त्यजुनि, म्हणत 'राम! राम!' देहातें. २६
राखायाचा जातां, झालें गोकुळ जसें, तसें पुर तें.
मरुशोक, श्रीगुरुनयघन; जीवन अन्यथा कसें उरतें? २७
राघव सानुज गुरुनें दूत प्रेषूनि शीघ्र आणविला;

---

१. गुहाच्या मनीं. २. जटाजूटयुक्त. ३. हस्तदोष–जेंव्हां.

मन्युद[1] अनर्थ हि तिणें, हर्षद मानुनि, सुतासि जाणविला. २८
राग करी मातेवरि, करुनि पित्याची क्रिया, निघे तूर्ण[2];
मघव्या भय दे, प्रभुला भेटे, व्हाया स्वकाम तो पूर्ण. २९
राज्यासि तोय देवुनि, समजावी राम आशु भरतातें;
मधुर वदे, 'त्वच्चित्तीं जें पूर्ण करीन बा शुभरता! तें. ३०
राहोंदे मज चवदा वर्षें, पितृसत्यरक्षणा, रानीं.
महिमा तुझा हि गावा ताताचें वचन रक्षणारानीं.' ३१
राष्ट्रावनार्थ मागुनि घे प्रभुच्या पादुका, शिरीं वाहे;
'मरणद समयादर्शन' कथुनि, समव्रत[3], पुरीनिकट राहे. ३२
राक्षसकदनार्थ निघे श्रीराम हि चित्रकूट सोडून,
मह बहु देता झाला अत्र्यनुसूयांसि हस्त जोडून. ३३
रानीं विराधराक्षस सीतेसि धरी, हरी, दरीवदन;
मत्ता तया मथुनि, दे पद न नमितया हि सुगतिचें सदन. ३४
रात्रिंचरभीतिरहित दंडकवन करुनि, हरुनि ताप, सजे,
मदनांतकसा, द्याया गति त्यांतें, सुपथ धरुनि तापस जे. ३५
राजा गृध्रांचा जो, तातप्रियसख, जटायु, तो तात
मम चि सुखांत केला; हें यश गाते तसे च होतात. ३६
राहे गोदातीरीं प्रभु, पंचवटींत, रचुनि दलशाला;
मत्ता खचरी लोभे त्यासि, शुनी जेंवि अमृतकळशाला. ३७
रागें कर्णघ्राण छेदी लक्ष्मण कृती, तिला दंडी.
मदिरास्रप[4] खर बंधु प्रेरी प्रभुच्या वधास ती चंडी. ३८
राक्षस शूर्पणखेचे कैवारी मारितां रणीं, दुष्टा
महदप्रिय दशवदना कळवी ती, परमदारुणा, रुष्टा. ३९
राख स्वकुळ कराया, कपटकनकमृग निशाचर प्रेषी.
मत्स्याशन, वरमत्त, क्षणदाचरराज, दशमुख, द्वेषी. ४०

१. दुःखद. २. लवकर; लगेंच. ३. [रामा-] सारखें च व्रत ज्याचें. ४. मद्य आणि रक्त पिणारा.

रावण संहाराया, श्री हि कपटकनकहारिणलोभ धरी;
मनुकुलतिलका[1] प्रार्थी; त्यामागें प्रभु हि जाय, जेंवि हरी. ४१
रानांत दूर पळतां प्रभु कपटमृगासि खरशरें हाणी.
मर्महत हि 'हा सीते! हा सौमित्रे!' असी वदे वाणी. ४२
राणी, प्रभुची वाणी मानुनि, भी, लक्ष्मणा म्हणे, 'स्वामी
मरणव्यसनीं रक्षीं; तुज पत्यसुदान मागत्यें बा! मीं.' ४३
राघव म्हणे, 'सति! रहा स्वस्था; भी न रघुसत्तमा यावी.
मथिला बहुधा प्रभुनें तो कनककुरंग मत्त मायावी.' ४४
राग करी, कटु बोले, उटजांतुनि वालवी तया आर्या
मधुभित्प्रभुची भार्या; सिद्ध कराया सुरांचिया कार्या. ४५
रावण तों चि सदुटजीं शिरुनि हरी श्रीस; जड म्हणे, 'आजी
मत्सम मीं च; जयश्री मेळविली सहज, न करितां आजी.' ४६
राहु सुरयशोविधुचा तो खळ केला जटायुनें भग्न.
मग तेणें ही, अनर्थे पक्ष च्छेदूनि, कश्मळीं मग्न. ४७
राजसुता, गगनपथें नेतां, लंघूनि ऋष्यमूकनग,
मर्कटपंचक पाहे; सोडी ती त्यांत सोत्तरीय नग. ४८
राक्षस लंकेमध्यें रोधी सीता सती अशोकवनीं.
मणिकीं रस गंगेचा, तेंवि कथेचा चि या असो कवनीं. ४९
रामें[2] मनुष्यतनु प्रभु परते, मृग वधुनि, तों, अनुज कथि, तें
महिजोक्त श्रवण करुनि, धांवत उटजासि ये, मनें व्यथितें. ५०
रामा[3] उटजीं न दिसे, 'हाय!' म्हणे, क्षणसा विलाप करी.
'मदिराक्षि! हाय! कोठें आहेसि?' म्हणे; वरी च शोक वरी. ५१
रानीं हुडकी स्त्रीतें प्राकृतसा, तों जटायुला पाहे.
मरणोन्मुखा हि वदवी, न दशाननपापकृत्य तें साहे. ५२
राजसखाचें उत्तरकार्य करुनि, पुनरपि प्रिया शोधी.
मन वारिचेवारि शोकीं बुडतां, लक्ष्मण परोपरी बोधी. ५३

१. रामाला. २. हस्तदोष–राम. ३. स्त्री (सीता).

राक्षस कवंध खाया धरि, त्या प्रभु दे विमान बैसाया.
महिमा श्रीरामाचा अत्यद्भुत, विश्वगीत, ऐसा या. ५४
राजीवनयन वसवी प्रेमें शबरीस भावुक विमानीं.
मकरालय करुणेचा हा प्रभु, या सत्य भावु कवि मानीं. ५५
राबवितो प्रणतगृहीं जो सकळा सिद्धि, तो सहाय करी
मर्कटभल्लूकांतें, चरितें, तारावया जगासि, हरी. ५६
राजस कपिपति वाळी, स्त्री हरुनि[1], जपे वधावया भ्रात्या.
मत्ता प्रभुवात उडवि मित्रीकृतसुगळकपि[2] भयाभ्रा त्या. ५७
राड तसी सुगळाची कुदशा, गांगप्रवाहसा राम.
मरुदात्मज रविकांत, प्रभुरविसंनिधि च यासि दे धाम. ५८
राज्य कपींचें देउनि सुगळा अग्रजवधू दिली तारा.
मरुदधिप[3] म्हणे, 'प्रभुजी! तुमच्या चि करीं असे किली, तारा.' ५९
राजी सुगळ कपींच्या धाडी, त्यांला न लागला शोध.
मरुदात्मज चि यशस्वी होय, न दुसरा जगीं तसा योध. ६०
राय कवींचा सुरसा छायाग्रह ठकवि, न धरि शंकेला.
मकरालय शतयोजन उडुनि, गरुडसा चि, जाय लंकेला. ६१
रामप्रियेसि मुद्रा दे, वन चुरि, अहितकटक ये जॅथुनी[4],
मथुनि तया, पुर जाळी, खळदशवदनासि भावि तें कथुनीं. ६२
रासभसे पर केले, होउनि उच्चैःश्रवा तसा, आला.
मणि देवीचा देवुनि, बहु मान्य प्रभुसि वातसुत झाला. ६३
राळासा प्रभुपासीं, अरिपासीं पवननंदन सुमेरु.
मदनारि विभु वदे, 'या वत्सा दहनापुढें पर उमे! रु[5].' ६४
रावणवधार्थ राम प्रभु, अमितसुरांशकपिबळेंद्रयुत,

---

१. खोडलेला हस्तदोष–**वधुनि**. २. मित्र केला आहे सुग्रीव वानर ज्यानें असा. ३. इंद्र–**पंत**. ४. जमाव करून. ५. कापूस (ह्या आर्येच्यापुढें ६० व ६१ ह्या दोन आर्या आणि ६२ वे आर्येपैकीं **रामप्रियेसि मुद्रा** इतका भाग पुनर्लिखित झाला व तो लगेंच कवीच्या लक्षांत येऊन हरताळला आहे).

मकरालयासि पावे शिवविधिशतमखमहर्षिकोटिनुत. ६५
राक्षसराजानुजनि, प्रणत, बिभीषण, पलाशकुलराज्य,
मधुप मधु जसें कमळीं, रामपदीं पावला, यश प्राज्य. ६६
राशि जळांचा प्रभुच्या तेजा भी, विनवि, 'बा! यश तगावें;
मज दाम अयुतयोजन ही सेतु गमेल; काय शत गावें?' ६७
राक्षसराज, धराया सत्वर कुळसहित मृत्युची पदवी,
मस्तक धनुष्य पतिचें दावुनि सीतेसि 'हा!' असें वदवी. ६८
रामा बिभीषणाची सरमा, 'माया' असें तिला कळवी;
मळवी अश्रुभरें जी मुख देवी, तन्मनोव्यथा पळवी. ६९
राहुनि अष्ट दिन तटीं, नळकपिला कथुनि, सेतुतें करवी.
मग, सबळ प्रभु उतरे, प्राज्य यशोमृत जगत्रया भरवी. ७०
राजा कपिकटकांचा, प्रभुतें घेउनि, चढे सुवेळनगीं.
मत्तीं त्या दुर्गस्थीं उडुनि पडे, श्येन जेंवि तुच्छखगीं. ७१
रागें ताडुनि, पाडुनि शत्रुमुकुट, ये[1] करूनि भुजयुद्ध;
महिजाकांत म्हणे, "बा! साहस हें; या न म्हणति 'बुध शुद्ध.'" ७२
राक्षसपुर विभु रोधी; अंगदवदनें दशानना बोधी;
मत्सरिवर आरि, परि हरि तारि साम, न आवरी च जड तो धी. ७३
रात्रिचरचार धरिती, भुज झाडुनि, वालिसुत करि चूर.
मथुनि प्रासादातें, सूरकुळवरासि तो[2] कथी शूर. ७४
रागिट वानर ऋक्ष, प्रभुची होतां रणार्थ आज्ञा, ते
मलिन निशाचर मथितां, प्रेक्षुनि म्हणती, नभांत 'हा!' ज्ञाते[3]. ७५
राहे महामुनींचा नित्यविधि, समांजि[4]; समरयज्ञांत
मन लुब्ध; जय पराजय दिसती, घटिकेंत, सम रयज्ञांत[5]. ७६
राड रुधिरमांसांची झाली समरांगणीं; मग, नदी न
मत्तेभां हि तरों दे; पळति खचर; काढिती तग न दीन. ७७

---

१. ह्या दोन पदांच्यामध्यें **फिरुनि** असें एक अनवश्यक पद मूळांत पडलें आहे.
२. हस्तदोष–**ती**. ३. हस्तदोष–**ज्ञातें**. ४. शब्दार्थ (?). ५. वेगवानांत.

राजी सलक्ष्मण प्रभुवर विशिखांच्या कबंधलक्षांचें
मन मोहाया दाविति नृत्य शतमखादियुद्धदक्षांचें. ७८
रावण हि भंग पावे, जो सेनेश प्रहस्त, तो मेला.
मरतां राक्षसकटकें, मायावी मेघरव न कोमेला. ७९
रावणि अहिपाशांहीं सौमित्रिस रघुवरास ही बांधी;
मर्कटकटकें भंगी. श्रीची होईल न विकळा कां धी? ८०
राजा सर्वखगांचा धावुनि ये, सख्य संकटीं कळवी;
मरुदशनांतें, प्रभुचा गुण दोषांतें जसा, तसा पळवी. ८१
रावण घटकर्णातें, कष्टें उठवुनि, रिपुक्षया धाडी.
मदिरामदांध तो, बहु कपिवीरांतें, रणांगणीं, पाडी. ८२
रात्रिंचरेश्वरानुज सुग्रीवातें रणीं धरी, परते;
मर्कटकटकें भ्यालीं; विजयें घनसे चि गर्जले पर ते. ८३
राजा मग, सुटुनि, हरी घटकर्णघ्राणकर्ण वेगानें.
महती ख्याति करी, सुरगंधर्वांस हि न वर्णवे गानें. ८४
रागें भरे, फिरे, तो काळ गमे, कपि वधी, गिळी सगळे.
मर्कट भयें गळाले; पर्वतशतवृष्टिनें हि तो न गळे. ८५
राम प्रभु भुज चरण च्छेदी, तरि तो न आवरे अहित.
मस्तक खंडुनि पाडी, त्यातें करि वीरमंडळीं महित. ८६
राक्षसराज्याचे जे बंधु, सुत, सचिव, सहाय, ते सर्व,
मठ कपटाचे, खचले, दाखविते वज्रपाणिला गर्व. ८७
रावण, त्यांच्या शोकीं, जें जें श्रुतसदनुजोक्त, आठवि तें.
मसणाप्रति सल्लंघन सकुला हि, महाबळा हि, पाठवितें. ८८
रावणि धैर्य तया दे, गगनांत शिरोनि शस्त्रवृष्टि करी,
मति मोहीं सर्वांची बुडवी; प्रभु ही दशा तसी च वरी. ८९
राजीवभवसुताची हृदयांत धरुनि यशःप्रदा वाणी,
मरुदात्मज ओषधिनगशृंग, पुरहराद्रिनिकटगत, आणी. ९०
राहे न शल्यमोह क्षत तद्गंधानिळें कपिबळांत.

मनुजतनु सानुज प्रभुसह उठले सर्व ही भट पळांत. ९१
रावणसुत मायावी सीता मायामयी रची, मारी;
मग्न करि महाशोकीं; साधु बिभीषण तया भ्रमा वारी. ९२
रावणि बिभीषणानें, युक्ति कथुनि लक्ष्मणासि, मारविला.
मह मघव्याला थोडा दे विजय सुरांत फार हा राविला. ९३
रावण शोकें खवळे; धवळेतरभा[1] धरूनि करवाळा
महिज्यामथना धांवे; वारी त्या बुध सुपार्श्व अरवाळा[2]. ९४
राक्षस बळ चतुरंग प्रभुवरि मथनार्थ पाठवी रागें.
मधुभित्पवना[3] त्यांतुनि एकें हि दिली न पाठ वीरागें[4]. ९५
'राख प्रभुशरदहनें केलें बळतृण,' असें हि परिसून,
मदिरांध, दुरभिमानी, सोडी अजसूनुची न परि सून. ९६
रांट[5] क्रोध धरि, निघे, न गणुनि उत्पात, अपशकुन, भारी.
मरुसख व्हाया, वाली गांठि प्रभुसीं, सुकंठबळ मारी. ९७
राळ करी सर्वांची, सौमित्रिस शक्तिनें विकळ पाडी;
मर्मीं खरविशिखांहीं त्यातें, प्रभु तो भ्रमे असें, ताडी. ९८
'राग' 'अनु'पूर्व भगवद्दास्यीं बहु ज्यासि, तो, महासुकृती,
मरुदात्मज उठवि पुन्हां, त्या चि उपायें, तया, महासु[6], कृती. ९९
राईचा गिरि, गिरिची राई करि, त्या दशास्य तो काय?
महिमा अरिस हि देतो ज्याच्या हृदयांत आपले पाय. १००
राजा गीर्वाणांचा रथ दे, त्यावरि बसे, करी समर;
मकर निवटिला जेणें, जो 'कासारीं' म्हणे करीस 'मर'. १०१
रात्रिदिवससप्तक रण अत्यद्भुत, ज्यांत शत शिरें तुटलीं.
मरण तरि अरि न पावे; पाहिलीं जैसीं तसीं नवीं फुटलीं. १०२
रांद्धांत[7] दशमुखाच्या अंताचा तें न होय कोणा ही.

---

१. काळवंडलेला रावण. २. दांडग्याला. ३. रामरूप वायूस. ४. वीररूप पर्वतानें. ५. राजा. ६. महाबळ सदोत्सव प्राण इति वा–पंत. ७. सिद्धान्त.

मरणभयप्रद झाला, जेंवि दुखविला स्वगेहकोणाही[1]. १०३
राहे साधि प्रभु, तों, 'रविहृदय' अगस्त्य दे जपायास.
'मथिशिल अरिसि' रवि असें वदला, बहु न करितां जपायास.
राक्षसवरा वधि प्रभु वरविध्यस्त्राभिमंत्रितें बाणें;
महिला लोकेशांच्या वाटिति तेव्हां महोत्सवीं वाणें. १०५
राशि स्वः[2]पुष्पांचे प्रभुवर सुर वर्षले, सरी घनसे.
महभर तो सुघन विपुळ, त्यांत पररसाशि लेश रीघ नसे. १०६
राक्षसवधाविजयातें गाती गंधर्व, नाचती देवी.
मध्य ब्रह्मांडाचा वाद्यस्तवरव न रिक्त तिळ ठेवी. १०७
रावणदाहादि सविधि करवूनि, पदीं बिभीषण स्थापी;
मग देवी दिव्य करी; सद्यश सत्यादिलोक हें व्यापी. १०८
राजा दशरथ भेटे; उठवी मृतऋ[3]क्षकपिबळें शक्र;
मन सुकवींचें मानी हें सद्यश अमृत, अमृत तें तक्र. १०९
राक्षसराज्याकरवीं सबळ सुगळ पूजवूनि, तत्साहित
महित विमान वारि, निघे राम, करायासि भरतवत्सहित. ११०
राजसुतेसि रणकथा कथुनि, प्रभु सेतु दाखवी, रमवी;
मधुरवचनें बिभीषणसुगळसमागम मना सुधा गमवी. १११
राजितकुसुमविमानीं विरहींचें वृत्त सर्व आयकवी.
'मधुपिककूजित तैसें प्रभुभाषण' हें म्हणेल काय कवी? ११२
'रा' मग, 'ता' आधीं, हें नाम जिचें, तीस घे; जग नयानें
मग्न सुखीं करिता प्रभु गोदेतें पावला गगनयानें. ११३
राजीवाक्ष विभु म्हणे, 'सादर गोदावरीतटीं वसलों
मं[4]दिराक्षि! तरि च सप्रियजन सुविमानीं कुबेरसा बसलों. ११४
राहु जसा चंद्रातें, मोह तसा ज्या क्षताकुळा कवळी
मत्तातमित्र, येथें सुगति वरुनि, सद्यशें कुळा धवळी. ११५

१. आपल्या घराच्या कोपऱ्यांत (सांधींत) राहणारा सर्प. २. येथें हरताळीनें वेसर्ग दिला आहे! ३. हस्तदोष—रक्ष. (?) ४. खंजरीटनयने!

राज्ञि! अगस्त्याश्रम हा, अत्र्याश्रम, चित्रकूट, नव लोकीं
महद सदा या गंगायमुना, हा श्रीप्रयाग अवलोकीं.' ११६

राहे प्रभु प्रयागीं नमुनि भरद्वाजमुनिस; 'तूर्ण पण
झाला सिद्ध,' म्हणे, 'बा! आशीर्वादें तुज्या चि पूर्ण पण.'[1] ११७

'रात्रि क्रमूनि येथें येइन, तूं कुशळ वद[2] गुहा[2], भरता,'
मरुदात्मजा असें प्रभु सांगे, परमस्वदास्यलाभरता. ११८

[3]राधींचा पिकपक्षिस्वन रसिकजनासि बहु; तयापरिस
मधुर मरुज्जरव[4] गुहा; मानी जीवातु[5] मूर्त या हरिस. ११९

रानट कपि, परि गुरुहुनि, चंद्राहुनि, अधिक वाटला भरता,
मलयानिलाहुनि श्रमहर, रघुपतिभजनवाटलाभरता.[6] १२०

राकारमण चकोरा, तैसा प्रभुवर तया गुहा होय.
मग दर्शन दे भरता, देतो घन चातका जसें तोय. १२१

राजित[7] होय न केवळ साकेत चि, बहु निवोनि, विश्व हि तें.
[8]घमघित धवळ सुयशें केलें ब्रह्मांडभांड[9] विश्वहितें. १२२

राज्याभिषेकविधि तो केला वरुनि प्रभूत्तमें धन्य.
मणगट धरुनि दवडिलें भवभय; राहेल कोणतें अन्य? १२३

राजे सुगळबिभीषणजनकादिक सर्व पूजिले सबळ.
मरुदात्मजा निजयशःश्रवणवर दिला, जसा सुधाकवळ. १२४

[10]राउत उच्चैःश्रुतिचा जो, त्याच्या सुगतितें जसा, अन्य
मनुजेंद्र श्रीराम प्रभुच्या पावे तसा न राजन्य. १२५

रास्नादिकषाय शमवि वातादिस, अमृतरस तुरवि शेष,
[11]मनुजप तसा प्रजाधिस राम असा स्तविति महिसुर विशेष. १२६

राज्य प्रभुचें प्रभुच्या राज्यापरि; मत्त लवण गंधर्व,
मथनीं त्यांच्या गमला शत्रुघ्न, तसा चि भरत ही, शर्व. १२७

---

१. रचनेच्या भरांत ही आर्या नामांकित करावयाची राहिली आहे. २.खोडलेला पाठ—**सांग जा.** ३.वैशाख—**पंत.** ४. मारुतीचा शब्द. ५. पृष्ठ ८७ टीप २ पहा. ६. गृह. ७. शोभायुक्त. ८. घमघमित. ९. ब्रह्मांडरूपी पात्र. १०. स्वार. ११. राजा.

राष्ट्र चि न, राम निववी, देवुनि धर्मार्थकाममोक्ष, मही.
मत अनुसरे प्रजांचें अक्षमसा, रामराज तो क्षम ही. १२८
राजा राम दयाघन, भक्तमयूरांसि हा अमृतवर्षं
मन निववुनि नाचवि, जें भवभान उरों न दे किमपि हर्षें. १२९
'नामांकरामायण' हें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. १३०

इति श्रीनामांकरामायणं संपूर्णं ।

# सद्गर्भरामायण



श्रीशे दशवदनदमना विधिनें संप्रार्थिला धरी नरता,
दशरथसुत होय, म्हणे, 'मच्चरितीं मुक्त मीं करीन रता.' १
गर्भवती कौसल्या देवी झाली, तिचा तनुज राम,
कैकेयीचा नंदन जो त्याचें भव्य भरत हें नाम. २
जन्मे प्रथम सुमित्रासुत लक्ष्मण रामनिष्ठ हा वीर,
दुसरा शत्रुघ्न भरतनिष्ठ सकळसद्गुणैकनिधि धीर. ३
वसुधासुरवर गाधिज राक्षसकृतविघ्न याग रक्षाया
ने रामलक्ष्मण सहित, दे विद्यास्त्रें स्वकार्यदक्षा या. ४
दमुनि पथीं गुरुवचनें अत्युग्रा ताटका करी ख्याती;
सिद्धाश्रमीं हि कीर्ति द्विज ठेवुनि पंचिका जितें गाती. ५
नक्तंचरबळमथनीं मारीचा बाणपवन शत गावें
उडवि, समुद्रीं पाडी, वांचे जन्हि पळ हि आयु न तगावें. ६
सवसिद्धिनें मुनि निवे, दे 'विजय सदा असो' असी आशी,
'बा! त्वद्रिपु सापराधा मारू चि, महाहिची जसी आशी.' ७

---

१. या रामायणांतील गीतींचीं आद्याक्षरें क्रमानें घेतली असतां एक नामावलि र होते, म्हणून यास 'सद्गर्भरामायण' असें नांव दिलें आहे. २. ऋग्वेदान्तर्गत य ब्राह्मणांतील प्रत्येक पांच अध्यायांच्या समुदायाला 'पंचिका' असें म्हणतात. सर्पांचा सुळा दांत किंवा विष.

रघुपति विनवी, मुनि ने दावाया श्रीपुरारिचापातें;
प्रभु चरणरजें उडवी गौतममुनिदारपापशापातें. ८
स्वप्रियतमा क्षितिसुता सीता त्र्यंबकधनुष्य ओढून
मोडून प्रभुवर्यें वरिली आर्धी सुकीर्ति जोडून. ९
'तीच्या स्वसा तिघी त्या द्याव्या रामानुजां तिघांसि' नृपा
कथुनि असें मुनि गेला, बहु आश्रमपक्षिमृगकुळीं हि कृपा. १०
कुशळ सचिव पाठवुनि श्रीदशरथ सगुरु ससुत साप्त पुरा
प्रार्थुनि आणविला त्या जनकें, उप[1]यम अविघ्न होय पुरा. ११
लक्ष्मणकरीं जनक दे निजकन्या ऊर्मिळा, दुजीवाणी
धरि भरत मांडवीचा श्रुतकीर्तीचा अरिघ्न ही पाणी. १२
दे बहु रथगजवाजीमणिकांचनराशि, बहु अळंकारी
द्विजपौरसैनिकांतें तो सद्विद्वान्मनःकळंकारी. १३
वरुनि वधू अनुरूपा दशरथ परते, पथांत तों दापी,
गुरुवरकार्मुकभंगें क्षोभे, जो क्षत्रगर्भ ही कापी. १४
मायामानुषविग्रह नारायण चुकविता करी[2]शांत
नारायणचाप करुनि सज्ज तया भार्गवा करी शांत. १५
तात दशरथ प्रमुदितहृदय करुनि निजपुरासि ये राम,
सामर्थ्य प्रकटुनियां स्वजनांचे पुरवि सर्व ही काम. १६
पिकसे कवियश गाती, पिकला माकंदसा चि हा राम,
हारामध्यें मणिसा, स्वाश्रितहित[3]कल्पभूरुहाराम. १७
ताताज्ञा घेउनि ने मातुळ नगरासि सानुजा भरता;
युवराज करूं पाहे राजा रामा श्रितेष्टदानरता. १८
विधिमुखसुरदूषितमति सैरं[4]ध्री मंथरा करी भेद
कैकेयीच्या मतिचा; ती देती जाहली नृपा खेद. १९
'द्या वर' म्हणे 'दिले ते संरक्षुनि सत्य, सद्यशें साजा;

---

१. विवाह. २. गजेन्द्रान्त. ३. कल्पवृक्षांचें उपवन च असा. ४. अंतःपुरदासी.

मन्वब्द वनांत वसो राम, असो भरत या पुरीं राजा.' २०
प्रबळ स्त्रीहठ, राजा सत्यव्रत कोंडला, असें कळतां;
वनवास वरी प्रभु, यश गुरुधर्माच्या अरक्षणें मळतां. २१
दयितालक्ष्मणसहित स्वीकारी रामभद्र वनवासा,
सानुज जननीदत्तें वल्कें नेसे[1] अखिन्न न[1] नवासा. २२
गुणरत्नाकरपुत्रस्नेहें भ्याला अतिस्थविर हा, तें
दुःख न वदवे; जोडा न दिसे त्याच्या मतिस्थविरहातें. २३
रुचिर सुकुमार वंदुनि निघतां चि तिघें मुलें रडे राय;
'हाय![2]' प्रजा म्हणे हो! माता सर्वा न एक ती माय[2]. २४
सांवरुनि देह धैर्यें भूप म्हणे, 'रे सुमंत्र! न विपत्ती
पुत्रांची[3] मज सोसे, वरि तेजोहानि नित्य नवि पत्ती[4]. २५
बसिव रथीं बा! माज्या, जा; वनवासोचिता न परि सून
जाती पतिभक्ता; मज मैथिल मानील मूढ परिसून.' २६
विनवुनि सुमंत्र बसवी राजरथीं त्यां तिघांजणां सचिव;
कैकेयीस म्हणे, 'गे! राज्य न हें गरल, पचविसी पचिव.' २७
धिक्कारुनि तीस निघे महिषीचें[5] सेवटीं वरी शरण[6];
झाले गुहा पहातां त्या प्रभुचे सुखद दुःखद हि चरण. २८
'नाथाजवळ वस, करीं, जेणें प्रभुचें न धैर्य भंगे, तें;'
ऐसें सांगुनि सचिवा तरिनें[7] उतरोन जाय गंगेतें. २९
रचुनि भरद्वाजातें अंजलि, घेवूनियां तदाशीतें,
करि उटज चित्रकूटीं, हर्षे वनदर्शनें सदाशीतें. ३०
दर्शन सूत प्रभुचें घे, सांगे, 'वटपयें जटा रचिती
प्रभुसुत' ऐसी वार्ता तद्धृयीं लागली कटार चि ती. ३१
प्राणांतें 'राम!' असें म्हणुनि कथुनि शापताप तो सोडी;

---

१. मूळचा च. २. हो! प्रजा [आणि] सर्वा माता 'हाय!' म्हणे [फक्त] एक ती माय (कैकेयी) न म्हणे. ३. हस्तदोष–**पुत्रांचीं**. ४. पादचारी मनुष्य. ५. कौसल्येचें. ६. मंदिर. ७. हस्तदोष–**तरिने**.

गोडी या मरणीं बहु, जी भासे हानि निपट ती थोडी. ३२
चेलें[1] मलिन जीर्ण तसें देह त्यागी विटोनि नरवर हा;
'हा[2]!' एकीच्या चि म्हणे 'रिक्त' मुखा तदितरासि न रव 'रहा[2].'
तत्तनु तैलीं स्थापुनि आणविला भरत तो तिला गांजी;
कांजी घे त्यजुनि सुधा ती रसिकानादृता नव्हे कां जी!? ३४
सत्य स्वाग्रजभक्ता भरता जाणे वियोगभीरु, सती
कौसल्या समजावी; नसती सद्बुद्धि कां न ती रुसती? ३५
सविधि पित्याचें उत्तरकार्य करुनि सूक्ति नायके गुरुची,
राज्य त्यजि, भरत निघे; रामपदाब्जीं च साधुची सुरुची. ३६
दावी गुहासि शुचिता साधु भरद्वाजमुनिस ही भरत
गंगायमुना उतरुनि जाय प्रभुनिकट तत्पदें स्मरत. ३७
शिशु मातेसि तसा तो प्रेमें रामासि चित्रकूटनगीं
भेटे, दुःखवियोगीं, योगीं सुख ही तसें न माय जगीं. ३८
'वचन पित्याचें सत्यच्युत न करावें' असें वदे राम,
फिरवि प्रजावना, दे भक्ता निजपादुका, करी काम. ३९
नंदिग्रामीं राहे भरत जटिल वल्कली, फळें भक्षी,
रक्षी प्रजांसि धर्में, श्रीराम तशा चि पादुका लक्षी. ४०
दवडी भरता देवुनि ताताला पिंडतोय तो, यश तें
दे गाया सुकवींच्या गातां संपूर्ण जें न होय शतें. ४१
नग तो मग सोडूनि प्रभुवर अत्र्याश्रमा स्वयें गेला;
मुनिनें अनसूयेनें प्रेमें सत्कार बहु बरा केला. ४२
जनकात्मजेसि दंडकगहनीं जो आपणासि ही कवळी
त्या उद्धरुनि विराधा प्रभुवर्य यशें जगत्त्रया धवळी. ४३
यमनियमनिरत तापस शरभंगप्रभृति सर्व धन्य करी,
शशहरिणवृकव्याघ्रश्वापदखगनगभुजंगवन्यकरी. ४४

---

१. वस्त्र. २. 'हा'! ('हाय!') हा रव एकीच्या चि मुखा 'रिक्त रहा' तदितरासि न.

देउनि घटजा दर्शन तातप्रियसखजटायुतें निववी,
गोदातट पंचवटी वसवी, यच्चरणरज महा शिव वी. ४५
वसतां लक्ष्मणरचितीं उटजीं दशवदनकदनकामानें
दंडविली शूर्पणखा दुर्मति कलिसंभवार्थ रामानें. ४६
[2]सानीक खर निशाचर तद्भ्राता तो मदांध ये कळहा,
खळहानिकर वधी त्या, शून्य जनस्थान कारि महाबळ हा. ४७
ग्रह[3]राजान्वयतिलक श्रीराम विजय रणीं असा साधी,
देवर्षींस म्हणे, 'न च यावारि कोणी तुम्हीं असा साधी.' ४८
जाल[4]म दशमुख प्रभुच्या दयितेतें कपटकनकमृग दावी,
भावी ती सत्य तया, त्यामागें पति धरावया लावी. ४९
नुरवाया त्या दुष्टा शर मर्मीं प्रभु तयाचिया हाणी,
'हा सीते! हा लक्ष्मण!' असि तो अत्यार्त ही वदे वाणी. ५०
जनकसुता 'सौमित्रे! धांव' म्हणे, हानि कळवि रामाची;
सौमित्रि वदे, 'वाणी रात्रिचराची, न खळविरामाची.' ५१
भ्रातिश्रीहर भरत, स्त्रीहर तूं स्वामिघातकाम; महा-
पुरुषोचित देह तुला लावूं देईल हात कां मम हा?' ५२
नमुनि तिला साश्रु निघे लक्ष्मण, तो प्रतिपदीं म्हणे 'हाय!'
सोडुनि रक्षण न क्षण राहे, निजपूर्वजाकडे जाय. ५३
देवी दलशालेच्या द्वारीं दूरूनि देखतां दापी
जो पाविपाणिस पलभुक्पति पृथ्वीपुत्रिका पळवि पापी. ५४
वडिल श्वशुर तसा तो गृध्रेंद्र जटायु वायुवेग पळे
विरथ करि, सून सोडवि, परि केला छिन्नपक्ष साधु खळें. ५५
एवं कपटें हरुनि श्रीतें लंकेंत ने, अशोकवनीं
रोधी तो धीमंद, ध्यावी पूजार्थ जी अजें भवनीं. ५६
कोप सतीचा गहनीं कळवी सौमित्रि साश्रु आर्यातें.
'हा!' म्हणसा प्रभु म्हणे सिद्ध करायासि देवकार्यातें. ५७

. भांडण उपस्थित होण्यासाठीं. २. सैन्यासह. ३. सूर्यकुलतिलक. ४. घातकी.

पंचवटींत स्वोटज शून्य विलोकुनि करी विलाप हरी,
मूर्च्छित जटायुचें शिर अंकीं प्रभु पुत्रसा वनांत धरी. ५८
'तव दयिता दशकंठें नेली' हें कथुनि, उष्ण निश्वास
देह हि सोडी, सुयशें धवळी यतिगीतमृत्यु[1] विश्वास. ५९
रामप्रभु ताताची तसि गृध्राची क्रिया करी आंगें;
न्याया सुगतिस भगवत्प्रेम क्षम, अन्यपुण्य तें पांगें. ६०
मग हि हुडकितां दोघांप्रति योजनभुज कबंध धरि खाया,
तारी[2] त्या हि दयानिधि जाणुनि निजरीति विश्व हारिखाया. ६१
दास्य मतंगमुनींचें, स्मरणीं ध्यानीं हि मन सदा जडलें,
त्या शबरीस हि मोक्षप्रदपददर्शन निजोटजीं घडलें. ६२
सप्रेम सकृत्पूजा[3] कारि, शिखिकुंडीं शिरे, वरविमाना
वारि दिव्याकृति, वदल्या देवी, 'सखिहो! इला बरवि माना.' ६३
दाखवि निजपदपूजनफळ करुणासिंधु देव शबरीतें,
मलिनमतितें हि देतें सुख तें जें काय हें यश बरीतें? ६४
सोडी त्या भिल्लीचें स्थान तदुद्धारकार्य संपे तें;
प्रभुवर कबंधशबरीकथित पथ धरूनि जाय पंपेतें. ६५
पंपातटीं प्रियेतें स्मरुनि प्रभु विकळ होय, 'हा! हा! तें
जीवन नसे' म्हणे 'बा! देवूं देहास तोय हा हातें.' ६६
तरुणजलधरश्यामा रामा सौमित्रि धैर्य दे, 'वधुनी
द्वेषी, प्रिया पहासिल; होइल तवकीर्ति जेंवि देवधुनी.' ६७
वायुसुत हनूमान् द्विजरूपें भेटोनि पुसुनि वृत्त नगीं
नेवूनि ऋष्यमूकीं भेटवि सुगळासि, कारि सुधन्य जगीं. ६८
महिजनिचे नग दावी सुगळ सखा, भरवसा प्रभुस दे हा,
बंधुकृत स्त्रीहरणस्ववधोद्यम कथुनि तद्बळें[5] वदे 'हा!' ६९

---

१. यतींनीं गाण्याजोगा मृत्यु ज्याचा तो जटायु. २. परलिखित हस्तदोष—**तारि.** **येथें** अमदीं आरंभीं 'री' दीर्घ आहे; पण नजरचुकीनें पुन्हां हरताळून ह्रस्व **केलेली** दिसते! ३. एकवार. ४. लक्ष्मणा—**पंत.** ५. खोडलेला पाठ—**तद्बळादि हि.**

नररूप प्रभु 'आधीं करितों त्वत्कार्य, राज्यपद लाहें;'
सत्यप्रतिज्ञ करुणासिंधु सुकंठीं द्रवोनि वदला हें. ७०
स्वाश्रितहित विभु निजभुजशक्तिप्रत्यय तया तपनतनया
दावुनि एकें चि शरें मारी शक्रात्मजा कृतात्यनया. ७१
मीनांसि सर तसें दे कपिराज्य तया सख्यासि तज्जाया
गेयगुणा तारा ही दे प्रभु, सुयशीं कवींस मज्जाया. ७२
केवळदयिताविरहव्याकुळविभुचें करावया कार्य
पाठविले सर्वत्र श्री शोधाया कपी कृती आर्य. ७३
शतयोजन मकरालय लंघुनि हनुमान् त्यजूनि शंकेला
गेला संपातीनें कथितां देवीप्रवृत्ति लंकेला. ७४
वसुधासुतेसि पाहे लंका शोधूनि तो अशोकवनीं,
त्या दृष्टीं[१] दशकंठीं क्षोभे, गोभक्त तो जसा यवनीं. ७५
जनकसुतेला मुद्रा दे, सांगे कुशळवृत्त एकांतीं;
जाळुनि लंकेचें ये, श्रीच्या पद उत्सवासि दे कांतीं. ७६
यश बहुत चि दे कपिला, आलिंगी, स्तवन ही करी शत, तें
वाटे तसें चि अवनीं यांचें* प्रेमें जसें करीश ततें. ७७
राक्षसमथनार्थ निघे घेउनि देवांशकपिचमूकोटी;
ये शरण बिभीषण जो, श्रीश तयावरि करी दया मोटी. ७८
मनुज गणूनि विनवितां सिंधु न भेटे, न मार्ग दे, वातें
अग्न्यस्त्राच्या तापवि, भेटुनि कथि सेतुयुक्ति देवातें. ७९
वितत[२] नळप्लवगकरें सेतुपथ प्रभु नदीधवीं[३] करवी,
उतरे पारीं, अतुळस्वबळरवें कंप दिग्गजां धरवी. ८०
ठोकी सुगळ दशमुखा प्रथम चि रोधूनि दुर्ग, ताप सदा
द्याया प्रभु प्रवर्तवि बळ जैसें कर्म दुर्गतापसदा,[४] ८१
बालिश दशमुख न वळे, प्रभुदूता अंगदासि तो धरवी.

१. पाहिलेल्या. २. विस्तृत असा सेतुपथ. ३. समुद्रीं. ४. पीडित अधमाला.
* हस्तदोष—याचे.

काय करील गतायुस कुमतिस अंधास वैद्य बोध रवी? ८२
दारुण रण प्रवर्ते, क्षय पावति राक्षसप्लवग शूर,
नाचति कबंध बहुशत, रक्तांचे पूर वाहती दूर. ८३
मायावी घनरव करि अहिपाशांहीं प्रभूंसि बंधन हो!
तें हरि गरुड, म्हणे, 'रे मत्ता! डोळस असोनि अंध न हो.' ८४
जीमूतरवें[1] माया केली गेली वृथा म्हणोनि अरी
घटकर्ण विनिद्रें[2] महाकष्टें सेनायुतें खपोनि करी. ८५
तुमुळ समर करुनि धरी सुगळातें, तो विमोह होय, सुटे,
कर्णघ्राण च्छेदी, परते घटकर्ण जेंवि सिंधु फुटे. ८६
लक्षाधिक कपि वधिले, सगळे गिळितां हि भासला काळ;
त्यातें अवयव खंडुनि मारी श्रीराम वीरभूपाळ. ८७
सीमातिग[3] शोक शिरे रावणहृदयांत, दे तया धीर
हीर, क्रूरमना तो मायावी शक्राजित सजे वीर. ८८
दारुण रण आरंभी, गगनांत शिरोनि शस्त्रवृष्टि करी,
शल्यातें रामलक्ष्मण झाले ससुगळ तसे चि सर्व हरी. ८९
सहसा जांबवदुक्तें ओषध्यगशृंग पवनसुत आणी,
तदनिळ[4] विशल्य निर्व्रण करि सकळ, रमे सुधारसें न्हाणी. ९०
राक्षसकदन पुनरपि प्रभुच्या आज्ञेकरूनि हरि करिती;
घनरवकपटें झाली न कपिचमू निजचमू च बरिक रिती. ९१
मायामयी जनकजा वधिली त्या संगरांगणीं पुढें,
देवर्षींचीं तेव्हां 'हा! हा!' ऐसें चि बोलिलीं तुंडें. ९२
नंदन तपन पवन दशरथ यांचे सबळ बोलिले 'हाय!'
त्यातें बिभीषण म्हणे, 'माया हे; धैर्य सोडितां काय? ९३
दुर्भ्रमति[5] घनध्वान भ्रमवुनि सकळांसि होम करणार;
अग्निजरथावरि रणीं बसतां नाहीं कदापि मरणार.' ९४

---

१. मेघनादानें. २. जागृत. ३. अमर्याद. ४. त्याचा वारा. ५. अल्पमति. ६. हस्तदोष–नाही.

कळवुनि असें बिभीषण मारवि लक्ष्मणकरें तया अरितें,
हरि तें पाहोनि [1]निवे; परमरण ज्ञानेंसें सुखी करितें. ९५
'बीज महानर्थाचें' सीतेसि म्हणे, न आपल्या मतिस;
सुतशोकीं खळ असि घे, नति सचिव करूनि दे वधूं न तिस. ९६
रजनीचर बहु कोटि प्रेषी, द्वेषी 'वधा' म्हणे 'अरितें';
सुरदुःसह बळ रामें दों चि मुहूर्तांत मारिलें परि तें. ९७
पी घटजाचें जैसें जलनिधितें, तेंवि खळविरामाचें
शत्रुबळसमूहातें तेज; हरसमत्व कळवि रामाचें. ९८
पावे बंधुसुतसचिवमित्राप्तानीकसंक्षयें ताप;
पाप प्रभुसि वधाया धांवे तो जेंवि दुखविला साप. ९९
जी रोधी कपिसेना तीतें दशमुख रणांगणीं खपवी,
लपवी कपिबळ तेजा, कीं पावे यापुढें जया न पवी. १००
न गणुनि सुगळप्रमुखां सौमित्रिस शक्तिनें उरीं ताडी,
पाडी मोहीं[*] प्रभु ही भंगुनि देवारिच्या मदा झाडी. १०१
रघुपतिसहाय मारुति पुनरपि गति धरुनि सत्वरा शिखरा
श्रीकैलासाजवळुनि आणी तत्काळ; सत्वराशि खरा. १०२
सिंपुनि अमृतरस जसा मृत उठवावा तसा चि तो सुरसा
पावुनि महौषधीच्या उठला सौमित्रि सुरसा सुरसा. १०३
हठिवरकंठीरवसा[2] पत्ति प्रभु जो रणांगणीं टिकला
खरशरकरें[3] पुसायास्तव जी मंदोदरी तिचा टिकला[4]. १०४
मत्ता दशकंठासीं प्रभु शक्ररथीं चढोनि युद्ध करी,
तो देखिला सुरानीं तैसा, जैसा मृगेंद्ररुद्ध करी. १०५
हरिलीं शत, तरि अरिचीं झालीं न शिरें तुटोनि दश नाहीं;
अस्त्रविपर्यय[5] मानी प्रभु, चाविति कीश अधर दशनाहीं[6]. १०६
तापसपति कुंभोद्भव उपदेशी 'द्युमणिहृदय' रामाला,

१. परलिखित हस्तदोष—**निवें**. २. अतिशय हट्टी सिंहाप्रमाणें. ३. तीक्ष्ण बाणाकरवीं. ४. सौभाग्यतिलक (रावण). ५. अस्त्रविपर्यास. ६. दातानीं. * ह. दो.—**मोही.**

जपसुप्रसन्न रवि दे विजयप्रद सुवर सत्यकामाला. १०७
माहात्म्य अरिस दे, कां देइल न सुरद्विजांस मानद हा?
न पहाति ब्रह्मांडीं ज्ञाते कोणी हि यासमान दहा. १०८
धर्मन्याय न लंघुनि, सप्त अहोरात्र रण करूनि, मग
ब्रह्मास्त्रें दशकंधर वधिला, केलें प्रहृष्ट सर्व जग. १०९
वसुरुद्रादित्यविधिश्रीकंठप्रमुख देव विप्र भया
त्यजुनि निवाले, होती जे सर्पादि स्मरोनि विप्रभ या. ११०
दाशरथिप्रभुचा स्तव करिति करुनि पुष्पवृष्टि, सुरसहित
गाती गंधर्व यश; त्रिदशांला होय हा चि सुरस हित. १११
सप्रेम नृत्य करिती रंभादिवराप्सरा. तदा सजुनीं
हें चि नवें अत्यद्भुत यश गाती, प्रभुपुढें न दास जुनीं. ११२
नाना वाद्यें दुंदुभिमुख्यें तेव्हां नभांत वाजविलीं,
उत्सवशतें बहुविधें बहु या परमोत्सवें चि लाजविलीं. ११३
मथुनि पवित्रशरास्त्रें प्रभुनें दिधली दशानना शुचिता,
सुचिता बिभीषणकरें करवुनि विधिनें क्रिया हि जी उचिता. ११४
देववि देव विधि विहित करवुनि अनुजासि कथुनि ती परमा
सरमापतिला लंका श्री सोडाया म्हणे कधीं नर मा[१]. ११५
वह्नीच्या कुंडांत प्रभुमत समजुनि शिरे अनादि सती;
झाली सरस्वतीच्या डोहीं नलिनी तसी जना दिसती. ११६
तुच्छत्व[२] ज्वलनाच्या तेजा तेजोलवें तिच्या आलें,
श्रीतें त्या श्रीशातें बहुसुरमुनिवृंद वर्णिते झाले. ११७
कोविद कोमळहृदय हि, दिव्य जगत्प्रत्ययार्थ तें करवी;
'विष्णो! श्री घे अंकीं' हरविधि वदले; वदेल कां न रवी?' ११८
बाप दशरथ स्वर्गाहूनि विमानीं बसोनि ये, अजि! तें
तद्दर्शन अमृताचें वर्ष परमसुखद मानिलें अजितें. ११९
अमरेंद्र अमृतवर्षें उठवी रणनिहतकीशभटकोटी;

---

१. पदच्छेद व अन्वयार्थ? २. पृष्ठ २३ टीप ५ पहा.

साधु बिभीषण पूजा त्यां सेशांची स्तवूनि करि मोटी. १२०
नंदिरथसखांचा[1] दे वंदुनि पुष्पक विमान पुरगमना,
प्रभुच्या येता हरिचा रथ हि न उच्चैःश्रवा हि तुरग मना. १२१
तोषें प्रभुस बिभीषण ससुगळ सानुज सदार वरयानीं
बसुनि निघे, होय मुदित गरुडाच्या जो सदा रवरयांनीं.[2] १२२
पाहुनि महारणस्थळ सेतु महापथ हि सागरीं देवी
अत्युद्धुतप्रतापें प्रभुच्या रोमांच[3]कंचुका सेवी. १२३
ध्यानीं प्रभुच्या जैसें तैसें चि विमान तें नभीं चाले,
श्रीकर्णं प्रभुकथित स्ववियोगक्लेश ऐकतां धाले. १२४
यक्षेंद्रविमान स्थिर किष्किंधा श्रीस दावितां झालें;
सुगळकळत्र बहातां भेटाया तूर्ण पुष्पकीं[4] आलें. १२५
मीनध्वज[5]शरपीडा पंपा[6] दावुनि सतीस विभु कळवी;
शबरीकबंधवृत्तें श्रीमुख तत्काळ विकसवी मळवी. १२६
'रांजि[7] श्रितभाग्याची ती हे गोदावरी' असें दावी;
'भवकूपपतितजनता ईच्या चि गुणें[*] परें न सैदावी. १२७
बालिश दशकंठ तव श्वशुराचे पक्ष या स्थळीं तोडी,'
ऐसें कथितां ती श्री कर जोडी, अश्रुबिंदु ही सोडी. १२८
ईश्वर जेंवि[8] उमेसीं सीतेसीं तेंवि[8] रामभद्र वदे,
तो श्रीस जसा विधु विधुकांतशिळेला[9] दुजीस न द्रव दे. १२९
रोषें सिंधु प्रांशी[10] जो मुनि दावी तदाश्रमा, अन्या
अत्र्यादिमहर्षींच्या, नाम जया 'चित्रकूट' त्या धन्या. १३०
हित करिती विश्वाचें, देती बहु सुकृतकनक ज्या माता,
त्या श्रीगंगायमुना दावी दयितेसि जनकजामाता.[11] १३१

---

१. नंदिरथो हरस्तस्य सखा कुवेरः—**पंत**. २. रयरवानीं=वेगध्वनीनीं. ३. रोमांचरूप वस्त्राला. ४. हस्तदोष—**पुष्पकी**. ५. कामशरपीडा. ६. हस्तदोष—**पंप**. ७. पंक्ति. ८. हस्तदोष—**जेवि तेवि**. ९. चंद्रकांतमण्याला. १०. हस्तदोष—**प्रासी**. ११. श्रीराम. * दोरीनें.

दाशरथि भरद्वाजा वंदी सीता हि सविनय ज्ञात्या;
या प्रभुचरिता जैसे गाति श्रेष्ठा हि कवि न यज्ञा त्या. १३२
सत्वर नाथनिदेशें जाय पुढें पवनतनय, आर्धी तें
पहिलें तसें चि यश घे, गुहभरतांच्या हरूनि आर्धीतें. १३३
विप्रवरभरद्वाजा पुसुनि निघे, प्रथम निववि गुहदृष्टी;
प्रभु मग सानुज भरतासह न निजपुरी च, सर्व ही सृष्टी. १३४
सोमें चकोर मेघें चातकजन तेंवि निवविले रामें;
नामें प्रभुच्या केलीं कल्पतरूचीं हतप्रभें दामें. १३५
बाधा भवजा हरिली सर्वांची ही महादयानिधिनें,
स्वीकारिलें सुलग्नीं सिंहासन कुळगुरूदितें[1] विधिनें. १३६
खेद द्विजांसि जो दे, शत्रुघ्नें तो हि मारिला लवण;
वांचेल अनय करुनि प्रभुवरराज्यांत दुष्टधी कवण? १३७
चलवृत्त[2] मत्त वधिले भरतें गंधर्व तीन कोटि पर्णे,
प्रभुतेज म्हणे धर्मा[3], 'दुष्टांचीं दाखवूं नको टिपणें.' १३८
रघुपति राज्य प्रेमें कारि एकादश सहस्त्र वत्सर हा;
वदले तयांत कामक्रोधांसह दंभलोभमत्सर 'हा!'. १३९
च्यांचण[4] हि रामराज्यामाजि पशूंस हि उपद्रव न करिती;
इतराची काय कथा? व्यालवृकव्याघ्र शांतिला वरिती! १४०
गमले रामप्रमुखां चवघांचे सुत तयां चि सम आठ.
पाठ न देते अरिला, श्रुतिशास्त्रें ज्यांसि सर्व ही पाठ. १४१
देवी जनापवादें प्रभुनें त्याजितां तपोवनीं राहे,
प्राचेतसाश्रमीं ती कांतध्यानामृतें तनू वाहे. १४२
वल्मीकजनि महामुनि सीतेच्या कुशलवाख्य तनयांतें
रावणवधप्रबंध स्वरचित पढवी सुसंमत नयांतें. १४३
भार्या श्री कनकमयी रचि, मेळवि मुनि समस्त विनयज्ञ,
प्रभु सव सकळ कारि, म्हणे देवर्षि, 'प्रभुसम स्तविन यज्ञ.' १४४

---

१. कुलगुरु वसिष्ठानीं सांगितलेल्या. २. चंचळवर्तनी. ३. यमधर्माला. ४. डांस.

नुतगुण सुत कुशलव हयमेधीं वाल्मीकिकृति मधुर गाती;
धाती सर्व श्रवणें, प्रभु हि म्हणे, 'गा चि'; कारि सुवश या ती. १४५
दारक सीतेचे हें समजे सर्वांसि[2]; मुनिमतें मग ती
पुनरपि दिव्य करवितां मंजूषा[1] आपली करी जगती. १४६
सर्व सुतांला राज्यें देवुनि जो वायुतनय शिष्टवर
प्रभु दे त्या 'जों यश तों श्रवण करित वांच' हा च इष्ट वर. १४७
अखिल कपि सुगळ पुरजन अनुज मनुजतनु जगन्निवास हरी,
प्रमुदितहृदय अभयवर देवुनि निजविरहभीरु सर्व करी. १४८
मृग जेंवि सुस्वरातें तेंवि प्रभुतें समस्त जन भुलले;
उलले असते हृदयीं अभयवरें करुनि पद्मसे फुलले. १४९
तनुज स्वस्वपुराप्रति धाडुनि झाडुनि[3] जनौघ घेऊन
सरयूप्रति जाय, बसवि सुविमानीं सर्व रूप देऊन. १५०
राजीवाक्ष प्रभु जे करिति स्वसुखामृतार्थ 'आ' स्थापी
ते संतानकलोकीं; या सुयशा सुकवि धरुनि आस्था पी. १५१
यश अमृतवर्ष, राम प्रभुवर घन, भव्यकाम, नाचवितो
भक्तमयूर बहुसुखें, पूर्ण करुनि नव्य कामना चवि तो. १५२
'सद्गर्भरामायण' हें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें. १

इति श्रीमद्रामनंदनमयूरविरचितं सद्गर्भरामायणं समाप्तं।

---

१. पेटी. २. सर्व. ३. या रामायणांत साधलेली नामावलि कवीनें लेखनविशेषानें स्पष्ट करून दाखविली नसतां हि, आमच्यासाठीं या रामायणाची नक्कल करीत असतां, आमचे मित्र कै० मोहनीराज बळवंत वेदमणी बी. ए. यानीं आपल्या सूक्ष्म दृष्टीनें जाणून आमच्या नजरेस आणिली, याबद्दल त्यांचे आभार मानिले पाहिजेत.

# शिवरामायण

(गीतिवृत्त)

श्रीकांत[1] कंजनाभब्रह्मादिसमस्तलोकपाळनुत,
वैकुंठ[2] होय दशसुखमथना दशरथनराधिराजसुत. १
कौसल्या प्रवरा[3] स्त्री, तीचा जो पुत्र विष्णु तो राम;
कैकेयी नरपतिची दयिता, तत्सुत, तया भरत नाम. २
सुगुण सुत सुमित्रेचे, लक्ष्मण शत्रुघ्न हीं तयां नावें,
सर्व मिळोनि प्रभुवर एक चि; यांचें चरित्र वानावें. ३
आधीं च शुद्ध यश घे मख रक्षुनि तोषवूनि गाधिसुता,
दोष हरुनि करि गौतमपत्नीतें प्रभु सतीसहस्रनुता. ४
उत्सव जनकनृपा दे प्रभु कामारांतिचाप मोडूनीं,
पण पूर्ण करुनि मुनिस क्षितिस हि तदपत्यरत्न जोडूनीं. ५
दशरथ आणुनि दिधल्या तनया रामानुजां तिघां कनकें
मणिनिकरें समलंकृत करुनि सुविधिनें महोदयें जनकें. ६
येतां पुरा अमर्षी[4] भार्गव हरचापहानिनें क्षोभे,
दे त्रास दशरथातें; त्या जिंकुनि राम वरयशें शोभे. ७
साकेतीं नृप लावी पौरांला रामभद्रयश गाया,
झाल्या प्रजा समग्रा वृद्धनृपापरिस फार वशगा या. ८
सानुजभरता वत्सळ मातुळ घेवूनि निजपुरा गेला,
युवराज सुत करावा हर्षें भूपें विचार हा केला. ९
अभिषेकाच्या समयीं कैकेयी हठ धरूनि वर मागे,

१. या रामायणाच्या नांवाचें स्पष्टीकरण कवीनें च पुढें १०९ व्या गीतींत केलें आहे. यांतील शिवनामें 'शिवाष्टोत्तरशतनामावलीं'तील श्लोकांच्या क्रमानें साधिलीं आहेत. कवीनें प्रत्येक गीतींत साधलेलें शिवनाम जेथल्या तेथें हंसपद करून समासांत किंवा गीतीच्या आरंभीं संस्कृत रूपांत नमूद केलें आहे. २. विकुंठेचा पुत्र विष्णु. ३. ज्येष्ठा. ४ रागीट.

'मनु वर्षें वन रामा, राज्य सुता;' भूप विनवितां भागे. १०
रामप्रभु सानंदस्वांत जनकसत्यधर्म पाळाया,
दशवदना हि वधाया त्वरित निघे पुसुनि भूमिपाळा या. ११
पत्रिपति स्यंदन ज्या तो सीतालक्ष्मणासहित रानीं
जाय वसाया, न गणुनि सुख, वर्ताया असें च इतरानीं. १२
वल्कें, शंका न धरुनि, कैकेयी दे, तयांसि मान्य करी,
तातप्रियार्थ बैसे तातरथावरि मनुष्यरूप हरी. १३
असु जातां, दुःख तसें झालें पौरांसि, शोक तो भारी,
विसरति देहा गेहा साकेतीं नर जसे तशा नारी. १४
शिशु हि प्रभुवर जातां खेळवितां ही करूनि 'आ' रडती,
वदनीं दिलें हि थान न पीती, वत्स हि तसे चि आरडती. १५
विकळ सकळ पुर झालें, सुतविरहें भूप काळजीं उलला,
भुलला व्यवहार सकळ, आयुः[1]शेषें न तत्क्षणीं डुलला[2]. १६
प्रमुदित सुदुःखित हि करि भेटोनि सख्या गुहा निषादास,
भुजगवराच्या हि म्हणे प्रभुवल्कजताप तो विषा 'दास'. १७
'वृद्धा नृपा न सोडीं, तद्दास्य विशेष' हें कथी सूता,
रघुपति उतरे गंगा, अभयें निर्व्यथ करी गुहा पूता. १८
विनयें वेदज्ञोत्तम पूज्य भरद्वाज वंदिला आधीं,
तो मुनि म्हणे, 'प्रयागीं बा वत्सा! जय सुकीर्ति, जा, साधीं.' १९
प्रभु वसुनि चित्रकूटीं विज्वर[3] शमधन सहस्र राम करी,
मुनिवृंदा दूर सोडी, येतां हारि निकट जेंवि धाम[4] करी. २०
ऐके नृप सूतमुखें, 'वटतरुपय गुह जटार्थ दे हातें,'
शोकविशीर्ण[5]हृदय तो सोडी 'हा राम!' म्हणुनि देहातें. २१
मालवला शापमहावातें भूपप्रदीप, शोकतम

---

१. गरुड. २. त्या वेळीं मरण आलें तर बरें असें त्यास वाटलें असा भावार्थ. ३. दुःखरहित. ४. स्थान; तेज. ५. शोकानें फुटलें आहे हृदय ज्याचें असा दशरथ.

म्हणवि 'कटकंटा[1]!' क्षम हि श्रमले, मग सावधान तो कतम[2]? २२
'कालाविलें अमृतीं विष कैकेयीनें,' असें प्रजा वदली,
'हा! हा!' ऐशा हाका लक्ष; पुरी कांपली जसी कदली. २३
शतशा रडले यति ही, तें दुःख अगण्य; राजदूताहीं
आणुनि सानुज भरत द्रुत केलें राजकार्य पूताहीं. २४
झाला चंड[3] समजतां, क्षुद्रमतिस तो विशेष जाच करी,
खर शब्दबाण हाणी, 'पतिपुत्रघ्नी' म्हणे, न भीड धरी. २५
वपु राज्याचें विधिनें संस्कारी तदुचित क्रिया करुन,
राहे न पुरीं राज्यश्रीप्रीति मनांत भरत तो धरुन. २६
पक्वान्नपात्र जैसें विषामिश्रित तेंवि राज्यपद सोडी,
मोडी कुळगुरुवचन हि शीघ्रतर स्वाग्रजासि कर जोडी. २७
देवुनि पिंड पित्यातें राम वदे, 'तातधर्म रक्षावा,
वत्सा भरता! त्वां म्यां वेदसम चि गुरुनिदेश लक्षावा. २८
सरतां पण येइन मी, न समय लंघुनि कदापि राहेन.'
शिशुसा भरत वदे, 'दे, माथां श्रीपादुकांसि वाहेन.' २९
दे योगीशार्चितनिजपदपद्मस्पृष्ट[4] पादुका राम,
त्या माथां धरुनि निघे, नंदिग्रामीं करी भरत धाम. ३०
जटिल फलाशी वल्की उष्णीं वर्षीं हिमीं वसे भरत,
कृशविग्रह प्रभुपदें भद्रासननिहितपादुक[5] स्मरत. ३१
सर्म[6] हि खचर मर्दाया प्रभु सोडी चित्रकूट, भूजेतें
सांभाळित सानुज वे जावुनि अत्र्याश्रमांत पूजेतें. ३२
श्रेय करि विराधाचें राक्षसपण राम तत्क्षणीं उडवी,
जो हिंसानिष्ठ धरुनि सीतेचें चित्त कश्मळीं बुडवी. ३३
दंडकवनवासी जे भूसुर राक्षसभयें मनीं भग्न,

---

१. हाय हाय! २. कोणता. ३. संतप्त. ४. योगीशांनीं पूजिलेल्या आपल्या चरणकमलानें स्पृष्ट अशा (पादुका). ५. भद्रासनावर ठेवल्या आहेत रामपादुका ज्यानें. ६. सर्व.

ते शरभंगप्रमुख प्रभुनें केले महासुखीं मग्न. ३४
भवहर कठ्यर्चितपद विप्रप्रिय घटजमुनिस सद्मास
जाउनि सुखवि श्रीश, ग्रहपति उगवूनि जेंवि पद्मास. ३५
पक्षी गृध्र दशरथप्रियसख नामें जटायु सुखवी त्या,
मेघश्याम हि वारि तें, जें वश होउनि पुरांत सुख वीत्या. ३६
गोदावरी पहातां रमलें मन, राम तत्तटीं राहे,
पंचवटींत उटज करि, रघुनंदन न खरराक्षसा साहे. ३७
परिसुनि लावण्यगुण प्रभुचे, पूर्वज जिचा दशास्य, बरी
होउनि शूर्पणखा, ये मायेनें वर्ण वय हि रम्य धरी. ३८
पत्नी होवूं पाहे, दुभ्रमति प्रार्थना करी, निंदी
श्रीतें प्रबळें दर्पें, जसि खर्जूरीस निंदिता सिंदी. ३९
श्रीरामबंधु करि खरखङ्गें तत्कर्णनाशिकाछेद,
वेद जसा असदुक्तिस, दे तीस करूनि दुर्दशा खेद. ४०
तीचा मत्त भ्राता खर अहिसा क्षोभला कुधी अहित,
वधिला प्रभुनें समरीं सहज चतुर्दशसहस्त्रबळसहित. ४१
शंका न धरुनि सांगे शूर्पणखा रावणासि बुडवाया
स्त्रीरत्नहरण, मूढा मणिलोभें जेंवि भुजग तुडवाया. ४२
दुर्भगिनीचें कुमत स्वीकारी राक्षसेश तो कपटी.
मारीच्यासि कनकमृग करुनि बळें अंतकाननीं दपटी. ४३
दाटुनि गरळ गिळाया सांगे, तो जड गतायु मान्य करि.
श्रीच्या दृष्टीस पडे, शीघ्र पळे, नाशभय मनांत धरि. ४४
'कनकमृग धरा' म्हणतां, प्रभु हि धरुनि चाप लागला मागें;
जड पळुनि दूर गहनीं शिरतां, ताडी शरें तया रागें. ४५
अहित म्हणे 'हा सीते!' 'हा लक्ष्मण!' हाक तीस ती सीता
जनकसुता दयिताची मानुनि, उटजांत जाहली भीता. ४६
'भय किमपि श्रीरामप्रभुला नाहीं च, खचर मायावी,'

१. पिता जो दशरथ त्याला. २. वडील भाऊ.

वद्ला हें, 'कीनाशें हि दे[1]शा सति ! यास न चरमा[1] यावी.' ४७
ऐसें लक्ष्मण विनवी, सीता प्रकटूनि कोप, कटुकवचें
शस्त्रें हाणी, त्यांचें वारण जालें न स[2]त्त्वपटुकवचें. ४८
प्रभुला बहुदु:खाकुळ लक्ष्मण गेला स्वताप कळवाया,
तो अवसर सांपडला दशकंठा जानकीस पळवाया. ४९
तों क्षिप्र जटायु तया गांठी समरांत, तद्रथा मोडी;
वधिता चि, परि अधमें खड्गें तत्पक्षती कुधी तोडी. ५०
क्रीडामानुषरूप प्रभु गहनीं लक्ष्मणें नसुनि, खेद
कथितां, बहु 'हाय !' म्हणे, ज्याचे निश्वास सर्व हो वेद. ५१
पंचवटींत स्वोटज वरतनुविरहित विलोकितां 'हाय !'
प्रभुवर वद्ला, न धरी क्षण मोहनिमग्न आपुला काय. ५२
उदकें वातें शमवी लक्ष्मण सीतावियोगतापातें,
धैर्या[3] अवलंबा दे, हुडकाया जागवि प्रतापातें. ५३
वन शोधितां दिसे तो मूर्च्छित गंभीरसिंधुसा पक्षी,
विसरुनि विलाप पहिला[4], बहु दुसरा आदरी, न धृति रक्षी. ५४
शूरवरा तातसखा सावध वातें जळें करिति दोघे,
'नेली वधू दशास्यें' हें कथि, तनुला म्हणे, 'रहा[5] मोघे.' ५५
करि तत्क्रिया यथाविधि बापाची तसि च; 'कीर्ति हे आली
झाली गंगे ! तुज' असि सूक्ति महाकविशताननें आली. ५६
सुटला दुर्गतिपासुनि जो योजनबाहु घातकामुक तो
अत्युग्र कबंध गतिस खळ न भजुनि या अ[6]पातका मुकतो. ५७
जनिमृ[7]ति वारुनि गति दे शबरीतें पूजितां चि दे[8] बरवी,
यासम हा चि दयाकर पाहे आणिक जगीं असा न रवी. ५८
पंपेंत राजहंसांसह व[9]रटा कमळकाननीं पाहे,
त्यां 'धन्य' म्हणे, सीताविरहीं प्रभु कामज व्यथा वाहे. ५९

---

१. मरण. २. सत्त्वरूप उत्तम कवचानें. ३. आधार. ४. सीताविषयक. ५. मृत इति भाव:—**पंत** ६. अनघा—**पंत**. ७. जन्ममरण. ८. द्विरावृत्त पद ? ९. हंसी.

लक्ष्मण म्हणे, ‘ नरेशा ! सोडविशिल, अरिस वधुनि, ती आर्या;
सोडुनि विश्व न गेला तस्कर, बा ! सुकर समज या कार्या.’ ६०
अनिलात्मज मतिसागर आधीं भेटोनि होय वरदास,
मग रविसुत सुगळ सखा जोडुनि दे हा सदिष्ट[1]वरदास. ६१
स्वाश्रितसमी[2]हितप्रद मत्त महाबळ महेंद्रसुत वाळी
मारुनि, कपिराज्यपदीं स्थापुनि सुगळासि बंधुपरि पाळी. ६२
योगिध्येय प्रभु करि शिखरिगुहेमाजि वास घनकाळीं,
सुगळा ‘ हो धन्य ’ म्हणे, [3]धनतन्वाद्यधिक सत्य वच पाळी. ६३
[4]उष्णगुकिरण तसे ते कपिरूप सुरांश चहुंकडे लक्ष
प्रेरी, त्यांत मरुत्तनुजनु विभुचें कार्य करि महादक्ष. ६४
सांगे जटायुचा [5]गुरु संपाती शोध, मारुति क्षिप्र,
गोष्पद समुद्र शतयोजन करि, धांवे धना जसा विप्र. ६५
जगतीधर मैनाक प्रियकर जो प्रकटला तया न भजे,
सुर ‘ जय ’ वदति, पहाती सुरसाछळकुतुक वरुनियां नभ जे. ६६
समजे छायेसि धरुनि ओढी जी सिंहिका तिच्या वाता
उदरीं शिरोनि तोडी काळिज, वाता करी सुखी ताता. ६७
त्रिभुवनगीतबळ [6]जगत्प्राणसुत [7]नगारिनुतयशा शंका
त्यजि, भूषवी जग यशें देविसि[8] रण करुनि हुडकि मग लंका. ६८
श्री लंकेंत न दिसतां होय अतिव्यथितहृदय ता कीश,
पाहोनि अशोकवनीं निवुनि म्हणे, ‘ पावला त्रिलोकीश.’ ६९
तो सद्रिपु रावण ये, श्रीस म्हणे, ‘ आठवीं न रामातें,
हो महिषी, न वरिसि कां बहु मानुनि तापसा नरा मातें ?’ ७०
तो पापपुंज जडमति रीति विलंघुनि वदे महाकामी
राक्षस अप्रिय ऐसे, कपि हि म्हणे, “ म्हणतसे ‘ अहा !’ कां मी ?”
प्रभुदयिता त्यासि म्हणे, ‘ मरणप्रद कर्म वरिसि कां मत्ता !?

---

१. रामास. २. इष्ट. ३. धनदेहादिकाहून अधिक. ४. सूर्यकिरण. ५. वडील भाऊ. ६. वायुपुत्र. ७. शक्र—पंत. ८. हस्तदोष—देवीसीं.

या अपराधें बसतिल तुझिया माथां विपत्तिच्या लत्ता.' ७२
होउनि तो उन्मत्त क्रुद्ध वदे राक्षसींस, 'सांगा तें
जें हित, दों मासांवरि करिन इच्या प्रातराश[1] आंगातें. ७३
कमनीय वपु समर्पू, भोगाया भोगवर मला वश हो,
गौरव पावो, म्हणतों, मन्महिषीचें जगीं इचें यश हो.' ७४
ऐसें बोलुनि गेला सुरघातक पापनिष्ठ; देवीतें
कटु कथिति राक्षसी बहु, जें जाचिति गरळसें चि, सेवी तें. ७५
साहों न शके जाच क्षितिजा, उद्बंधनें मरायास
पाहे, तुटतां आशा, कष्टहरा स्मरुनि रामरायास. ७६
स्तवुनि प्रभुतें मारुति एकांतीं जानकीस दे मुद्रा,
परम धृति धरी, मानी पतिकुशळें तृण चि ती खळा क्षुद्रा. ७७
चूडामणि दे, सांगे प्रभुला संदेश, 'शत्रु हा निकर[2]
करितो, तीव्रतर सजो तुमचा कोदंड शत्रुहानिकर.' ७८
सुटला कपि वाततसा प्रखर, करी प्रथम वृक्षवर चूर,
राक्षसबळ फणिकुळ करि, आपण पक्षींद्र होय तो शूर. ७९
समरीं दशमुखपुत्रा अक्षा, वधितां सुरर्षि नृत्य करी,
दादुनि संक्रंदनजिद्ब्रह्मास्त्रा[3] सांपडे, न भीति धरी. ८०
कपि कवि कथि दशवदना, 'प्रभुला ये शरण, मरण चुकवील;
नाहीं तरि अपराध क्षय करिल, त्वन्मुखांसि सुकवील.' ८१
तो दुष्ट अंजनासुतवधकामें घे करीं कराल असी,
परि साधु बिभीषण दे स्मृति तूर्ण 'अवध्य दूत होय' असी. ८२
कामादि सा नटांचें जो अजिर[4] दशास्य तो तया तुच्छ
मानुनि वाततनूजा, पेटविता जाहला कुधी पुच्छ. ८३
सहसा वदोनि 'जयति श्रीराम' असें उडे, पुरी जाळी,
रडवी दशमुखदार हि, साधुबिभीषणगृहासि परिपाळी. ८४

---

१. न्हाहारी. २. अनर्थ. ३. इंद्रजिताच्या ब्रह्मास्त्राला. ४. आंगण.

निजचारितें रंजवि बहु जगदीशातें नमूनि, संदेश
श्रीचा कथूनि कळवी, 'केला पुरदाह, भग्न मंदेश[1].' ८५
दीर्घभुजाहीं प्रेमें आलिंगी पवननंदना राम;
बंदीसा कारि मधुर स्तवन श्रितसर्वनंदनाराम. ८६
प्रभु दशमुखक्षयार्थ त्रिदशांश प्रबळ ऋक्ष कपि कोटी
घेउनि निरहंकृति नततारक जलधीस भीति दे मोटी. ८७
विटुनि दुराग्रह धरित्या दशकंठावारि नमी महाभाग
साधु बिभीषण रामप्रभुस म्हणे, 'भागल्या न हा भाग[2].' ८८
वानील न कोण तया लोकत्रयहितकरास? जो नमनीं
लंका बिभीषणा दे, ज्याच्या नतसा दुजा भरे न मनीं. ८९
सेतु करवि शतयोजन, सबळ प्रभु सागरा सुखें उतरे,
व्यथित श्री करि त्या मथि, सुगळ म्हणे, 'कुशळ न, न मर्दे उत रे!'
साम न मानी, अंगदवध वांछी, धारिति कपि, वधी धरिते,
क्षीणायु कारि प्रभुसीं रण, वधिले वीर, जारि बळी तरि ते. ९१
कृत्रिमपटु[3] घनरव अहिपाशानीं प्रभुसि बद्ध करि, भग्ना
तीक्ष्णा ताता सुखवी, श्री पाहे, होय पळ तमोमग्ना. ९२
नेणें उपाय कोणी, गरुड हरि व्यसन नाग पळवूनि,
घटकर्णा उठवि बळें धाडी युद्धास ताप कळवूनि. ९३
उद्दामा त्या धरिला, सुगळ सुटुनि करि विरूप, खेदानें
तो सीमातिगबळ[4] कपि वधि, गिळि, चुरि नग हि शूळभेदानें. ९४
समरीं नितांतकठिना अवयव खंडूनि दाशरथि मारी,
गमलें बिभीषणवचन सत्य, खचरपति विलाप करि भारी. ९५
मायावी सप्रभु बळ शस्त्रघनें विद्ध विकळ सर्व करी,
वातात्मज ओषध्यगशिखरें क्षतशल्यमोहताप हरी. ९६
पिशुनशिरोमणि[5] ताता द्याया सुख संगरांगणीं सीता

---

१. मूर्खराज रावण. २. कष्टी होणें. ३. कपटपटु. ४. अमर्याद बळी. ५. दुष्ट.

मायामयी वधी, 'हा!' म्हणवी त्या ही महत्त्वभागीता. ९७
सबळप्रभुसि बिभीषण कपट असें कथुनि सावधान करी,
रवाणी लक्ष्मण शतमखहृच्छल्य, व्यथित होय फार अरी. ९८
भग्नमनोरथ दशमुख पुत्राची ऐकतां तसी वार्ता,
जाय वधाया खड्गी सीतेतें; प्रभुसि ती स्मरे आर्ता. ९९
सचिव परतवूं शकला त्या; प्रभुतेजें कसा वधिल तिस तो?
विभु निपट मानवापरि परदृष्टिस यश करावया दिसतो. १००
बळ भगवच्छरदहनीं हुत होतां, खळ निघे करूनि पण;
सौमित्रि पडे मूर्च्छित, कटक तुरे, करि असा महोग्र रण. १०१
वेगें मारुतनंदन घेउनि आला तसें चि तें शिखर;
लक्ष्मण उठे, प्रभु म्हणे त्या, 'स्वयश जगीं असा चि बा! विखर.'
विनवी मातलि, बैसे शक्ररथीं, द्यावया तया यश तें;
दशवदना सव्यथ करि तो खंडिलिया शिरांचिया न शतें. १०३
शिकवि 'रविहृदय' कुंभज, वरद दिवाकर म्हणे 'जयस्व'[1]; मग
ब्रह्मास्त्रें दशवदनक्षय करुनि करी जयें प्रहृष्ट जग. १०४
निवावि जग यशें, बरवी प्रभुवर दशकंधरक्रिया करवी;
मिरवी बिभीषण पदीं, त्याला लंका पवित्र[2]कथ निरवी. १०५
निरसी जनापवाद श्री दिव्यें, प्रभुसि मुदित करि तात;
वधिलीं बळें हरि[3] करिरिति[4] पंति[5], जळजें जेंवि उदित करितात. १०६
वरुनि वर विमान निघे, सद्यश जोडूनि ये पुरा, भरता
निववीं, राज्य करि अतुळ सुचिर, प्रभु उद्धरी प्रजा स्वरता. १०७
अनिळकुमारा परम स्वयशोमृतपान सुचिर वर दे हा,
नेल्या प्रजा विमानीं बसवुनि सुपदा करूनि वरदेहा. १०८
यांत श्रीशिवनामें अष्टोत्तरशत म्हणोनियां याचें
'शिवरामायण' ऐसें नाम शिवप्रद चि होय हें साचें. १०९

---

१. विजयी हो. २. राम. ३. इंद्रराम—**पंत**. ४. प्रफुल्ल—**पंत**. ५. चंद्रसूर्य उदय पावोन—**पंत**.

'शिवरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ११०

इति श्रीशिवरामायणं संपूर्णं ।

---

# सन्नामगर्भरामायण*

श्रीगंलविधिशक्राहीं नारायण रावणासि माराया
परम दयालु विनविला, अतितर गोविप्रताप वाराया. १
सरसिजनाभ समस्तस्वजनामरवृक्ष तीर्थपाद हरी
होवुनि पुत्र दशरथक्षितिपतिस जगत्रयांत धन्य करी. २
श्रीकौसल्याकुक्षिज लक्ष्मीपति 'राम' हें धरी नाम,
कैकेयीतनय भरत याचें दे मह धरावरा धाम. ३
गुणसिंधु सुमित्रेचे लक्ष्मण शत्रुघ्न पुत्र हे दोघे,
रुचिरूपसुधा यांच्या मुखचंद्रींची यथेष्ट नृप तो घे. ४
शिशु हि प्रगल्भजनमन मोहिति तत्काळ सुरुचिरें रूपें,
वचनें सुधाधिकरसें गुरुसचिवांसह निषेविलीं भूपें. ५
विमळद्युतिमतिरीतिस्थितिगतिहीं पुरजनांसि तापातें
धिक्कारुनि, सुख देती, जें त्यां मातांसि जें चि बापा तें. ६
नायक सद्विप्रांचा आचार्य वसिष्ठ धीरमणि वेद
शास्त्रें पढवी, करि ते स्वसम, न देतां न पावतां खेद; ७
प्रमुदित नृप होय, परि ऱ्हास वयाचा म्हणोनि दायाद
व्हाया सदार मन करि सुकलुष, चिंतानदींत हा याद. ८

---

*. या काव्यांतील प्रत्येक गीतीमध्यें साधुसंत, मुनि, देव, राजे, भक्त, कवि इत्यादिकांचीं नांवें योजिलीं आहेत म्हणून या काव्यास **'सन्नामगर्भरामायण'** असें अन्वर्थक नांव दिलें आहे. पहिली खेरीज करून प्रत्येक गीतीच्या आरंभीं तिच्यांतील साधित नाम मूळांत लिहिलें आहे. १. श्रीकंठ महादेव. २. सेवन केलीं. ३. प. लि. ह. दो. **वशिष्ठ.** ४. पुत्र. ५. अत्यंत अधीर असा भावार्थ.

तों गाधिज ये, भेटे नरपतिस, म्हणे, 'सलक्ष्मणा रामा
दे मन्मखनाशकखळखचरवधा, पुरिव शीघ्र या कामा.' ९
सुखपुंज पुत्र दे असुदानाहुनि जड पडे तथापि; कवी
रघुकुलरीति निरुपमा रसिकजनमनोहरा कथा पिकवी. १०
सप्रेम बळातिबळा विद्या अस्त्रें हि दे शत नतातें,
करि वात्सल्य मुनि जसें, केलें तैसें सुतावरि न तातें. ११
बहु दारुणा छळी जी विप्रांतें ताटका महाचंडी
तीतें स्वगुरुनिदेशें राम प्रभु मार्ग रोधितां खंडी. १२
व्याधि मुनींचा मुनिच्या लीळेनें खळवधें अनघ नाशी,
सवसिद्धिसुप्रसन्न प्रभुला देतो तपोधन घनाशी[1]. १३
अंह अहल्येचें तें बहु हि, रवि जसें तमिस्र, सर्व हरी,
ईषन्मात्र[2] हि कैसा राहों देईल हस्तिगर्व हरी? १४
शुद्धयशोनिधिमुनिनें नेला मिथिलेसि राम यज्ञास,
करि जनकास प्रमुदित भंगुनि हरधनु तया हितज्ञास. १५
बळ शौर्यनिधिस जनकक्षितिपति दे भूमिसंभवा कन्या,
मुन्युक्त भरतलक्ष्मणशत्रुघ्नांला[3] हि तो तिघी अन्या. १६
निजगुरुकार्मुकभंगें बहु कोपे क्षत्रियघ्न राम, परी
क्षिति कांपतां तयाच्या क्षोभा प्रभुबाहुतेज दूर करी. १७
निजपुर वृजिन[4]हरयशें रविकुलसत्तिलक राम हृष्ट करी,
कीं भार्गव होय विमद तेंवि निपट जेंवि सिंहदष्ट करी. १८
सुज्ञा नरपतिस पुसे श्याल युधाजित् तया शुभरतातें
दे, विरहा वचके परि, आज्ञा न्याया पुरासि भरतातें. १९
सोसे[5] कैकेयीस न, राजा दे यौवराज्य रामा, तें;
पाडी व्यसनीं पतिला, न वळे, 'दे वर' म्हणे 'दिले मातें.' २०
'क्रमु वन्यवृत्ति वल्की राम चतुर्दशमितें वनीं वर्षें,

---

१. दृढ आशीर्वाद. २. यत्किंचित्. ३. परालिखित हस्तदोष–**लत्रुघ्नाला.** ४. पातक. ५. परालिखित हस्तदोष–**सौसे.**

करु राज्य भरत, सत्या स्वोक्ता, बाधीं[1] न ईश्वरा हर्षें.' २१
सानुज सस्त्रीक निघे प्रभु, चांदाचा वियोग तापातें
जेंवि चकोरातें दे वन वारिल्या सूनुचा क्षमापातें. २२
भा भूपतिच्या देहीं पुत्रवियोगीं जुरे, म्हणे 'हाय!'
दाशरथि सत्यरक्षणकाम पितृरर्थी बसे, वना जाय. २३
लक्ष्मणसह वळुनि जटा, साचिवा सस्यंदना पुरा धाडी,
करुनि कपर्द[2]मुकुट, गुहमन शोकीं तरुनि सुरनदी पाडी. २४
एकांतवासरुचि शुचिशील भरद्वाज कोमलस्वांत,
त्या पंडिता प्रयागीं दे दर्शन पुत्रसा रमाकांत. २५
करि वास चित्रकूटीं, 'शिवें[3]' म्हणति महर्षिजन पहाते ज्या,
स्वाश्रितमुनिराक्षसभयघनपटलसमीर हा महातेजा. २६
नंदनवियोगशोकें श्री धरणी तनु हि सोडिली भूपें,
शोकार्त पुर न शोभे जेंवि मखायतन[4] भंगल्या यूपें[5]. २७
साकेतीं दूत कुशळ धाडूनि वसिष्ठ आणवी भरता,
तो गति जाणोनि म्हणे 'धिक्!' शतदा तीस, जी कुलोभरता.
अवनीशा संस्कारी, तदनंतर साश्र तो निघे, जाय,
साधु गुह भरद्वाजानुमतें स्वस्वामिचे नमी पाय. २९
तो कृपण[6] भरत सोडी दीर्घोष्ण श्वास साश्रु, तातगती
कळवी, दावी प्रभु ही सकळा जी पुत्र दाविती मग ती. ३०
जळ पिंड यथाविधि दे राज्याला प्रभु मनुष्यसा तर्पी,
'गुरुवाक्यधर्मपालन हित' हें सांगोनि पादुका अर्पी. ३१
आला परतुनि नंदिग्रामीं च वसे, क्षुधातृषा द्रवडी,
मूळफळें पूर्ति करी, राज्यांतिल घे न एक ही कवडी. ३२
बहु रंजवि प्रजा त्या, गतलोभ महामना पथ न सोडी.
प्रभुपादुकांसि कर तो स्थापुनि भद्रासनीं सदा जोडी. ३३

---

१. अन्वयार्थ? २. जटाजूटरूप मुगुट. ३. कल्याण असो. ४. यज्ञस्थान. ५. यज्ञस्तंभानें. ६. दीन.

दारानुजसहित प्रभु मग सोडुनि चित्रकूट जो अत्री
मुनिवर तदाश्रमाला जाय, जसा मानसा सरा पत्री[1]. ३४
अनसूया कष्ट वनीं न सिवाया श्रीस आपल्या हातें
दे निपुण अंगराग न जो व्हावा शुष्क आतपें वातें. ३५
राम विराधा उद्धरि वधुनि, रुचिर रूप गति हि दे कांहीं;
या प्रभुला जें अघटित तद्धटन अशक्य तों कधीं नाहीं. ३६
केवळ विरक्त जे शरभंगादि तपस्विवर्य ते रामें
स्वाश्रित कृतार्थ केले, मीन पयोदें, तसे घनश्यामें. ३७
जो प्राशी जलराशि द्विजवर कुंभज तदाश्रमीं गेला,
धनुरादि महाशस्त्रें देवुनि सत्कार पितृसमें केला. ३८
तातसखजटायुखगा पुत्र तसा राम रंजवि नयानें,
वंदी सादर विधिनें, ध्यावें यत्पादकंज विनयानें. ३९
गोदावरीतटीं प्रभु उटज करुनियां, वसोनि चिर धन्या
पंचवटी करि, हर्षे बहु माहेरीं तसी धराकन्या. ४०
दाखवि बहु सुंदरपण मायेनें जी रतिप्रिया चंडी
पंकमयी[2] शूर्पणखा लक्ष्मण तद्घ्राणकर्ण ही खंडी. ४१
राक्षस खर तद्भ्राता माराया सबळ ये, तया रुष्टा
दुष्टा श्रीरघुनंदन भस्म करी, होय शक्रधी तुष्टा. ४२
कनकमृगें श्रीचित्त भ्रमवी, सर्वस्वहानिबीज रची,
पति देवर दवडवि; हरि दशमुख सीतेसि; भी, निवे[3] हि शची. ४३
रोधी पथ, विरथ करी त्या अहिता दारुणा, महासमर
करि जो जटायु, अरि त्या पक्ष च्छेदुनि म्हणे सहास 'मर'. ४४
मत्त भुलून करि असें दारुण सर्वस्वहानिकर आग,
लंकेंत अशोकवनीं रोधी, हंसीप्रती जसा काग. ४५
लक्ष्मण साश्रु कथि वनीं हरिणाच्या गणुनि सत्य हाकेला,

---

१. पक्षी (हंस). २. पापी. ३. इन्द्राची भार्या प्रथम भ्याली व नंतर समाधान पावली.

आर्या दापी, पाजी पैरुषविष[1]; खळें अनर्थ हा केला. ४६
खेद धरी रघुनाथप्रभु जाय स्वोटजास, तें ओस
पाहे, बहु 'हाय!' वदे, अनुज म्हणे, 'बा बुधोत्तमा! सोस.' ४७
शोधी गहना, न करी प्रभु आळस, पाहिलें पुन्हां पाहे.
क्षण गमे, रडवि, रडे, शोक दुजा तातसखवधें वाहे. ४८
अर्पी जळा, समीरा, 'बा! ईषन्मात्र बोल, हा! काय
झालें? कोणें पापें हतकें[2] केला क्षतार्त हा काय?' ४९
कळवी दशमुखकर्मा, 'वाईट वधूपमर्दन,' स्वांतें[3],
ऐसें वदोनि सोडी रामांकीं देह तो शुचिस्वांतें[4]. ५०
करितां क्रिया न औरस पुत्र श्रीरामभद्र भासेना,
न्हावी[5] यशोमूर्ती या रसिकांची विष्णुवल्लभा सेना. ५१
परमाधमा कबंधा कवळ करायासि आपणा धरित्या
दारुण शाप निवारुनि सद्रूपज्ञानलोक दे हरि त्या. ५२
शबरीचें प्रेम अतुळ*, सीमा प्रभुच्या कृपेस ही नाहीं;
भावें वरप्रसादा व्हावें सत्पात्र जातिहीनाहीं. ५३
दे व्योमयान, सुरुचिर रूप सकळलेखपूज्यपद[6] दावी;
सद्यः स्वपूजनाचें फळ यश गाया असंख्य कवि लावी. ५४
पंपातीरीं रागी[7] विरही मदनक्षुरप्र[8]विद्धमना
तैसा होय व्याकुळ, वेडावी दूरदयितखिन्नजना. ५५
त्रिनयनविक्रममतितें[9] सुखवि द्विजवेषपवनसुतवाणी;
मग दोघे दाशरथी सुग्रीवाच्या समीप तो आणी. ५६
सख्य दिनकरसुतासीं करि करुणासिंधु हरि, निवे पूंषा[10],
कामहतापरि झाला तेणें श्रीची निवेदितां भूषा. ५७

---

१. दुरुक्तिविष. २. अधमानें. ३. स्वनाश—**पंत.** ४. चित्त—**पंत.** ५. कवीनें 'सेना न्हावी' असें संबंध नांव साधल्याचें न लिहितां 'सेना' असाच फक्त उल्लेख केला आहे. ६. सकळ देवास वंद्य ज्याचे चरण असा राम. ७. प्रेमासक्त. ८. कामशर. ९. शब्दार्थ? १०. सूर्य. * तुलसीदास—**पंत.**

केकी जैसा वळल्या अनुकूळा बारिका हि जीमूता
बहु मानी, सुगळ तसा सानुजरघुसत्तमा तथाभूता[१]. ५८
सुगळाचें दुःख श्रुत होतां, त्या अभय दे, वधी वाळी,
प्रभु कपिराज सुकंठा करि, तारापति हि आदरें पाळी. ५९
सुगळ प्रभुदारेतें शोधाया वीर मर्कट प्रेषी,
द्वेषिक्षपाचरवधा देव चि ते जाहले तथा वेषी. ६०
संपाती या नावें मतिमान् अग्रज जटायुचा शोध
सांगुनि दे उत्सव; जलनिधि लंघी वातभू महायोध. ६१
तों सुर सुरसेसि कथिति, ती हि करुनि हृदय तच्छळीं सक्त,
पसरी कपिला खाया मुख; बळिचें भवन तें गमे व्यक्त. ६२
जव करुनि सूक्ष्मवपु कपि सुरसावदनीं शिरे, निघे, सुकवी,
नीरनिधींत वधी जी छाया धरि सिंहिका तिला सुकवी. ६३
यंत्रोत्थितगोळेकसा[२] पारा पावे प्लवंगकुंजर हा,
लंकेस 'उगी च' म्हणे मूर्त प्रभुचा प्रभावपुंज 'रहा'. ६४
सांजे सूक्ष्म वपु करुनि वातात्मज तो पुरींत शोध करी;
मानी वधिली दुष्टें, अबळ गमे आधिनें बळी हि हरी. ६५
खेदी हि अशोकवनीं संचरतां विश्वनुतपदा देवी
पाहे बसोनि वृक्षीं, दर्शन तें स्तन्य बाळ तो सेवी. ६६
चिंती प्रभुतें च, सवड पाहे भेटावयास, कर जोडी,
तों दे रावण येउनि ताप दुरुक्तें कुधी करी खोडी. ६७
दाशरथिप्रभुदयिता परमोद्दामा तया महादरदा
दे परिभव धिक्कारें, तें श्रीयश मित्र करि गणेशरदा[३]. ६८
परतुनि तो लंकापति गेल्यावरि वायुसुत सुधी वाणी
लावि प्रभुस्तुतिस, दे मुद्रा, जोडी सतीपुढें पाणी. ६९
बोले सर्व कुशळ, दे निजचूडामणि धरासुता कपिला;

---

१. तशा स्थितींत असलेल्यास. २. तोफेंतून सुटलेल्या गोळ्याप्रमाणें. ३. गणपतीच्या दांताला सीतेच्या यशानें स्नेही मानिलें.

हा वत्स होय, पाजी संदेशस्तन्य ती महाकपिला. ७०
मारुति मग लोकेशद्वेष्ट्या दशकंधरा गजा मत्ता,
पंचास्यसा[1] चि कळवी प्रभुची जी संतता महासत्ता. ७१
सुरमुनि सुखवी, मोडी तरु, राक्षस उद्गतासु[2] करि लक्ष,
मारी लीलेनें त्या दशकंठाचा कुमार जो अक्ष. ७२
बहु मेघनाद हि करी यत्न धराया रणांत कपि, 'साधो
ब्रह्मास्त्रें[3] यश, मज' म्हणे, 'प्रभुतेजें[*] विधिवरें न तें बाधो.' ७३
पर वदले, 'ब्रह्मास्त्रा सापडला, भागला, शव तसा या
बांधा, भूमिपतिकडे न्या, योग्य न सासु हा खळ असाया.' ७४
हरि दशवदना राजा यत्नें नेवूनि दुष्ट कुणपाश,
दाविति गळां पडाया काळाचे दुःसहोग्रगुण पाश. ७५
न्यायें मुहूर्त कुंठित दशतुंडा राक्षसा सभेंत करी
कवि आंजनेय, तेव्हां तद्धाता तो मदांध खड्ग धरी. ७६
त्या दशमुखा बिभीषण सांगे युक्तेष्ट शाश्वत रहाया,
'दूत अवध्य असे' कारि मान्य सुबोधा मदांध पर हा या. ७७
पुच्छास कृष्णवर्त्मा[4] खळ दशमुख लाववी तया हरिच्या,
भस्म सुवर्णपुरीतें पवनतनय कारि महाबळा अरिच्या. ७८
जनकसुतेतें आधीं मग सुखवी मिहिरकुल[5]पवित्रकरा,
नारद गाय असा प्रभुपासुनि सत्कार यासि होय बरा. ७९
विधिस हि दुर्लभ जें तें आलिंगन वातनंदना दे हा,
गाती पुरातन यती या कपिच्या विहितनंदना[6] देहा. ८०
श्रीचा निरोप परिसुनि टपकॅरि[7] सुग्रीवसह निघे राम,
रंजन यशें कराया विश्वाचें विश्वहृदयविश्राम. ८१
सोडी साधु बिभीषण दशकंठें भंगितां चि मान पुरी,

---

१. सिंहासारखा. २. गतप्राण. ३. ब्रह्मास्त्रास. ४. अग्नि. ५. सूर्यवंशास पवित्र करणाऱ्या रामाला. ६. योग्य आहे नंदनवन ज्याला असा (मारुति). हस्तदोष—**विहितंदना**. ७. शीघ्र. * पित्याच्या प्रभावानें.

नमितां चि तया प्रभु दे राज्य, करि दया पित्यासमान पुरीं[1]. ८२
प्रभुतेज्यापासूनि त्रासे बहु सागर, प्रसादास
व्हाया पात्र शिरीं धरि नळसेतु, निदेश[2] वारि जसा दास. ८३
केवळ सत्य तसें शठ रावण दावी सतीस चाप शिर;
सरमा कथि, 'हे माया, न च तूं मोहीं धरूनि ताप शिर.' ८४
पक्षिप बिलेशयांची हानि, गजांची करावयासि हरी,
तैसी निशाचरांची, उतरे पारीं बळाढ्य राम हरी[3]. ८५
रागें भरोनि ताडी रक्तपभूपाळका महामाया[4]
देवब्राह्मणकाळा कामरता सुगळ तत्कुधी जाया. ८६
भव्यार्थ व्यक्त कथी अंगद, परि साम न करि अविचार[5],
तो निजलयरुचि दावी रामहरिपुढें निकाम अवि[6] चार[7]. ८७
परभटहनन करिति कपि विभुनें आज्ञापितां, जगा श्रम ते
गमले, परि किति कातर शशसे हरि हरि च जाहले गमते. ८८
मुनि वृंदारक देखति दशमुखपरिभव नवा असीम रणीं;
नारद म्हणे, 'खळांस न सिद्धि मिळाली कधीं असी मरणीं.' ८९
अगणित योधक्षय तो ध्यानीं येतां चि मूर्च्छना यावी,
वाहति रक्तनदींत प्राज्य सुनासीरशत्रु[8] मायावी. ९०
जनकात्मजा म्हणे प्रभु मूर्च्छित पाहुनि 'वृथा गुरुजनाशी[9].'
त्या राघवाहिपाशा सीतातापा हि पक्षिपति नाशी. ९१
प्रभु घटकर्णा मारी द्विषदसुभृद्वारकाळ[10] जो वासी
पाताळाभ[11] मुख, गिळी कपि, सुगळा नासिकाहरा त्रासी. ९२
सकळबळिगर्व नाशी, क्षेमी ये त्रस्त मूर्च्छिता सेना
ओषधिनीं वातात्मज निजलीसी उठवि निर्व्यथा सेनीं[12]. ९३
घनरव म्हणे, 'न वांचो राघव' मायामयी वधी सीता,

---

१. पूर्ण. २. आज्ञा. ३. प्रभु. ४. अत्यंत कपटी अशा. ५. अविचारी रावण. ६. मेंढा. ७. चेष्टा. ८. इन्द्रशत्रु राक्षस. ९. वाडवडिलांचा आशीर्वाद. १०. जीवंत शत्रूंच्या समूहाचा काळ. ११. पाताळाएवढें मोठें. १२. धन्यासह.

लेखाधिप[1] भ्रमे, बहु झाली शोकाकुळा चमू भीता. ९४
झाल्या सशंक राजी बाळांच्या तेंवि वानरांच्या, तो
साधु बिभीषण वारी भ्रम, तज्ज्ञें जेंवि बोधितां जातो. ९५
लक्ष्मण बिभीषणमतें घननादा खरपराक्रमा मारी.
'हाय !' म्हणे रावण, घाति बाहिर, वाहे मनीं व्यथा भारी. ९६
शित[2]धार असि वधाया देवीतें घे, तया सचिव वारी;
धाडी प्रभुवारि सेना, दीनत्व वरूनि ती मरे सारी. ९७
प्रकट ऱ्हास बळाचा तो दशमुख दुष्ट आपुल्या पाहे,
बडबडुनि निघे वेडा, लक्ष्मण तच्छक्ति[3]सि न रणीं साहे. ९८
पवनसुत पुन्हां आणी त्या अमृतरसौषधी, हरी बाधा;
राम म्हणे, "या स्वयशें म्हण विश्वाला स्वयें हि तूं बा ! 'धा'."
जगदीश सत्य[4]पांडोपद्रवकरबालिशारिचा, सात
दिन आधीं रण, मग सुरहित संपादावया करी घात. १००
विधिसह वदले, 'लागो बा ! त्वत्पादारविंद सुरसाची
गोडी, भासावीं लघु इतर सुखें, स्वरुचि कथिति सुर साची.'
सांत्वूनि बायका, दे जळ, उत्तरकृत्य करि, वितृष्ण[5]मना
बैसे बिभीषण पदीं बाच्या सुतसा, 'निवा' म्हणे स्वजना. १०२
श्री कळवि शुद्धि दिव्यें, प्रभु हि कठोरत्व सद्यशोर्थ धरी.
भेटे बाप दशरथ हि, दायादा सानुजा प्रहृष्ट करी. १०३
सांगुनि बिभीषणातें सत्कारवि कपिबळें सुगळसहितें,
हर्षे, वरि पुष्पक, निजनगरीतें ये, सुखी करी महितें. १०४
बाधा हारि अंबूद्भ[6]वसें पुर, रवि राम, तनयसा भरत,
पावे प्रजा सदा शिव सर्व प्रभुचरणभक्तिलाभरत. १०५[7]

१. इन्द्र. २. तीक्ष्ण. ३. पृष्ठ २३ टीप ५ पहा. ४. जगाला त्रास देणारा मूर्ख शत्रु जो रावण त्याचा. ५. निर्लोभी. ६. कमळ—**पंत.** ७. या गीतींत 'बाबूराव सदाशिव' असें नांव साधल्याचा कविनिर्देश आहे. तथापि 'बाबूराय सदाशिव' असें मानल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

अभिषेक स्वीकारी, भरता युवराज करि, अळिसमान
कवि गुणमकरंदास प्राशिति; एका नसे काळिस मान. १०६
वैकुंठाश्रम वाटे, प्रभु साकेतीं च वाटला रमला,
गमला न स्वर्ग अधिक, पौर म्हणे 'सत्यलोकरुचि न मला.'
पंचास्य राज्य वर्णी[1], मूढ खर पुरुष परस्वसक्त नसे,
वाणी शुचि दासी ही, सर्वत्र गुणौघभाग्य नित्य वसे. १०८
हर्षें भारि विश्वातें, करि रामप्रभु भवव्यथा नाहीं;
दे आशयज्ञ जें सुख नामाहीं शिशुसि तें न थानाहीं. १०९
श्रम न घडतां चि वरगति निजगुणसक्ता जनासि दे राम,
सरसिजलोचन करुणामृतघन सेवकमयूरविश्राम. ११०
'सन्नामगर्भश्रीरामायण' हें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें. १११

इति श्रीमन्मयूरविरचितं सन्नामगर्भरामायणं समाप्तं ।

---

# मात्रारामायण

[2]अजित प्रभु विधिवचनें, त्रिजगत्पीडक दशास्य माराया
होय चतुर्मूर्तिधर श्रीदशरथपुत्र, भक्त ताराया. १
आदिपुरुष देव धरी, जीं तातें सविधि ठेविलीं, नामें;
तीं राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न असीं सुखाब्धिचीं धामें. २
इष्टार्थ गाधिसुत ने, अस्त्रें शत दे, मखघ्न आरि खपवी.
पावे स्वपराभवकरराक्षसनाशें उदंड हरिख पवी. ३
ईश्वर मुनिभार्येतें चरणरजें उद्धरी, करी धन्या.
हरधनु चुरि, जनकाच्या कौशिक[3] चवघांसि देववी कन्या. ४

---

१. हस्तदोष–**वर्णीं**. २. अपासून ज्ञपर्यंत जे वर्ण आहेत त्यांस छंदःशास्त्रामध्यें मात्रा असें म्हणतात; त्या मात्रा यांत अनुक्रमानें आर्यांचे आरंभीं योजिल्या आहेत, म्हणून यास '**मात्रारामायण**' असें नांव दिलें आहे. ३. खोडलेला पाठ–**चौघी**.

उग्रा भार्गवरामा प्रभु, दावुनि बाहुबळ, करी शांत.
पितृसत्यरक्षणें, शुचि यश जोडाया, निघे रमाकांत. ५
ऊर्ध्वगति[1] तया राज्या, सुतशोकें देह सोडितां घडली.
राज्यश्री भरताच्या मनु वर्षे प्रभुमतें गळां पडली. ६
ऋषि सर्व भरद्वाजप्रमुख प्रभु हर्षवी, पदें नमुनीं;
सानुज सदार हर्षे बहु वर्षे तापसाश्रमीं क्रमुनीं. ७
एक दिवससा सरला बहु काळ तपोधनाश्रमीं हर्षे.
पितृसख जटायु भिजवी प्रभुशीर्ष प्रेमजाश्रुच्या वर्षे. ८
ऐश्वर्यातें कुतुकें झांकुनि, गोदावरीतटीं राहे.
दशमुखभगिनीप्राणच्छेद न, खरसैन्यनाश ही, साहे. ९
ओस पडाया स्वकुळ स्वर्णहरिण दाखवी, मन भ्रमवी;
श्री हरि, जटायुपक्ष च्छेदी, दशकंठ तापसा श्रमवी. १०
औद्धत्यें लंकेंत श्रीतें रोधी कुधी अशोकवनीं;
स्त्रैणत्व प्रभु दावी बहु, 'हाय!' म्हणे, जरि प्रसन्न मनीं. ११
अंकीं जटायुचें घे शिर, रावणकर्म कथुनि, तो मेला.
दे त्या पिंडोदक, परि तच्छोकें[2] दीनबंधु कोमेला. १२
अस्त्रें शस्त्रें प्रार्थिति, परि धैर्य धरी, चरित्र वाढाया.
प्रभु जाय पुढें, सुरमुनिहृद्गत दशवक्त्रशल्य काढाया. १३
कवळीं कबंध राक्षस भक्षाया जो, तया हि दे सुगती.
ऐसें नसोनि, गर्वे आपण चि प्रभु म्हणोनि, कां फुगती? १४
खगपरथ[3] विराधाला, तेंवि कबंधा हि, उद्धरी; मग ती
भक्ता शबरी प्रेमें प्रभुला पूजुनि वरील कां न गती? १५
गहिवरला पंपेच्या तीरीं, श्रीतें स्मरोनियां, राम.
पवनसुताचा आधीं, मग पुरवी भानुसूनुचा काम. १६
घनंदुरभिमान[4] जो, त्या शक्रसुता वाळिला वधी; राज्य

१. स्वर्गवास. २. पृष्ठ २३ टीप ५ पहा. ३. गरुडरथ विष्णु (यम). ४. दृढ दुरभिमानी.

सुग्रीवास कपींचें देउनि, जगदीश दे सुख प्राज्य. १७
चर सर्वत्र प्रेषी श्री शोधाया सुकंठ, परि शोध
अग्रज जटायुचा कथि; लंघी जलधीस वातसुत योध. १८
छळुनि सुरसेसि, मारी छायाग्रह सिंहिका, पुरीं पाहे,
त्या श्रीस अशोकवनीं देखूनि, उगा चि पादपीं राहे. १९
जड दशमुख ये रात्रीं, 'मन्मोहिपी हो' म्हणे गतव्रीड.
धिक्कारी प्रभुभार्या त्यास; तयाची न तीं धरी भीड. २०
झडपी मारुति न तया, प्रभुची आज्ञा नसे म्हणोनि च.
स्वमनांत म्हणे, 'म्हणतो हें, आयुःशेष तो; म्हणो नीच.' २१
[2]उपकारि मागें घेउनि गेली स्त्री त्या दशानना क्षुद्रा.
मग एकांतीं प्रभुची स्तुति करुनि, श्रीस नमुनि, दे मुद्रा. २२
ठकवी, सबळा अक्षा वधुनि, रणीं घनरवा महामाया.
ब्रह्मास्त्रा सांपडला; काळमुखीं योग्य जो न हा माया. २३
डसुनि भुजंग कधीं तरि गरुडाला म्हणविताल 'हा!' काय?
पेटवितां पुच्छ, उडे, जाळी लंकापुरी, महाकाय. २४
ढळवुनि परधृतिनग ये; प्रभुला वंदुनि, 'विलोकिली देवी,'
ऐसें सांगुनि, चूडामणिसह मस्तक पदीं पुन्हा ठेवी. २५
'ण' पुढें मागें 'नो' ज्या, तो राय कपींस भेटला, यानीं;
मानी बहु सिंधुतटा गेला, घेवूनि कोश सेनानी. २६
तस बिभीषण झाला स्वाग्रजदोषाग्निनें, शरण आला;
त्याला लंका प्रभु दे; कोण कवि न सद्यशोमृतें धाला? २७
थरथर सागर कांपे; सांगे, 'पारासि जावया सेतु
नळ कपि करू; धरिन मीं; होइल अधमप्रमुक्तिला हेतु.' २८
दनुजारि सेतु करवी; श्रीला दावी दशास्य चापशिरें;
सरमा कथी, 'कपट हें; मोहांत न तूं, भरूनि नयन, शिरें.' २९

---

१. वृक्षीं. २. सन्नामगर्भरामायण ८१ पहा. ३. या शब्दकोड्यांचा उलगडा होत नाहीं. ४. दैत्यशत्रु.

घनदानुजासि सुगळ प्रथम चि, भुजगासि गरुडसा, झडपी.
अंगद 'साम कर' म्हणे; परि हितबोधामृता न तो जड पी. ३०
'नर वानर तुच्छ' म्हणे, दारुण रण करुनि, भंग तो पावे.
देवांश कपि प्रभुच्या तेजें कां काळसे न कोपावे ? ३१
[1]पवनाशनपाशानीं घनरव करि बद्ध सानुजा देवा.
दे वायुजादिकां भय; ये खगपति, सोडवी, करी सेवा. ३२
फळ पावे पापाचें पर, कीं घटकर्ण काळसा हि मरे;
कोण म्हणेल अशांता विग्रह दावाग्नि साम बा! हिम रे!? ३३
बहु विकळ करी घनरव सबळा सुगळा, सलक्ष्मणा रामा;
आणी ओषधिशिखर चि, उठवि सकळ, वातपुत्र ये कामा. ३४
भय दे मायासीता वधुनि बिभीषण तया श्रमा वारी;
मग लक्ष्मण घननादा मायाविवरा महाखळा मारी. ३५
मरतां सर्व, दशानन, सीता मारावया, धरि असीतें.
त्या सचिव सुपार्श्व म्हणे, 'जरि हातीं मारिसी, तरि [2]असीतें?' ३६
यत्न करी परनाशा बहु, बळ खपतां, स्वयें अतिक्रुद्ध,
सौमित्रिस शक्तीनें भूतळिं पाडी; करी असें युद्ध. ३७
रक्षी प्रभु अनुजातें, उठवी मारुति पुन्हां तया शिखरें.
अमृतस्रावि [3]च्छत्रें चि तो, निववि, हरुनि उन्हा, तयासि खरें. ३८
लक्ष्मीपति, शक्ररथीं बसुनि, अहोरात्र सप्त करि युद्ध,
शतमस्तक खंडुनि वधि सूर्यवरें होय यश जगीं शुद्ध. ३९
वर्षुनि पुष्पें, प्रभुतें वर्णिति, जय नारदप्रमुख गाती.
अतिधवळा कीर्ति शिवा लोपवि, केवळ न हंस सुखगा ती. ४०
शतमख उठवी वानर; दिव्य करी श्री; पिता हि दे भेट;
प्रभुयश भवार्णवीं हें सेतु न नौका, तसें नव्हे बेट. ४१
षण्मुख जनकसखाचें पुष्पकनासक विमान या वाहे
प्रभुला; आंत बसोनि श्री सेत्वाद्यखिल कौतुकें पाहे. ४२

---

१. नाग. २. अशा स्त्रीला. ३. पृष्ठ २३ टीप ५ पहा.

ससुगळ बिभीषण प्रभु ये, जय मारुतिमुखें प्रथम कळवी,
मग सानुज भरतातें भेटुनि तत्ताप सकळ ही पळवी. ४३
हर्षवि राजा होउनि भरता सुगळा बिभीषणा राम,
मारुतिस भव्य वर दे, पूर्ण करी सर्व भक्तजनकाम. ४४
क्षयकर विप्रांचा जो त्या लवणातें अरिघ्न ही मारी,
भरत वधी कोटित्रय गंधर्व, प्रभु असा जगा तारी. ४५
ज्ञ हि अज्ञ हि जन तारी, नामें कामादि शत्रु ही मारी;
स्वयशें भवभय वारी, करि भक्तमयूरवन दया भारी. ४६
'मात्रारामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ४७

इति श्रीरामनंदनमयूरविरचितं(तं ?) मात्रारामायणं समाप्तं ।

---

# शिवरामायण*

(गीतिवृत्त)

विधिशशिशेखरशतमख यांहीं संप्रार्थिला दयालु हरी,
दशमुखवधार्थ दशरथसदनीं अतिरम्य मूर्ति च्यार धरी. १
ते राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न शिशु स्वमूर्तिकांतिभरें
करिति नृपाचें भवन हि हृदय हि वितमस्क[1] हर्षपूर्ण बरें. २
राम सलक्ष्मण अर्पी कुशिकसुता गुरुनिदेशकर[2] भूप,
तो त्यांसि बळातिबळा विद्या दे अस्त्रशतक भवरूप[3]. ३
कौशिकनिदेश होतां प्रथम चि रघुवीर ताटकेशि खरें
बाणें वधी, कळवि कीं, निजगुरुचें वाक्य वेदरूप खरें. ४
सिद्धाश्रमीं रघूत्तमविशिख क्षणदाचरांसि संहरिती,

---

*. या काव्यांत प्रत्येक गीतींत 'शिव' शब्दाची योजना केली आहे. १. अंधकाररहित. २. गुरूची आज्ञा पाळणारा. ३. शंकररूप.

सवसिद्धिनें मुनि निवे, यश नुरवि दिशा हरूनि अंह रिती. ५
कौशिकमुनि जनकनृपें व्हावा निजयज्ञ सफळ या भावें,
स्वसचिवमुखें विनविला कीं, 'ताराया नता तुम्हीं यावें.' ६
प्रभु विनवी मुनितें, 'हे न्या शिष्य पुरारिचाप दावाया.'
गुरु हि 'अवश्य' म्हणे, घे गौतममुनिला नृपा हि पावाया. ७
शप्ता सती अहल्या जगदीश हरी तिच्या शिलाभावा,
पूजुनि ती स्तवन करी प्रथम, म्हणे, 'म्यां महामुनि च गावा.' ८
जनक तपोराशिप्रति भेटे, तों निकट दाशरथि पाहे,
लाहे[1] समाधिभव सुख, विसरे पूजादि, चित्रसा राहे. ९
पुसतां कौशिक सांगे जनका, 'हे राम लक्ष्मण भ्राते,
दशरथवत्स, खपविली ज्याहीं राक्षसचमू अदभ्रा ते. १०
हा राम लक्ष्मणाग्रज आला शितिकंठधनु पहायाला,
दाखिव राया! तें या कुशळा सद्धर्मपथसहायाला.' ११
आणिति आणवितां तें पुरुष सुशिक्षित सहस्रशः श्रमुनी,
मुनि चिबुक[2] धरूनि म्हणे, 'वत्सा! श्रीरुद्रधनु पहा नमुनी.' १२
नमुनि मुनिस राम उठे श्रीशशि[3]शेखरधनुष्यवल्लीला
करुनि प्रदक्षिण प्रभु वंदी, दावी मनुष्यवल्लीला. १३
सांबा[4] सदाशिवातें सीता प्रार्थी धनुष्य उचलाया,
'कुचलो[5] याहुनि पर नर, राघव चि' म्हणे 'मनास रुचला या.' १४
प्रभु लीलेनें उचली त्र्यंबकधनु शिल्पि[6]वीरकोटिनुत,
सज्य करुनि वोढी, तों मोडे, तद्रव करी त्रिलोक धुतें[7]. १५
सीता प्रभुला, अतुळा प्रीति श्रीकौशिका हि, कीर्ति बरी
रविवंशाला, जनका चिंता उडवूनि दूर शांति वरी. १६
कौशिक सांगे जनका, 'राज्या! दे लक्ष्मणा निजा कन्या

---

१. समाधीपासून होणारें. २. हनुवटी. ३. चंद्रमौळि महादेवाच्या चापलतेला.
४. अंबेसहित अशा. ५. काजरा, क्षुद्र. ६. शिल्पि=कारागीर. ७. कंपित.

भरता शत्रुघ्ना त्या स्वावरज्याच्या[1] स्वलंकृता कन्या.[2]' १७
मुनिनें ख्यात जगद्गुरुशिष्य त्रिजगीं असा बरा केला,
मुनिच्या या कीर्तीसीं कवण्या चि घडे तुळा न राकेला. १८
सिद्धाश्रमासि कौशिक गेल्यावरि दशरथा सतनयास
स्वपुरासि याज्ञवल्क्यच्छात्र[3] द्रुत आणवी ततनयास.[4] १९
केले विवाह शिबिका हय रथ गज रत्न भूषणें कनकें
देऊनि, सपौर ससचिव गौरविला पंक्तिरथ बरा जनकें. २०
नाशित आला मत्त क्षत्रिय बहुकोटि जो महातेजा
तो भार्गव मार्ग धरी, न दिसति शिर निजपदीं वहाते ज्या. २१
प्रभुघटयोनिपुढें भृगुरामाहंकारतोयराशि सरे,
परपुरुष[5] असें समजे, शांति धरि, पराभवव्यथा विसरे. २२
कर्णांहीं विजयकथा प्रभुची प्राशिति, सुमूर्ति नयनाहीं.
वदती पौर प्रेमें, 'आतां आम्हांसि किमपि भय नाहीं.' २३
शिष्ट युधाजिन्मातुळ ने सानुज भरत आपल्या नगरा,
नगराज होय आतां बाधों दे साधु भवभया न गरा. २४
राजा प्रजाशिवार्थ श्रीरामाला गुरुप्रधानमतें
युवराज करूं लागे, कैकेयीच्या मनासि दे श्रम तें. २५
तीतें सुरदूषितमति दासी दुर्बुद्धि मंथरा शिकवी;
मागे दोन वर दिले, राज्यांत महा अनर्थ ती पिकवी. २६
सत्यव्रत शिष्टोत्तम पति जो त्यातें म्हणे, 'असो भरत
अभिषिक्त, राम तापस मनु वर्षें, मन तुझें अपापरत.' २७
ती न द्रवे, शिलाधिक कठिना, बहु सांत्वितां हि, हें कळलें;
गुरुसत्यधर्म बुडतां त्रिजगद्गुरुहृदय रक्षणा वळलें. २८
कैकेयीशब्दशिलीमुख[6]विद्धहृदय पित्या पुसे नमुनीं,

---

१. आपल्या धाकट्या भावाच्या. २. पंतांच्या ठरीव यमकांच्या दृष्टीनें येथें 'धन्या' असा पाठ असावयास पाहिजे होता. ३. पृष्ठ २३ टीप ५ पहा. ४. विस्तृत आहे नीति ज्याची त्यास (दशरथास). ५. परमेश्वर. ६. बाण.

वल्कल धरुनि निघे प्रभु दारानुजसह, जसा रुसे न मुनी. २९
बहु रडले साकेतीं शिशु पशु शुक सारिका सखे दास,
वंचुनि जाय जनास प्रभुवर सदय हि तया सखेदास. ३०
राजानुशिष्ट मंत्री राजरथीं बसवि ने, निषादातें
भेटे राघव गंगातीरीं, त्याच्या हरी विषादातें. ३१
रचुनि जटा क्लेशित करि गुरुसचिवा त्या म्हणे, 'पुरा जा च.'
उपदेश तो नव्यसुधारस चि, परि तया गमे पुरा जाच. ३२
उतरुनि मदनारि[1]शिरोमुक्तामाळेसि ये प्रयागातें,
देव भरद्वाजातें नमन करी, सर्व जग जया गातें. ३३
'जगदीश चित्रकूटीं शुद्धतपोराशिसंकुळीं[2] राहे,'
हें सचिव कथी, राजा व्यसु होय, न विरहदुःख तें साहे. ३४
शोकीं साकेत बुडे, रघुकुळदेशिकें[3] बळी कुशळ पूत
जवन प्रेषी, भरता आले घेवूनि न कथितां दूत. ३५
शोकशिथिल भरत रडे, कैकेयीतें म्हणे, 'खरी कृत्या.'
स्वगुरुवसिष्ठानुमतें ताताच्या आदरें करी कृत्या. ३६
स्वजनककनककशिपुतें जेंवि प्रह्लाद जळजनाभरत[4],
जननीतें अवमानी, कळवी निर्दोष फळ जना भरत. ३७
तो साधु चित्रकूटीं शिशुसा करुणाब्धिच्या गळां पडला,
रडला, वत्सलतिळकें श्रीरामें साधु सांत्विला, अडला. ३८
श्रीपादुका शिरीं घे, परते, परें[5] ते त्यजी न मन पाय,
नंदिग्रामीं च वसे, रक्षी तें आर्यराज्य अनपाय. ३९
अत्रिस अनसूयेस प्रभु वंदी पुत्रशिष्यसा, पूजा
पावति मुनिपतिपासुनि, साध्वीनें बहुत सुखविली भूजा. ४०
उद्धरुनि विराधातें, शुद्ध शिलोंछादि[6]वृत्ति तापस जे
दंडकगहनीं होते, त्यांचा शमवावयासि ताप सजे. ४१

---

१. गंगेस. २. समुदायांत. ३. गुरु. ४. विष्णुभक्त. ५. परंतु. ६. धान्यकण टिपून त्यांवर निर्वाह करणारे (तापस).

तापसशिरोमणि घटज पूजुनि दे प्रभुसि वैष्णवें शस्त्रें
जीं दैत्यदानवक्षयनिपुणें, तो गाधिसुत जसीं अस्त्रें. ४२
पितृसखजटायुगृध्रक्षितिपतिला शिशु तसा चि सुख दावी,
पंचवटी च अयोध्या, गोदा सरयू, खगा जनक, भावी. ४३
मेघश्यामा रामा घन मानुनि नाचती शिखी हर्षें,
जैसे प्रावृट्काळीं अतिमुदित मुदिर विलोकनें वर्षें[1]. ४४
तेथें शूर्पणखा ये, जी रक्त प्राशिती महादुष्टा,
मायारुचिराकारा प्रभुची स्त्री व्हावया रता तुष्टा. ४५
तद्घ्राणकर्ण लक्ष्मण आर्यनिदेशें शितासिनें[2] खंडी,
सबळ खर वधवि, पाडवि शून्य जनस्थान ती कुधी चंडी. ४६
पिशिताशनेंद्र[3] धाडी कपटकनकमृग, तया सती पाहे,
सांगे धरावया, प्रभु जातां, सौमित्रि रक्षणा राहे. ४७
ब्रह्मास्त्रें अभिमंत्रुनि पळतां प्रभु शितशरें तया हाणी,
'हा सीते!' 'हा लक्ष्मण!' असि तो रामस्वरें वदे वाणी. ४८
त्या पिशिताशनकपटें सीता भी, लक्ष्मणा म्हणे, 'स्वामी
प्राणव्यसनीं, रक्षीं, धाव कसा? भय नसे मला धामीं.' ४९
सौमित्रि म्हणे, 'माते! पिशिताशाची च हाक हे खोटी,
कपटमृग वधुनि येइल कुशळी प्रभु, या तृण द्विपत्कोटी.' ५०
ती कोपे, त्यासि म्हणे, 'अशिवाचारा! तुझ्या मनीं आर्या
मृत्यु घडावा, पापा? वांछिसि मातें करावया भार्या. ५१
अशिवा उक्ति असी त्या देवीची ऐकतां चि, तो जोडी
कर, होय उदश्रु, निघे, धैर्य उटज अधन तापला सोडी. ५२
पिशिताशनेंद्र तों ये, आर्ते वाहे, रथीं निघे भीता,
हाका मारी नाथा दीरा श्वशुरा हि वत्सला सीता. ५३
धांवुनि जटायु अरिच्या धैर्या हि रथा हि नाशिता झाला.
भ्याला रावण, पक्ष च्छेदी, करि विकळ पापधी त्याला. ५४

---

१. उदकवृष्टीनें. २. तीक्ष्ण खड्गानें. ३. रावण. (पिशित=मांस).

श्रीतें ने गगनपथें, पावे जलराशिमाजि लंकेतें,
दशकंठ अशोकवनीं रोधी तीतें त्यजूनि शंकेतें. ५५
पिशिताशनासि मारुनि फिरतां सौमित्रि भेटला आर्या,
सांगे जें वदली तें, राम म्हणे, 'हा! गमाविली भार्या.' ५६
शून्य स्वोटज पाहुनि राम म्हणे, 'हा सुकेशि! हा तन्वि!
हा सुदति! हा वरोरु! क्षणदापतिमृग हरील हा धन्वी.'[1] ५७
प्रभुचे विलाप परिसुनि मृग शुक शिखि सारिका मृगेंद्र करी
रडती वनदेवी ही, प्रभुशोक व्याकुळ द्रुमांसि करी. ५८
'हा शशिमुखि! हा सुंदरि!' म्हणत असें शोधितां स्वचुलत्यातें
पाहे वनांत शोकें क्षतविकळातें उरांत उलत्यातें. ५९
'नरपिशिताशन दशमुख घेवुनि गेला सतीस, मम पक्ष
छेदुनि' असें वदे तो, त्यजितां तनुतें म्हणे, 'स्वयश रक्ष'. ६०
ज्याचीं नामें नाशिति दुर्गति तो तीर्थपाद राम हरी,
तातसखा गृध्राची तत्तनुभवसा क्रिया स्वयें चि करी. ६१
कोरिं[2] कवळि त्या कबंधा शतमखयमपाशिधनदनुत[3] राम,
शबरीस वरा गति दे, पुरवी मारुतिदिनेशसुतकाम. ६२
श्रीरामें संहरिला एकें चि शिलीमुखें बळी वाळी,
कपिराज्य दिलें सुगळा, धर्मन्याया वरूनि तो पाळी. ६३
श्री शोधाया सुगळ प्लवग सुशिक्षित चहूंकडे प्रेषी,
पवनसुतें शतयोजन सागर लंघूनि गांजिला द्वेषी. ६४
शिर चरणीं ठेवुनि दे मुद्रा, चूडामणी तिचा पावे,[4]
वन बळ भंगी, जाळी लंकेतें, कीं असाधु तापावे. ६५
चूडामणि दाखवितां विश्वाचा ईशितां[5] निवे फार;
आलिंगी बहु वर्णी, त्या मारुतिच्या यशा नसे पार. ६६
अमितामरांशकपिबळ घेउनि जळराशिच्या तटा पावे,

---

१. धनुर्धारी (राम). २. प. लि. हस्तदोष–**कारि**. ३. इन्द्र, यम, वरुण, कुबेर यानीं स्तविलेला. ४. मिळविता झाला. ५. स्वामी.

ये रावणानुजन्मा शरण, न तद्यश जगत्रयीं मावे. ६७
प्रभुनें बिभीषणाला चरणीं शिर ठेवितां दिली लंका,
रंका हि तरायाची करुणार्णव हा धरूं न दे शंका. ६८
सुराशिल्पिपुत्र[1] नळ करि शतयोजन सेतु, त्या पथें पारा
पावे सुग्रीवसह प्रभु, विजयश्रीस जो सदा थारा. ६९
शिक्षी कोपें सुगळ प्रथम चि दशकंधरा महामत्ता,
श्रीस रडवि पतिमस्तक दावुनि जो त्रिभुवनीं करी सत्ता. ७०
उपदेशिला सकरुणें प्रभुनें अंगदमुखें न करि साम,
हांसुनि वदे, 'कपिबळें सीतेतें इच्छितो मनुज राम.' ७१
समर करी, पंक्तिशिरा बुडवी, भृत्य प्रधान बंधु सुत
प्रभुच्या प्रतापदावज्वलनीं झाले चि शलभ तेंवि हुत. ७२
घननाद नागपाशित करि मायेनें सलक्ष्मणा रामा,
लीलामानवरूपप्रभुच्या ये गरुड संकटीं कामा. ७३
सुगळविरूपित सुटला घटकर्ण प्राशित प्लवंगबळा
राम वधी त्या काळप्रतिमा, खंडूनि पादबाहु, खळा. ७४
शितशस्त्रवृष्टिनें करि मूर्च्छित घननाद ससुगळा देवा,
उठवि पवनसुत ओषध्यगशृंगें, आदरें करी सेवा. ७५
मायामयी जनकजा दावी घननाद, शिर तिचें कापी,
तो लक्ष्मणें निवटिला भक्तबिभीषणमतें महापापी. ७६
सुतशोकें खळ कोपे, निशितासि[2] धरी सतीस माराया,
त्या सचिव म्हणे, 'मारीं आरिस, इला मधुनि काय बा राया!?' ७७
प्रभुमथनार्थ प्रेषी निशिचरसेना दशास्य तो भारी,
त्या अर्णवतुल्येतें राम मुहूर्तद्वयें रणीं मारी, ७८
असकृद्भंगत आला, तरि तो पिशिताशराज ये युद्धा,
भ्याली प्लवगबळें बहु, लक्ष्मण हटकी तया अतिक्रुद्धा. ७९
तो निशिचरनाथ रणीं दारुणतर शक्तिनें उरीं ताडी,

---

१. विश्वकर्म्यांचा पुत्र (नळ). २. तीक्ष्ण खड्ग.

सौमित्रितें महीवरि मूर्च्छित रामाश्रुबिंदुसह पाडी. ८०
ओषध्यचळशिखर तें मारुति आणी, सुषेण तद्रस या
देवुनि उठवि, शचीच्या त्यांचें चिंतिति सदैव भद्र सया. ८१
शक्ररथीं बैसोनि प्रभु विखरी विशिख, किरण जेंवि रवी,
प्रकटी दशवदन हि निजतेज, त्रिदशेंद्रधैर्य जें विरवी. ८२
सप्त अहोरात्र रण प्रभु करि, शत अरिशिरें जरि हि तोडी,
तरि न मरे, दैव पुन्हां नाहीं तुटलीं असीं संपदि जोडी. ८३
प्रभुसि 'रविहृदय' सांगे जो सिंधु प्राशिता महातेजा,
तज्जपतुष्ट तरणि दे वर बहुमत, वंदिते पहाते ज्या. ८४
अद्भुततेजोराशि प्रभु राम ब्राह्म मार्गणीं जोडी,
सोडी दशकंठाचें वज्राभेद्योर तत्क्षणीं फोडी. ८५
वातें चैत्यद्रुमसा प्रभुविशिखें शत्रु पाडितां भारी
सुरदुंदुभिरव कोंदे ब्रह्मांडीं, हृष्ट होय जंभारी. ८६
दंशित सशस्त्रवाहन राक्षस पळतां हि मारिले हरिनीं,
परि निंदिले न कोणी कीं वरिली सुगति मरुनियां अरिनीं. ८७
प्रभुच्या शिरीं सुरानीं दिव्य कुसुमवृष्टि सत्त्वा केली,
गेली त्रिभुवनपीडा, वाटे मारीच मारितां मेली. ८८
शशिशेखर विधि शतमख नारद हे बंदिजनसम स्ताविती,
नाचति, गाती, 'जय जय!' हा ध्वनि वदनें तदा समस्त विती. ८९
निशिचरपतिक्रिया प्रभु करवी, बसवी पदीं पदनतातें,
श्री दिव्य करी, भेटुनि पुत्राचें देखिलें वदन तातें. ९०
उठवी रणमृत कपिबळ ईशित्वाद्याखिलसिद्धिचा भर्ता,
यश देवनायका दे ब्रह्मादिसमग्रसृष्टिचा कर्ता. ९१
पूजायाचा प्रांजळि तो निशिचरनाथ जाणवी काम;

१. मैत्रिणी. २. तत्क्षणीं. ३. गांवांतील किंवा गांवाबाहेरील पिंपळाचे झाडा-प्रमाणें. ४ इंद्र. ५. सज्ज. ६. ईशितादि आठ सिद्धींचा स्वामी (राम). ७. प. लि. हस्तदोष—भर्त्ता.

'भेटिव भरत मज, सबळसुगळातें पूज' हें म्हणे* राम. ९२
उपदेशिलें करुनि दे पुष्पक लंकेश नमुनि रामातें,
धनदविमान प्रभुच्या पूर्ण करी जव करूनि कामातें. ९३
शितिकंठसखाविमानीं बसुनि बिभीषणसुकंठबळयुक्त
सेतु वधूला दावुनि ये साकेता, करी खरें उक्त. ९४
सानुज भरत शिखीसा, प्रभु घनसा, पौर सर्व चातकसा,
दुःखार्णवमग्नांतें द्रवुनि न देईल सदय हात कसा? ९५
शिष्ट कुळगुरुप्रमुख प्रभुतें राज्याभिषेक तीर्थजळें
करिती, सोत्सव दे हा सुरतरु धर्मार्थकाममोक्षफळें. ९६
निजपदपद्मशिलीमुख[1] सुगळ बिभीषण ससैन्य शोभविले,
प्रभुनें बहुप्रसादामृतवर्षें ताप हरुनि लोभविले. ९७
औरस शिशुसा मारुति गौरविला स्मरुनि तत्कृतें कार्यें,
श्रीसह रामें दिधले वर जे त्या इच्छिले महाआर्यें. ९८
सुतपोराशि घटजमुनि सांगे प्रभुला दशास्यजन्मकथा,
जपुनि तपुनि वर जोडुनि, पीडी विश्वासि धरुनि पापपथा. ९९
श्रीदत्तशिष्य अर्जुन[2] शक्रात्मज बळसमुद्र जो वाळी,
तत्कृत दशमुखपरिभव सांगे, कथिता न ऐकता वाळी[3]. १००
पवनसुतशिशुपणींचें अत्यद्भुत चरित मुनिमुखें सेवी,
सानुज राम प्रभु बहु हर्षे, वसुधासुता हि ती देवी. १०१
शक्रयमपाशि[4]धनदप्रमुख सकळ लोकपाल यश गाती,
जी सुखसमृद्धि न कधीं झाली, होय प्रजांसि वरागा ती. १०२
हय रथ गज शिबिका तों प्रभुच्या राज्यांत पौर वागविती,
नागरिकांच्या वर्गा गावुनि गीतज्ञ नित्य जागविती. १०३
शिबिरें श्रीसाकेताभवतीं शोभति असंख्य भूपांचीं,
पौरांचीं जीं रूपें तीं बिंबें गमति देवरूपांचीं. १०४

---

१. आपल्या चरणकमलसंबंधीं भ्रमर. २. सहस्रार्जुन. ३. बगळलें नाहीं. ४. वरुण. * प. लि. हस्तदोष–म्हणें.

स्वर्गस्थ शरण्य[1] शिबि प्रभुयश परिसुनि म्हणे, "मम नगातें
नंदनवनस्थितातें हें[2] म्हणतें 'मत्पदीं रम, न गा तें.'" १०५
सानुजरामप्रभुचे सद्गुणमणिराशि पुत्र जे आठ
ते कुशलवप्रमुख गुरुसम चि सदा, सांग वेद ज्यां पाठ. १०६
रविशशिकुलज नृप बहु, श्रीरामाचें परंतु शुचि राज्य,
वरमहित अमृतसरसें, तदितर तें होय जेंवि रुचिराज्य[3]. १०७
जो प्रभु शिला समुद्रीं नळकपिस निदेश करुनियां तारी,
पावनयशें प्रजांचें त्राण भवीं त्यासि काय हो! भारी? १०८
वाल्मीकिशिष्य होउनि जोडिति हितकाम हात, पाठ कवी
कुशलव करिति विभुयशें; षड्रिपु नारद महातपा ठकवी. १०९
'शिवरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ११०

इति श्रीशिवरामायणं संपूर्णं ।

---

# उमारामायण*

(गीतिवृत्त)

उत्सव चरितें द्याया निर्जरगोब्राह्मणांस विश्वास,
मायानर हरि होय स्वपदीं स्थापावयास विश्वास. १
उत्पन्न होय दशरथसदनीं, अतिरम्य देह च्यार धरी,
माता तिघी जगद्गुरु धन्या होवूनि सुगुण पुत्र करी. २
उत्तमतम राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न हीं धरी नावें,
मावें सुख न मनीं, अघ ज्याच्या श्रवणें हि तत्क्षणीं जावें. ३

---

१. रक्षणकर्ता. २. प्रभुयश. ३. साजुक तूप. * या काव्यांतील गीतीच्या पहिल्या अर्धाच्या आरंभीं 'उ' आणि दुसऱ्या अर्धाच्या आरंभीं 'मा' असे वर्ण योजिले आहेत म्हणून यास 'उमारामायण' असें नांव दिलें आहे.

उर्वीपतिला[*] कौशिक मुनिवर भेटे, सलक्ष्मणा रामा
मागे मखावना, दे, दशरथ करि पूर्ण साधुच्या कामा. ४
उपदेशी गाधिसुत क्षुत्तृड्बाधा शमावया रामा
मार्गीं बळा अतिबळा शत अस्त्रें सानुजा रमाधामा. ५
उग्राकारा चंडी दुर्वृत्ता ताटका वनीं रामें
'मार' असें मुनि वदतां, गुरुवचनें मारिली घनश्यामें. ६
उद्दाम निशाचरबळ आलें सिद्धाश्रमांत तें सर्व
मारी, मखसिद्धि[1] करी, प्रसन्न बहु होय मुनि जसा शर्व. ७
उद्धरुनि अहल्येतें जावुनि मिथिळेसि मुनिवरासहित
मानुषरूप प्रभुवर मोडी जें रुद्रधनु जगन्महित. ८
उज्ज्वळगुणा क्षितिसुता, होतां पण पूर्ण, हर्षली आली,
माळा प्रभुच्या कंठीं प्रेमें पूर्वीं जसी तसी घाली. ९
उचित कुशिकसुत सांगे जनका, 'व्हाया जगत्रयीं[2] धन्या
मान्या द्याव्या रामावरजां पूजुनि तिघां तिघी कन्या.' १०
उपयम नृप करि विधिनें, कन्या चवघांजणांसि दे चवघी,
माहात्म्यप्रोत्साहित अर्पी संपत्ति आपली अवघी. ११
उग्रप्रभुचा[3] शिष्य[4] क्रोधें गांठी पथांत देवास,
मारूं पाहे जो त्या स्वपदीं सावध करूनि दे वास. १२
उरुमोहमग्न दशरथ सुतविजयें सावधान होय मेहें,
मानुनि पुनर्भव म्हणे, 'साध्वस[6] देईल काय हो! यम हें?' १३
उदयें पतिविजयाच्या साकेतें स्वर्ग ही उणा केला,
मातुळ भरत रिपुघ्न प्रेमें घेवुनि निजालया गेला. १४
उपरत[7] नृप धरि इच्छा युवराज[8] वरात्मजा करायाची,
मानवती कैकेयी लोभें पूर्वीं दिल्या वरा[9] यांची. १५

---

१. परलिखित हस्तदोष—शिद्धि. २. परलिखित हस्तदोष—जगत्त्रयीं. ३. महादेव. ४. परशुराम. ५. तेजानें. ६. भय. ७. संसारास कंटाळलेला. ८. रामाला. ९. याचना करी, मागे. * दशरथाला.

“उत्सृष्ट[1]भोग वल्की राम वनीं निरत अब्द चवदा हो,
माझा सुत राज्य करू, व्हा सत्य, ‘अवश्य’ शब्द च वदा हो!” १६
उद्विग्नचित्त दशरथ ‘हाय!’ म्हणे, सत्य सुत हि यां[2] इष्ट
मानुनि ‘दिष्ट[3] सुदुस्तर’ धीर हि बहु विकळ होय तो शिष्ट. १७
उत्साहें राम निघे गुरुचा गुरुधर्म जो तदवनातें,
माना वैकुंठाच्या नांदोनि करावया पद वनातें. १८
उच्चत्व सदारानुज भगवान् दे चित्रकूटशैलास,
मानी परम प्रिय सख वसतां जगदीश यास कैलास. १९
उत्क्रमण प्राणांचें राज्याच्या होय रामसुतशोकें
मालिन्य पुरें राष्ट्रू वरिलें केवळ न याचिया ओकें[4]. २०
उत्कृष्टवेग दूत प्रेषुनि भरतासि सचिव आणविती,
माता येतां चि तया राज्यश्रीप्राप्तियुक्ति जाणवि ती. २१
‘उद्वृत्ते! निर्लज्जे!’ ऐसें तीतें म्हणे, बहु क्षोभे;
मानिति बहु साधु तया, शुद्धगुरुप्रेमसद्गुणें शोभे. २२
उठला जननीपासुनि कौसल्येच्या गळां भरत पडला,
मानस शुचि समजुनि ती समजावी, शिशुतसा चि बहु रडला. २३
उत्तरकार्य पित्याचें करुनि यथाविधि, न राज्य करि, सोडी;
मातेचें गुरुचें ही वचन प्रभुभक्त भरत तो मोडी. २४
उत्कंठितचित्त निघे गुरुजननीसचिवपौरबळसहित
मार्ग न दे प्रभुसख गुह, मानी भरता निषादपति अहित. २५
उतरी मग तो सुतरी देवुनि गंगेंत समजतां भक्त,
मासा भरत, हृद विभु राम, भरद्वाज समजला व्यक्त. २६
उशनासा[5] गुरुसा मुनि सुविचक्षण मग निरोप दे, पावे
मापतिस चित्रकूटीं, ब्रह्मांडीं या सुखें न तो मावे. २७
उदकें पिंडें आर्धीं प्रभु ताता दशरथा स्वयें तर्पी,

---

१. टाकिले भोग ज्यानें असा. २. दशरथाला. ३. दैव. ४. स्थानें, गृहें. ५. शुक्राचार्यांप्रमाणें.

माथां हुंगुनि सांत्वुनि भरता पदपूत पादुका अर्पी. २८
उत्तप्तहृदय परते, स्वपुराबाहेर भरत तो राहे,
मानसशरीरनियमी[1] वन्यांशी[2] उष्ण वृष्टि हिम साहे. २९
उडुपति जसा चकोरा, बहु निववी अत्रिला तसा राम.
माहेर चि अनसूया भासवि सीतेसि आपलें धाम. ३०
उद्धार विराधाचा करि, शरभंगा मुनीस दे सुगती;
माधुर्यें प्रभुच्या मुनिवर्य सुतीक्ष्णादि बहु सुखें फुगती. ३१
उदधि प्राशी जो त्या भेटे, शस्त्रें मुनींद्र दे तो या,
मानी जटायुतें गुरु, तत्सूक्ता जेंवि तृषित घे तोया. ३२
उटजीं गोदातीरीं पंचवटीमाजि राहिला राम,
मायारूपवती तों शूर्पणखा धरुनि ये मनीं काम. ३३
उशिर न सौमित्रि करी, तत्कर्णघ्राण सदसिनें कापी;
माराया तद्भ्राता खर ये सकटक हि तो, मरे पापी. ३४
उच्छेद जनस्थानस्थितसैन्याचा दशास्य तो परिसे,
मानी दाशरथि प्रभु विश्वप्रिय परम सदय ही आरिसे. ३५
उच्छृंखळ[3] खळ मायाकनकहरिण करुनि आग्रहें धाडी,
मारीचातें सीतादेवीच्या दृष्टिला वनीं पाडी. ३६
'उत्तमरूप मृग धरा' ऐसें प्रार्थी प्रिया, निघे राम;
मागें लक्ष्मण ठेवी सीतासंरक्षणा घनश्याम. ३७
उरवाया निजजीवित कपटमृग पळे वनांत दूरवर,
मारी शर तन्मर्मीं चिंतुनि सुरकार्य सर्वशूरवर. ३८
उच्चस्वरें म्हणे 'हा सीते! हा लक्ष्मणा!' असें खोटा,
मानी त्या हाकेला ऐकुनियां घात जानकी मोटा ३९
उद्धैर्यां[4] सौमित्रिस 'धांव' म्हणे जानकी, वदे तो हें,
'मायामृग वदला, न प्रभु, तव मन देवि! चळ नसो मोहें.' ४०

---

१. मनाचें आणि शरीराचें नियमन न करणारा. २. वनांतील फळेंमुळें भक्षणारा ३. पृ. २३ टीप ५ पहा. ४. गेलें आहे धैर्य जिचें ती.

उलटें समजे सीता, अतिकटु वचनें तयास आयकवी,
मानी बहु दुःख, निघे सोडुनि उटजा म्हणोनि 'हाय!' कवी. ४१
उदिताश्रु सुमित्रासुत जाय प्रभुला स्वदुःख कळवाया,
मागें तों दशमुख ये, न करी श्रीतें विलंब पळवाया. ४२
उडवी रथ खळ गगनीं, श्री निजपतिदेवरश्वशुरनामें
मारी हाका, धांवे गृध्रेंद्र जटायु दुष्टवधकामें. ४३
उरवी न रथ बळ धृति, क्षतविकळ दशाननासि करि, तोडी
मान भुज श्मश्रु कच, असुनि खळ श्रीस, घाबरे, सोडी; ४४
उतरुनि महिवरि सीता खळ खड्गें गृध्रपक्षति च्छेदी.
मानधन जटायु वधू नेतां अत्यंत जाहला खेदी. ४५
उत्तरपटीं अळंकृति बांधुनि कपिपंचकीं सती सोडी;
मारुतसा ने श्रीतें लंकेंत स्वकुळहानितें जोडी. ४६
उष्णांशुकुळवतंसा[1] लक्ष्मण सीतोक्त काननीं सांगे,
मागें धांवे[2], बोले, 'हा! वदलिस सुमुखि! कटु असें कां गे!?' ४७
उद्वस[3] उटज पहातां जगदीश स्त्रैणसा म्हणे 'हाय!'.
मानुषभाव चि दावी, वन धुंडित पितृसखाकडे जाय. ४८
उदकें स्ववल्कलांचलवातें[4] सावध करी, तया वदवी,
मागिल सोडी प्रभु तो, गुरुशोकाची धरी नवी पदवी. ४९
'उन्मत्तें दशवदनें सीता नेली' असें कथी, लक्ष्मी
मासर्वस्वमुखार्ते, अंकीं प्रभुच्या तनु त्यजी पक्षी. ५०
उत्संगीं शिर, दृष्टि प्रभुच्या वदनीं, असें जया मरण,
मान्य दशरथाहुनि हा, याचें गतिहेतु सेवटीं स्मरण. ५१
उत्तरकार्य खगाचें करि दाह श्राद्ध मुक्तिचा दाता,
मागावें या प्रभुला; याचें यश सर्व ही तरे गाता. ५२
उद्धरुनि कबंधातें शबरीतें मग मुकुंद गति दे हा

---

१. सूर्यकुलशिरोभूषणा (रामास). २. हस्तदोष–धावें. ३. ओस. ४. आपल्या वल्कलाच्या पदराच्या वाऱ्यानें.

मानी इच्या विमानीं पाहुनि अत्यंत रम्य रीति[1] देहा. ५३
उत्फुल्लसरोजवना हंसमधुव्रत[2]निनादिता पंपा
मार[3]विकार प्रकटुनि विरहीं प्रभुच्या मनासि दे कंपा. ५४
उत्कंठित कामीसा स्मरुनि श्रीतें विलाप राम करी,
मात्सर्य श्रीचें श्री पंपेची काय ती मनांत धरी? ५५
उठवी प्रभुला सांत्वुनि लक्ष्मण, दे धैर्य संगरीं, 'अरिला
मारूं चाल, सुकंठा भेटों, आर्या! मनांत जो धरिला.' ५६
उमगाया सुगळातें जातां, तेणें हि धाडिला शोध,
मारुति निवोनि निववी भेटवुनि प्रभु इनात्मजा[4] योध. ५७
उष्णकरसुत प्रभुसीं मैत्री करि, धन्य रवि तया भावी;
माणिक्यादिमणिमय श्रीचे नग सोत्तरीयपट दावी ५८
उत्कलिका[5] प्रभुची तो दूर कराया स्वयें करि पणातें.
मारी प्रभु शक्रसुता, जो धरि भक्तानुजीं अरिपणातें. ५९
उपकार करि सख्यावरि देउनि कपिराज्य दाशरथि भारी,
माहेंद्रि[6] मथुनि सुगळा, नक्र वधुनि करिवरा तसें तारी. ६०
उतरायी व्हाया, कपि धाडी श्रीचा करावया शोध
मारुतिस, करी संपात्युक्तें विधिपुत्र जांबवान् बोध. ६१
उसळे गगनपथें, घे न विसांवा उपगतीं[7] हि मैनाकीं.
मारी[8] सुरसेसि मुखीं शिरुनि, निघे हर्ष होय तें नाकीं. ६२
उदरांत सिंहिकेच्या सिरुनि तिला वधुनि सिंधु शतगावें,
मारुतसुत गोष्पद करि, हें यश होवूनि यासि नत गावें. ६३
[उतरीं[9]] लीलालेशें आधीं लंकाधिदेवतागर्व,
मार्जारसा मरुत्सुत धुंडाळी पुर दशास्यगृह सर्व. ६४

---

१. सुख. २. भ्रमर. ३. मदन. ४. सूर्यपुत्र सुग्रीवास. ५. उत्कंठा–**पंत**. ६. वाळीस–**पंत**. ७. प्राप्त झालेल्या अशा. ८. हस्तदोष–**मानी**. ९. या पदाच्या ठिकाणीं मूळांत 'रात्री' असें अयुक्त पद आहे, पण तें हस्तदोषानें लिहिलें गेलें आहे असें म्हणावें लागतें.

उपवन अशोकनामक जें, त्यांत श्रीस पुण्यवान् पाहे,
[1]माकंदीं पिकसा तो प्रमुदित कपि शिंशिपा[2]नगीं राहे. ६५
उतला वीर्यें, रात्रि श्रीतें प्रार्थावया कुधी आला,
मातेला 'मन्महिषी हो' ऐसें मूढ बोलता झाला. ६६
उन्मार्गगा तया ती धिक्कारी श्री, म्हणे, 'वराका[3]! मी
मानधनसुताभार्या; बुडवि धनकुळा कळेवरा कामी.' ६७
उरगमद मयूरीनें श्रीनें खळमद तसा लया नेला;
माघारा विगतप्रभ होउनि दशकंठ तो कुधी गेला. ६८
[4]उदयाचळतिळककुळा वर्णुनि दे जानकीकरीं मुद्रा,
मारुति गमे प्रभुविशिख देवीस, न ती गणी परा क्षुद्रा. ६९
उचित कथुनि संदेश श्री चूडामणि निरोप दे कपिला,
मानवुनि महत्कृत्या आशी ही होय जी महाकपिला. ७०
उपडी अशोकवनगत बहु पुष्पित फलित तरु लता भारी,
माळी रक्षक राक्षसबळ अक्षकुमार ही रणीं मारी. ७१
उद्धत घननाद बळक्षय होतां ब्राह्म योजिता झाला,
मानद कुतुकी कपि तो गांजाया अरिस सांपडे त्याला. ७२
उन्मत्त निशाचर तो बांधुनि ने कपिस रावणाजवळ,
माकड मानुनि कोपें दशमुख पाहे करावया कवळ. ७३
[5]उत्सिक्ता दशकंठा अल्पपराधें विनाश जो भावी
[6]मारुति कळवि, म्हणे, 'दे सीता, गौरी शिवींच शोभावी.' ७४
उपसी असि खळमणि नयनिष्ठुर वदतां कपीस माराया,
'[7]मा मा' म्हणे बिभीषण, वारी यत्नें निजाग्रजा राया. ७५
उजवा घालावा जो वंदावा त्या हि हरिजना तुच्छ
मानुनि खळ तैलार्द्रें वस्त्रें वेष्टूनि पेटवी पुच्छ. ७६
उसळे प्रभुवरशरसा नेतां फिरवावया पुरींत बळें;

---

१. आम्रवृक्षीं. २. सिसव्याच्या वृक्षाखालीं. ३. हे नीचा! ४. सूर्यवंशाला.
५. गर्विष्ठाला. ६. हस्तदोष—मारुत. ७. नको नको.

माड्या प्रासाद कनकमय जाळी, खिजविला बळींद्र खळें. ७७
उल्लंघुनि जलनिधितें श्रीचूडामणि नमूनि दे हरितें,
मारुति भरी सुखें जें प्रभुचें होतें श्रमूनि देह रितें. ७८
उर लावूनि उरासीं मारुतितें प्रभु भुजद्वयें कवळी,
मान्य त्रिजगांत करी, सर्व ब्रह्मांड या यशें धवळी. ७९
उदधितटातें पावे सर्वसुरांशप्लवंगबळसहित
मानधन बिभीषण ये शरण, तया राज्य दे करी महित. ८०
उपळांहीं सेतु रची शतयोजन लांब, रुंद दशगावें;
'मागें झालें न पुढें होइल' कवि म्हणति 'हें चि यश गावें.' ८१
उखळाया सीताधृतिमेरु प्रभुशीर्षचाप खळ दावी,
मायेनें मन मोहीं बुडवी, बहु 'हा!' म्हणावया लावी. ८२
उडवी मोह बिभीषणभार्या सरमा क्षणांत भीतेचा
मातेचा, कन्यासी जोडी परम प्रसाद सीतेचा. ८३
उतरुनि सागरपारा पावे प्रभु बंधुसुगळबळसहित,
मारामारी प्रथम चि करुनि सुकंठें विडंबिला अहित. ८४
उशनासा[1] गुरुसा कवि अंगद सांगे, 'दशानना! राम
माथा पदीं वहातां, तुज देइल अभय, बा! करीं साम.' ८५
उर्वारुक[2] काळमुखीं होणारा दुष्टधी कसा वळतो?
मारावयासि धरवी सांगुनि चौघां निशाचरां खळ तो. ८६
उडुनि भुजद्वय झाडुनि पाडुनि अंगद पळांत धरित्यांतें
माना लववायाला लावी, जे घनरवाद्रि अरि त्यांतें. ८७
उग्रतर समर करिती कपिराक्षसवीर, होय जरि मोड,
मानी दशमुख न म्हणे, 'हृदया! अहिता दुराग्रहा सोड.' ८८
उरगमयमहादारुणपाशांहीं सानुजा अजा बांधी,
मायावी मेघध्वनि, सीतेची विकळ होइना कां धी? ८९
उरगाशन[3] मुक्त करी, मोहव्रणवेदना हरी, रक्षी;

१. मागें गीति २७ पहा. २. वाळुक, कांकडी. ३. गरुड.

[1]माक्षिक पिपीलिकांला प्रभुला, प्रिय होय तो तसा पक्षी. ९०
उठवुनि वटकर्णांतें दशमुख सर्वांहितक्षया धाडी;
मारुनि कपिबळ सुगळा धरुनि फिरे, शेष संकटीं पाडी. ९१
उसळे सुटोनि सावध होतां तद्घ्राणकर्ण ही खंडी,
मागें फिरे, वधी, गिळि कपिबळ, बहु कांपवी जसी थंडी. ९२
उन्मूळी त्या त्रिभुवनहृ[2]च्छल्या प्रभुवर स्वयें चि रणीं;
मार्तंडाच्या प्रभुच्या बाणीं जें तेज तें नसे किरणीं. ९३
उद्दामें मेघरवें प्रभुसह सुगळादि सर्व ही खिळिले,
मारुति दुजा बिभीषण हे मात्र न दोन कश्मळें गिळिले. ९४
[3]उल्काधर हे शोधिति सर्व रण, तयांत जांबवान्कांहीं
मारुतिस पुसे, कथितां ‘कुशळ’ म्हणे ‘तारि बळासि भय नाहीं.’ ९५
उक्तो[4]पाया नमि त्या, कैलाससमीप वातभू जाय,
मागें घडींत घेउनि ओषध्यगशृंग ये महाकाय. ९६
उठवी विशल्य निर्व्रण निजलेसे प्रभुसमेत सर्व कपी
मारु[5]ति महौषधींच्या गंधें, हें सुशय कोण साधु न पी? ९७
उलटे तसा चि शृंग स्थानीं स्थापुनि घडींत ये मागें;
मातेला ताताला धन्यत्व दिलें जगीं महाभागें. ९८
[6]उच्छेद करित सुटले कपिभट तेव्हां रणांत खवळून,
मारणपण करुनि निघे वनरव निज[7]जन्महेतुजवळून. ९९
[8]उभवुनि रणांगणांत त्रिदशमुनिमनासि सत्य जी वाटे,
मायामयी जनकजा मारी, प्रभुचा हि बहु गळा दाटे. १००
उकलुनि बिभीषणानें सर्वांचा भ्रांतिपाश मग मोटा,
मायावी मारविला लक्ष्मणहस्तें रणांत तो खोटा. १०१
‘उपजावा रथ होमीं, तेणें व्हावें चि निश्चयें अमर,

---

१. मध. २. पृष्ठ २३ टीप ५ पहा. ३. मशालजी. ४. सांगितला उपाय ज्यानें त्याला. ५. हस्तदोष–**मारुत**. ६. पृष्ठ २३ टीप ५ पहा. ७. रावणापासून. ८. उभी करून.

मारावे नर वानर लीलेनें विधिवरें करुनि समर. १०२
उद्योग असा करितां विघ्न करुनि बंधुपुत्र हारविला,
मारविला यत्नानें, आवडला फार साधु हा रविला. १०३
उत्तप्त पुत्रशोकें होवुनि दशकंठ जानकीनाशा,
मानी जाय अशोकीं, प्रेक्षवलें खिजुनि ज्या न कीनाशा. १०४
'उपरम[1] होय तशा अघकर्मांपासुनि' असें वदे मंत्री,
माघारा जाय खळ हि, कीं प्रेरक राम तत्तनू[2] यंत्री. १०५
उद्भट चतुरंग बळ प्रेषी बहुकोटि, रामभद्र वधी;
मारवि बंधु सुत सचिव, धरि दुष्टाची तरी हि न द्रव धी. १०६
उर शक्तिनें बिभीषणरक्षकसौमित्रिचें रणीं फाडी,
मारुति उठवि पुन्हा त्या प्रभुच्या प्राणासि, अरि जया पाडी. १०७
उसरीसी[3] वाळविली जेणें श्री, तद्वधा सजे राम;
मातलि बसवि हरिरथीं, पुरवी दशमुखवधें जगत्काम. १०८
उन्नाद दिव्य दुंदुभि होय कुसुमवृष्टि नृत्य नुति गीत,
माजे आनंद जगीं, झालें खळभीत साधुमन शीत. १०९
उदक दशास्या देववि, लंकेंत पदीं बिभीषणा स्थापी,
मारुतिमुखें कळवि जय, सीता तें अमृत धरुनि आस्था पी. ११०
उद्यज्ज्वाळहुताशीं[4] शिरली गंगाहृदीं तसी देवी,
माता विधिची स्तोत्रा प्रभुच्या अंका महोत्सवें सेवी. १११
उत्कंठित दशरथ घे भेट प्रभुची निवोनि 'वत्स! लहा[5]
माझें राज्यपद' म्हणे, प्रेमें कारि मान्य भक्तवत्सल हा. ११२
उठवी रणमृतकपिबळ भगवत्प्रियकाम अमृत वर्षोन,
मातलिसारथि घनरवदशमुखनिधनें प्रकाम हर्षोन. ११३
उजवी भाग्य बिभीषण रामनिदेशें ससैन्यसुगळातें
माळांगदपदकांहीं शोभवि, निववि स्वनेत्रयुगळातें. ११४

---

१. परावृत्ति. २. त्याची (रावणाची) तनू हा गाडा. ३. वाळलेल्या भाजी-प्रमाणें. ४. प्रज्वालित अग्नीमध्यें. ५. पाव.

उत्सुकचित्ता भरता भेटाया पुष्पकीं बसे राम,
मान्य सुकंठ बिभीषण बळ हि विमानांत घे घनश्याम. ११५
उरकुनि सुरकार्य निघे, सेतुपथा श्रीस दाखवी सारा,
मानार्हा आणविली श्रीनें त्या पुष्पकीं प्रिया तारा. ११६
उद्धव शत्रुघ्नभरतगुरुमातासचिवपौरवर्गातें
मारुतिमुखें प्रथम, मग आपण दे सविधि शक्रभर्गातें. ११७
उत्तमलक्ष्मीं प्रभु घे करवुनि राज्याभिषेक, मह[1] भूतें
मानाधिक दे, सर्वें धन्यें करि पशुखगांहिसह भूतें. ११८
उधळी घन जेंवि जळें, वस्त्रें मणिभूषणें तसीं राम.
माहात्म्य दे सुकंठा सबळा लंकेश्वरा घनश्याम. ११९
उपमारहित प्रेमें गौरविला भक्त विश्वपितरांहीं[2]
मारुति सत्कार तसा वरिला नाहीं जगांत इतरांहीं. १२०
उदय यशश्चंद्राचा प्रभुच्या हरि सर्वजनचकोरमती,
मागुनि वर या चि रसीं म्हणुनि बहुत 'अमृत ही नको' रमती.
'उमारामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें. १२२

इति श्रीउमारामायणं संपूर्णं ।

---

# *काशीरामायण

(गीतिवृत्त)

कारुण्यामृतनिधि जो मधुकैटभकाल विश्वपाळ हरी
शीलाढ्य दशरथातें तो प्रभु होवूनि पुत्र धन्य करी. १

---

१. उत्साह. २. राम व सीता यानीं. * या काव्यांतील प्रत्येक पद्यांच्या पूर्वार्धांत 'का' हें अक्षर व उत्तरार्धांत 'शी' हें अक्षर मिळून भरतखंडांतील जें प्रसिद्ध पुण्यक्षेत्र 'काशी' याचा संनिवेश केला आहे म्हणून याला कवीनें 'काशीरामायण' असें नांव दिलें आहे.

कारि कार्य गाधिजाचें राक्षस मारूनि यज्ञ पाळूनी.
शीघ्र सुख अहल्येतें दे चरणरजें चि पाप जाळूनी. २
कार्मुक महेश्वराचें सज्य करुनि राम ओढितां मोडी,
शीतेतें[1] वरुनि प्रभु कविवरशतगीतकीर्तितें जोडी. ३
जनक तिघे प्रभुचे जे अनुज तयां कन्यका तिघी ओपी,
प्रभु भार्गवा जिणी, जो पथ आशीविषतसा[2] धरी कोपी. ४
रावणवधकाम अमर घालिति भरतप्रसूमनीं भेद,
धारि सत्यव्रत रघुकुळकुमुदशशी दशरथ प्रचुर खेद. ५
अभिषेक अनादरुनि प्रभु रक्षायासि सत्य जनकाचें
जाय वना सीतेसह लक्ष्मण हि, वशीश[3] न कारि मन काचें. ६
शोकें भूप मरे, प्रभु अर्पी भरतासि पादुका जिववी,
नाशी प्रजाधि, धर्मे न्यायें साधूंसि साधु तो निववी. ७
दंडककाननवासी सस्त्रीकें सानुजें पदीं नमुनीं,
श्रीशें निववुनि केले सुतपोराशी जगीं अदीन मुनी. ८
अत्यंत कामुकी जी मायेनें रूप चांगलें प्रकटी,
केली गोदातीरीं दुर्बुद्धि निशीथिनीचरी[4] नकटी. ९
हंसावारि काक तसा प्रभुवरि ये खर कुधी तिचा भावू,
प्रभुशर म्हणति, 'पलाशी[5] त्या[6] कविजन वायु आपणा भावू.' १०
लंकापति शूर्पणखाभगिनीवैरूप्य जें न तें साहे,
दुःशील कनकहरिण प्रेषी, त्या स्वाश्रमीं सती पाहे. ११
रघुपतिस मृग धराया जनकाची नंदिनी[7] वनीं धाडी,
विद्ध हरिण आर्तरवें शीतामति शोकसागरीं पाडी. १२
'कांहीं प्रभुसि भय नसे,' विनवि असें जो यथार्थ सामर्पटु[8],

---

१. येथें काशी हें उद्दिष्ट नांव साधण्यासाठीं कवीनें 'स' चा 'श' केला आहे, हें सांगावयास नको च. २. सर्पाप्रमाणें. ३. जितेंद्रियश्रेष्ठ. ४. राक्षसी शूर्पणखा. ५. वृक्ष—पंत ६. त्या राक्षसास. ७. हस्तदोष—नंदिनीं वनी. ८. तंटा मिटविण्यांत प्रवीण असा लक्ष्मण.

क्लेशी करुनि श्री त्या सौमित्रिस घालवी वदोनि कटु. १३
कामी क्रोधी लोभी दशमुख पाहूनि एकलीस हरी,
होय विरथकरगृध्रपपक्ष च्छेदूनि कांदिशीक अरी. १४
शोकाकुळ होय प्रभु तातप्रियसखजटायुच्या पातें,
खळकृत परिसुनि, विधिनें जळ दे, नाशी पितृव्यतापातें. १५
जेंवि विराधा काळा सुगति, कबंधा हि दे, न कां मग ती?
शबरी तारिल, जीच्या शुचिशीला नित्य मानवे जगती. १६
वायुसुता सुगळा सुखरोमांचितकाय कारि दयाजळधी,
मग वाळीतें नाशी, ज्याची वैरा विटेचिना पळधी. १७
मारुति शोधावी श्री हें स्वामीचें करावया कार्य,
लंघी, अलंघ्य गृ[2]ह तारि, पा[3]शी 'विजयी असो' म्हणे 'आर्य'. १८
मैनाका चकित करी, ठकवी सुरसेसि, सिंहिका मारी,
लंका जिंकी, मेळवि यश सित शीतांशुहूनि जें भारी. १९
सीतेसि अशोकवर्मी लंका शोधूनि मारुती पाहे
मग ता[4]दृशी खळाची रीति हि, धैर्यें उगा चि हा राहे. २०
रघुनायकासि वर्णुनि, दशमुख जातां, सतीस दे मुद्रा,
मीनासि जसी दा[5]शी दावी निजशक्ति कपि तया क्षुद्रा. २१
वन बळ अक्ष मथी, घननादा सांपडुनि पूर्णकाम करी,
दशवदना उपदेशी हित, तो तत्पुच्छ करवि दीप्त अरी. २२
कांचनमयी पुरी ती काष्ठमयीसी च जाळिली हारिनें,
शीतल नेत्रसहस्र प्रेक्षुनि पुरदाह मानिलें ह[6]रिनें. २३
कपिदत्त श्रीचूडामणि जीवाहुनि नि[7]का बुधाधारा
झाला, संदेशोक्ति प्राशी प्रेमें जसी सुधाधारा. २४
प्रभुवर परमप्रेमें भेटे त्या साधुसेवका हरिस,
मानी हित बहु तद्वपु कर्पूरोशी[8]रचंदनांपारस. २५

---

१. भयद्रुत–**पंत.** भयानें जो पळतो तो. २. वरुणाचें वर=जलनिधि. ३. वरुण–**पंत.** ४. तशा प्रकारची. ५. धीवरस्त्री–**पंत.** ६. इन्द्रानें. ७. खरा. ८. वाळा.

देवांशामितकीशानीकार्णव[1] सुगळसह जलधितीरा
ये, तों नमी बिभीषण परदेशीं दीनसा चि रघुवीरा. २६
लंकाराज्य तया दे, भी सागर, करवि नळकरें सेतु,
शीर्षीं धारि बहुमानें पुष्पांचा हारसा चि सुखहेतु. २७
मायामय कार्मुक शिर विभुचें दावी दशास्य सीतेला,
सरमा कथि, 'गुर्वांशी स्मर,' हें सावध करूनि भीतेला. २८
प्रभु उतरे पारीं, तो न वळे कापुरुष[2] सुगळकृतमथनें
दशशीर्ष अंगदाच्या जें सन्मत सुहित साम तत्कथनें. २९
आजि प्रवर्तली जी अत्युत्साहेंकरूनि काळाची
ती द्वादशी च, वेचे सेना प्रतिदिन पलाशपाळाची. ३०
मायावी शतमखजित्सानुजरघुनायकासि बद्ध करी,
त्रिजटा श्रीला धृति दे, आशीविषपाश पक्षिपाळ हरी. ३१
काळोग्रा घटकर्णा प्रभु मारुनि, उठवि हर्ष अमरांत,
सुगळ शशीसा झाला जो क्षणभरि राहुरूप समरांत. ३२
मायावी घनरव करि कातर सुर, खिळुनि सकळ, धरि गर्व,
शीघ्रानीत[3]महौषध्यगशृंगें उठवि पवनसुत सर्व. ३३
मायामयी जनकजा दावी, घननाद शिर तिचें कापी,
मोह बिभीषण वारी, वधिला तो शीघ्र लक्ष्मणें पापी. ३४
सुतशोकाकुळ दशमुख नग्न करी खड्ग, उग्रता मिरवी,
शीतेसि वधूं धावे, परि सचिव सुपार्श्व कवि तया फिरवी. ३५
रघुनायका वधाया धाडी चतुरंग सैन्य बहुकोटी,
तो दुःशील दशमुख प्रभुवर कल्पानळीं बळें लोटी. ३६
असकृद्भंगत आला, परि काळग्रस्तबुद्धि तो क्रुद्ध
क्रूर कुशील दशानन उत्पात न गणुनि ये, करी युद्ध. ३७
पाकारा[4]तिस भिववी, सौमित्रिस शक्तिनें रणीं पाडी,
पुनरपि शीघ्र प्रभु तें आणाया शृंग वायुजा धाडी. ३८

---

१. अनीक=सेना. २. भ्याड. ३. आनीत=आणिलेल्या. ४. इन्द्रास.

घटिकार्धांत चि आणी, तें चि शिखर लक्ष्मणा करी सिद्ध,
विद्ध न झाला वाटे शीलें तेजें शिखी जसा इद्ध[1]. ३९
सप्त अहोरात्र भिडे[2] श्रितकामदें[2] रथ वरूनियां हरिचा,
व्हाया मनोरथद्रुम अवकेशी[2] त्या सुराद्विजात्यरिचा. ४०
आकाशीं मुनि वदले, 'प्रभुमेघें सद्वनानळा[3]! शम रे!'
ब्रह्मास्त्रें तो वधिला, शत शीर्षें छेदितां हि जो न मरे. ४१
कैलाससत्यनाकाधिप सुर मुनि झांकिती कुसुमवर्षें,
गंधर्व गाति, नाचति देवी रंभोर्वशीप्रभृति हर्षें. ४२
ते वर्णिति विभुचें यश, कापुर किति? शारदेंदु ज्या लाजे,
जे राजर्षिवर हरिश्चंद्रौशीनरगयप्रमुख राजे. ४३
दशकंठोत्तरकार्यें प्रभु करवी, तदनुजा पदीं बसवी,
श्री दिव्य करी, पावक होय शशी, विभु तिला मनीं हसवी. ४४
ती मूर्तपावकानें पल्यंकीं बसविली धराकन्या,
विधि शिव वज्री पाशी यम धनप स्तविति दशरथा धन्या. ४५
रणमृतकपिकटकातें शक्र प्रभुच्या प्रिया जसें सुप्त
अमृतरसशीकरांहीं[4] उठवी जें प्रभुदयाधरा[5]गुप्त. ४६
'भरतावांचुनि न रुचे मज पूजा प्लवगनायका! सबळा.'
या प्रभुवचा बिभीषण शीर्षीं वे, जेंवि शिशु मुखीं कवळा. ४७
सदलंकार सुवस्त्रें त्यां सर्वांला हि साधु तो अर्पी,
दिव्यान्नें शीधुरसें[6] तांबूलें परम आदरें तर्पी. ४८
नमुनि बिभीषण अलकापतिचें पुष्पक विमान दे तेणें
प्रभुनें केलें शीघ्र स्वपुरा कपियातुनाथसह येणें. ४९
सेतु श्रीला दावी, ऐकाया विरहवृत्त विभु लावी;
ज्याच्या श्रवणें शीतळ व्हावी ब्रह्मज्ञवृत्ति हि भुलावी. ५०
देवी प्रभुला विनवुनि आणवि तारेसि पुष्पकामाजी;

---

१. प्रदीप्त. २. वंध्य—पंत. निष्फल. ३. साधुरूप वनाचा वणवा अशा! ४. अमृतरसाच्या तुषारांहीं. ५. भूमिः—पंत. ६. मद्य—पंत.

शीतेला बहु वर्णी स्वगुणें लाजवि सुरादिरामा[1] जी. ५१
भेटुनि भरता पुरवी काम प्रभु, होय सप्रिया[2] राजा;
जेंवि चकोरांसि शशी अमृतें तर्पुनि म्हणे, 'निजा साजा.' ५२
सबळ सुकंठ बिभीषण परमप्रेमें स्वयें अळंकारी,
करि पवनजीं बहु दया श्रीराम सशीते[2] नतकळंकारी[3]. ५३
शत्रुघ्न लवण वधि, करि कालिंदीतटमुनीष्ट सत्तम हा,
भरत हि गंधर्व कुमति कोटित्रय शीधुमांसमत्त महा. ५४
करि आठ पुत्र राजे, ने निजलोकाप्रति प्रजा, नाम
स्वप्रतिनिधि बसवि जगीं, स्वर्सुरनगाराम[4] सद्यशा राम. ५५
'काशीरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं आर्पिलें कृतवंदनें. ५६

इति श्रीकाशीरामायणं संपूर्ण ।

---

# गंगारामायण*

(गीतिवृत्त)

लक्ष्मीदृगंबुजार्चितचरण[5] प्रभु होय दाशरथि राम,
गाधिजगौतम यांचा पुरवी मखदार[6]रक्षणें काम. १
भस्म दृगंचळ[7] ज्याचा मदनातें करि, तदीय धनु मोडी,
सानुज राम सुगात्रीसीतादि जनकसुता सुखें जोडी. २
करि हुतभुगंतकोग्रा[8] भृगुरामा शीत कांत भूजेचा.

---

१. देवादिकांच्या स्त्रियांना. २. सीतेसह. ३. शरणागतांचें दोषहरण करणारा (राम). ४. भक्तकल्पद्रुमोपवन. * या काव्यांतील गीतीच्या प्रथमार्धांत 'गं' व द्वितीयार्धांत 'गा' वर्णांची योजना कवी केली आहे म्हणून याला 'गंगारामायण' हें नांव प्राप्त झालें आहे. ५. लक्ष्मी दृष्टिरूप कमलानीं पूजिले आहेत चरण ज्याचे असा (विष्णु) ६. स्त्री (अहल्या). ७. नेत्रकटाक्ष. ८. हुतभुक्=अग्नि.

कर्ता होय पित्याच्या आपलिया गाळिता[1] चि पूचेचा. ३
गंडूषसें[2] चि राज्य त्यजुनि निघे राम सानुज सदार
जाय वना, यश गाया करि, गातिस जडा असें हित न द्वार[3]. ४
शोकें भूप मरे, त्या कैकेयीतें म्हणे भरत गंजा[4],
तातक्रिया करि, धरी प्रभुचरणयुगा जसा मधुप कंजा. ५
प्रभुपादुका भरत घे, चातक न च जळमुगांतरा[5] साहे,
नंदिग्रामीं प्रभुगुण गात तपस्वी प्रजावना राहे. ६
अत्रिस वंदी प्रभु, दे अनसूया अतुळदिव्यगंधाची
स्वकरें उटी, कवच करि आंगा, स्त्री निवावि सत्यसंधाची. ७
जो परमदहर गंधद्विपसा[6] राक्षस विराध सीतेतें,
धरि त्या नागा हरिसे वधिती प्रभु सांत्विती हि भीतेतें. ८
जे दंडकवनवासी मुनि शुचिवागंगाचित्त[7] तच्चरण
वंदी निजोत्तमांगा लावुनि ज्याचें करी शिव स्मरण. ९
पितृसख जटायु गृध्रक्षितिपति गंभीर तो बरा मानें,
तातसा गौरविला गात्यां तारावयासि रामानें. १०
प्रभु जी श्रितगति सुखदा गंत्री[8] गोदा, तिच्या तटीं राहे,
त्या भुलवुनि भोगाया शूर्पणखा रावणस्वसा पाहे. ११
सौमित्रि शब्दगंधग्रहणेंद्रियगोळकें[9] तिचीं तोडी,
प्रभुसीं दशकंठासीं स्वागा झांकूनि वैर ती जोडी. १२
आगंतुक सर्वस्वक्षय न प्रेक्षी, सतीस तो दावी
कनकमृगातें दवडवि रक्षक हरि, ‘हा!’ म्हणावया लावी. १३
धांवे दूरदगंडज[10] विरथ करि अरिस, सतीस खळ सोडी,
वृद्धजटायुखगाचे पारि खड्गें पक्ष यातुपति तोडी. १४

---

१. वगळणारा. २. चुळेप्रमाणें. ३. द्वार. ४. मद्यगृह. ५. मेघाच्या वियोगाला. ६. गजविशेष; मस्त हत्तीप्रमाणें. ७. पवित्र आहे वाणी, देह व चित्त ज्यांचें असे मुनि. ८. वाहणारी. ९. कान आणि नाक. १०. दूरदर्शी जटायु.

दुर्विधिदृगतपातापास्तज्ञान[1] क्षमासुतेसि हरी
लंकेंत अशोकवनीं रोधी, आनंद बहु नगारि[2] धरी. १५
क्रीडानरसदृगंग[3] प्रभु जो तो कोणसा वदे 'चिर हा!'
पितृसखखगाचिया ही वत्सल साहों शकेचिना विरहा. १६
वधुनि कबंधा बसवी सुविमानीं देव गंतुकामा[4] हो!
तो गाय गुण, म्हणे, 'बा! सुगळा भेटुनि सदार रामा! हो.' १७
शबरी हि सद्बहुमता श्रीरामें गंडकीसखी केली,
नेली उत्तमलोका गात प्रभुयश मुखें सुखें गेली. १८
पंपातटीं वदे 'हा!' मग भेटे गंधवहसुता, सुखवी
सुगळा सखा करि, वधी वालिस कीं स्वानुगानुजा दुखवी. १९
कपिपति सुगळकपींतें जे गंतव्य[5]प्रदेश ते सारे
कथुनि म्हणे, 'सीतेतें त्या हि अधाच्या नगा पहा जा रे!' २०
शतयोजन सिंधु उडुनि लंकेला गंधवाहसुत पावे,
मैनाकलंघनादिक ज्याचे कविनीं प्रताप बहु गावे. २१
पवनसुत युगंधरसा[6] वाहे गुरुकार्यभार; ती लंका,
शोधी वेगानें, धरि शिरतां रावणगृहांत हि न शंका. २२
साधि अशोकवनीं तो शिरतां दशशतदृगंगनागीता[7]
गाढ विचक्षण मारुति पाहे प्रभुची प्रिया सती सीता. २३
तों रावण ये खाया कंटाळा पूतिगंधिसा[8] खोटा
प्रार्थी, 'सुख भोगाया महिषी हो, बहु हठीं तुझा तोटा. २४
धिक्कारी गंभीरा श्री न करी भस्म चरित वाढाया;
खळ खचरींस म्हणे, 'हित सांगा अथवा वधा चि[9] वाढाया.' २५
रावण गेल्यावरि दे प्रभुमुद्रा गंधवाहसुत तीतें,

---

१. दुर्दैवाच्या दृष्टीच्या कोपऱ्याच्या पडण्यानें हरण केलें आहे ज्ञान ज्यानें असा रावण. २. इन्द्र. ३. लीलेनें मानवरूप धारण करणारा (राम). ४. जाण्याची इच्छा ज्यास तो. ५. जाण्याजोगें. ६. जुंवाप्रमाणें. ७. इन्द्राची शची तिनें स्तविलेली (सीता.) ८. दुर्गंधाप्रमाणें. ९. भक्ष्यार्थ असा अध्याहार.

गावुनि कुशळ तिच्या घे आर्शींच्या तो सभाग्य सुत[1]तीतें. २६
चूडामणि दे, सांगे गंधव[2]तीनंदिनी निरोपातें,
प्रेमें म्हणे सदनुगा, 'अरिगिरि तव दृष्टिच्या विरो पातें.' २७
देवीतें नमुनि निघे गंधवहात्मज, अशोकवन मोडी,
झोडी मग चतुरंगा कटका, रावणसुताक्षशिर तोडी. २८
खळबळगं[3]जन कपिसुररंजन करि मथुनि अहित बहुलक्ष,
मग घनरवविध्यस्त्रा जय दे गाया कवींस रणदक्ष. २९
बांधुनि सभेसि नेला, गेला गंभीरबुद्धि तो उगला,
वदला गुरुसा जागा व्हाया जो कुमति वरमदें फुगला. ३०
'देवीं[4] प्रत्यर्पय रे! नो चेदंतं प्रमत्त! गं[4]तासि.'
तें ऐकुनि रागानें दशमुख घे खड्ग हनुमदंतासि. ३१
'दूत अवध्य' असें कथि दूरदृगं[5]चित बिभीषण कवीन.
'पेटवि पुच्छ' खळ म्हणे, 'प्लवगा! शासन रुचो तुज नवीन.' ३२
'फिरवा पुरींत' म्हणतां उसळुनि जलधिस दं[6]गांवरीं जाय,
गाजवि 'जयत्य[7]तिबलो राम' असें म्हणुनि कांड कपिराय. ३३
लंकापुरी पुरीसी तो मारुति हुतभु[8]गंचळीं घाली,
सुर म्हणति, 'आशुगानें प्रभुच्या पुरगति तसी च हे झाली. ३४
दशमुखगजमदगंडीं नख लावी कीशसिंह तो परते,
घनरव उगा चि राहे, 'हाय!' वदति बहु पलाश जे पर ते. ३५
पुच्छ समुद्रीं विझवी, श्रीस नमुनि गंधवाहपुत्र उडे,
प्रभुदूतविजयगानीं देवींच्या दाटले क[9]रांत चुडे. ३६
भुजगभुगं[10]डजसा ये, चूडामणि दे, निरोप कथि, वंदी,
त्या प्लवगा आलिंगी वर्णी तच्चरित विभु जसा बंदी. ३७

---

१. मालेला. २. सीता. ३ नाश. ४. अरे! देवीला समर्पण कर. न करशील तर, हे उन्मत्ता! तूं मेलास म्हणून समज. ५. दूरदृष्टि जनानीं पूजित असा. ६. दूर आकाशांत (?) ७. महाबलाढ्य राम विजयी होतो. ८. अग्नीच्या पदरांत घाली म्हणजे जाळून टाकी. ९. परलिखित हस्तदोष—कारांत. १०. सर्पभक्षक गरुडाप्रमाणें.

गंधवहसुतरथ प्रभु अंगदरथ लक्ष्मण प्लवंगबळें
घे सुगळ निघे, झाली भुजगाधिपमस्तकें हि [1]भारचळें. ३८
स्वजनभय दिगंतातें दवडाया, सिंधुच्या तटा पावे,
तों ये बिभीषण, नमी प्रभुच्या चरणांसि जे शिवें गावे. ३९
त्या दे राज्य नतप्रिय मृगमदसा प्रभुसि, अ[2]न्य गंधकसा;
करवि जगा हि तराया सेतु, तारि वळे न खळ, न अंध कसा? ४०
खळ शिर दावुनि रडवी श्री, रूपस्पर्शगंध सम पाहे,
सरमा म्हणे, 'सुगात्रि! च्छळ हा, त्वत्प्राणपति सुखी आहे.' ४१
जटिल [3]त्वगंबर प्रभु उतरे पारीं दशानना पाहे,
उडुनि सुगळ त्या मर्दी न तदागातें हरींद्र तो साहे. ४२
[4]पद्मजपरमादिगंबरलब्धवरमहासिमत्त तो न वळे,
अंगदमुखें प्रभु म्हणे, 'त्यज रागा, साम कर,' तऱ्ही खवळे. ४३
नळनीळगंधमादनमैंदद्विविदादि यूथपति भारी
प्रेरी सुकंठ राक्षस बहुकोटि करूनि संयुगीं[5] मारी. ४४
गजगं[6]डकशार्दूलप्रमुखांचे प्राण जेंवि हरि हरितो,
तेंवि कपींचे दशमुख रागानें रणमहोग्र हरिहरि तो. ४५
त्यातें हि प्रभु भंगी, रोधी गंभीरसत्व शरभव[7]नीं
जैसा मृगाधिपातें तुच्छीकृतसर्वसत्व शरभ वनीं. ४६
घनरव अहिनीं बांधी, वायु भुगंतक तशांत ये कामा,
मग कुंभकर्ण वधितां गाती शक्रादि सर्व सुर रामा. ४७
घननादें अनुजसह प्रभु खिळितां, गंधवाहसुत रक्षी,
प्रभु सारें उपकारें 'अनुगा[8] ही असुद गुरु' असें लक्षी. ४८
घनरव कृत्रिम सीता मारी, प्रभुगंड अश्रुनीं भिजवी,
प्लवगाधि हरि बिभीषण, सौमित्रि अरिस नुठावया निजवी. ४९

---

१. भारानें हादरलीं. २. शरण न येणारा. ३. वल्कल. ४. ब्रह्मदेव श्री व शंकर यांच्या वरानीं व मोठ्या खड्गानीं माजलेला (रावण). ५. युद्ध. ६. गेंडा. ७. बाणांच्या घरांत. ८. अनुचर.

दशवदन जित[1]सहस्रदगंगजवातें पडोनि शोकभरीं
क्षोभे नागापरि, घे श्रीतें मारावयासि खड्ग करीं. ५०
खळ गं[2]डशैलसा अनिवार्य महावेग जानकीजवळ
गेला, जागा केला, सचिवें यश जोडिलें सुधाधवळ. ५१
बहु शतकोटि कटक अरि धाडी तें हुतभुगंतरीं यवसें[3]
होय, तसें प्रभुतेजीं, म्हणे नगाराति 'पुरविला नवस.' ५२
भीषित[4]यज्ञभुगंगन रावण ये सेवटीं पुन्हा कळहा,
गाढायुधा हि भंगुनि बळ पाडी लक्ष्मणा रणीं खळ हा. ५३
गंधवहतनय पुनरपि सौमित्रिसि तें चि शिखर आणून
उठवि, प्रभुहृद्रोगा उडवी, तो शूर दूर खाणून. ५४
प्रभुनें अतुळरण करुनि दशमुख मारूनि यश दिगंतातें
पाठविलें गायत्रीसम बहुमत होय सर्व संता तें. ५५
गगनीं दुंदुभि वाजे, पुष्पांची वृष्टि होय, गंधर्व
गाती, नाचति [5]देवी, प्रभुची स्तुति करिति देव मुनि सर्व. ५६
प्रणत पदीं बैसविला, कळवी श्री हुतभुगंतरीं शुचिता,
[6]रुचि ता[6]मरसाची धरि, कांतोत्संगा सुखें वरी उचिता. ५७
दशरथ भेटे, उठवी हरि मृत बळ सर्व गंतुकामा[7]तें
लंकापति पुष्पक दे, सुगति खगाधीशसें चि रामातें. ५८
सुखद महाभूतांचे गुण शब्द स्पर्श रूप रस गंध
बंधहर प्रभुविजयीं झाले, निववी जगासि [8]ऋतसंध. ५९
प्रभु साकेताप्रति ये, पुर सुद्गंगें अळंकृतें झालीं,
भरतादिमनें भेटुनि, गाईतें वासुरें तसीं, धालीं. ६०
होय सहस्रदगंगणसम पौरांगण हि भगवदभिषेकीं

---

१. इंद्रजिताच्या नाशानें. २. धरणीकंपानें जो पर्वताचा खडक उडून पडतो त्याप्रमाणें. ३. गवत. ४. भयग्रस्त केली आहे विष्णूची स्त्री ( सीता ) तिला ज्यानें असा. ५. अप्सरा. ६. कमलाची शोभा. ७. मागें गीति १७ पहा. ८. सत्यप्रतिज्ञ.

दिव्यें वाद्यें नृत्यें गानें मोहीं तदा न मद्द एकीं. ६१
पूजुनि सुगळ बिभीषण बहु सुखवी गंधवाहतनयातें,
गाती प्रभुच्या कवि सुखपुरीं गतबंध वाहत नयातें. ६२
प्रभुगुण अघराशींतें उरवि तृणांच्या न दाव गंजींतें,
जड हि तरति जे गातां सुयश प्रभुच्या चि पादकंजीं तें. ६३
'गंगारामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें,
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ६४

इति श्रीगंगारामायणं संपूर्णं ।

---

# प्रयागरामायण*

(गीतिवृत्त)

श्रीश प्रभु विधिवचनें सुरगोद्विजरक्षणार्थ दशवदना
मारावयासि अंगज होय, करी धन्य पंक्तिरथसदना. १
कौसल्येचा पुत्र प्रथम, श्रीराम नाम या ठेवी;
कैकेयीचा अंगज भरत दुजा, गुणसमृद्धि ज्या सेवी. २
प्रसवे सती सुमित्रा सुत दोघे, त्यांत सुगुण जो पहिला
नाम तयाचें लक्ष्मण, दुसरा शत्रुघ्न, सुख गमे महिला. ३
विप्रवर गाधिनंदन ये, त्याच्या पंक्तिरथ पदीं लागे,
तो रामलक्ष्मणांतें, वृत्त कथुनि, यागरक्षणा मागे. ४
प्रत्याख्यान[2] करूं दे न कुळगुरु वसिष्ठ, तस्करीं दोघे
देववि विनयादिसुगुणसागर, ते [3]स्त्पुमर्थसे तो घे. ५
प्रथितयशा मुनि विद्या अस्त्रें रामा सलक्ष्मणा सिकवी

---

१. यथेच्छ. *या काव्यांतील प्रत्येक गीतींत '**प्रयाग**' शब्दांतील वर्णांची योजना केली आहे म्हणून या रामायणास कवीनें '**प्रयागरामायण**' असें नांव ठेविलें आहे. २. नाकारणें. ३. उत्तम पुरुषार्थांप्रमाणें.

बहु ताटकावधें निजयागघ्नवधें हि धरि सुखासि कवी[1]. ६
होय प्रसन्न मुनि, ने जनकमखा, हरधनुष्य दावाया,
सांगे मुनिपत्नीतें अघभवसागरतटासि लावाया. ७
उद्धरुनि अहल्येतें, प्रमथाधिपचाप[2] ओढितां मोडी,
या पांडित्यें[3] जगतीकन्या सीता सुकीर्ति ही जोडी. ८
प्रचुरानंद जनक दे रामावरजां तिघां तिघी तनया;
कीं, सागरासि सोडुनि हर्षें अन्यत्र नांदती न नया[4]. ९
प्रकट करी क्षत्रांतक भृगुराम क्रोध गुरुधनुर्भंगें,
धरुनि भयासि गडबडे दशरथ, परि निववीला रमारंगें. १०
प्रमुदित पुर चि न केलें, या रामयशें समस्त जग धालें;
प्रभुच्या विजया गातां गजमुखगुरुहृदय[5] बहु सुखी झालें. ११
भूप प्रजावनोचित[6]तनया युवराज जों करूं लागे,
कैकेयी त्या जगतीपतिस हठें पूर्वदत्त वर मागे. १२
पुत्र प्रबुद्धमति, परि होता मातुळपुरीं, तयामागें
गडबड करि कैकेयी, न वळे जन्हि विनविली महाभागें. १३
प्रथम वर पतिस मागे, ‘ चवदा वर्षें वनीं वसो राम,
या नगरीं राज्य करू भरत, ’ असा जाणवी हठें काम. १४
सत्यव्रतप्रतिष्ठित नृप कुंठितयत्न होय हें कळतां,
राम प्रियानुजानुग जाय वना स्वपितृसत्य डळमळतां. १५
प्रणता रामा माता वल्कल नेसावयास दे हातें;
शोकार्त नृप प्रार्थी, ‘ जगति ! विवर दे मदीय देहातें. ’ १६
रडति प्रजा समस्ता, पत्ति तिघे पाहतां चि राजपथीं,
प्रेषी दयालु जगतीवल्लभ, बसवी सुमंत्र राजरथीं. १७
न घडो प्रयास गहनीं म्हणवुनि पौरांसि सदय ही फटवी,
आश्रीं गुहा, मग भरद्वाजा भेटोनि आदरी अटवी. १८

१. विश्वामित्र. २. शिवगणांचा स्वामी शंकर त्याचें धनुष्य. ३. पराक्रमामुळें. ४. नद्या. ५. शंकराचें अंतःकरण. ६. रामाला. ७. हस्तदोष—**श्लोकार्थ.**

प्रत्यक्ष होय तापससमुदाया ब्रह्म तापसत्वानें,
नग चित्रकूट सेवुनि वसतां साहोनि ताप सत्वानें. १९
सूत कथी नृपतिप्रति ‘विनयानें कथुनि मज तुम्ही सेवा,
गंगा उतरुनि वसला जटिल वरुनि चित्रकूटनग देवा!’ २०
महिषीप्रति कळवुनि तो सुतशोकें मरण लब्धमुनिशाप,
क्ष्माप त्यजि कायातें, गति पावे, परि पुरासि दे ताप. २१
भरत पुराप्रति गुरुनें आणविला, वृत्त तें तया कळलें.
गमलें बहु दुःख, म्हणे, ‘सयश कैकेयि! तुजमुळें मळलें.’ २२
प्रयतमना[1] भरत करी जनकाची उत्तरक्रिया उचिता,
मग जाय शरण रामा, मळल्या स्वयशासि यावया शुचिता. २३
प्रभु त्या प्रियानुजाला सांत्वुनि सांगे, ‘गुरूक्तिचें अवन
धर्मत्याग न करितां, वन ही होईल बा! मला भवन[2].’ २४
भरत प्रभुपदपूता माथां मणिहेमपादुका वाहे,
परते नंदिग्रामीं, याचिपरि त्यक्तभोग तो राहे. २५
प्रभु निकट वास सोडी, करुनि कृपा भेट अत्रिला दे हा,
अनसूया लावी श्रीसीतेच्या अंगराग वरदेहा. २६
प्रबळ विराध धरि श्रीसीतेला या हि सानुजा अजिता,
हा आधीं मारुनि त्या झाला मग देवतागुणें साजिता. २७
प्रयततमदंडकवनस्थितशरभंगादिमुनिसमाजाला
भेटे दयाळु, गति दे, साधुपरि न बहुमता रमा ज्याला. २८
अतुल प्रताप ज्याचा त्या घटजातें स्तवी जसा बंदी,
रघुपति सदार सानुज विनयानें जगदवघ्नकथ[3] वंदी. २९
प्रख्यात विष्णुशस्त्रें दे शक्रस्थापितें तपोराशी
विनयावनता रामा, गमनीं अर्पी पुन्हां हि तो आशी. ३०
प्रणयी सखा पित्याचा जो गृध्र जटायु करि तया नमन,

१. शुद्धमना. २. वनाप्रमाणें नव्हे तर घराप्रमाणें. ३. जगाचें पापनाश करणारी कथा ज्याची असा राम.

[1]शमनत्रासहरयशा पंचवटीप्रति हि तन्मतें गमन. ३१
गोदावरीप्रवाह श्रीच्या हृदयाब्धि बंधुसा गमला,
उटजीं पंचवटींत प्रभु साकेतीं जसा तसा रमला. ३२
प्रमुदित करि हरि हृदया शूर्पणखाघ्राणकर्ण कापवुनी,
सुर जगतीसुर निववी सकळ, खरवधें दशास्य तापवुनीं. ३३
प्रणति करिति उदयार्थी देवादि जिला, दशास्य हरिण तिला
कनकांग दाखवुनि हरि, न विचारुनि पापकर्मपरिणतिला. ३४
प्रभुला उटजांतून श्री मायामृग धरावया तोषें
सुरकार्यसिद्धि चिंतुनि दवडी, मग देवरास ही रोषें, ३५
प्रज्ञाबळनिधि वृद्ध हि गृध्र जटायु स्नुषेसि रक्षाया,
करि विरथ क्षत अरितें, अहि म्हणती देव गरुड दक्षा या. ३६
प्रखरासिनें अधर्में पक्ष च्छेदुनि पराजया करि, तें
पाहुनि जगतीकन्या 'हाय!' म्हणे, सांपडे पुन्हां अरितें. ३७
नेली प्रभुप्रिया ती लंकेंत, निरोधिली अशोकवनीं,
श्री त्या वदली, 'परगजहरिमत्पतियश भरो पशो! कवनीं.' ३८
प्रभु करि विलाप नानापरि, विषयासक्त नर तसा गमला,
अमला वनांत शोधित मूर्च्छित पाहुनि जटायुतें श्रमला. ३९
श्रीचें दशवदनकृत [2]प्रसभहरण साश्रु गृध्र तो कळवी,
करि तत्क्रिया सुत तसा, हरि आर्धी गल्ल अश्रुनीं भिजवी. ४०
प्रभु उद्धरी तशा ही जो योजनभुज कबंध धरि खाया,
शबरीतें वरगति दे, बदरें भक्षूनि साधु हरिखाया. ४१
राम प्रफुल्लवारिजवन शुक पिक बर्हि हंस पाहून,
होय प्रियावियोगव्याकुळ पंपातटीं च राहून. ४२
प्रभुला लक्ष्मण सांत्वी, ने त्या भेटावयासि सुगळातें,
मारुति भेटुनि पाहुनि परितृप्त करी स्वनेत्रयुगळातें. ४३
प्रक्षाळी रविनंदन रघुपतिसख्यामृतहृदीं काया,

---

१. यमाचें भय हरण करणारें यश ज्याचें असा राम. २. बलात्कारानें हरण.

तो श्रीनें त्यजिले नग दावी रामासि खेद टाकाया. ४४
प्रमथी राम श्रीस्त्रीहारित्या[1] सुरराजनंदना अनया,
दे प्लवगराज्य मित्रा स्वकुळकरसहस्त्ररश्मिच्या तनया. ४५
प्रभुची प्रिया दशास्यें नेली, तीचा करावया शोध,
कपिसार्वभौम सुगळ प्रेषी सर्वत्र कपि महायोध. ४६
पुत्र प्रभंजनाचा परिसे रामप्रियासमाचार,
श्रीरामाचा गति धरि पक्षिपतीच्या चि गतिसमा चार[2]. ४७
मैनाकाद्रि प्रकटे, द्याया विश्राम सागरीं वाटे,
पाडी उरप्रहारें, विघ्न चि या प्लवगसत्तमा वाटे. ४८
प्रजव महाकपि सुरसावदनांत शिरे, निघे हि झटकारि, तें
तेज तयाचें समजे शक्रा कीं, अरिमदासि गटकारितें. ४९
तातप्रभृति सुखविले सुर, जी छाया धरूनि आकर्षी,
त्या सिंहिकेसि उदरंग[3] होउनि वधि, हृष्ट होय नाकर्षी. ५०
प्रचुरबळ विलंघुनि शतयोजनजलनिधिस उतरला पारीं,
लंकाधिदेवतेच्या हृदया गजबजवि कीं म्हणे 'तारीं[4].' ५१
प्रथम तनुतनु[5] कपि पुरी धुंडाळी, रावणालया पाहे,
मग साधि अशोकवनीं श्री पाहुनि शिंशिपानगीं राहे. ५२
प्रहर निशेचा तिसरा त्यांत दशानन हि ये, भया दे हा,
तन्वंग तथापि दडे, श्री ही झांकी गुणालया देहा. ५३
प्रकट करी खळ पापा स्वाभिप्राया सती हि ती पूता,
रोष हि तोष हि होय प्राप्त सदागतितनूद्भवा[6] दूता. ५४
प्रत्याख्यात[7] दशास्य क्षोभे तो राक्षसींस हें सांगे,
'बोधा न च वळतां, द्या खाया; हे गर्व दावितां कां गे!?' ५५
प्रभुच्या दयिताहृदया देती मग ताप राक्षसी दुष्टा,

१. इन्द्रपुत्र वाली. २. दूत (मारुति). ३. पोटांत शिरून. ४. [या मारुतीच्या त्रासापासून] माझें रक्षण कर. ५. कृशशरीर (मारुति). ६. वायुपुत्र मारुतीला. ७. निषेधित.

त्यांवरि न होय, होय स्वासूंवरि ती क्षमासुता रुष्टा. ५६
तों प्रणति करुनि कपि दे श्रीहृदय मुदित करावया मुद्रा,
कळवुनि कुशळ म्हणे, 'सति! जगदीश वधील सत्वर क्षुद्रा.' ५७
प्रमुदितहृदया देवी निजचूडामणि निरोप दे कपिला,
द्रवली सदागति[1]सुतीं वत्सीं जासि वत्सला महाकपिला. ५८
प्रध्वंसी उपवन बहु, पर अक्षकुमारसहित तो खपवी,
करि घनरवा भयाकुळ, बळ रगडुनि धारि अनंत तोख पवी. ५९
पुत्र प्रभंजनाचा ब्रह्मास्त्रा सांपडे रणीं कपटें,
बांधी या घनरव, मग गांठावा शीत अग्नि कां न पटे? ६०
परमप्रवीण नेतां दशकंठाजवळ हित तया बोधी,
तत्प्रागल्भ्यें क्षोभे, साम न मानी, वधीं धरी तो धी. ६१
शुद्धप्रज्ञ बिभीषण 'दूत नव्हे वध्य' हें वदे वारी,
पुच्छ प्रदीप्त करवी, दंडाया मत्त कुबुद्धि देवारी. ६२
प्रबळ कपि सुटोनि उडे दावाया शत्रुदुर्दशा शक्रा,
गवताची राशि तसी लंका जाळी बहु च्छळी वक्रा. ६३
प्रलयीं तसा चि धडके, एका न बिभीषणालया भक्षी,
श्री प्रार्थी, मित्रां[2]गजलांगूलाग्रस्थ लोम ही रक्षी. ६४
येवुनि वंदी प्रभुला, दे चूडामणि कथूनि संदेश,
यावरि गभीर हि कथी छळिला जैसा सपुत्र मंदेश. ६५
प्रमुदित होवुं[3]नि रघुपति आलिंगन दे समीरतनयातें,
भगवत्प्रसाद जो हा झाले पात्र न जगांत जन यातें. ६६
प्रस्थान करी सानुज विजयार्थ प्लवगलक्षकोटिसह,
प्रभुसह सुग्रीव निघे, यात्रा दे प्रथम सागरा न मह. ६७
प्रणतबिभीषणहृदया सुखवि, म्हणे, 'हा चि काळ वर[4] देश'
दे राज्य सागरजळें करवुनि अभिषेक राम वरदेश. ६८

---

१. मागें गीति ५४ पहा. २. अग्नीचा मित्र जो वायु त्याचा मुलगा मारुति त्याच्या शेंपटाच्या टोकांवरील. ३. हरताळलेलें रूप—**होउनि**. ४. योग्य.

राम प्रभूत कपिबळ आणुनि विजयार्थ सागराजवळ
आला, हें आरि परिसे, परिसे चि न साम, मृत्युचा कवळ. ६९
प्रभुची प्रिया मुहूर्त क्षणदाचर शोकसागरीं बुडवी,
सरमा 'शिर धनु कृत्रिम' ऐसें सांगोनि तद्भ्रमा उडवी. ७०
प्रभुला भेटे अनुज पावोनि भयासि सागर प्रार्थी,
'सेतु करावि नळहस्तें,' श्रीराम नव्हे चि केवळ स्वार्थी. ७१
प्रचुर कटक सेतुपथें पावे पारास, याम चोवीस
लागति, कवि म्हणति, 'कथे! तूं चि सुधेहूनि अधिक होवीस.' ७२
प्रथम चि सुकंठ पाहे दुर्गीं त्या निर्भया महादर्पा,
उडुनि मुकुट उडवि, मथी गरुड जसा विषमदोद्धता सर्पा. ७३
प्रभुनें साम कराया पाठविला वालिपुत्र अंगद हो!
वदला, 'देवी दे, प्रभु सुखसंगद हो तुला, न भंगद हो.' ७४
प्रमथूं पाहे रावण यातें, तों हा चि वीरमणि धरितें
राक्षस रगडूनि निघे, झाले विभ[१] दशमुखादि जे अरि ते. ७५
समर प्रवर्तवी दशमुख जाया अंतकाननीं सकुळ,
तो गमला प्रेक्षकसुर[२]मुनिनयनमधुपमधुप्रपाबकुळ. ७६
मेला प्रहस्त पहिल्या युद्धीं, दशमुख पराजया पावे,
मुनि वदले, 'प्लवग प्रभुसरसे तेजस्विवर्य हे गावे. ७७
प्रत्यह[३] पराजयातें पावे दशकंठ सुगळबळ गाजे.
डाजे घननादमनीं तो शत्रूत्कर्ष नित्य जो माजे. ७८
प्रभुस ससौमित्रिस तो मायावी शत्रु नागपाशानीं
बांधी[४], मुनिनीं 'हा! हा!' जप केला रामजयनिराशानीं. ७९
प्रम्लान सुकंठादिक कपिसेना कांपली असी कदली,
मृदुहृदया श्री ती गति दाखवितां 'हंत! हा!' असें वदली. ८०
प्रकटे सेवासमया समजुनियां गरुड, सर्प ते पळवी,

---

१. निस्तेज. २. युद्ध पहाणारे देव आणि मुनि यांचे डोळे हे च भ्रमर त्यांस मधूची पाणपोई असा बकुळवृक्ष. ३. दररोज. ४. हरताळलेलीं अक्षरें—नुर.

'तूं वत्सळ कोण?' म्हणे प्रभु, तो 'पहिला सखा' असें कळवी. ८१
प्रमुदित सर्व हि झाले, करिति पुन्हां राक्षसक्षयारंभा.
जागविला घटकर्ण प्रेक्षूं ये सोडुनि क्षिया[१] रंभा. ८२
तो प्रबळ यातुधान प्लवगचमूतें रणीं करी भग्न,
कपिपतिस धरुनि परते, केले चिंतेंत सर्व ही मग्न. ८३
सुटला प्रतापशाली कश्मळ सरतां चि तो महाप्राण
यातुमहावीराचे छेदी कृतवेग कर्ण सघ्राण. ८४
प्रकुपित होउनि परते, माराया यूथपांसि तो लागे,
सगळे चि गिळी, देवी 'काळासीं' म्हणति 'यासि तोला गे!' ८५
प्रभु तद्भुजचरणशिरें कायापासूनि वेगळीं पाडी,
जो निजबळासि अवखळ खळखळ रुधिरौघ वाहवी ताडी. ८६
प्रबळतरानुजशोकाकुळहृदया रावणासि दे धीर,
घननाद शिरे गगनीं बाणाहीं सर्व ही खिळी वीर. ८७
प्रभुसह सर्व हि खिळिले[२], मूर्च्छित मायाबळें रणीं केले,
सुर मुनि 'हा! हा!' वदले, गमले राजादि सर्वथा मेले. ८८
पुत्र प्रजापतीचा सदुपायातें कथी, मनावरि घे
मरुदंगज ताराया; प्रेरिलि जळधींत कां न नाव रिघे? ८९
क्षिप्र उडे, कैलासापासीं ओषधिशिलोच्चया पावे,
त्याचें शिखर चि आणी, याचे जगदीशभुज तसे गावे. ९०
वातें[३] क्षुरप्र[४] कायामधुनि निघाले न राहिले व्रण, तें
सामर्थ्य ओषधींचें गणिलें अमृतें महागुरुप्रमतें. ९१
उठले प्रबळ सकळ ही जाळाया शत्रुबळवना वणवे,
क्षण वेचला न तों ये मरुदंगज, ज्यां[५] न 'कपि' असें म्हणवे. ९२
विभ्रम झाला रावण, पाहुनि रक्षक्षया सचिव भेले[६],
अंगज घटकर्णाचे जे याचे ते यमक्षया गेले. ९३

---

१. गृह—पंत. २. प. लि. हस्तदोष—खिळीले. ३. पर्वतशिखरावरील वाऱ्यानें. ४. बाण. ५. हस्तदोष—जा. ६. भ्याले.

मेघध्वनि प्रतापी पुनरपि देवूनि धैर्य तातातें,
करिता झाला खड्गें माया सीतोत्तमांगपातातें. ९४
प्रभुला हि 'हा!' म्हणाया लावी, भ्रमवी समस्त सैन्यातें,
सौमित्रि सुगळ मारुति रडले युद्धीं धरूनि दैन्यातें. ९५
शोकप्रसर हराया लागे सुज्ञा बिभीषणा न पळ,
मग लक्ष्मणें निवटिला यजितां विजयद्रथार्थ तो चपळ. ९६
प्रखरासि धरी रावण सीता मारावया महाखळ हा,
सचिवें निवारिला, मग बहु बळ बुडवी स्वयें करी कळहा. ९७
प्रमथुनि बहु बळ लक्ष्मण भेदुनि हृदयासि पाडिला अरिनें,
आणुनि तें चि अगशिखर सुखसुप्त तसा चि उठविला हरिनें[1]. ९८
प्रभु शक्ररथीं बैसे, सप्त अहोरात्र रण करी भारी,
यातुवरा दशकंठा मत्तगजा जेंवि हरि तसा मारी. ९९
प्रमुदित सुर मुनि झाले, विजया गावूनि नाचल्या देवी,
गर्जति दिव्यें वाद्यें, पुष्पांची वृष्टि रघुवरा सेवी. १००
प्रभु देववी दशमुखा विधिनें तोयादि, मग पदीं स्थापी
भक्ता बिभीषणातें, या सुयशा विश्व धरूनि आस्था पी. १०१
प्रत्यय दहनीं सिरुनि श्री दे आत्मप्रियासि शुचितेचा,
स्तविती सुर, जगदीश स्वीकार करी द्रवोनि उचितेचा. १०२
अहितप्रमाथित कपिबळ उठवी भगवत्प्रियार्थ देवेश,
त्यां ससुगळा बिभीषण पूजी, मणिभूषणादि दे वेशें[2]. १०३
प्रभु पुष्पकनामनभोयानीं कपि राक्षसेंद्र वेवून,
भरतादि सर्व निववी, गगनपथें निजपुरासि येवून. १०४
निववी प्रजा समस्ता राजा होवूनि कौशयातुपती,
पूजी जगदीश, शमवि ज्याच्या शोकाग्नि मानसीं धुपती. १०५
तनुज प्रभंजनाचा बहु गौरविला दयासुधानिधिनें,
विधिनें सुतुरगमेधक्रतु केले सर्व गायिले विधिनें. १०६

---

१. मारुतीनें. २. पोषाक.

प्रस्तर तरले जलनिधितोयावरि जैंवि वाळलीं पर्णें,
तो जगदीश न तारिल यश गातां काय सेवितां कर्णें? १०७
विप्रप्रियार्थ वधिला शत्रुघ्नें लवण, गज जसा हरिनें,
भरतें गंधर्व, जसे गरुडें अहि, वर्णिला विजय हरिनें. १०८
प्रवरगुण कुशलवादि क्षिति रक्षायासि ठेविले आठ,
पाठ निगम ज्यांला, ते सदरींचीं नित्य पुरविती पाठ. १०९
प्रभुनें दिव्य तनु करुनि पुष्करयानांत सर्व बसवीले,
नागर कपि पशु पक्षी उत्तम लोकांत मुदित बसवीले. ११०
'प्रयागरामायण' हें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. १११

इति श्रीप्रयागरामायणं संपूर्णं ।

---

# तीर्थरामायण*

(गीतिवृत्त)

श्रीपति पुष्कळ वर शिव विश्वा द्याया दशाननवधानें
नर होय, तद्यशीं अवधानें मिळतें न तें अनवधानें. १
सत्यव्रत दशरथनृप जो अर्थिद्विजमयूरघन यास
स्वगुरुत्व दे जगद्गुरु सुमतिस शतमखसखास सनयास. २
गंभीर कृतसुरतरुवीड मनुजकौतुकी तनुज चार
ते राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न कुमार रुचिर सुविचार. ३
कौशिकयागोपद्रव मथुनि पथीं ताटका हरी राम
तीर्थांघ्रि, गौतमाच्या स्त्रीला वारूनि शाप दे धाम. ४

---

१. व्योम—पंत. *. या काव्याच्या प्रत्येक गीतीमध्यें एका तीर्थाचें नांव गोंविलें आहे म्हणून यास 'तीर्थरामायण' असें सार्थ नांव दिलें आहे. गोंवलेलें नांव गीतीचे आरंभीं लिहिलें आहे. २. सावधानपणानें. ३. तीर्थ आहे अंघ्रींच्या ठायीं ज्याच्या असा राम. ४. पूर्व स्थिति, असा भावार्थ.

शुद्धयशोनिधि चढवुनि गुण लीलेनें चि भव्यरुद्रधनु
ओढुनि मोडी, प्रेमें वरि विभुसि महाविभूति भूमिजनु. ५
व्हाया कुळ सफळ जनक नृपति परमवल्गुभाषिणी[1] धन्या
दशरथपुत्र तिघे जे भरतादिक दे तयां तिघी कन्या. ६
पुण्ययशा प्रभु भार्गवराममनःक्षोभ शमवि, दे शांती,
रिपुचें ही तम नाशी, ताप हरी रामशक्तिशशिकांती. ७
गंधर्वांला[2] गायां[2] लावी प्रभु साधुचरित, नगर भरी
आनंदें, संत तदा गमले शिव सर्व गीत नृत्य करी. ८
सत्यव्रतराज्याला वर अल्पदृगंगना[3] हठें लोभें
मागायाला लागे, स्तवुनि म्हणे स्वपतिला, 'यशें साजे.' ९
'त्वत्तनय राम वल्की जटिल क्रमु काननांत मनु वर्षे,
नरनाथा! मत्पुत्रा भरता दे यौवराज्यपद हर्षें.' १०
सत्यव्रत रक्षाया स्वपित्याचें तीर्थपाद जोडून
हस्त गुरुजनांसि निघे, सानुज सस्त्रीक राज्य सोडून. ११
चतुर समर्थ हि राजा धर्मज्ञोत्तम हि पावला ताप,
अणवपराधें घडला तीक्ष्ण सुतवियोगशोक, दे शापें. १२
गंभीर हि 'हाय!' वदे पुत्रवियोगातें कथुनि सारथितें
बसवि रथीं, सुतमोहें जातां सद्धारें[6] सुहितसारें थिटें. १३
कौतुकनिधि जातां तें पुर शोकविषांबुराशिमाजि बुडे,
शिशुकीर हि बहु रडले, श्री भीता पक्षिणी तसी च दडे. १४
कथवे न खेद रघुवरविरह परम तीक्ष्ण नागरांस, मग
मातांचा काय? तयां गमलें शोकांत सर्व शून्य जग. १५
शोकांत विप्र वेदस्मृति न करिति, दुःख बहु असें झालें.
गुह बहु रडे, तयाच्या प्रेमाश्रुभरें हि भूमितळ धालें. १६

---

१. फार सुंदर भाषणें ज्यांचीं अशा कन्या. २. गंगा राजापूरची-पंत. ३. अदूरदर्शी कैकेयी. ४. रामचंद्र. ५. श्रावणानें दिलेला शाप. ६. साधुसमुदायाचें उत्तम कल्याण हें फार अल्प झालें.

प्रभु अतिकोमल दारुण वनवास म्हणूनियां महा पूत
रडला 'मागें जा' हे आज्ञा होतां सुमंत्र तो सूत. १७
गुह अश्म[1]कठिण मन करि, पावी रामास सुरनदीपारीं,
होय भरद्वाज वारि च कष्टीं, हृदयीं म्हणे मुनी 'तारीं.' १८
बहु विप्र चित्रकूटीं प्रभुला पाहुनि निशाचरभयातें
सोडिति, म्हणती स्वाहित जे त्यांतें केसरी, शरभ यातें. १९
बालिशता मातेची भरता बहु दुःखदा मनीं होय,
शरण प्रभुला गेला विधिनें देउनि नरेश्वरा तोय. २०
शमवी त[2]च्छोकातें संश्रितकल्पद्रुचरण जनकातें
जळ पिंड, पादुका दे भ्रात्यातें स्वपदभजनकनकातें. २१
परतविला प्रभुनें तो नंदिग्रामीं वसे, प्रजा रक्षी,
करि दास्य पादुकांचें वल्कजटाधर द[3]ळें फळें भक्षी. २२
अत्रिस परम पुरुष दे आनंदा, तातसा मुनि हितातें
करि, हुंगी सानुजजगदीशशिरातें, प[4]दीं सु[4]निहितातें. २३
अनसूया श्रीस उटी दे विपुलगुणा अयातया[5]मा जी
स्वीकारी लेंकुरपण जें सीता बहु दया तयामाजी. २४
दंडकवनीं प्रचंड क्षणदाचर रौद्र जानकीस हरी,
भासे काळ जगा त्या वधुनि विराधासि राम मुक्त करी. २५
तापसवेष प्रभु दे रात्रिचरत्रस्तमुनिजना भेट,
अभयवरदतीर्थपदा म्हणति, 'भवाब्धींत भेटलें बेट.' २६
प्रभुलक्षित मुन्याश्रम विप्राधिपकुंभजाश्रमपदातें
गेला तो याचें या दे शस्त्र, दिसे जयोत्सुक तदा तें. २७
गृध्रवर दाशरथिनीं नमिला पितृसख जटायु तत्कथित
गोदातटपंचवटीस्थान वसवि करि जगत्रयीं प्रथित. २८
दशमुखभगिनी विधवा शूर्पणखा ये सजूनि, कनकाची

---

१. दगडाहून कठिण. २. पृष्ठ २३ टीप ५ पहा. ३. पर्णें. ४. पायावर ठेविलेल्या. ५. ताजी.

पुतळी होय, म्हणे, ‘मी योग्या बहु शर्मदा न जनकाची.’ २९
जीवित रक्षी; नासा कर्ण तिचे लक्ष्मण क्षणें कापी,
बुडवी चमू समस्ता, तद्भ्राता खर[1] रणीं मरे पापी. ३०
हेमहरिण खळ दावी, प्रभु लक्ष्मण कपट करुनि दूर करी,
खड्गें जटायुतें ही पाडी, श्रीतें बुडावयासि हरी. ३१
प्रभुवर बहु ‘हाय!’ म्हणे, मानी सर्वस्वनाश, तातसखा
विधिनें दे सलिल करुनि जनकाच्या जेंवि तेंवि अंत्यमखा[2]. ३२
तप योग करुनि तरले सद्यश[3] उष्णीष[3] हें न अन्यास,
सुपुरुष दशरथसख्यें अतुळ मिळे भव्य या चि धन्यास. ३३
योजनबाहु कबंध ग्रासाया जो धरी, तया तारी,
शबरीतें सत्यपदीं स्थापी मह मारुतीस दे भारी. ३४
चतुरें वातकुमारें भेटविला रामभद्र सुगळाला.
क्षुद्रा वाळीस वधुनि निववि प्रभु मित्रनेत्रयुगळाला. ३५
लंघुनि समुद्र मुद्रा श्रीतें दे मारुति च्छळी मंदा,
जाळी पुरी, चकित सुर वदले, ‘या शक्तिनीरधिस वंदा.’ ३६
गोष्पद करि लवणोदा[4] देवीस पुसोनि पवनपुत्र हरी
श्रीचा चूडामणि दे प्रभुला संदेश कथुनि खेद हरी. ३७
शिर चरणांवरि ठेवुनि कथितां संदेश परम मानद या
कृतकर्मा आलिंगी, वर्णी; प्रभु करि पित्यासमान दया. ३८
क्षिप्र निघे अनुजसुगळकपिबळसह लवणसागरा पावे,
तों धरि चरण बिभीषण जे शिवविधिशतमखादिकीं गावे. ३९
भीताभयप्रद प्रभु दे लंकाराज्य, नमनफळ दावी,
सेतु रचावा ऐसें सिंधु कथी, काम तें नळा लावी. ४०
तो ब्रह्मराक्षस प्रभुमस्तकधनु दाखवूनि देवीतें
गुरुमंतु[5] करी, रडवी, जें अघ विष विषयलुब्ध सेवी तें. ४१

१. हरताळलेलें पूर्वपद—**महा**. २. अंत्येष्टीला. ३. सद्यश हें उष्णीष (पागोटें). ४. क्षारसमुद्रास. ५. मोठा अपराध.

लोकेश्वरचूडामणिदीपकनीराजितांघ्रि तो पारा
पावे सेतुपथें, किति शतयोजन करि भवाब्धि सोपारा. ४२
कृष्णाध्वा जेंवि वनीं, लंकाद्वीपीं महाप्रताप सिरे.
मुनि वदले, 'रे मत्ता! प्रभुला नमन न करूनि तापसि रे!' ४३
जाणुनि वेदा शास्त्रा सर्व पुराणा हि खळ असामकर
श्रीपति म्हणे, 'दृढ मिठी घालितसे आमिषा असा मकर.' ४४
त्या प्लवगनायक कुटी छद्मनिधिस करुनि तीव्रतर वेगा,
वदला, 'श्री दे, सावध हो, अहिस गरुडनखा न तरवे गा!' ४५
मग अंगद पाठविला प्राणांचें व्यसन वारणारानें;
सूक्तें खळा वळावें तरि मत्ता कां न वारणीं रानें? ४६
प्रभु, निजपंकहरच्चरित सत्कविगंधर्वकोटिनीं गावें,
दशवदनासीं निरुपम युद्ध करी सुचिरकाळ, या भावें. ४७
पांडित्य घनरवाचें घटकर्णांचें निशाचरवराचें
पाहे मानद हा प्रभु, दावी मग आपुल्या खरशराचें. ४८
जो मेघनाद खोटा मायावी नागपाश जे घाली,
ते वारवि पक्षिवरा त्रिजगीं प्रभु हा करी यशःशाली. ४९
सांगे जनासि, रक्षी व्यसनीं सबळा मला, पहा या गा
मारुतिला, अभय तुम्हीं मागा श्रितवत्सला महाभागा. ५०
बहु सुखवुनि तुंदिल करि गणपतिसे सर्व साधु हित कथुनीं.
भव्य जया रुद्रापरि पद मीं द्विज रविवरें अरिस मथुनीं. ५१
उग्राहवीं विजयदा सामग्री स्वरथसारथि प्रेषी
वासव, यश घे मातलिं हि ब्राह्म कथी वधावया द्वेषी. ५२
दिव्यामाजि उतरली जनकनृपसुता महासती सीता,
जयहेतु इचें चि व्रत ऐसी केली महर्षिसुरगीता. ५३

---

१. राजांचीं शिरोरत्नें हे च दिवे यानीं ओवाळिले आहेत पाय ज्याचे असा रामचंद्र. २. सुलभ. ३. अग्नि. ४. हत्तीला. ५. सोडलेला पाठ—**स्वूनि पदरीं गरुडाच्या सुयश देव हा घाली.** ६. भयंकर युद्धामध्यें.

'जे स्नेहपात्र शिशुसे युद्धमृत प्लवग ते उठीव' असा
वर मागे, गंधर्वां गाया यश हरिस दे तया हि रसा. ५४
करवि 'मर्मा[1]प्येष यथा तव' हें बोलोनि हा क्रिया आरिची,
ह्रस्व गमवि मेरु, पदीं बैसवुनि बिभीषणा दया हारिची. ५५
घनरवें[2]काळ करी अभिषेक बिभीषणशिरीं, निवे लंका,
रीति प्रभुची पंका वारी, प्रणतीं उरों न दे शंका. ५६
ताताला नम्र प्रभु सानुज सस्त्रीक होय परमहित,
दर्शन मानी वर्णी, करि विश्वीं दशरथासि परम हित. ५७
बैसे प्रभु यातुकपिक्षितिपति वाहूनि पुष्पकीं क्षिप्र.
ये स्वपुरा हित नीरद, करि बर्हीं बंधुपौरगुरुविप्र. ५८
श्रीराम सकळहितकर [3]निर्जरतर्वधिकचरणकंजरजा
जगतीश पुमर्थप्रद यश करि, कवि म्हणति वज्रपंजर ज्या. ५९
'तीर्थरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ६०

इति तीर्थरामायणं संपूर्णं।

---

# ऋषिरामायण*

(गीतिवृत्त)

श्रीप्रिय केशव चक्री श्रितसर्व[4]सुरद्विजाद्यवनकाम
होय चतुर्मूर्ति प्रभु दशरथसुत, राम हें धरी नाम. १
प्र[5]चुरैधमानतेजा कौसल्यापुत्र राम हा ज्येष्ठ,
कैकेयीचा सभ्यस्तुत भरत, तदीय गुण बहु श्रेष्ठ. २
कमनीयरूप लक्ष्मण शत्रुघ्न प्रसवली सुमित्रा, हे

---

१. हा रावण जसा तुझा तसा माझा हि. २. लक्ष्मण. ३. कल्पवृक्षापेक्षां अधिक ज्याचें चरणरज. *. या काव्याच्या प्रत्येक पद्यांत एका ऋषीचें नांव गोंविलें आहे म्हणून यास '**ऋषिरामायण**' असें नांव ठेविलें आहे. ४. आश्रित जे सर्व सुर व ब्राह्मण इत्यादिकांच्या रक्षणाची इच्छा करणारा. ५. अत्यंत वाढणारें तेज ज्याचें.

सद्गुणरत्नक्षीराधि ज्यां अनिमिषतात[1] भाग्यवान् पाहे. ३
औदार्य बहु तपाचें ज्याच्या तो गाधिज स्वयें मागे,
त्या ऋषिस रामलक्ष्मण दे अजसुत निजकुळव्रतीं जागे. ४
भृत्य जयाचे सुरवर तो सानुज गुरु करी तया ऋषितें,
शिष्यत्व वरी, सुयशोमृत हें सेविति सुधी मनें तृषितें. ५
करि अंत ताटकेचा प्रभु मग सिद्धाश्रमांत, कामारी
जेंवि त्रिपुरा, ऋषि पळगिळित्या[2] राक्षसबळास हा मारी. ६
पदकमळरजोणवनिळें मुनिपत्नीचा निवारिला शाप,
चाप शिवाचा भंगुनि, जनकसुतेचा हि शमविला ताप. ७
परमेष्ट मुनींद्र बुधा जनका ' रामानुजां तिघी कन्या
दे ' ऐसें उपदेशुनि जाय, रुचे फार मैथिळा धन्या. ८
सबळ दशरथ स्वपुरा आणवि, करि तो विवाह कवि च्यार,
उत्सव घन, जन बहीं, कीं नृप दोघे हि वृद्ध सविचार. ९
उत्सव अत्यद्भुत हा जन्मुनि दोघां नृपांसि जे इतर
बंदी मागध[3] सूत प्रचुर निवाले सविप्रसुरपितर. १०
प्रमुदित पुरासि येतां ये भार्गवरामविघ्न, परि चुकवी
प्रभुचा प्रताप संकट लीळेनें, दशरथास्य जें सुकवी. ११
मुक्त करुनि परधर्मापासुनि मुनिमार्ग उचित तो धरवी,
दे शांति रामहृदया, चुळ करुनि तमासि रामबोधरवी. १२
अगणितगुणा प्रभूतें ' स्वस्त्यस्तु ' असें म्हणे, पुसुनि जाय
स्वपुरा सुतस्नुषांसह, आला पावोनि विजय तो राय. १३
दृष्टिस्थ पुरजनाचा काढाया ताप सानुजा भरता
साधु युधाजिन्मातुळ ने पुसुनि नृपा सदिष्टलाभरता. १४
ऊनत्वहेतु[4] लोभ स्वीकारी स्वर्ध्वजा[5] पतियशातें

१. देवांचा पिता ( दशरथ ). २. मांसभक्षकास ( राक्षसास ). ३. वैश्यापासून क्षत्रियाच्या ठायीं झालेला पुत्र ( भाट ). ४. कमीपणाला कारण. ५. स्वर्गीच्या ध्वजाप्रमाणें.

मळघाया स्त्री रामा युवराज करूं न दे निजवशातें. १५
उग्र वदे कैकेयी, 'भरता दे यौवराज्य, वन रामा
मनु वर्षें.' राजा धरि षंढगुण चि ऐकतां अशा कामा. १६
परिसुनि तें प्रभु गुरुच्या भव्या धर्मा न शब्द लागाया
नमुनि निघे सीतानुजसह सुजनीं या पथीं च वागाया. १७
दीप्ति न लोपे त्यजितां सद्वस्त्र अनर्घ्य भूषणें तनया
त्यां दोघां ती नेसवि वल्कें करि माय मोहिली अनया. १८
गतगौरव दशरथ नृप 'हाय !' म्हणे, तळमळे, रथीं तनया
बसवी कथुनि सुमंत्रा; सस्त्रीका दोष लाविती जन या. १९
कर्मफळ अवश्य तशा त्या हि उपस्थित पहा कसें झालें !
प्रियपुत्रांच्या शोकें शापास्तव मरण न चुकतां आलें. २०
चवघांत जवळ एक हि तनय नसे, प्रभु गुहा भरद्वाजा
भेटोनि चित्रकूटीं वसला, हें तो सुमंत्र कथि राजा. २१
यन्नामस्मरण जना मुक्तिप्रद तद्वियोगतप्त मरे
दशरथ तद्वपु तैलीं शोकीं साकेत सुचिरकाळ भरे. २२
मंत्रिप्रेषित दूत द्रुत सानुज भरत आणिते झाले,
तो मातेसि म्हणे, 'गे ! दुर्गुण उदयासि हे कसे आले ?' २३
सारुनि उत्तरकार्य स्वजनसहित शरण जाय रामातें,
प्रभु पादुका अभय दे, फिरवी भरतासि करुनि सामातें. २४
नंदिग्रामीं राहे अतिदुःखित भरत तापसत्वानें,
मंत्रिमतें पद रक्षी, साहे दुःसह हि ताप सत्वानें. २५
वनवासरसिक अत्रिप्रमुख तयां श्रेष्ठ भाव अज दे हा,
नमि पितृसखगृध्रा, सजि[1] मुनिपत्नीच्या यदंघ्रिरज देहा. २६
दशमुखभगिनी दुष्टा मायेनें सुतनु भक्ति जी दावी,
कर्ण घ्राण हरुनि प्रभु तीतें 'हा !' म्हणावया लावी. २७
ती पाप खर प्रेषी माराया प्रभुसि, हा तया शमवी;

---

१. भूषवी.

कार्य सुरांचें सत्वर करितों ऐसें सुराधिपा गमवी. २८
विश्वाहित खळ दशमुख कनकहरिणरूप रात्रिचर धाडी,
भूमिसुता धरवी त्या त्रस्ता प्रभु मार्गणें वनीं पाडी. २९
तो भय दे श्रीस, करी आर्तस्वर रामसा चि दूर वनीं;
तद्वाक्यें जनकसुता 'धांव!' म्हणे देवरा भिवूनि मनीं. ३०
'रजनीचरकपट, नव्हे रामप्रभुशब्द' कथि असें सुमती;
द्रवडि विषाग्नि कटु वदुनि भक्ता, पुरवी प्रकोपना[1] दुर्मती[2]. ३१
परमार्त शुचि हि रागें गेला गमला उदश्रु[3] बाळकसा,
शून्योटजीं सिरे हरि, भीरुस भासेल तो न काळ कसा? ३२
सोडवितां औद्धत्यें पक्ष च्छेदुनि जटायुतें पाडी,
उद्दाम लयभय किमपि न धरी हरि जारि परांगना नौडी[4]. ३३
आश्वेव स्वपुरींत श्री ने, रोधी तिला अशोकवनीं;
लक्ष्मण कथि दुःख, प्रभु धाके जों यातुवध करूनि मनीं. ३४
शून्य उटज पाहूनि प्रभु शोकोपहत होय 'हाय!' वदे,
लक्ष्मण धैर्य भ्रात्या दे, जरि तो किमपि आपणासि न दे. ३५
विपिनीं पुसे लतांतें वृक्षांतें जानकी प्रभु नगांतें,
हरिणकरेणुफणींतें रडवि रडुनि हंसबर्हिणखगांतें. ३६
देखुनि जटायु मूर्च्छित 'हाय!' म्हणे, यत्न करि तया वदवी,
वृत्त कथुनि लय वरि तो, तत्पुत्राची च राम धरि पदवी. ३७
मग दे सुगति कबंधा, वर्ण्यविमानांत बैसवी शबरी,
करि वायुजीं सुकंठीं धर्मात्मा प्रीति जानकीश बरी. ३८
शक्रसुतमळ[6] प्रभुचें त्या गंगास्रोतसें सिवे अस्त्र,
कपिराज्य सुगळ सेवी, धौत परम रम्य काय तें वस्त्र. ३९
गंधवहज[7] उदधि तरे, 'स्वस्ति' वदे, श्रीस नमुनि दे मुद्रा,

---

१. फार रागावलेली सीता. २. शब्दार्थ (?) ३. रडत. ४. गांजी, नागवी. ५. लवकर च. ६. वाळी—पंत. ७. मारुति.

कार्य करुनि आवश्यक परते, जाळी पुरी, छळी क्षुद्रा. ४०
लोभ बहु मरुत्पुत्रीं प्रभु करि, यश वाढवी, निघे सबळ,
कपि शतकोटि उसळले दशकंठाचा करावया कवळ. ४१
कृतनमना द्विषदनुजा प्रभु लंकाराज्य दे सुचिर शुद्ध,
सेतुपथें उतरे, करि नाकेश प्रीत आदरुनि युद्ध. ४२
शिर धनु दावुनि रडवी श्रीतें जो परमदुष्टबुद्धि अरी,
पहिलें चि लोमहर्षण युद्ध तयासीं वलीमुखेंद्र करी. ४३
अंगद कथि, "उग्र प्रभुशर, कोणी हि न करूनि युद्ध तरे,
'हा!' न म्हणु विश्रवा, दे सीता, कर साम, हो न उद्धत रे!" ४४
राज्यपदापासूनि च्यवणारा खळ न मान्य करि साम,
आज्ञा दे सुग्रीवा रजनीचरबळ मथावया राम. ४५
युद्धांत शक्रजित् करि अहिपाशनिबद्ध सानुजा रामा,
यातुपति हर्ष पावे, गरुड महासंकटांत ये कामा. ४६
विपुलबळ घटश्रुति ये, 'स्वस्त्यस्तु' त्रिदश वदति, बळ मोडी,
सुगळा धरि, परते, परि तत्कर्णघ्राण तो सुटे तोडी. ४७
मारी सगळे चि, गिळी कर्कंधुफळांपरि प्लवग शतशा,
वेडे यूथप झाले, प्रभुसायक मात्र वचकले न तशा. ४८
घनरव रिपु लपुनि नभीं शरवर्षें सानुजप्रभुसि ताडी,
मारुतिबिभीषणेतर मूर्च्छित कपिऋक्षसुगळसह पाडी. ४९
ऋक्षाधीशप्रेरित मारुति ओषध्यगाचिया शिखरा
लवकरि आणुनि उठवी, म्हणति 'जगत्प्राणपुत्र' यासि खरा. ५०
तो शत्रु रणीं मोही, मायासीताशिरोरुह कापी,
भ्रम हरि बिभीषण सुधी, लक्ष्मणतेजें चि भंगला पापी. ५१

---

१. 'मरुत्पुत्रीं बहु' असा मूळलिखित पदक्रम आंकड्यानीं वरीलप्रमाणें बदलला आहे. २. शत्रूचा कनिष्ठ बंधु बिभीषण त्याला. ३. शहारे आणणारे. ४. सुग्रीव-पंत. ५. विश्रवा ऋषि हा रावणाचा पिता. ६. कुंभकर्ण. ७. बोरांप्रमाणें. ८. जांबवान कीं सुषेण?

प्रभुहृदयतपस्विबृसीश्रीहत्यार्थी दशास्य खड्ग धरी,
त्या शश्वदतिक्रूरप्रकृतिस फिरवी सुपार्श्व साधुपरी. ५२
उरुविक्रम विश्वांबरसत्तंतु प्रभु अनेक शतकोटी
मर्दी चतुरंगबळ, प्रकट करी त्र्यक्षरीति जी मोटी. ५३
मेले सर्व भ्राते सुत मंत्री यातुवीर, तज्जाया
रडतां, दशकंठ निघे प्रभुसायकसागरांत मज्जाया. ५४
सुरवैरी शंकेना, पाहे उत्पात, तरि हि ये युद्धा,
मूर्त प्रलय चि मानिति वानरयूथप रणीं तया क्रुद्धा. ५५
सबळा सुगळा भंगी माराया स्वानुजा महाबाहु
युद्धांत गांठि घालि, ग्रासाया हिमकरा जसा राहु. ५६
शरणागतासि रक्षी सौमित्रि महापराक्रमी छेदी
तच्छक्तितें, दुजीनें तदुरःस्थळ परम कठिन तो भेदी. ५७
मरुदात्मज जाय पुन्हा अति शीघ्र पतंगराजसा गुप्ता
दिव्यौषधी सशिखरा आणुनि उठवी तया जसें सुप्ता. ५८
शक्रार्पितजैत्ररथीं भूमिसुताजानि बैसला, सप्त
पूर्ण अहोरात्र करी रण निववायासि विश्व जें तप्त. ५९
प्रभु वात फळें तैसीं शत दशमुखमस्तकें जऱ्हीं खंडी
न पडे, तो दे भी ती त्रिदशवरा कांपवी जसी थंडी. ६०
प्रभुच्या मनास वाटे गेलें शस्त्रास्त्रतेज, तों जवळ
प्रकटे कुंभज, जपवी ‘तरणिहृदय’; यश चि दे गमे धवळ. ६१
होय प्रसन्न जपतां स्वहृदय, दे विजयवर रवि प्रभुला;
ब्राह्में प्रभु अरिस वधी, यासि म्हणति सर्व तज्ज्ञ विप्र ‘भुला’. ६२
प्रमुदित झाले वासव शंकरविधि नारदादि नाकर्षी,
तो उत्सव सर्वांतें चुंबक लोहास तेंवि आकर्षी. ६३
प्रभुवरि सुर मुनि हर्षे दिव्यकुसुमवृष्टि करिति, यश गाती,

१. रामहृदयरूप तपस्वी बसण्याचें आसन जी सीता तीतें मारण्याकरितां. २. शश्वत्=नित्य. ३. महापराक्रमी. ४. पृष्ठ २३ टीप ५ पहा. ५. विजयी.

म्हणती, 'जी विजयश्री या स्वस्वामीस नित्य वश गा! ती.' ६४
शौर्य प्रभुचें वर्णिति दुंदुभिमुरजानक[1]प्रमुख वाद्यें
वाजविति, गाति, नाचति, हर्ष दिला अरि वधूनि जगदाद्यें. ६५
सांगुनि बिभीषणा प्रभु विधिनें करवि क्रिया दशास्याची,
जरि भांडला कठिन अरि बहु मानी टेंकें[2] त्या अशास्याची[3]. ६६
केला भूप बिभीषण अभिषेक अणीक मांडवुनि भव्य,
दिव्योत्तीर्णा देवी प्रभुचा उत्संग शोभवी सव्यें[4]. ६७
ऋषिवर सशिष्य करिति स्तुति, दशरथ ये, तया नमी, सुतता[5]
करि कीर्ति या त्रिलोकी, शृंगारा बहु गमे हिता सुतता. ६८
मृत सर्व पाकशासन कपि उठवी सुप्तसे सुधावर्षे[6],
त्यां सेश्वरांसि पूजुनि भक्त बिभीषण महामना हर्षे. ६९
पुष्पक लंकापति दे, घे त्या सबळा सख्या तयामाजी,
आनंदवूं निघे भरतासि, म्हणे जो, 'नसे दया माँजी.' ७०
सत्वर पुष्पक विनंतापुत्र[7]सम निघे, त्रिलोकगीतेतें
तत्कुशळगाति प्रमुदित करि, रामाहूनि फार सीतेतें. ७१
दशमुख[8]शासन दावी युद्धमही सेतु, चरित आयकवी;
श्री बहु हर्षे, तत्सुख जाल्या मुखशत हि कथिल काय कवी? ७२
प्रभु जलधितीर दावी, सांगे, 'सत्कारुनि स्वयें प्राज्य
प्रेम करी, या स्थानीं लक्ष्मण दे या बिभीषणा राज्य. ७३
मग सांगे आर्य युगळ, 'परमसखा प्राप्त या नगीं झाला,
हा ह्रद, मीं हस्ती, कीं या कमळीं देवि! भृंग हा घाला.' ७४
शुद्धात्मा विक्रमनिधि पवनसुत प्रथम भेटला, मग या
मज भेटवि सुग्रीवा, सत्संगति हित करी तसी न गया. ७५
किष्किंधा दाखवितां, कथितां तें वृत्त गुणवती तारा

---

१. आनक=नौबत. २. सामर्थ्य. ३. शासन करण्यास जो अशक्य रावण त्याची. ४. डावी. ५. अति विस्तार पावलेली. ६. परलिखित हस्तदोष–**मासी.** ७. गरुड–**पंत.** ८. राम–**पंत.**

श्रीनें आणविली, त्या रुचिरविमानीं कथा कथी सारा. ७६
पंपेच्या तीरींची निजविरहदशा सुदुःसहा कळवी,
निजचरणीं शबरीचें प्रेम कथी, स्वहृदयासि जें वळवी. ७७
शत्रुपण कबंधाचें मित्रपण हि जाहला स्वयें कथिता,
प्रभुवर अनंतहृद्य जो मथिता तारावया भवव्यथिता. ७८
वेगें मंद हि चाले पुष्पक समजोनि नाथभावातें,
पावे गोदेसि, जिचें दे बहु जीवांसि पाथ[1] भा वातें. ७९
गोदावरीस वंदी जगतीजा जी झषांसि दे स्वर्ग,
किंबहुना माळेपरि जीतें वाहे शिरीं सदा भर्ग. ८०
अतिसुकृतव्रतरक्षण करूनि श्रीचें जटायु तो मेला,
त्यातें स्मरतां प्रभुचा सीतेचा ही मुखेंदु कोमेला. ८१
घटजादि विशदधी[2] जे चिर अवलोकुनि तदाश्रमपदातें,
अत्र्याश्रम पाहे, श्रीअनसूयाप्रेम आठवि तदा तें. ८२
श्रीचित्रकूटगोत्रा पाहुनि देश स्वपर्णशालेचा
प्रभु कर जोडुनि महिमा वर्णी श्रीकंठमौलिमाळेचा[3]. ८३
प्रभुनें मुनि प्रयागीं शंकरसा सुखद सविनयें नमिला,
भरताकडे पवनसुत धाडुनि तो दिवस आश्रमीं क्रमिला. ८४
प्रभु सलिलद रव कपि, शिखिचातक गुह भरत, कविमना गमले;
शमले ताप श्रीमद्दर्शन होतां चि तद्यशीं रमले. ८५
परमानंद पुरा दे, दशरथभद्रासनीं बसे राम;
प्रभु हा करि प्रजांचा प्रेमें संपूर्ण सर्व ही काम. ८६
वानरयातुपतींची प्रभु जसि तसि रचिल न स्वरंग[4] पूजा,
अखिला वात्सल्य भुलवि जें पतिसह पवनजीं करी भूजा. ८७
सदरि लवण शत्रुघ्नें वधिला, भरतें त्रिकोटि गंधर्व,
हर्षित केलें प्रभुनें जग, हें यश गाय शक्र विधि शर्व. ८८

१. उदक. २. विमलमति. ३. महादेवाच्या मस्तकासंबंधीं माळेसारखी जी गोदावरी तिचा. ४. कल्पतरु.

'ऋषिरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ८९

इति श्रीऋषिरामायणं संपूर्ण ।

---

# *राजरामायण

(गीतिवृत्त)

श्रीश विधि विनवि यास्तव दशवदनवधार्थ दशरथनृपातें
सुखवि तदंगज होउनि, गावें यश जें जगीं करि कृपा तें. १
ससुमित्रा कौसल्या कैकेयी तनय या तिघी आर्या,
श्रीराम भरत लक्ष्मण शत्रुघ्न प्रसवल्या नृपतिभार्या. २
नरपति बहु तोष धरी, स्वच्छात्रत्वें वसिष्ठ गाधिज ही,
गौतम दारोद्धारें, जामातृत्वें विदेहराजमही. ३
क्षत्रक्षयकर राम हि तोषें निजदुरभिमान सोडून,
साधूनि शांति गेला, प्रभुतें [1]हृदयांत हात जोडून. ४
पूतचरित निजगुरुचें सत्यव्रत मातृचित्त ही रक्षी,
लक्षी राज्य तृण तसें, वल्क जटा धारि, वनीं फळें भक्षी. ५
[2]शापविधुंतुद दशरथविधुस गिळी, प्रभुकुमारविरहातें
साहों न शके, शोकें वदलें साकेतराष्ट्र चिर 'हा!' तें. ६
भरत म्हणे, 'दुष्टेनें कैसी आम्हां दिली पहा कुगती?'
तातक्रिया करि, निघे, प्रभुविरहीं जी घडी तया युग ती. ७

---

* या काव्याच्या प्रत्येक गीतीमध्यें एका जगत्प्रसिद्ध राजाचें नांव गोंविलें आहे. व म्हणून कवीनें या काव्यास 'राजरामायण' असें सार्थ नांव दिलें आहे. मूळ-पोथींत साधलेलें नांव गीतीचे आरंभीं लिहिलें आहे. १. भृगुराम हा ब्राह्मण असल्यामुळें त्यानें क्षात्रकुलोद्भव दाशरथि रामाला 'हृदयांत' हात जोडिले. २. शापरूप राहु.

घेवूनि सचिव नागर[1] गुरु माता बळ, गुहा भरद्वाजा
भेटूनि चित्रकूटीं प्रभुसि नमी, पिंड देववी राज्या. ८
सकृपप्रभुचें शासन विश्वहित म्हणोनि पादुकासहित
घेवुनि शिरीं फिरे तो नंदिग्रामीं वसे सुधी महित. ९
सीतालक्ष्मणयुक्त प्रभुवर अत्रिस नमी कथुनि नाम,
विश्वनुता अनसूया श्रीला दे अंगराग वरदाम[2]. १०
केला विराध हि शुचि त्रासद जो शश्वदुग्र[3] विश्वास,
शरभंगादि मुनि निवावि, कीं त्यांचा प्रभुपदीं च विश्वास. ११
दुष्ट खरादि निशाचर ऋष्यंतक जे तयांसि माराया
शतमखदत्तें वैष्णवशस्त्रें दे घटज साधु ताराया. १२
पितृसखजटायुगृध्रा भेटे पक्षीश्वरप्रभा[4] वढिला,
श्रीत्राणभर[5] तया दे, ज्या वृद्धाचा हि न प्रभाव ढिला. १३
ज्या मघवा[6] बहु मानी प्रयता दंडकवनक्षमापतितें,
त्या पुसुनि गौतमीतट वसवी प्रभु, तन्मना रुचे अति तें. १४
रजनीचरी मन करी त्रस्त श्रीचें धरूनि शोभा जी,
तद्दुर्दशा करवि जो प्रभु सबळ खरादिकांसि तो भाजी. १५
फिरतां अदृष्ट राक्षसवर यमपुरपथ धरावया दावी,
कनकमृग हरि सतीतें गृध्रेंद्रा 'हा!' म्हणावया लावी. १६
प्रभुवर ही लघुहृदय स्त्रैणतसा 'हा!' म्हणे, श्रमी होय
स्त्रीगति ऐकुनि; विधिनें तातसखातें तशांत दे तोय. १७
हरि खेद कबंधाचा, शबरीतें सुगति दे बरी पंपा,
सरसी थरथर कांपवि, विरहीं प्राणांसि विभु म्हणे, 'संपा'. १८
सुगळा सूर्यकुमारा मरुदात्मज भेटवी, सुसख्य घडे;
तो श्रीत्यक्तालंकृति दे, त्या हृदयीं धरूनि राम रडे. १९
निजदुःखातिशय कथी, शमवि प्रभुशोक सुगळ, दे धीर;

---

१. पौरजन. २. उत्तम माला. ३. निरंतर भयंकर. ४. गरुडासारखी कांति ज्याची असा (जटायु). ५. राज्यरक्षणभार. ६. यवन जामघ—**पंत.**

रविबिंब दुरभ्रलयीं[1] तेंवि द्युति धरि पुन्हा महावीर. २०
भस्म करी गीर्वाणाधिपपुत्रा वाळिला शरें एकें;
वांचावें [2]चक्षुर्गरसख सव्यथ करुनियां कसें भेकें? २१
हरिराज्यश्री देतां सुग्रीवा निजसख्यासि साधूनीं
स्ताविला श्रित[3]दुःखतमश्चंडकिरण रामभद्र साधूनीं. २२
श्री हुडकाया बहु कपि सुगळ प्रेषी, मरुत्तनय मात्र
पात्र यशा होय, सुखी प्रभुचें करि मानस श्रवण गात्र. २३
दृष्टश्रुत नसतां ही, सिंधु विलंघूनि मत्तमूढपुरी
शोधी, श्रीतें मुद्रा दे, पर निजमथनसिद्ध सर्व चुरी. २४
भ्रम हो दूर हो न परा, म्हणुनि बळें सापडे, खळा बोधी,
तो धीरा हित कथितां मारूं पाहे दशानन क्रोधी. २५
अनळ[4]प्रज्ञ बिभीषण 'बा! दूत अवध्य' हें वदे वारी,
पुच्छ प्रदीप्त करवी अतिकर्कश भूमिदेवदेवारी. २६
एवं जो ऐश्वर्यें मत्त न तो कां करील अन्याया?
रक्षी प्रियसख[5]पुत्रा श्रीसंप्रार्थित कृशानु[6] धन्या या. २७
कपि रंजवी सुरांतें बहु रक्षोधमपुरीस जाळून,
अति साधु बिभीषण जो त्या एकाच्या गृहासि पाळून. २८
कवळी इध्मोच्चयसे[7] [8]कार्तस्वरनिलय दहन 'हा!' वदवी;
पुच्छ समुद्रीं विझवी, श्रीस नमी, धरि पुन्हा नभःपदवी. २९
[9]सर्वपरमद्क्षयकरतेजा कपिचक्र हर्षवी वंदी,
श्रीचूडामणि दे, या प्रभुवर भेटे, स्तवी जसा बंदी. ३०
अंता न्याया अरितें प्रभुसह कीशर्क्षबळ निघे प्राज्य,
सागरतटीं करी द्विषदनुज नमन, राम दे तया राज्य. ३१

---

१. दुष्ट अभ्ररूप लयांत. २. दृष्टिविष सर्पांचा मित्र. ३. आश्रितांच्या दुःखरूप अंधकाराला घालविणारा प्रखर सूर्य. ४. अलर्क—पंत. ५. वायुपुत्र मारुतीस. ६. अग्नि. ७. काष्ठसमुदायाप्रमाणें. ८. सुवर्णपुरी लंका. ९. सर्व शत्रूंच्या गर्वाचा नाश करणारें तेज ज्याचें अशा मारुतीस.

अब्जभयाकुळसिंधुप्रार्थित ऐकुनि रचावया सेतु,
नळवानरासि सांगे प्रभुवर जो विश्वहेतुचा[1] हेतु. ३२
कूरैकराज रावण जैसें प्रभुशीर्ष धनु तसें चि करी,
भ्रमवी श्रीस, बिभीषणदयिता सरमा परंतु मोह हरी. ३३
शतयोजनसेतुपथें कुतुकें उतरुनि पयोधितें सबळ,
ससुगळ चढे सुवेळीं प्रभु, दुर्गीं तो हि मृत्युचा कवळ. ३४
संतप्त होय कोपें सुग्रीव उडे, दशानना ताडी,
पाडी मुकुट खळाचा, बाहुरण मुहूर्त करुनि मद झाडी. ३५
कामांधा ताराया प्रभुनें अंगद हि धाडिला सामा,
परि अरि न वळे, खवळे, आरंभी स्वक्षयार्थ संग्रामा. ३६
तुमुलीं रणीं परस्पर न चुकति कपियातुकुंजर[2] दमाया,
रक्तप्रवाह वाहति, चाले, करि इंद्रजित्, परि न माया. ३७
प्रभु मनुजभावनिह्नुततेजा[3] यश वाढवावया लोकीं,
वनरवकृतफणिपाशीं पडुनि, चमू श्री हि मग्न करि शोकीं. ३८
पृथ्वीसुतेसि धैर्य त्रिजटा दे कथुनि तत्व; वरपक्षी
उडवी नागांतें, प्रभु सानुज गुरुतातसम तया लक्षी. ३९
भूमि त्रस्ता ज्याच्या पादन्यासेंकरूनियां झाली,
तो घटकर्ण अमरभा नुरवी, सुगळा धरी, चमू भ्याली. ४०
तत्त्रासाश्रुति हरि, हरिपति खवळे, शत्रु करि बळ त्रस्त,
सगळे चि गिळी, झाले निशितसदस्युग्रनख[4] कपि ध्वस्त. ४१
विश्वेप्सितविजय[5] प्रभु खंडुनि भुज पाद शिर तया मारी;
भारी शोक दशास्या होय, तया वनरव स्वयें वारी. ४२
प्रभुभंगकाम हा खळ खरशर वर्षोनि सेश[6] सैन्य खिळी,
मारुति होय भिषग्वर, पाडी घननादरोगशक्ति शिळी. ४३

---

१. ब्रह्मदेव. २. वानर व राक्षसवीर. ३. मनुष्यपणानें लपविलेलें तेज ज्याचें असा (राम). ४. तीक्ष्ण जो उत्तम खड्ग त्यासारखीं उग्र नखें ज्यांचीं असे. ५. विश्वाला इष्ट ज्याचा विजय असा. ६. सुग्रीवासह.

राक्षसबळहानि अमितबळ कपिभट करिति अजितशरसे; तें
पाहुनि वधि मायाश्री, पळभरि गमलें असत्य न रसेतें. ४४
श्रमवी अनिष्टकर्मा[1] अमरत्वप्रद शतांग जन्माया,
होम करी एकांतीं, कळवी ती तत्पितृव्य तन्माया. ४५
लक्ष्मणशरसर्पाहीं त्याचें समरांत सारिलें आयु,
हा युद्ध अहोरात्रत्रय करि अहितोभ्रघनमहावायु[2]. ४६
सुतशोकक्षुब्ध निघे दशमुख परमेश्वरीस माराया,
वारा या होय घना सद्बुद्धि सुपार्श्व सचिव वाराया. ४७
चतुरंग सैन्य बहुशतकोटि मग पलाशनायक प्रेषी,
प्रभुच्या दक्षेषुपुढें[3] युद्धीं एक हि न वांचला द्वेषी. ४८
क्रोधप्रतप्तचेता असकृत् भंगे, तथापि ये युद्धा,
मर्दन करि कीशांचें मेले गांठूनि कीशप क्रुद्धा. ४९
कपिबळ दिसे तृणोपम, दावोपम राक्षसेंद्र तो, ताडी,
खरशक्तिनें दुसरिया दाशरथिस खळ रणांगणीं पाडी. ५०
जगदसुदायाद[4] सखा गरुडाचा होय तें पुन्हां शिखर
आणी, या यश दे, प्रभु कां शक्रा न म्हणता 'सुधा विखर'? ५१
खलदलनानळस प्रभु दशवदनासीं करी समर भारी,
प्रभुसीं तो ही निर्भय अतितेजा शतमखाद्यमरभाऽरी. ५२
लीलामनुष्य भगवान् दशकंठाचीं शिरें शत च्छेदी,
तरि अरि न मरे म्हणुनि प्राकृतसा होय संगरीं खेदी. ५३
घटज महर्षि 'रविहृदय' उपदेशी, होय तो जपें तुष्ट,
भूभ्ररिपु[5] स्वरथ तसा वर दे समरीं वधावया दुष्ट. ५४
ब्रह्मास्त्रें अभिमंत्रुनि कोदंडगुणीं पृषत्कवर[6] जोडी,
सोडी गृध्रगतिप्रद देवद्विषदुर अभेद्य परि फोडी. ५५
प्रमुदित सुर मुनि करिती स्तुति, पडतां शत्रु, पुष्पवृष्टि पडे,

---

१. इंद्रजित्. २. शत्रुरूप मेघाचा मोठा वायु (नाशकर्ता). ३. कुशल बाणांपुढें. ४. हनुमान्–पंत. ५. इन्द्र. ६. श्रेष्ठ बाण. ७. हस्तदोष–फाडी.

ध्वनि दिव्य दुंदुभींचा गंधर्वशतप्रगायनांत दडे. ५६
शांत उपद्रव होतां, शंका सोडूनि देवतनुमध्या[1]
नाचति, गाति प्रभुला, प्रभुचरितोद्दीपका हि त्या वंध्या. ५७
जेंवि अजगरापासुनि दोषापासुनि तसा अरि हि मुक्त
करि, करवुनि क्रिया प्रभु, या परमाला चि हें परम युक्त. ५८
प्राज्यसुखाची व्हाया प्राप्ति पदनता बिभीषणा बसवी
सिंहासनीं, न गर्हितवृत्तीं प्रभु कीर्तिसंपदा वसवी. ५९
करि दिव्य इलाकन्या, भेटे दशरथ हि, उठवि कपि शक्र,
मानसभिक्ष्वादि[3] कुशळ वदले, 'पय सुयश हें, इतर तक्र.' ६०
सबळा सुगळा अर्ची, पुष्पक लंकेश दे नतस्वरगा[4].
प्रेम सुरर्षिस सांगे, 'प्रभुपुण्ययशोमृता ततस्वर[5] गा.' ६१
लंकेशा कपिराज्यी*[6] सबळा घेवूनि मनुजरूप हरी
बसुनि विमानांत निघे, स्थिरजंगम जीव अनघ धन्य करी. ६२
कथि पुष्कराक्ष विरहक्लेश, म्हणे श्री, 'अशेष परिसेन'
असुख[7] हि न असुखसे कीं सुयशस्कर[8] जेंवि अरि हि अरिसे न. ६३
युद्धक्षिति दावित जलनिधिवरि सुविमान वरुनि विभु गेला,
श्रीस म्हणे, "बिंबोष्ठि[9]! प्रेक्ष नळें रुचिर सेतु हा केला. ६४
सुमुखि! बिभीषण येथें भेटे मजला, तसा चि सागर हा,
या ऋष्यमूकगोत्रीं 'स्वस्थ' म्हणे सुगळ 'सानुराग रहा.' ६५
सुदति! अळंकार तुझे अर्जुन[10] रक्षुन दिले मला एणें
देणें प्राणांचें हें, याचें यश देवि! आमचें लेणें. ६६

---

१. देवांगना. २. रावणास. ३. सनत्कुमारादि–**पंत.** ४. नम्र आहेत कल्पवृक्ष ज्याला. ५. विस्तृत स्वर. ६. स्पष्टोच्चारणार्थोयमत्वत्यो यकारः–**पंत.** ७. असुखकर हि प्रसंगविशेषीं सुखप्रद होतात. ८. शत्रू हि समयविशेषीं कीर्तिकर होतात. ९. आतांपर्यंतचा वर्णनसंक्षेप व यापुढील रामाच्या भाषणाचा विस्तार यांचा विचार करितां पंतानीं उद्दिष्ट राजनामें गोंवण्यासाठीं हा विस्तार केला असल्याचें दृग्गोचर होतें. १०. संपादून–**पंत.** * जानुजंघ–**पंत.**

पवनकुळदीप येथें भेटे विध्वंसिता असाधूऽर
हा जेंवि अरींस करी, न फणींस विकळ बिळीं असा धूर. ६७
या पंपेच्या तीरीं दयितासहचर विलोकिले पक्षी,
रडलों बहुत, तुझा हा देवर मत्प्राण संकटीं रक्षी. ६८
बसुनि विमानीं गेली त्या लोका योगिराज ज्या जावे
शिष्या मतंगमुनिची शबरी, यश या सदाश्रमीं पावे. ६९
विश्वभयंकर योजनदीर्घभुज कबंध सानुजा मजला
धरि मृगमृगेश्वराशन[1] देवि! वरविमान या स्थळीं भजला. ७०
रंभोरु! सति! प्रमदे! हे ती गोदावरी, स्वदेशाला
स्मरलों न यदुत्संगीं, चिंतामणिची असी[2] न दे शाला. ७१
क्रमिला काळ बहु सुखें या पंचवटींत, उटज सुंदरि! तें
दिसतें वीतमधुश्रीमधुपकथ[3] म्लान जेंवि कुंद[3] रितें. ७२
कैवारी श्वशुर तुझा आर्य जटायु प्रिये! वसे नाकीं,
जनकें ज्ञान शिकविलें गुरुशोक त्वन्मनीं असेना कीं. ७३
भीष्मग्रीष्मार्कांच्या जेंवि करें[4] बिंदु सिंधु, तेंवि करें
ज्याच्या आटे, आश्रम त्या मुनिचा हें सुकेशि! जाण बरें. ७४
सांब शिव जसा बिल्वें, झाला नमनें प्रसन्न जो सीते!
त्या अत्रिचे स्मर चरण, कथिति नता तत्त्वलग्न[5] जोसी[6] ते. ७५
शोकार्त भरत येथें विनवी नगवर्य चित्रकूट पहा,
देतो प्रयाग गंगायमुनासंगम हि लोचनांसि महा. ७६
दयिते! नीट पहा तें दिसतें साकेत पदक वसुधेचें,
रघुकीर्तिचें रुचे हें पात्र रसज्ञांसि तेंवि म सुधेचें.' ७७
उतरे प्रभु प्रयागीं मुनिचरणग्रहण करुनियां राहे,
भासे नमनीं सुतसा, तो हि भरद्वाज तातसा पाहे. ७८

---

१. हरिण आणि सिंह याना भक्षण करणारा. २. या गोदावरीसारिखा पुरुषार्थ—पंत. ३. गेली आहे मकरंदरूप शोभा व भ्रमरांचे गुंजारव ज्यापासून असें कुंदपुष्प. ४. किरण—पंत. ५. खरा मुहूर्त. ६ ज्योतिषी.

श्रीरामें पाठविला मारुतसुत गरुडसा उडे तूर्ण,
गुहभरतमनोरथ करि कथुनि प्रभुसत्यसंधता पूर्ण. ७९
मुनिस पुसुनि बळ पुष्पकयानीं वाहुनि निघे, गुहा पहिला,
मह दे विश्वस्तभरतशत्रुघ्नगुरुप्रजांसहित महिला[1]. ८०
दे वेष, घे, यशस्वी कैवल्यदपद महें पुरीं गेहीं
सुदिनीं प्रभु प्रवेशे, जीवात्मा जेंवि सोडिल्या देहीं. ८१
श्रितकल्पद्रुम भगवान् स्वीकारी तातराज्यपद, भरता
युवराज करी, 'न रता अन्यत्र' म्हणे, असी धरी नरता. ८२
विप्रादि सर्व सुखवी, कपिराक्षसनायकांसि गौरव दे,
टकमक सुरपति पाहे, त्यांतें प्रभुबंधु सकळ पौर वदे. ८३
अक्षांतक दास्यकुशळ सविनय सत्स्थविर[2] शीलपरें[3] वक्ता,
पवनसुत तया पूजी, प्रभु चिरजीवित्व सुवर दे भक्ता. ८४
प्रिय वर मारुतिला दे सत्कल्पव्रतति[4]निजकथाश्रवण.
लवणघ्नाग्रजचरितीं कवण न होईल सुरसिक प्रवण[5]? ८५
उत्तम आनंद दिला, हृत्ताप न उरविला जनीं कांहीं,
पापपडारि दमिले प्रभुनामें चि, अजेय जे अनीकांहीं[6]. ८६
'राजरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ८७

इति श्रीराजरामायणं समाप्तं ।

---

१. या आर्येंतील साधितनाम निर्दिष्ट नाहीं; तथापि तें 'सुबाहु' असावें काय?
२. उत्तम वृद्ध. ३. सुस्वभावसंपन्न. ४. वेली. ५. नम्र. ६. सैन्यानीं.

# सप्तमंत्ररामायण

## बालकांड

(अनुष्टुप्वृत्त)

श्रीपति प्रार्थिला मत्ता माराया दृशकंधरा,
देवानीं सद्धितें ज्यांचीं नेत्राब्जें आठ[1] पंधरा[2]. १
राज्या दशरथाचा तो चतुर्मूर्ति महायशा
पुत्र झाला रामनामा, विश्वा आली शुभा दशा. २
महात्मा राम कौसल्यापुत्र हा ज्येष्ठ सांवळा,
सन्नेत्रांतें सद्गुणाब्धि तो म्हणेल न कां 'वळा'? ३
जगन्नाथांश भरत कैकेयीचा सुत क्षण[3],
पुत्र लक्ष्मण शत्रुघ्न सुमित्रेचे सुलक्षण. ४
यज्ञावनें हर्ष देती रामलक्ष्मण गाधिजा,
अहल्येच्या समुद्धारें गौतमा बहु आधि ज्या. ५
राजकोदंड मोडूनि रामें वरिलि भूसुता,
जनकाच्या तिघी रामानुजाहीं सज्जनस्तुता. ६
महाप्रतापा पहिल्या रामातें नव राम हा
जिंकी, या विजयाऐसा दुजा दे न वरा महा. ७
जयाधिक गमे शांता पराजय हि तो, 'दया
केली' म्हणे 'बा विश्वेशा! निजधर्महितोदया.' ८
यश गाय, म्हणेना चि स्वांतीं भार्गवराम 'हा!'
पावे स्वीकारुनिपुन्हां निजमार्गवरा महा. ९
जगतीपति पुत्राच्या विजयें बहु हर्षला,
स्वाम्युत्कर्षें पुरीं पौर स्फार प्रेमाश्रु वर्षला. १०

---

१. ब्रह्मा–**पंत.** (ब्रह्मदेव चतुर्मुख म्हणून आठ नेत्रांचा). २. शिव–**पंत.** (शिव पंचानन; प्रत्येक आननास तीन नेत्र म्हणून पंधरा नयनांचा). ३. उत्सवरूप–**पंत.**

यथाविधि गृहीं पुत्र प्रवेशवि सदार ते,
पुत्रभाग्योदयीं भूप तद्गुणीं च सदा रते. ११
राजाज्ञेनें निजपुरा नेला भरत मातुळें,
म्हणे त्या लोक, 'रविसीं तेजें चंद्रसमा तुळें.' १२
मनोज्ञरूपा भरता शत्रुघ्ना देखते जन
वदले, 'गोमटें यांचें ऐसें तें लेखतेज न.' १३

इति बालकांड:

## अयोध्याकांड

भू श्री रामकरीं द्याया युवराज करावया
योजी राजा, गुरु म्हणे, 'हा विचार बरा वया.' १
सा रा विचारा या मोडी कैकेयी मंथरामतें,
वर साधी, करि, धरी वन्यांचा पंथ राम, तें. २
'हो म न्वब्द वनीं राम स्पष्ट वल्कजटाधर,
रक्षो भरत पृथ्वीतें, हे माझे दे मला वर.' ३
रा ज वर्य जरि प्रार्थी, न वळे, खवळे असें
कळे, निघे राम सीता सौमित्रि प्रीतिच्या रसें. ४
हो य प्रहृष्टा कैकेयीमंथराशक्रधी, 'रहा
क्षण' भूप म्हणे; तेव्हां वदले सर्व धीर 'हा!' ५
ध रा पति रथीं वाहों सांगे, सूत तसें करी;
गुहासि भेटे, फिरवी प्रभु हा विनवी परी. ६
स्व म स्तकीं बंधुच्या ही जटा रचि, गुहा तरी
मागे, गंगा तरे, वंदी भरद्वाजपदें हरी. ७
'द्वि ज वर्या पुसे, राहे चित्रकूटीं' असें पुरीं
सूत सांगे, मरे भूप, शोकशूळ सिरे उरीं. ८
प्र य लें भरत क्षिप्र आणिला, बहु तो रडे,
कैकेयीचे लागले त्या मृदुला बोल कोरडे. ९
नि ज मातेसि धिक्कारी, पित्याची करुनि क्रिया,

गेला शरण रामाला आणाया, श्री न ज्या प्रिया. १०
त्या य शोनिधि सांगे, 'बा! ताताचें सत्यरक्षण
आम्हीं करावें, सोडावा त्वां म्यां ही धर्म न क्षण.' ११
घे रा ज्याच्या रक्षणा तो पादुका प्रभुच्या, फिरे,
नंदिग्रामीं वसे वल्की, मनें ही न पुरीं शिरे. १२
त्या म हीध्रा त्यजी राम जाय अत्र्याश्रमास, ती
अनसूया अंगरागें हरि श्रीच्या श्रमा सती. १३

इत्ययोध्याकांड:

## अरण्यकांड

हरि श्री तें त्या विराधा राक्षसा राम दे गती,
दंडकीं मुनि रक्षी, जी दया करावि वेग ती. १
साग रा चा प्राशिता जो दे शस्त्रें यासि तो जुनीं
पादानता शिष्यसमा सदाशीराशि या[1]जुनीं. २
जो स म र्थ स्वताताचा सखा गृध्र जटायु तें[2]
त्या दे गुरुत्व कीं वंदी शिरें भव्यें जटायुतें. ३
राहे ज गत्पति प्रेमें उटजीं गौतमीतटीं,
रामीं शूर्पणखा लोभे, शुनी जेंवि सुधाघटीं. ४
अन्या य ज्ञें लक्ष्मणें ती प्रभूक्तें नीट दंडिली,
खरसेना रामभद्रें लीलेनें मग खंडिली. ५
कोपे रा वण तो दावी सुवर्णहरिणा महा,
तल्लोभ श्री धरी त्याचा म्हणवी परिणाम 'हा!'. ६
तो हे म हरिण श्रीनें धराया प्रार्थितां वनीं
शिरे प्रभु, शरें ताडी, तच्छब्दें भी सती मनीं. ७
सीता ज पोनि कपटें दशानन जटायुतें
पाडी, ने, सिंधु शोषाया पाहे मूढ घटायुतें. ८
अप्रि य प्रभुला भ्राता सांगे, धावोनि देखिलें,

१. यज्ञ करवून. २. यत् स्वपितरि प्रसिद्धं–पंत.

जसें उटज तें शून्य तसें विश्व हि लेखिलें. ९
शोधी ज नकजा, क्षीण तसा 'हाय!' वदे 'वहा
शोकपूरीं' म्हणे एणा खगा व्याघ्र हि देव हा. १०
तों हो य शोक शोकांत गृध्र सक्षत पाहिला
'सीता दशमुखें!' ऐसें सांगतां स्तब्ध राहिला! ११
करी रा जीवनयन शरीरा त्याचिया करें
संस्कार जेंवि ताताच्या, गावें हें यश शंकरें. १२
धरी म हाक्रूर जो दे त्या कबंधासि कामग
विमान; शबरीला ही, पंपेला पावला मग. १३

इत्यरण्यकांड:

## किष्किंधाकांड

विरही श्री श पंपेच्या तीरीं 'हाय!' म्हणे, मग
भेटे हनूमान् सुग्रीव, सीतेचे दाखवी नग. १
जो वान रा धीश बळी मत्त तो खळ मारिला,
वारिला ताप, सुग्रीव, केला कीशेंद्र, तारिला. २
सुकंठें म ग शोधाया सीता पाठविले हरी,
संपाती शोध सांगूनि अंगदादि सुखी करी. ३
तो अग्र ज जटायूचा सांगे, "मीं अनुजासह
गेलों पहाया अरुणा, न सोसे भानुचें मह. ४
प्राणप्रि य स्वानुज म्यां झांकिला तनुच्या तळीं,
मत्पक्ष दग्ध झाले, मीं पडलों या महाचळीं. ५
रक्षी ध रा सुर मला महेंद्रीं तो निशाकर,
ताप माझा हरी जैसा चकोराचा निशाकर. ६
तो म्हणे म ज, 'या स्थानीं रहा ऐसा चि तोंवरी,
श्रीतें शोधावया येथें येतील प्रभुचे हरी[१]. ७
प्रवृत्ति[२] ज गदीशाच्या प्रियेची त्यांसि तूं मुखें

१. वानर. २. शोध.

सांग, तत्काळ येतील पक्ष, क्रीड नभीं सुखें.'' ८
ये प्रत्य य हि जों ऐसी दग्धपक्षकथा कथी,
सपक्ष होउनि उडे तत्संदेहाचळा मथी. ९
लंघाया ज लधी कोणही शतयोजन न क्षम,
म्हणे अंगद, 'जातों मीं, जाणें येतां न विक्रम.' १०
आत्मश्रे य सुकंठश्रीरामप्रिय सुखें घडे,
ऐसें कोणा हि न सुचे, सर्व ही संकटीं पडे. ११
त्या ऋक्ष रा जें वाराया सर्वांची ही मनोव्यथा,
वायुजा कथिली त्याची जन्मकर्ममहाकथा. १२
स्तवें स्व म हिमज्ञानें उत्साहें दशयोजन
वाढे, म्हणे नारदादि, 'या वीरा यश यो' जन. १३

इति किष्किंधाकांडः

## सुंदरकांड

वायुपुत्र श्री पहाया उडे गरुडसा रयें,
यादें यादोनिधिस्थें ही लक्षशा कांपलीं भयें. १
वक्षप्रहा रा मैनाक क्षमला न सहावया,
देव देवर्षि ही आले तत्कौतुक पहावया. २
सुरसा अ म रप्रोक्ता गिळाया पसरी मुख
शत गावें त्यांत शिरे, निघे, दे वासवा सुख. ३
मरुदात्म ज मारी त्या सिंहिकेतें, वरें धरी
छाया ओढी, गिळी पापा, सागरीं दारुणा खरी. ४
तो उग्रर य ये पारा, करी गोष्पद सागरा
ती अशोकवनीं पाहे, केली माता जिणें धरा. ५
तों ये कामी रा क्षसेंद्र, 'स्वप्रिया हो' म्हणे खळ,
श्री वदे प्रभुच्या तेजें 'न तूं ही खरसा जळ.' ६
पापी जाय, म रुत्पुत्र मुद्रा दे श्रीस वांचवी,
तच्चूडामणि घे खूण स्वांतीं संदेश सांचवी.

शाखी भंगी, ज [1]न्यकामें मारी अक्षा महाबळा,
ब्रह्मास्त्रा मान दे, मेघध्वाना हा सांपडे खळा. ८
ल्हाया स्वामि य [2]श क्रूरा रावणातें म्हणे, ‘अरे !
वांच, वांचवित्या देवी दे वीराधीश्वरा अरे!’ ९
क्षोभतां, अं ज लि करी बिभीषण म्हणे, ‘अहो !
अवध्य दूत, जो याचा स्वामी तो विज[3]यी न हो.’ १०
तो धनंज य तत्पुच्छीं पेटवी, वीर वायुभू
जाळी पुरी; म्हणे, ‘याला असो पुष्कळ आयु’ भू. ११
पुच्छ पाथो रा शिमध्यें विझवी, रिझवी, सुर,
निववी स्वसहायांतें तप्तांतें जेंवि कापुर. १२
श्रीचा चूडा म णि श्रीशा दे, निरोप कथी तया,
जयाधार प्रभु प्रेमें भेटे, वर्णी, करी दया. १३

इति सुंदरकांडः

## युद्धकांड

सौमित्रियुक्त श्री राम सुग्रीवानुमतें बळें
घे, जाय सिंधुतीरा जो ध्यावा गावा सदा नळें. १
बिभीषण ब रा धर्मन्याय सांगे, तया खळ
अपमानी, [3]तो शरण्या रामा वंदी गुणोज्वळ. २
राक्षसांचा [3]तो म हीश श्रीशें केला, नदीपती
सेतुनें लंघिला, [4]राजा भंगी त्या जो छळी सवी. ३
अंगदोक्तें न ज गतीसुता दे, युद्ध आदरी,
मारवी बळ तत्पाळ, भंगे आपण ही अरी. ४
नागांतकें भ य श्रीचें चमूचें नागपाशज
हरी, मारी कुंभकर्णा मग, जो उद्धरी गज. ५
घननादें [5]बा रा सारें खिळितां, वायुनंदन

---

१. युद्धाच्या इच्छेनें. २. आशीरष्पत्र—पंत (?) ३. बिभीषण—पंत. ४. सुग्रीव—पंत. ५. शरवृष्टीनें.

दिव्यौषधीनीं उठवी, समजे तारि मंद न. ६
मायासीतेसि म थितां घननादें, रडे बळ
छळज्ञ तो लक्ष्मणानें प्रयत्नें वधिला खळ. ७
शोकें क्षोभोनि ज गतीसुताघातार्थ हा निघे,
सुपार्श्व मंत्री सुयश श्रीची वारूनि हानि घे. ८
बळकोटिक्ष य रणीं करवी, [1]लक्ष्मणा अरी
पाडी स्वशक्तिनें, स्वस्थ पुन्हां मारुति या करी. ९
हरि दे रथ ज न्यार्थ, प्रभु बैसे तयावरी,
[2]सप्ताहांतीं रावणांत ब्रह्मास्त्रें कौतुकें करी. १०
श्रीरामविज य स्वर्ग[3] सत्य कैलास हर्षवी,
प्रभूत वाद्य सद्गीत पुष्प प्रेमाश्रु वर्षवी. ११
क्रिया राक्षस रा ज्याची बरवी करवी, मग
बिभीषणा पदीं स्थापी. श्री दिव्यें हर्षवी जग. १२
पुष्पकें ये प्रे म निधि, भ्रात्या भेटे, बसे पदीं;
प्रभूदयीं जगें हृष्टें जसीं यादें सुधानदीं. १३

इति युद्धकांडः

## उत्तरकांड

कुंभोद्भवमुखें श्री श शत्रुचा मानुनि प्रिय
ऐके पूर्वचरित्रास पैरित्रासहराक्रिय. १
जगत्प्राणकुमा रा चें जन्मकर्म दिला वर
ब्रह्मादिकीं तें चरित प्रेमें ऐके[4] हलावर. २
जे नाशिते पर म हा कपिराक्षसनायक,
त्यांतें पूजी परम हा स्वाश्रितोत्सवदायक. ३
साधितातित्स्वभ ज ना सदार प्रभु वातजा
पूजी, सदिष्ट वर दे, काळें स्पर्शे न घात ज्या. ४

१. हस्तदोष–**लक्षणा**. २. सात दिवसांच्या शेवटीं. ३. भयहारक क्रिया ज्याची असा (राम). ४. हस्तदोष–**एके**.

प्रजांतें रंजवी य त्नें, निंदितां श्रीस हि त्यजी,
स्वर्णश्रीसीं करी यज्ञ अश्वमेधादि नित्य जी ! ५
पक्षीश्वान हि ता रा या धर्में न्यायें न आळसे,
काळ सेवकसा लोकां भी, कीं ते प्रभुबाळसे. ६
जो विप्राचा सुत म रे त्यातें तत्काळ वांचवी,
मारवी शत्रु, भरतीं शत्रुघ्नीं यश सांचवी. ७
जानकीचे तनु ज ते कृती कुश लव, स्वयें
वाल्मीकिनें पढविलें त्यांसि ' रामायण ' [1]स्वयें. ८
तद्गीत ऐके स्व य श प्रसन्न प्रभु होय ज्या
चकोर केलें सत्काव्यें चंद्र तन्मुखतोयजा. ९
प्रभु श्रीतें, 'दिव्य ज नप्रत्ययार्थ ' म्हणे ' करीं '.
ती ' शुद्धा तरि घे ' ऐसें वदे, जाय धरोदरीं. १०
चौघांचे धर्मन य वित् पुत्र आठ गुणाकार
श्रीरामें ते सर्व राजे केले, घेते उणा कर. ११
सत्यसंध सदा रा ध्य प्रभुप्राण बहिश्चर
जो लक्ष्मण तया त्यागी घडतां [2]वागनादर. १२
प्रजा सर्वा हि वि म ळा विमानांमाजि वाहिल्या,
नेल्या स्वलोका ताराया, कथा श्रोत्यांसि राहिल्या.
' सप्तमंत्रात्मक ' प्रेमें मयूरें रामनंदनें
' रामायण ' श्रीरामीं हें अर्पिलें कृतवंदनें. १४

इति श्रीसप्तमंत्ररामायणं संपूर्णं ।

---

१. सुष्ठु शुभावह विधिनें—पंत. २. वचनभंग.

# दिव्यरामायण*



(गीतिवृत्त)

कल्याणाच्या मूळा श्रीकांता भक्तवत्सळा ताता
प्रार्थी अत्युन्मत्ता दिक्कंठातें वधावया धाता. १
भास्वद्वंशोत्तंस[1] ज्ञातात्मा दिग्रथ क्षमाभर्ता,
त्याची स्त्री कौसल्या, तीच्या पोटासि ये जगत्कर्ता. २
रामाख्या स्वीकारी, जी कैकेयी तिजी सुमित्रा त्या
माता साध्वीत्वें या विश्वाच्या फार मानल्या त्राल्या. ३
भव्या रता तत्वा आधींचे तीन वर्ण तन्नाम,
जो कैकेयीपुत्र ज्ञात्यां याचा रुचे गुणग्राम. ४
श्रीरामासीं युक्त प्रेमानें लक्ष्मण क्षमासक्त,
ज्ञाता शत्रुघ्न श्रीकैकेयीसूनुचा सदा भक्त. ५
आधीं च श्रीराम क्रव्यादांच्या चमूसि जाळून,
विश्वामित्रातें दे आनंद प्राज्य याग पाळून. ६
केलें श्रीशें होय श्रोता जेणें समस्त हर्षी तें,
कीं, ग्रावत्वोन्मुक्त[2] स्त्री भेटे गौतमा महर्षीतें. ७
रुद्राच्या कोदंडा मोडी, दे मैथिला महा हर्ष,
स्वस्वीकारें झालें श्रीला, तसा जसें सुधावर्ष. ८
विश्वामित्राज्ञेनें त्या वैदेहें स्वलंकृता अन्या

---

* गीतिवृत्त हें मात्रावृत्त असलें तरी सोळांहून कमी अक्षरांत तें साधतां येत नाहीं; यामुळें, या वृत्ताची मात्रासंख्या तीस आहे तथापि, सर्व च दीर्घाक्षरें योजून हें वृत्त साधण्याची इच्छा असली तरी तें शक्य होत नाहीं. प्रस्तुत रामायणांत तसें च झालें आहे. प्रत्येक गीतीच्या प्रत्येक चरणांतील ११ वें व १३ वें अक्षर लघु आहे व तसें असणें अपरिहार्य आहे. १. सूर्यवंशांतील श्रेष्ठ. २. पाषाणत्वापासून सुटलेली.

श्रीरामाच्या सर्व भ्रात्यांला उत्सवें दिल्या कन्या. ९
क्षत्रघ्ना रामाच्या होता चित्तांत कोप जो भारी,
त्यातें हा तेजस्वी सूर्य ध्वांता जसा तसा वारी. १०
ताताच्या सत्यातें, कैकेयीच्या हि हा मना रक्षी,
राज्य त्यागी, रानीं राहे, वल्की जटी फळें भक्षी. ११
मातेच्या आज्ञेनें सेवी ज्या चित्रकूटगोत्रास
देतो गात्या श्रोत्या जीवाच्या संसृतीस तो त्रास. १२
शोकें शापें राजा साकेतीं गेह देह ही सोडी,
निंदी कैकेयीतें पुत्र, श्रीची च जी धरी गोडी. १३
'यावें मागें' ऐसें प्रार्थी तो हस्त बंधुला जोडी,
'चौदा वर्षें रक्षीं भू' हे आज्ञा न साधु तो मोडी. १४
राहे नंदिग्रामीं हा ही वल्की जटी जसा आर्य,
स्वामीच्या श्रीपादू पीठीं स्थापूनि चालवी कार्य. १५
सौमित्रिश्रीसीतायुक्त श्रीराम अत्रितें वंदी,
त्या ही तद्भार्येतें, ज्याचे ब्रह्मादि वेद ही बंदी. १६
ती साध्वी सीतेच्या दिव्या देहासि दे उटी भव्या,
पुष्पांची माळा ही, कीं जी वाळों नये सदा नव्या. १७
जो सीतेचा हर्ता संहारी दंडकीं विराधा त्या
तारी, सारी शापा तो, ज्याची ज्ञान दे गिरा धात्या. १८
ज्यांची धर्मीं निष्ठा, ऐसे जे दंडकीं वनीं होते,
भेटोनि श्रीराम प्रेमें तारी दयानिधी तो ते. १९
प्राशी पारावारा जो योगी त्यासि भेटतां, तो या
शस्त्रें दे, जीं राहों देती न द्विट्चमूमुखीं तोया[1]. २०
ताताच्या सन्मित्रा भेटे गृध्रा जटायुला बापा.
'रक्षावी हे सून' प्रेमें ऐसें म्हणे खगक्ष्मापा. २१
गोदातीरीं राहे ख्यात न्यग्रोध[2] पांच ज्या स्थानीं,

१. तेज, पाणी. २. वडाचे वृक्ष.

जेथें संपादावी सिद्धि ध्यानादिकीं [1]धृतास्थानीं. २१
सौमित्रीनें केली पर्णांनीं ही मनोरमा शाळा,
कांतप्रेमें होती स्वप्रासादीं तसी धराबाळा. २२
तों मायारम्यांगी कामांधा रावणस्वसा आली,
झाली विघ्राणा ती; कीं सिंहीची कसी शुनी आली? २४
दुष्टेचा दुष्टात्मा जो कैवारी खराख्य ये युद्धा;
मारी रामस्वामी तत्सैन्या त्या हि संगरीं क्रुद्धा. २५
रक्षोराज क्षोभे, मारीचा राक्षसा पुढें प्रेषी,
तो ही [2]तन्निर्बंधें झाला स्वर्णैण सज्जनद्वेषी. २६
सीता त्यातें पाहे, प्रार्थी स्वामीस तो धरायाला,
धन्वी मागें लागे देवांचें वांछिलें करायाला. २७
त्यातें रामस्वामी दूरारण्यांत मार्गणें ताडी,
'हा! सीते! हा! बंधो!' हे फोडी हाक तो भ्रमीं पाडी. २८
झाली सीता भीता, दीरा वीरा म्हणे, 'पतिप्राण
रक्षीं, लक्षीं धर्मा, साधो! बाधो न मी, करीं त्राण.' २९
तो प्रार्थी, 'माते! हे रक्षोमाया, न हाक आर्याची.'
श्री त्या गांजी व्हाया शक्राच्या शीघ्र सिद्धि कार्याची. ३०
बोले ती, 'जा पापा!' सोडी दुःखार्त तो हि शाळेला,
तों ये कामी क्रोधी लोभी, ने शीघ्र भूमिबाळेला. ३१
त्या भंगी गृध्रेंद्र, च्छेदी तत्पक्ष तो हि तत्काळ.
ने व्योमाच्या मार्गें, रोधी लंकेंत तीस सत्काळ. ३२
भेटे भ्राता भ्रात्या, सांगे संताप जो मना झाला,
म्याला दुश्चिन्हें ही श्रीराम क्षिप्र आश्रमा आला. ३३
शून्या शाला पाहे, स्त्रैणाच्या श्रीश रीतितें वाहे,
बोले वाणी 'हा!' हे, प्राणी कोणी न शोक तो साहे. ३४
रानीं श्रीतें शोधी तो [3]धीरैध्येयपाद ताताच्या

---

१. धारिलें आहे आस्था ज्यानीं. २. त्या रावणाच्या आज्ञेनें. ३. श्रीराम.

मिळा पाहे, ऐके तत्तुंडें हेतुतें स्वघाताच्या. ३५
त्यातें देता झाला प्रेमें अंतीं मुकुंद तो मांडी,
सांडी स्त्रीच्या शोका, ताताची तेंवि तत्क्रिया मांडी. ३६
त्या शोकीं ही तारी, खावूं पाहे कबंध जो त्यातें;
भिल्ली पूजी प्रेमें या विश्वाच्या जपोनि जोत्यातें. ३७
पंपातीरीं बोले सीतेतें आठवूनि 'हा!' राम,
जो साक्षात् सर्वां ही दासांचा स्वर्गभूरुहाराम[१]. ३८
वाताच्या पुत्राला भेटे, सूर्यात्मभू सखा जोडी,
सुग्रीव श्रीभूषा दे, दीर्घ श्वास देखतां सोडी. ३९
अन्योन्यक्लेशातें जाणोनि श्रीश तो म्हणे, 'आधीं
त्वत्कार्याचा कर्ता मीं, बा! मत्कार्य तूं पुढें साधीं.' ४०
सुग्रीवातें मारूं पाहे, स्त्री श्री हरूनि, जो वाळी
त्यातें एकें बाणें मारी, मित्रासि राज्य दे, पाळी. ४१
जातां वर्षाकाळ, श्रीसीतेचा करावया शोध
राजा ते सर्वत्र प्रेषी देवांश जे महायोध. ४२
कीशर्क्ष प्रोत्साहें गेले जे अंगदादि काळाशा[२]
शोधाया ते कष्टी झाले होतां न पूर्ण पौळाशा[३]. ४३
मासातें लंघूनि भ्रांतस्वांत प्लवंग ते झाले,
प्राणत्याग ध्याती, उग्रा सुग्रीवशासना भ्याले. ४४
प्रायस्था[४] सेना जों झाली प्राणां म्हणोनि 'संपा' ती,
सिंधूच्या तीरागीं[५] तों ये खायास गृध्र संपाती. ४५
ऐके त्यांच्या गोष्टी, मध्यें आलें जटायुचें नाम,
सीतारामांचें ही जेणें साधे असाध्य ही काम. ४६
वृत्त भ्रात्याचें तो त्यांतें प्रार्थी, पुसे बया सारें,
कीशानीं तें नेलें त्यांच्या चित्तांत तच्छ्रुतिद्वारें. ४७

---

१. कल्पवृक्षांची बाग. २. दक्षिण दिशा. ३. रामसुकंठ–पंत. ४. प्रायोपवेशन केलें जिनें असी (सेना). ५. तीरावरील वृक्षांचे ठायीं.

दे तोय भात्याला, त्यांतें सांगे स्ववृत्त तो दक्ष,
" भास्वत्तेजें झाले माझे हे दग्ध कीशहो! पक्ष. ४८
भ्राता तो म्यां ज्येष्ठें पोटाखालीं च अंडसा केला,
या चि क्षमाध्रीं[1] झाला दाहार्तां पात, ताप ही गेला. ४९
अंतातें मत्ताप ज्ञानिश्रेष्ठें निशाकरें नेला,
'सीतेच्या शोधातें सांगें,' मातें निदेश हा केला. ५०
'श्रीरामाच्या कार्या या जेव्हां साधिसील तूं भावें,
त्वद्देहीं पक्षाहीं मद्वाक्यें तत्क्षणीं पुन्हा यावें.' ५१
हे आज्ञा स्वामीची; ऐका लंकेंत जानकी आहे;
गृध्रत्वें हा दूर, ज्ञानें योगी जसा, तसा पाहे. ५२
मध्यें आहे भर्ता सिंधूंचा योजनें शत स्पष्ट,
श्रीरामाच्या भक्ता संसारांभोधि ही न दे कष्ट." ५३
ऐसें सांगे जों तों आलें पक्ष क्षणांत, संपाती
जाय व्योमीं, चिंता संपे, त्यांतें म्हणे न 'संपा' ती. ५४
वाताच्या पुत्रातें ऋक्षेंद्राच्या स्तवें दिली शक्ती
ती वाढे उत्साहें भक्ताच्या मानसीं जसी भक्ती. ५५
वेगें श्रीरामाचा पत्री जैसा तसा उडे, ताडी
वक्षें मैनाकातें, वृक्षातें उग्रवातसा पाडी. ५६
नागांच्या मातेतें, विस्तीर्णीं तन्मुखीं सिरे, वंचीं;
भक्तग्रासा काळीं नाहीं[2] ती सिंहिका वरीं कंचीं? ५७
पारा पावे, शोधी लंका, पाहे सतीस जें क्षुद्रा
श्री धिक्कारी तें ही; एकांतीं दे सुधी तिला मुद्रा. ५८
ऐके वृत्त प्रेमें; श्री संदेशा कथी सुधीगेया[3].
हे यातु ध्वंसाया देवी चूडामणि स्वयें दे यां[4]. ५९
रुद्धा[5] क्रुद्धा शुद्धा श्रीसीता ज्या वनांत 'हा राम!'

---

१. महेन्द्रपर्वतावर. २. ह्या चरणाचा अर्थ नीटसा लागत नाहीं. ३. रामा. ४. मारुतीला. ५. अटकेंत ठेविलेली.

ऐसें बोले शोकें, तापे, ज्याचें 'अशोक' हें नाम. ६०
त्यांतील क्रोधानें शाखी मोडूनि मारुति स्वैर
रक्षःसैन्यें मर्दी तीं ज्यांचें वज्रपाणिसीं वैर. ६१
मारी दिक्कंठाच्या पुत्रा क्रुद्धा महाबळा अक्षा,
लक्षा वीरांच्या[1] हा, तैसा दावाग्नि तो जसा कक्षा. ६२
सेनाकोटिध्वंसें युद्धीं अत्यंत इंद्रजित् क्षोभे,
तेजस्वी कार्यार्थें ब्रह्मास्त्रा सांपडे तरी शोभे. ६३
तो बांधूनि क्रुद्धें मेघध्वानें पित्याकडे नेला,
आचार्यें दुश्छात्रा तैसा त्या बोध या बुधें केला. ६४
बोधें राजा क्षोभे, पाहे याचे हरावया प्राण;
केलें व्हाया भव्य प्राप्त प्राज्ञें बिभीषणें त्राण. ६५
सांगे, 'पुच्छ स्नेहें आर्द्रें वस्त्रें करा, बरें गुंडा[2].
लावा ज्वाला, लंका दावा, सोडा दमूनि या पुंडा.' ६६
मित्राच्या[3] पुत्राच्या श्रीनें संप्रार्थिला न पुच्छातें
स्पर्शे, पेटे वह्नि, क्षोभे द्यायासि हानि तुच्छातें. ६७
आधीं रक्षःसेना तो, ती लंका मग क्षणें जाळी,
आळी केल्या दीप्ता प्रासादांच्या, बिभीषणा पाळी. ६८
पारावारीं केला लांगूलाग्राग्नि वातजें शांत,
आत्मा श्रीचा पश्चात्तारेचा तो हि भूरमाकांत. ६९
सीतेच्या संदेशें चूडारत्नें हि हर्षला, भानें
झाला त्यक्त स्वामी तो, बर्हीं जेंवि वर्षलाभानें. ७०
आलिंगी स्नेहानें स्वामी तो वर्ण्य होय या दास,
पोषी भक्तास श्रीकांताचें प्रेम, तोय यादास. ७१
कीशर्क्षांच्या सेना घेवूनि श्रीश सागरा गेला,
वाटे हा शुद्धाब्धि[4] क्षारीं[5] जाणोनि आगं[6] रागेला. ७२

---

१. हस्तदोष—विरांच्या. २. गुंडाळा. ३. वायूच्या. ४. गोड्या पाण्याचा सागर च असा राम. ५. क्षारसमुद्रावर. ६. अपराध.

धिक्कार ज्येष्ठानें केला कल्याण सांगतां प्राज्य,
वंदी जो, स्वामी दे लंकेचें त्या बिभीषणा राज्य. ७३
अग्न्यस्त्रें तापे, ये, प्रार्थी जो, त्या हि सागरा मानें
केला भारी हर्ष, प्रेमें सोडूनि राग रामानें. ७४
केला श्रीरामाच्या आज्ञेनें सागरीं नळें सेतु,
सैन्या पारावारा विश्वा पापा तरावया हेतु. ७५
मूर्धा चाप श्रीला मायेनें पंक्तितुंड मायावी
दावी, 'हा ! हा !' ऐसें बोलायाला मुहूर्त तो लावी. ७६
त्या पारावाराच्या पावे तें सैन्य सेतुनें पारा,
पाडी दिक्कंठाला सुग्रीव, क्ष्मारुहा जसा वारा. ७७
सामार्थ श्रीराम प्रेषी दिक्कंधराकडे दूत,
पूतश्रेयोबोधें[1] क्षोभे, मंत्रें जसा महाभूत. ७८
श्रीरामासीं युद्ध प्रारंभी राक्षसेंद्र अज्ञानें,
केले अत्याश्चर्यें[2] चित्रें ब्रह्मादि या चि यज्ञानें[3]. ७९
मोटेमोटे योद्धे युद्धीं मेले, स्वयें जह्री भंगे,
मत्त क्रव्यादांचा भूभर्ता तो दुराग्रहीं रंगे. ८०
मेघध्वान क्षोभे, सभ्रात्या क्रूरनागपाशार्नीं
बांधी, भंगी सेना बाणार्नीं ध्वस्तदेवपाशार्नीं[4]. ८१
'त्यांची दुःखावस्था सीतेला दाखवा' म्हणे पापी,
द्वेषी प्रेषी युद्धस्थानीं मोहार्थ पुष्पकीं स्थापी. ८२
यन्नामीं आधीं त्रि, प्रांतीं टा हा, जकार त्यांमध्यें,
ती श्रलि सांगे, 'हे माया केली खळात्मजें वध्यें.' ८३
त्या पाशांपासूनि व्याळांचा काळ सोडवी देवा,
हे वात्सल्यें रामस्वामीच्या पक्षिपा घडे सेवा. ८४
जागा केला यत्नें तो कुंभश्रोत्र धाडिला काळ,

---

१. पवित्र कल्याणाच्या उपदेशानें. २. आश्चर्यचकित; स्तब्ध. ३. रणयज्ञानें.
४. भग्न केली आहे इन्द्राची इच्छा ज्यानीं अशा बाणानीं.

सुग्रीव व्यामोहीं त्या, ताक्ष्यां सांपडे जसा व्याळ. ८५
तत्कर्णघ्राणातें, मूर्च्छा जातां चि तो सुटे, तोडी,
थोडी सेना राहे, भक्षी, मारी, न देखिला सोडी. ८६
त्याची शक्ति प्राज्या सेनेला कांपवी जसी थंडी,
तैशाचा ही मूर्धा लीलेनें राम मार्गणें खंडी. ८७
हर्ष स्वर्गीं, शोकें होतां दिक्कंठ, घाबरा, माजे;
भ्याले क्ष्वेडा[1]त्युग्रा होते मानीत राव रामा जे. ८८
दिक्कंठ स्वभ्रात्या शोची, लोभी जसा धना नष्टा,
सांत्वी पुत्र ज्येष्ठ क्रूरात्मा द्यावया महाकष्टा. ८९
गूढ[2] व्योमीं राहे तो मेघध्वान बाणवृष्टीतें
निर्मी, पाडी सैन्यें तीं, त्या ही भक्तवत्सगृ[3]ष्टीतें. ९०
श्रीकैलासापासीं सांगे ऋक्षेंद्र ओषधीगोत्र,
तच्छृंगातें आणी अक्षारी, वज्रभृत् करी स्तोत्र. ९१
त्या ओषध्युत्पन्नें गंधें शल्यें निघोनियां गेलीं,
वातें त्या शृंगाच्या सैन्यें जागीं पळांत तीं केलीं. ९२
शल्यें गेलीं, झाले नाहींसे चि व्रण, प्रभूत रणीं
ये तेज, [4]व्यभ्रींचे ते दीवे भासले प्रभू तरणी. ९३
[5]आगस्कर्ता हस्ती तैसा तो मेघनाद या रामा
सिंहा मत्तत्वें दे क्षोभा नेणोनि दुःसहा धामा. ९४
श्रीरामाच्या तेजें सेना [6]बह्वी रणांगणीं आटे,
त्याला अभ्युत्पन्नीं बैसावें स्यंदनीं असें वाटे. ९५
मायासीता दावी, तच्छी[7]र्षाब्जा रणांगणीं कापी,
स्थापी मोहीं सारे, एकांतीं होम तो करी पापी. ९६
'माया' ऐसें सांगे, वारी त्याचा पितृव्य मोहातें;
सौमित्रीनें केला युद्धांत प्रेत शत्रु तो हातें. ९७

---

१. अत्युग्र विषाला. २. गुप्त. ३. गाईला. ४. निरभ्रांतील. ५. अपराधकर्ता. ६. पुष्कळ. (सेनेचें विशेषण). ७. पृष्ठ २३ टीप ५ पहा.

या पुत्राच्या शोकें क्षोभे, सीता वधावया पाहे,
त्यातें मंत्री वारी, आयुःशेषें कुधी हि तो राहे. ९८
'सारे मारा' ऐसें सांगे, धाडी हठी चमू भारी,
कोटीनीं मोजावी ऐशीतें राम रुद्रसा मारी. ९९
जाला अत्युद्विग्न स्त्रीकोटीच्या तदा विलापानें,
ताप क्ष्वेडाच्या ही ऐसा कोणा न दाविला पानें. १००
क्रव्यादांचा अंता जाया न्यायास हा निघे राजा,
सुग्रीव स्वानीका[1] सांगे, 'चिंता न हानि, घेरा या[2].' १०१
युद्धीं सौमित्रीतें पाडी, तद्वक्ष शक्तिनें भेदी,
आणी तो त्या शृंगा, होतां श्रीराम मानसीं खेदी. १०२
गेला आला गेला आला तत्काळ काय सांगावें?
मारुत्यन्या गातां हंसा सोडूनि वायसा गावें. १०३
भ्राता होतां स्वस्थ, त्रैलोक्याचा हरावया ताप,
पापक्रव्यादेशा माराया श्रीश घे करीं चाप. १०४
यापूर्वीं युद्धांत क्रूरा शूरा दशानना मोडी,
थोडी दावी शक्ति, क्रीडायाला पुनःपुन्हा सोडी. १०५
या अंतीच्या युद्धीं शक्राच्या स्यंदनीं बसे, भारी
सप्ताहोरात्र श्रीराम क्रीडे, यशें जगा तारी. १०६
दिक्कंठाचें केलें शौर्य प्रख्यात मानदें आद्यें[3],
गाया सारज्ञानीं गंधर्वांनीं सजूनियां वाद्यें. १०७
श्रीगंगेच्या पावे येया ओघा बरोबरीला जो,
तद्गीतीला अन्या नम्रा हो बावरो बरी लाजो. १०८
श्रीभर्ता लंकेच्या नाथाचीं मस्तकें शत च्छेदी,
पावेना अंतातें, ब्रह्मास्त्रें तेधवां उरीं भेदी. १०९
दिक्कंठाच्या अंतीं शक्र ब्रह्मा महेश ही हर्षें,
श्रीरामीं पुष्पांतें देवर्षिव्रात संस्तवी वर्षें. ११०

---

१. आपल्या सैन्याला. २. निर्यमक. ३. रामानें.

दिव्या भेरी वाजे, गाती गंधर्व या चि कृत्यातें.
स्वर्वेश्यांचें वृंद प्रारंभी प्रेक्षणीय नृत्यातें. १११
रामाज्ञेनें प्रेता दिक्कंठाची क्रिया करी भ्राता,
त्राता विश्वाचा दे कारुण्यें हर्ष सज्जनव्राता. ११२
सौमित्रि स्वामीच्या आज्ञेनें त्या पदीं नता स्थापी,
दिव्यें श्रीसीतेची भव्या कीर्ति त्रिविष्टप[1] व्यापी. ११३
भेटे तात प्रेमें पुत्रा रामा सलक्ष्मणा नम्रा,
हुंगी माथां, आज्ञा राज्याची दे तया रमाकम्रा[2]. ११४
उग्रा युद्धामध्यें होतें कीशर्क्षसैन्य जें मेलें,
पीयूषाच्या वर्षें शक्रें जीवंत सर्व तें केलें. ११५
पूजा घ्याया प्रार्थी श्रीशा लंकेश हात जोडून,
स्वामी सांगे, 'पूजीं आम्हां दोघांसि मात्र सोडून. ११६
पूजीं या सुग्रीवा या सैन्या, यांत मीं सुखी जाण,
बा! भेटीव भ्राते, दोघे ते सत्य मूर्त मत्प्राण.' ११७
पूजी सर्वांतें, दे बैसाया पुष्पक स्वभ्रा[3]वांतें,
भेटों ये, घेवूनि प्रेमें त्यां हीं शुचिस्वभावांतें[4]. ११८
सेतु श्रीला दावी, विश्लेषींच्या कथा स्वयें लावी,
सद्भक्तभ्रात्यांला दे भेट श्रीश, जी सदा गावी. ११९
विप्र भ्राते माता पौर श्रीवल्लभासि पाहूनीं,
बाहूनीं आश्लेषा[5] देती रोमांचभार वाहूनीं. १२०
स्तोत्रांच्या पुष्पांच्या आनंदाच्या हि वृष्टि लाज्यांच्या,
ते भाग्याचे वेळा ती झाली प्राप्त दृष्टिला ज्यांच्या. १२१
भ्रात्यांला त्या भक्तां कीशर्क्षांला हि भव्य दे वेश,
साकेतीं ये, दावी सर्वांला शर्म नव्य देवेश. १२२
राजा झाला राम, श्रीसाकेतीं प्रजा सुखें धाली,

---

१. त्रैलोक्य. २. लक्ष्मीकामुका. ३. भरतशत्रुघ्नांला. ४. सुग्रीवबिभीषणादींना. ५. आलिंगन.

—२०

आली वैकुंठाची शोभा, धन्या वसुंधरा झाली. १२३
'श्रीराम स्वामी दे सर्वांला सर्व अर्थ साधूनीं,
त्यातें गावें भावें,' केला हा सूपदेश साधूनीं. १२४
सर्वांचा ही ठाईं त्यांत प्रेमा मरुत्सुतीं मोटा,
या हें दे कीं 'यावत्कल्प प्राशीं कथा, नसो तोटा.' १२५
या[1] तें जें पावावें पीयूषाच्या नदांत यादानें
कीं कामें[2] दावावे[3] कोणाला ही नें दांत[3] या दानें. १२६
'दिव्यरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें. १२७

इति दिव्यरामायणं संपूर्ण ।

---

# सुखरामायण*

(गीतिवृत्त)

दशमुखवधमति विधिसुरनुतपद जगदधिप अजित वरद हरी
परम करुण म्हणवुनि दशरथ नरवर तनुज मनुजपण हि धरी. १
कुशिकतनयसवसमवन करि, मुनिवरयुवतिदुरितगिरिस खणी,
मग पुरहरधनु चुरि, वरि अवनिजनिस[4], सकलसुभटमुकुटमणी. २
जनक निजदुहितृपति करि दशरथसुत सकळ, परम मह करुनीं,
पुर बहु सुखवि, परशुधरखर[5] रुडनळसहित[6] भुजजभय[7] हरुनीं. ३
अवितथ जनकवचन करि, पुरवुनि अभिलषित सुखवि बहु जननी,
अनुजयुवतिसह वरि वनवसति, धरुनि हृदय दशवदनहननीं. ४
दयिततनयविरहदहनविकळ नृपति 'अहह!' वदत असु खरची,

---

१. मारुतीला. २. इच्छेनें. ३. पुनः तोंड न पसरावें. * या रामायणांत सर्व लघ्वक्षरें साधिलीं आहेत. अत्यांक्षराचें गुरुत्व अपरिहार्य आहे हें काव्यज्ञांस सांगावयास नको च. ४. सीतेस. ५. परशुधारी विष्णु (परशुराम). ६. क्रोधाग्नी-सहित. ७. क्षत्रियभय.

दशरथनिधन बहुत पुरभरतधृतिस नुरवि, अतुळ असुख रची. ५
प्रभुसि भरत चरण धरुनि विनवि, परम करुण तरि हि न परतला,
धृत[1]मुनिपथ समजुनि महिसमवनगुरुकथित विहिततप रतला. ६
शमधन वनरुचि शुचिऋषि बहुत मुदित करुनि घटजमुनिस नमी,
पितृसख खग मग जगदिन[2] सुखवि, परम कुमति खर हि सबळ दमी. ७
बहिण नकटि निरखुनि खळ दशमुख करि कनकहरिण, युवति हरी,
स्वरत अजित तरि विलपुनि खगमृगकुळ सकळ परम विकळ करी. ८
दशमुखहतपतगपतिस दहन सलिल सुगति दुरितवनदव[3] दे,
श्रुति[4] भज गतिस असि गिलनपर[5] रिपुस हि दुरितदहनवनद[6] वदे. ९
प्रभुवरचरणपरिचरण[7] करुनि मिळवि अतुळ मुदतिशय शबरी,
गुरुपदरुचि शुचि तरि कविबहुमत कसि करिल विमळ न यश बरी? १०
प्रथम पवनसुतमन हरि, मग रघुवर निववि रविज सुगळ हरी,
निवटुनि हरितनुजनि अरि[8] कपिमहिपति तदनुजनुस वरद करी. ११
सुगळ महिजनिस हुडकवि, कपिभटचरवदनहृदयगद मळवी,
स्थिति दशरथसखखगगुरु कथि विधिसुत पवनजनुस बळ कळवी. १२
जलधि उडुनि, करुनि अतुळ कुतुक, हुडकि सकळ दशवदनवसती,
'बत! बत!'[9] जप करि पवनज हरि, जंववरि निरखि सुगुणखनि न सती. १३
उपवन बहु कपिस निववि, वळखुनि तिस, निरसि असुखमति समुदी[10],
खळ विनवि, हिमट[11] मुख करि, मग निरखवि, नमुनि चरण, सतिस मुदी[12].
कुशळ कथि, पुसुनि खुण, मणि वरि हरि, मग सदुपवनज सुतरु चुरी,
खळबळसुत मथि, हितवच न गणि, म्हणुनि रडवि करुनि भसित पुरी. १५
पुनरपि जलधि उडुनि, कपिबळ सुखवुनि, विभुसि नमुनि, रुचिर मणी,
नयनविषय करि, कथि, 'तव असि हितमित वदलि अतनुरुचि[13] रमणी.' १६

---

१. धरिला आहे मुनींचा मार्ग (आचार) ज्यानें तो भरत. २. जगत्प्रभु. ३. पापारण्यास वणवा च असा (राम). ४. वाणी–पंत. ५. शब्दार्थ? ६. पापाग्नीस मेघासारखा. ७. सेवा. ८. इंद्रपुत्र वाळी. ९. हाय हाय! १०. सर्व. ११. हिरमुसलेली. १२. मुद्रा. १३. मोठें तेज जिचें अशी.

प्रमुदितहृदय विभु कपिस पसरुनि भुज उठुनि सुचिर दृढ कवळी,
स्तवुनि बहु तदुपकृतिभर, मिरवि सुयश, विखरि, सकळ जग धवळी. १७
सबळ सुगळसह अनुजनुयुत रघुपति निघुनि जळधितट वारि तें
द्विषद्[1]वरज उ[2]पगत नत निशिचरपति करुनि विरु[3]चि करि अरितें. १८
भिवुनि जळधि कथि, 'नळ कपि करिल सुपथ धरुनि सबळ उतर मला.'
तदुदित चि करुनि उतरुनि, यश करि बहु पिवुनि कंजज[4] सुत रमला. १९
प्रथम चि सुगळ अरिस कुटि, मुकुट उडवि, अनयदुरितफळ कळवी,
तरि हि कुमति शम न च करि, जरि परिभव भवन बुडवि, मुख मळवी.
घनरव विभुस तदनुजनिसह अहिंसितें[5] करुनि, उडवि कपि अवघे,
खगपति अतितर वर यश नुरवुनि विपजनित विकळपण नव घे. २१
दशमुख अनुजनिस उठवि, समजुनि हत कटक कुपित परम निघे,
कपिबळ मथुनि पळवि, धरि सुगळ हि भग्न बहुत सकळ पर मनि घे. २२
कपिपति सुगळ सुटुनि हरि बहुमत तदवयव परम हरिख[6] रची.
प्रकुपित अतिबळ निशिचर वर परतुनि बहुत सुभट हरि खरची. २३
तदवयव भुजचरणशिर विखरुनि वरविशिखनिकर अजित हरी
अवरजनिनिधन परिसुनि हळहळ दशवदन कुमति बहुत करी. २४
गगनग घनरव खर शर विखरुनि कपिकटक सविभु विकळ करी,
पवनसुत अगद मिळवुनि तदपटुपण तरणि तिमिरसम चि हरी. २५
निकट कपटपटु घनरव पुनरपि करि विकळ वधुनि महिजनितें;
श्रम नवॅं[7]निशिचरपति हरि, भगवदनुज खपवि मग दुरितखनितें[8]. २६
सुतवधविकळ कुपित खळ खरतर असि कवळि अवनिजनिकदना,
सचिव कवि विनवि परतवि, कथि रघुवरवध चि हित कुमतिसदना. २७
प्रभुवरि खळ बहु बळ वध कथुनि उठवि, अजित सकळ परि खपवी,
निरखुनि अपसर[9] निशिचर सुनटन धरि हरिहिपरिस हरिख पवी. २८

१. बिभीषण. २. आलेला. ३. निस्तेज. ४. ब्रह्मसुत नारद–पंत. ५. नाग-पाशबद्ध. ६. आनंद. ७. बिभीषण. ८. पापखाणी न्त अशा (मेघनादाला) ९. परलिखित हस्तदोष–अपशर. पळालेले.

मग जगदहित दशवदन वरि जय, कपिकटक सुगळसह दमुनी.
भगवदनुजनिस हि विकळ करि, धरि भय परम सुजनमहद मुनी. २९
पवनतनय कपि पुनरपि सपदि[1] उठवि भगवदनुजनुस अगदें,
प्रभुसि रति दिधलि बहु असि निपट अवसुमतिस[2] हि न कनकनग दे. ३०
हरि करि हरिरथमणिवरि चढुनि तुमुळ समर सदरिसह सुचिर.
शुचिरसभरित निजनयनचषक करिति अमर, म्हणति 'बहु रुचिर.' ३१
पतन न वरि अरि जरि हरिहरि शतमित रिचवि अवनिउपरि शिरें.
दश हि दिसति अनुपहत[3] चि, विभुसि म्हणति 'विशिख अचुक तरि हि विरें.'
घटज मुनि 'रविहृदय' कथि, जप करि हरि, निववि 'जैहि[4]' म्हणुनि तरणी,
रविवर विधि मनु विभुशर मग मृति कसि वरिल सदहित हि न रणीं? ३३
प्रभुवरखरतरशर चिरि सुदृढ हि उर उरवि न डेर[5] पर मरणा,
वरि विभुसि म्हणति 'जय जय!' सुर मुनि गुरु[6] करिति सुकवि परभरणा[6].
स्तवन कुसुम[7]मुदिर नटन विधिमुख सुर सुमुनि सकळ मह करिती,
स्वरनिपुण मुरजें[8] मुखरित करुनि समरजनित परम सिण हरिती. ३५
मृतदशवदनविधि करवि तदनुजनिस कथुनि परम सदय हरी,
मग भगवदनुज चिरंतर[9]वरपदगतरचितचरण नतिस करी. ३६
मग महिजनि निजशुचिपण कळवि शिरुनि बसुनि वसुनि चिर दहनीं,
सुरमुनिजनमतिस गमलि रमलि भरुनि निवुनि सरसिरुहगहनीं[10]. ३७
शिव विधि शतमख दशरथ दहन अमर मुनि हि वदति 'शुचि रमणी
न विटिव, तुज हरिस चि चिर भजलि, मिरिव वरुनि अजडे[11] रुचिर मणी[11].'
विभुवरतनुसि वरि निववि जग हि, विनय धरुनि जनकपद[12] नमुनी[12],
'जय जय!' म्हणति अजितगुणनुतिस करिति सतत सदन वदन मुनी. ३९

---

१. तत्काळ. २. अ+वसु+मतिस किंवा अव+सुमतिस=निर्धन किंवा मूढ स्त्रीचे बुद्धीला. ३. न मेलेलीं. ४. मार. ५. शिल्लक. ६. परमोयं रणोभूतभाविरणगुरुरित्यूचुः **–पंत** ७. पुष्यरूपी मेघ. ८. मृदंग. ९. नित्य अशा श्रेष्ठपदाच्या ठिकाणीं असलेलें साधलें आहे चरण ज्यानें असा भरत(?). १०. कमलवनीं. ११. जीवंत सुंदर रत्न च अशी सीता. १२. या दोन पदांच्या मध्यें न हें अनवश्यक अक्षर पडलें आहे.

शतमख उठवि समरमृत कपिबळ जळसम चि अमृतरस विखरी.
प्रभु निजपदकमळनिकट भरवुनि यश रसिकसुमति वसवि खरी. ४०
प्रियखचरपतिस[1] कळवुनि सबळ सुगळ पुजवि विभु कुसुमकबरी[2],
प्लवगरजनिचरपतियुत निघुनि अवनिदुहितृहृदय मुदित करी. ४१
नळकपिकृत पथ निशिचरपतिकपिपतिसमधिगमसुपद[3] कळवी
विरहजनित बहु असुख हि विभु, महिजनिहृदय मुदित करि, वळवी. ४२
कपिपतिसुतनुस[4] महिजनि निजनिकट चि बसवि, सुखवि बहु परमा
वदलि,‘सखि! मम पतिस तव पति च जिववि, मज हि सदयमति सरमा. ४३
प्रियसखि! पतिशिरधनु मज निरखवि बहु सुमुखि! रडवि, परि सरमा
कपट कळवि, तरि च मिनलि महिजनु[5] रघुपतिस[6] जसि च हरिस रमा.’ ४४
परिचित अपरिचित हि तिस विभु कथि मुनिवसति सुनग परमधुनी[7],
प्रहित पवनतनय उडवि सकळ असुख गुहकभरतमतिमधुनीं. ४५
सुरसरिदुपपद[8]पितृसख मुनिस नमुनि पुसुनि निवविं गुहमतितें
भरतअनुजसहित जिववि निववि विरहविकळ सकळ पुर अति तें. ४६
सुरवर कुसुमघन करिति रघुपतिसह अनुज कपि हि रुचि धरिती,
पुरजन परम मह वरिति, विभुनृपगुण अखिळजगदहित हरिती. ४७
निववि शिवविधिहृदय बहु, वश यश करि रसिक, न सिकति च इतर
जितरण वितरणपटु विभु सुखवि करुनि महित अहित जन पितर. ४८
हरि हरि भय, हरि, हरि नय जयपद करि करिपवरद पर दमुनीं;
वदति ‘सदतिसुखकर विभु भवजलनिधिपतितसपतितकरद’ मुनीं[9][10]. ४९

‘सुखरामायण’ प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें. ५०

इति श्रीसुखरामायणं संपूर्णं।

---

१. भरतदर्शन कपिसत्कार–**पंत.** २. पुष्पयुक्त केशसमूह ज्याचा असा राम. ३. सिंधुतट ऋष्यमूक–**पंत.** ४. तारेस. ५. हे सीता–**पंत.** ६. सदोष पदच्छेद–**रघुपतिस जसि च.** ७. गंगा. ८. समीपस्थ. ९. पडलेले पापी. १०. यमकार्थ सानुस्वार.

# *प्रथमस्तोत्ररामायण

(गीतिवृत्त)

विश्वस्रष्टा[1] विष्णुप्रति विनवी दशमुखक्षयार्थ, तया
वर वेदशास्त्रषट्का[2] रक्षाया दे जगीं करूनि दया. १
भूपस्तुत[3]भव्ययशा रविकुळभव सत्प्रभु प्रथित भारी
जो दशरथप्रभूत द्विजहित असकृत् सुरव्यसन वारी. २
तो भूतरणि क्षितिभृत् पति केला तातभाव[4] पाहोनि,
भूतापहर चतुर्धा[5] स्वात्मा ही गर्भवास साहोनि. ३
तो देव भूतभावन[6] कौसल्यापुत्र रामनाम धरी,
पूतात्मा परमात्मा कैकेयीपुत्र भरत होय हरी. ४
जनता करूनि मुक्ता नांदवि जो निजपदीं, जया धन्य
सुगति भजन परमा गति मागे होवूनि बाळ तो स्तन्य. ५
अव्यय भव्ययशोनिधि होय सुमित्रातनूज पुरुषमणी
लक्ष्मण शत्रुघ्न असीं नामें धरि दानवायुवायुफणी[7]. ६
होय असा क्षीरधिचा जामाता मनुज, गाधिसुतयज्ञ
क्षेत्रज्ञ[8] अक्षर[9] प्रभु रक्षी, हें चरित वर्णिती तज्ज्ञ. ७

---

*. पंतानीं ‘विष्णुसहस्रनाम’ नामक स्तोत्रावर १० रामायणें रचून प्रत्येक रामायणांत शंभर नांवें गोविलीं आहेत, म्हणून त्या प्रत्येक रामायणास ‘स्तोत्र-रामायण’ असें नांव दिलें आहे. पद्याचा क्रमांक लिहिल्यानंतर त्या पद्यांत विष्णुसहस्रनामांतील नामें क्रमानें कोठपर्यंत साधलीं आहेत तो आंकडा हि दिला आहे. १. ब्रह्मदेव. २. न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, मीमांसा आणि वेदान्त असा हा सहा शास्त्रांचा समुच्चय. ३. राम. ४. तातपणा. ५. राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न या चार प्रकारानीं. ६. सर्व भूतांतें उत्पन्न करणारा व वाढविणारा. ७. दैत्यांचे आयुष्यरूप वाऱ्यास भक्षणारा सर्प. ८. शरीरज्ञ. ९. अविनाशी.

वारी वियोग योगदपद, कविजन देवतरु निवे दांत[1]
मुनि सश्लोक; लया ने ताप, शमे जो न वरुनि वेदांत. ८
निववि प्रधान[2]पुरुषेश्वर[3] हा प्रभु जनकभूपचित्तातें,
तो शिवधनु चुरितां दे कन्या यां[4] सानुजा स्ववित्तातें. ९
जो नारसिंहवपु घे श्रीमान् खळकनककशिपुतें मारी,
तो केशव पुरुषोत्तम हा, या भृगुराम काय हो! भारी? १०
या सर्व शर्वमुख[5]सुर गाती विजया शिवप्रदा स्थाणु[6]
तैसा भृगुपति निश्चळ होय, म्हणे, 'शांति, धनु मनीं नाणु.'[7] ११
भूता दिवस तसा दे तो सुविजय मंथरामना मर्ह न,
जो श्रीचा अव्यय निधि, कैकेयीनें तया दिलें गहन. १२
मातृमनीं संभवला भाव न हित देवरचित, कीं भर्ता
श्रीचा हो क्षिप्र, भवप्रभुसा स्वोग्राहितायुचा हर्ता. १३
ईश्वर वल्कजटाधर लक्ष्मणसीतासमेत जें जाय,
हर्षे बहु स्वयंभू शंभु हि, आदित्य तें म्हणे 'हाय!' १४
'हा! पुष्कराक्ष!' म्हणतां, पुरजन करिती महास्वन[9] स्नेहें,
शोकें अनादिनिधन हि बहुधा तापे चि भक्त तंद्रेहें[10]. १५
विविधा तातविलापा करि, सोडी देह वृद्ध; कीं तापें
धातु जळे उत्तम ही; धीर विवेकी गळे चि तो शापें[11]. १६
मातुळगृहागत भरत साहेना अप्रमेय[12]विरहातें.
निंदी मातेसि; म्हणवि सदन हृषीकेश[13]रहित चिर 'हा!' तें. १७
ताताक्रिया करि, निवे तो प्रेमळ पद्मनाभपादरत,
भेटोनि चित्रकूटीं अमरप्रभुतें म्हणे, 'प्रभो! परत.' १८
राम म्हणे, 'ताताचें उक्त करावें चि, विश्व कर्मातें,

---

१. जितेंद्रिय. २. माया, प्रकृति. ३. जीव, आत्मा. ४. रामास. ५. महा-देवादि देव. ६. वृक्षाचें खोड. ७. मनीं शांति आणूं, धनु न आणूं, असा भाव. ८. आनंद. ९. आक्रोश. १०. भक्तरूपगृहतापेंकरून ताप–पंत. ११. श्रावणानें दिलेल्या शापानें. १२. अपरिमित. १३. इंद्रियांचा स्वामी (राम).

या गायिल मनुजेश्वरसत्यावन दाखवील शर्मातें.' १९
भव[1]वृक्षत्वष्टा दे राज्य करायासि पादुका आत्या;
नंदिग्रामस्थ विषय सकनिष्ठ त्यजि, जपे दयाश्रा त्या. २०
स्थविर[2] प्रधान हि ध्रुवनिश्चय, कीं ज्यांसि भोग अग्राह्य,
चालविति शाश्वत व्यवहार, बहु विराग आंतर, न बाह्य. २१
आरि कक्ष[3] कृष्णवर्त्मा तो मेघश्याम लोहिताक्ष हरी,
अत्रिस सुखवि, विराधप्रतर्दन[4] ब्रह्मवृंद हृष्ट करी. २२
देव प्रभूतदय जो त्रिभुवनकर कुशळगुणानिधी राम
स्तब्धारि[5] मथी, करि तो पवित्र मंगळ हि परघटजधाम. २३
ईशान[6]ध्येय प्रभु पितृसखगृध्रासि भेटला; त्याला
प्राणद किंवा प्राण चि; रामास हि तो स्वतातसा झाला. २४
राम म्हणे, 'तूं ज्येष्ठ श्रेष्ठ सुनेला वनांत संरक्षीं,
आम्हीं तव प्रजा; पतिभावें राज्या सदैव ही लक्ष्मीं.' २५
गोदातटीं मग उटज करुनि वसे तो हिरण्यगर्भगुरु[7],
भूगर्भस्त्रीरत्ना हरि दशमुख, ताप दे प्रभूसि उरु[8]. २६
माधवदयिता गृध्रें सोडविली, परि तदीय पक्ष खळ
छळपटु खड्गें खंडी, ने तें स्त्रीरत्न, मीन जेंवि गळ. २७
मधुसूदन कनकहारिणराक्षस मारूनि परतला वाटें,
लक्ष्मण साश्रु कथी तें, ज्या आर्योक्तें[9] उरस्थळीं फांटें[10]. २८
ईश्वर हि स्त्रैण तसा शून्य विलोकून गृह म्हणे, 'हाय!'
वन हुडकितां निरखिला क्षतमूर्छित तातसख महाकाय. २९
सावध करितां सांगे रावणकृत विक्रमी तनु त्यागी,
त्याची क्रिया करि, प्रभु धन्वी खड्गी वनीं वदे 'हा!' गी. ३०
मेधावी[11] लक्ष्मण या समजावी, 'करुनि विक्रम, खळातें

---

१. छेदणारा (राम). २. वृद्ध. ३. तृण. ४. मारणारा. ५. बलाढ्य शत्रु. ६. शिवानें ध्यान करण्यास योग्य. ७. ब्रह्मदेवाचा पिता (राम). ८. बहुत. ९. सौतेच्या भाषणानें. १०. यमकार्थ सानुस्वार. ११. बुद्धिमान्.

मारूं आर्या, आणूं, न असाध्य तुझ्या पराक्रम बळा तें.' ३१
राक्षस कबंध धारि, जो त्यासि अनुत्तमदयालु दे सुगती,
बसवि विमानीं शबरी, सज्जन या सद्यशोमृतें फुगती. ३२
सर्वदुराधर्ष तरि प्रभु पंपेच्या तटीं स्मरशरानीं
कांपे, लीलामानुषतनु, मानाया खरा नर परानीं. ३३
वातसुतीं सुग्रीवीं करि परम दया कृतज्ञवर राम,
दे खळ वाळीस वधुनि मित्रा स्त्री श्रीसमेत तद्धाम. ३४
निजकृति गावी कविनीं, विश्व तरावें सुखें, अशा भावें
प्रभुनें चरित्र केलें, नाम जडांच्या हि आननीं यावें. ३५
धाडी, स्त्रीस आरिस ही हुडकाया, आत्मवान् पवनतनय
शतयोजन सिंधु उडुनि वंदी सीतेसि तो सुधी सनय. ३६
प्रभुमुद्रा दे श्रीतें, राक्षस मारी, सुरेशचित्त हरी,
गांजी अरीस, लंका जाळी, श्रीरामभजनवित्त हरी. ३७
प्रणतशरणचरण प्रभु हर्षविला, कथुनि कुशळसंदेश,
श्रीचूडामणिनें ही, बहु तो ही करुनि विमद मंदेश. ३८
बहु शर्म प्रभु पावे, भेटे त्या पवननंदना राम.
या प्रभुवरप्रसादाहूनि उणा निपट नंदनाराम. ३९
सुरमुनि म्हणे, 'दशमुखा! केलें या प्रकट विश्व रे! तातें.
नाहीं तुझ्या कपाळीं, हा नमितां भक्तिभाग्य देता तें.' ४०
सर्वप्रजाभव यशें नाशाया, सिंधुच्या तटा गेला.
तों ये शरण बिभीषण; तो लंकाधीश वत्सळें केला. ४१
सेतु अहल्यातारक पांचां दिवसांत करुनि शतगावें
बळ वधि, जयापुढें शतमखमुखलोकेशतेज न तगावें. ४२
संवत्सर शत न पुरे कथितां, रण खचर कपि असा करिती;
न रिती होय चमू, जरि रक्तनद्या सागरोदरा भरिती. ४३
घनरव कपिबळ भंगी, प्रभुसि रणीं व्याळपाशबद्ध करी,

१. अजिंक्य. २. सुग्रीवास. ३. जितेंद्रिय. ४. वानर (मारुति).

श्री 'हाय!' म्हणे; त्रिजटा तिस धृति दे, व्यसन तें खगेंद्र हरी. ४४
प्रत्यय ये दशकंठा समरीं घटकर्ण मारितां रामें,
अनुज पवनवाळितनय वदले, 'बुडसिल परांगनाकामें.' ४५
बळ सेश सर्व, दर्शन न वडों देवुनि, नभीं सिरोनि, खळ
घनरव, मूर्छित पाडी; परि उठवी पवनसुत अनंतबळ. ४६
अजकुलतिलक वदे, 'हा!' मायासीतावधें, श्रमा वारी
भक्त बिभीषण, लक्ष्मण मग घननादा महाबळा मारी. ४७
सर्वेश्वर होय सुखी त्या विजयें, लक्ष्मणासि कुरवाळी;
जेणें एकें चि शरें वधिला, भेदूनि दृढ हि उर, वाळी. ४८
झाला सिद्ध दशानन सीताहनना; तया सचिव फिरवी.
मिरवी मग तेज, रणीं लक्ष्मण पाडुनि, विभुहृदय विरवी. ४९
प्रभुकार्यसिद्धिसादर मारुति उठवी, महौषधी आणी.
प्रभु शक्ररथीं बैसुनि दशकंठा स्वानुजाधि[1]ला खाणी. ५०
सर्वां दिव्यें शुचिता श्री कळवी, कीर्ति करि जगीं सुतता[2].
निववी नमुनि दशरथा प्रभु सानुज; यासि बहु रुचे सुतता. ५१
अच्युत[3], उठउनि मृतबळ, सर्वांसह पुष्पकें पुरा आला.
धाला गुहभरतसुखें प्रभु राजा, हर्ष बहु जगा झाला. ५२
'स्तोत्ररामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ५३

इति स्तोत्ररामायणं संपूर्णं ।

---

१. आपल्या धाकट्या भावाला दुःखरूप अशा रावणास. २. अत्यंत विस्तृत अशी. ३. स्वरूपसामर्थ्यानें अविनाशी (राम).

# द्वितीयस्तोत्ररामायण

देव वृषाकपि[1] दशरथसुत झाला, दशमुखासि माराया,
ताराया सुर भूसुर तत्संकट तें अशेष वाराया. १
जगदीश अमेयात्मा[2] रूपें घे च्यार विश्वहितकामें.
श्रीराम भरत लक्ष्मण शत्रुघ्न अशीं धरी रुचिर नामें. २
तो सर्वयोगपट्ट कविनुत निःसंदेह संसृति तराया,
नर होवुनि कारि लीला, सकळांचे तापशाप हि हराया. ३
वसु दे आर्थिजना बहु, दशरथ संस्कार करि. वशिष्ठ कवी
श्रुति शास्त्रें पढवि सुखें. प्रभु गुरुजनमन हि शिशुपणें ठकवी. ४
जो भूमिदेव सुमना[3] केला गाधिजमखघ्नखळदमनें,
आपण मयूर चातक झाले प्रभुला करूनि जळद मनें. ५
सत्यकरुण तीर्थचरण मुनिपत्नीपापशापताप हरी.
प्रकट करी अत्यद्भुत निजपदपंकजरजःप्रताप हरी. ६
ईश्वरकार्मुकभंगें दुर्घट ही सिद्ध करूनि तूर्ण पण,
प्रकटुनि नवरस मोत्मा[4] निववि, प्रभु दाखवूनि पूर्णपण. ७
काळासीं न असंमित[5] भृगुपति ठाके धरूनि वाटेतें.
शांत करी लीलेनें त्या प्रभु, सर्वांसि नवल वाटे तें. ८
सम सर्वांहीं वारिला आनंद असीम त्या पुरजनाहीं,
जेंवि सुरांचे, कोणां पौरांचे वाजले मुरज नाहीं. ९
तातार्चे सत्यव्रत मातेचें पुत्रराज्य, हें इष्ट
सुरचिंतित हि अमोघ प्रभु कारि वन वरुनि, हर्षवी शिष्ट. १०
सौमित्रिजानकीसह तापससा देव पुंडरीकाक्ष.
भय चित्रकूटवासि द्विजपीडक धरिति सींत जे राक्ष[6]. ११

---

१. सर्व काम पुरविणारा वराहरूपी ईश्वर. २. ज्याचा आत्मा मोजण्यास अशक्य असा. ३. सुप्रसन्न. ४. श्रीमान्–पंत. ५. वरच्छ. ६. राक्षस.

कारितो कृषीवळाच्या वृष कर्मा, परि घनाविना न फळे.
धर्म तसा जनपोषक यावांचुनि[1] अबळ, यावरूनि कळे. १२
राज्य वृथा भोग विषापरि मानी दशरथ, त्यजी देहा.
कृतिवर भरत गुरूसि जळ, मातेला धिक्, प्रभूसि यश दे हा. १३
घेउनि अभयवर निघे, आर्याज्ञा पादुका शिरीं वाहे.
रुद्रसम विरक्त जटी नंदिग्रामीं महातपा राहे. १४
धरि विनय बहु, शिरातें चरणावरि अत्रिच्या प्रभु हि अर्पी.
कन्येसि माय तैसी, अनसूया श्रीस आदरें तर्पी. १५
बभ्रु[2] मयूर व्याळा, तेंवि विराधासि बंधु हे झाले.
हें सुयशोमृत सेउनि, दंडकवनवासि विप्रवर धाले. १६
विश्वपति कुंभयोनिस भेटे, शस्त्रें पुरातनें पावे;
ज्या सदहितशमनांचे[3] सद्गुण देवर्षिनीं सुखें गावे. १७
भेटे जटायु दशरथसख गृध्र, शुचिश्रवा[4] तया सुखवी,
'तात!' म्हणे, बहु मानी, ज्या प्रभुचें वेदराशितें मुख वी. १८
अमृतयशा,[5] शाश्वत, जो स्थाणु, ध्येयांघ्रिपद्म तो स्वामी
राहे गोदातीरीं पंचवटीमाजि पर्णतृणधामीं. १९
दशमुखभगिनी विधवा शूर्पणखा ये, म्हणे, 'वरा मातें.'
रोषें सौमित्रि हरी तत्कर्णघ्राण आपल्या हातें. २०
तद्भ्राता खर ये. त्या शत्रुगजांचा महात, पाप्याला
मारी प्रभु विशिख खळा, जेंवि समुद्रा महातपा प्याला. २१
नकटी वृत्त दशमुखा कळवी तें सर्व गळदसृक्स्नाता,[6]
धाता खरादिकाच्या ऐकुनि तो कोपला तिचा भ्राता. २२
सर्वविनाशार्थ कुधी, तद्भाषित मानुनि स्वहित सेवी.
मारीच्यासि कनकमृग करुनि प्रेषी हरावया देवी. २३

---

१. रामावांचून. २. मुंगूस. ३. सज्जनाच्या शत्रूंचा नाश करणाऱ्यांचे. ४. श्रवणीय नाम ज्याचें असा (राम). ५. अविनाशी आहे यश ज्याचें असा राम. ६. गळणाऱ्या रक्तानें भिजलेली.

कपटकनकहारिणातें विश्वक्सेनप्रभुप्रिया मागे.
सुरकार्यार्थ जनार्दन तो त्यामागें वधावया लागे. २४
धांवे दूरें मृग, कळे राक्षस हें वेद्वित्सभागीता,
वेधी शरें प्रभु; म्हणे आर्तप्रभुसा चि 'हाय!' भी सीता. २५
ज्याच्या नामोच्चारें, व्यंग हि अव्यंग होतसे कर्म,
तच्छरहत कपटी ही राक्षस पावेल तो न कां शर्म? २६
गावे दांतानीं सुरनगगुरु यत्पादपद्म, ती आर्या
गांजुनि देवर दवडी, सिद्ध कराया सुरांचिया कार्या. २७
तों वेदवित् कवि, सुरद्वेष्टा ये, जनकनंदिनीस हरी.
'हा रघुवर! हा लक्ष्मण!', ऐसे ती उच्च आर्त नाद करी. २८
लोकाध्यक्षस्त्रीतें सोडवि गृध्रेंद्र, विरथ कारि आरितें.
तत्पक्ष च्छेदुनि ने लंकेंत सतीस, हर्ष दे हारितें. २९
मृग वधुनि, सुराध्यक्षप्रियकर्ता प्रभु फिरे, तयास वनीं
लक्ष्मण भेटे; सांगे सीतेचें उक्त, जें न माय मनीं. ३०
ज्या धर्माध्यक्षपण क्षण हि न सोसे कदापि, तो भर्ता
धावुनि, उटज विलोकुनि शून्य, बहु विलाप जाहला कर्ता. ३१
वाटे विलाप करितां स्त्रैण जना प्राकृता कृताविलाप.
प्रभु शोधी श्रीस वनीं. तों गृध्रांचा दिसे क्षत इलाप. ३२
चतुरात्मा नंदप्रदचारित प्रभु 'हा!' म्हणे, तया वदवी.
रावणकर्म कळवि; धरि परलोकाची खगेंद्र तो पदवी. ३३
चरित अतुळ दावी प्रभु, आरंभी तत्क्रिया, धरी सुतता.
ऊर्व्यूर्ध्वाधस्थ सुजन हर्षवि, सत्कीर्ति होय हे सुतता. ३४

१. ज्याच्या रणोद्योगमात्रेंकरून दैत्यसेना सर्व विश्वभर पळून जाते त्या विश्वक्सेन विष्णुरूपी रामप्रभूची स्त्री सीता. २. हरताळलेले परलिखित रूप—**दांतांनीं.** ३. वेद जाणणारा रावण. ४. इंद्राला. ५. धर्म—आधि—अ—क्षपण=धर्मरूपी रोगाचें अस्तित्व. ६. राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न अशीं चार रूपें ज्याचीं तो. ७. ऊर्वी—ऊर्ध्व—अधः—स्थ=पृथ्वी, आकाश आणि पाताळ यांत रहाणारे.

भक्तहितार्थ प्रभु जो होय चतुर्दंष्ट्र सिंह, तो यातें,
वात्सल्यें पुत्रत्व स्वीकारुनि, कां न देवु तोयातें? ३५
देव चतुर्भुज झाला नर ताराया जगा यशें भव्यें.
सव्यें अपसव्यें दे देवर्षीला सुखें सदा नव्यें. ३६
या करुणाभ्रा जिष्णु स्तवि बहु, हारितां कबंधशापातें,
उद्धरितां शबरीतें, फळ भोजन करुनि हरुनि तापातें. ३७
विषयजसुखदुःखांचा भोक्ता आपण मनुष्य, हा भाव
दावी पंपातीरीं सीताविरही श्रिताघतृणदाव. ३८
स्मरशरविकळा प्रभुच्या, दे लक्ष्मण धैर्यकवच, नव देहा.
तेणें सहिष्णु होउनि, 'हा!' ऐसें राम न वचन वदे हा. ३९
जगदादि जलजनाभ प्रभु मारुतिला मग स्ववृत्त कथी.
भेटवि सुगळा त्या दे कपिराज्य. तदग्रजा खळासि मथी. ४०
कपटें हि वधुनि दुष्टां, अनघ प्रभु हा शरण्य विजयशतें;
[1]गात्यासि, षडरिजेता व्हाया करि, गौरवूनि, निज यश तें. ४१
'तो विश्वयोनि[2] भगवान् विरहें खेदी नसो; मरो द्वेषी;'
हें चिंतुनि, सुग्रीव श्रीतें धुंडावया कपि प्रेषी. ४२
प्रभुनमनस्मरण पुनर्वसु पुष्य चि सर्वकार्यसिद्धिकर.
सर्वत्र वीर गेले, जाणों ते रामभद्रभानुकर. ४३
शोध उपेंद्रस्त्रीचा सांगे गृध्राधिराज संपाती,
'शतयोजनसिंधुपुढें दिसती लंकेंत शांतशंपा ती.' ४४
ऋक्षेंद्रस्तुत मारुति वामनसा वाढला, उडे, ताडी.
मानूनि विघ्न, वक्षें मैनाका आश्रयप्रदा पाडी. ४५
प्रांशु[4] दहा गांवें तो ठकवी सुरसेसि, सिंहिकेसि वधी,
लंकाधिदेवतेतें जिंकी, निववी पराक्रमें शिवधी. ४६
झाला अमोघविक्रम, पाहुनि भगवत्प्रिया अशोकवनीं.

---

गात्यासि विजयशतें गौरवूनि षडरिजेता करी—**पंत**. २. जगताला कारणीभूत.
मलेली अशी विद्युल्लता. ४. उच्च.

खळाधिकृतिनें हर्षे, 'सुकवींच्या हे' म्हणे, 'असो कवनीं.' ४७
कपि हर्षे त्या श्रीचा शुचिभाव बहु प्रभाव पाहून;
एकांतीं मुद्रा दे, तच्चरणाब्जीं शिरोब्ज वाहून. ४८
तो ऊर्जित कुशळ पुसे, घे चूडामणि निरोप, करि खोडी;
ज्यांत मनोहर तरु तें दशकंठप्रिय अशोकवन मोडी. ४९
मारुति अतींद्रसुखकर होय, क्रव्यादसैन्य लोळवुनि,
बोळवुनि, अक्षशोकज्वलनें दशकंधरासि पोळवुनि. ५०
दावूनि दूरितसंग्रहफळ, 'हाय!' म्हणावयासि तो लावी.
जाळी लंका, सुरपतिनगरीसीं जी विशंक तोलावी. ५१
उपसर्गव्याकुळ करि अरितें, परतोनि ये अजाजवळ.
श्रीचूडामणि देवा झाला, आतां जसा सुधाकवळ. ५२
झाला सुखें धृतात्मा, भेटे प्रभु सुप्रसन्न मारुतितें.
जी अंजना, त्रिलोकीं होय यश प्राप्त चंद्रचारु तितें. ५३
प्रभुवात्सल्य नुरवि तो, जो पहिला स्वामिभृत्य, हा नियम.
जाय सबळ सिंधुतटा. हर्षे, जाणोनि शत्रुहानि, यम- ५४
वेदांतवेद्य भगवान् चरणप्रणता विभीषणा राज्य,
लंकेचें दे, प्रेम प्रभुचें शरणागतीं सदा प्राज्य. ५५
भवगदवैद्य प्रभुवर सिंधूर्क्के करवि नळकरें सेतु.
प्रथम चि सुगळ मथी त्या, ज्याच्या नामांत था पुढें ये तु. ५६
सामें चि सदा योगी पावति ज्याचा प्रसाद, तो दूत
अंगद धाडी सामा. परि अरि खवळे तसा, जसा भूत. ५७
'क्षय निरुपम होय' म्हणे, 'दृष्ट न यासम' रवी; 'रहा, निकर
न कर' म्हणति हितकर; परि करि दशमुख समर वीरहानिकर. ५८
सानुज माधव केला घननादें नागपाशबद्ध रणीं.
सीता म्हणे, 'मला पतिघातीं बहु दुःख हें, न मद्धरणीं.' ५९

---

१. बलाढ्य. २. इन्द्राला फार सुख देणारा. ३. धैर्यशाली. ४. यातु (राक्षस). ५. हस्तदोष-तजा.

मधुकैटभहंता त्या प्रभुला दुःसाध्य काय पामर हा?
समरक्रीडार्थ म्हणे घननादा दशमुखा हि राम 'रहा'. ६०
गरुडा यश दे, प्रभु मग घटकर्णा परमदारुणा पाडी.
घनरव अतींद्रिय महामाय सनाथ हि समग्र बळ ताडी. ६१
दिव्यौषधि क्षमाधरशिखर महोत्साह पवनसुत आणी.
तद्गंधें वातें ते उठले अमृतें जसे मृतप्राणी. ६२
पावुनि शृंग महाबळ पुनरपि तत्काळ ये महातेजा.
मग घनरव मायाश्रीवध करि. वदले खरा पहाते ज्या. ६३
शोक, बिभीषण 'माया' ऐसें सांगुनि, हरी महाबुद्धी,
लक्ष्मण वधी घनरवा, तें यश दे गांगसें, जगा शुद्धि. ६४
दशवदन महावीर्य क्षोभें धांवे सतीस माराया.
वारी सचिवोक्ति, रुचे श्रुति देवांच्या न तीसमा, राया! ६५
दशकंठप्रेषितबळ अमित महाशक्ति रामभद्र वधी.
युद्धा स्वयें निघे, धरि सर्वस्व जनक्षयें हि न द्रव धी. ६६
कपिबळ भंगी, युद्धीं क्रोधी तो धीट लक्ष्मणा हटकी,
हाणी उरीं महाद्युतिशक्ति, जिच्या भासती विजा बटकी. ६७
होय अनिर्देश्यवपु श्रीमारुति, शृंग तें पुन्हा आणी,
उठवी सुषेण वीरा, 'जय जय!' ऐसी उठे नभीं वाणी. ६८
श्रीमान् शुभशक्ररथीं बैसे, अरिमस्तकें शत च्छेदी;
तरि दश तसीं च दिसती, न मरे परि, होय देव जों खेदी. ६९
येतो चि अमेयात्मा कुंभज, आदित्यहृदय तो शिकवी.
जपतां वरद रवि वदे, 'बा रामा! तूं चि आद्य होसि कवी.' ७०
कच्छप महाद्रिधृक् सुरकार्यार्थ प्रभु, तसा चि नर आतां,
व्हाया कृतार्थ, कविशत अत्यद्भुत पंक्तितुंडवध गातां, ७१
सप्त अहोरात्र समर करि विध्यास्त्राभिमंत्रितें रोपें

वाणी, भाषण. २. थोर मनाचा. ३. मंदराचल धारण करणारा.

हृदय [1]महेश्वासधर श्रीश विदारी, वधी खळा कोपें. ७२
रात्रिचर महीभर्ता मरतां प्रभुवरि पडे कुसुमवृष्टी.
सुरमुनि 'जय जय!' वदले. कोंदे सर्वा महोत्सवें सृष्टी. ७३
श्रीशनिदेशें आधीं विधिनें दशकंधरासि दे तोय
साधु बिभीषण. सुकृतें मग लंकाश्रीनिवास तो होय. ७४
दिव्य [2]सतांगति करवी शिवविधिसुरमुनिसमूहगीतेतें,
स्वीकारी प्रभु, दशरथचरणांतें नमन करुनि, सीतेतें. ७५
शक्रें सैन्य उठविलें. लंकेशें पूजिलें सुकंठयुत.
अनिरुद्धगति विमान प्रभुसि दिलें, पुष्पकाख्य विश्वनुत. ७६
तो मूर्त सुरानंद प्रभु, सबळसुगळबिभीषणासहित,
श्रीसह सानुज पुष्पकयानीं बैसे, निघे, जगन्महित. ७७
श्रीगोविंद श्रीला अत्यद्भुत समरसेतुविरहकथा,
सुगळबिभीषणसंगम [3]कथि; लंघी पुष्पकें सुखें खपथा. ७८
गोविप्रसुखद भगवान् क्रव्यादांतक पतिव्रता भार्या
सुखवी भेटवि तारा, भक्ता शबरी हि [4]ओणवी आर्या. ७९
वाटे [5]मरीचिमाली साक्षात्; पुष्पककथा कबंधाची.
प्रभु कथि; गोदा दावी. जी भी राहों चि दे न बंधाची. ८०
दनुजदमन दयितेला कळवी दिधल्या जटायुच्या गतितें.
घटजाश्रमपद दावी. जें गावें शुद्धिकामुकें पतितें. ८१
मुनिमानसहंस प्रभु अत्र्याश्रम चित्रकूट मग दावी.
मग उतरुनि प्रयागीं, स्वशिर भरद्वाजमुनिपदा लावी. ८२
श्रीरामें पाठविला पवनसुत, उडे सुपर्णसा तूर्ण.
गुह भरत निवाचि. 'आला प्रभु' हें सांगोनि, करि सुखें पूर्ण. ८३
प्रभु भरता भेटे. त्या [6]भुजगोत्तम हि न महोत्सवा कथिल.
हा चि [7]महारजत, इतर जें ब्रह्मांडांत, सर्व तें कथिल. ८४

---

१. मोठें धनुष्य धरणारा. २. साधूंच्या पुरुषार्थसाधनहेतु (राम). ३. पर-लिखित हस्तदोष–कथी. ४. ओळख करवी. ५. सूर्य. ६. सर्पश्रेष्ठ शेष. ७. सुवर्ण.

प्रभुचें आगमन पुरा शोभवि; जैसें हिरण्य नाभरणा.[1]
न करिति वैकुंठाच्या साकेतीं त्या मेहा[2] महीं स्मरणा. ८५
सुतपा वसिष्ठ विधिनें अभिषेकुनि, ईश्वरा करी राजा.
प्रभुदर्शनामृत म्हणे 'त्यजुनि भगवदा, प्रजाशरीरा ! जा.' ८६
बहु पद्मनाभ निजबळसहिता सुगळा बिभीषणा अर्ची
स्वयशोमृतें शिवों दे न पवनतनया भवाग्निची अर्ची[3]. ८७
म्हणति प्रजापति कसा आम्हां हा प्राप्त बहु असाध्या या
अन्या धन्या वरितिल मोक्ष हि दुर्लभ चि परि असाध्याया. ८८
प्रभुचें राज्य अमृत्युस्मरण; स्वप्नीं नसे असुखलेश
प्रभुसि लवण गंधर्व चि नति न करुनि, वेचिती असु खलेश. ८९
तो सर्वदृक् प्रभु करी सर्व हि सव सर्व देव समहर्षी.
पुरवुनि वांछित नाचवि; घन जेंवि मयूर सकळ सम हर्षी. ९०
रघुराज राजसिंह श्रीशश्रीरामभद्रयश गाते
जे जन तेज न त्यांचें उरवि तमा करिति मुक्तिवशगा ते ९१
'स्तोत्ररामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ९२

इति स्तोत्ररामायणं संपूर्णं द्वितीयं ।

---

# तृतीयस्तोत्ररामायण

श्रीकांत करी सत्या संधा[4] तापद दशास्य माराया.
साराया संकट नयधर्मत्राणें सुरर्षि ताराया. १
अमृतमथनार्थ बळिसीं केला देवेंद्र संधिमान्[5] जेणें,
स्वीकारिलें विधिवचें तेणें दशरथवधूदरीं येणें. २
जे राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न प्रकटले कुमारमणी,

---

१. निराभरणास–पंत. २. उत्साहास. ३. ज्वाला. ४. प्रतिज्ञा. ५. संधियुक्त.

स्थिर कुळ करिति, कविमति च न निवे श्रीशंभुची उमा रमणी. ३
अजकुळ बहुत चि शोभे श्रीरामें सानुजें तयावारि तें
गाधिजसिद्धाश्रमपद वधितां बळ यज्ञविघ्न जें करितें. ४
दितिदनुसुत[1]दुर्मर्षण शास्ता प्रभुवर सुबाहुला खपवी,
शतयोजन मारीचा उडवी, करिते असें न लाख पवी. ५
बहु होय विश्रुतात्मा[2] या कर्मे हा सुरारिहा[3], यागा
सिद्ध करि, म्हणे कौशिक 'ऋषिहो! सिद्ध्यर्थ सर्वदा या गा.' ६
गुरु गाधिजसह जातां अवलोकाया महेशचापातें,
प्रभुवर वारी गौतमदत्ताहल्यामहोग्रशापातें. ७
जनकपुरीं गुरुतम हा त्र्यंबकधनुतें सलील गुण जोडी;
मोडी, पण पुरवि, वरी सीता श्री, स्वभजनीं जिला गोडी. ८
मुनिवचनें शमधाम क्षितिपति रामानुजांसि मग तनया
दे, याज्ञवल्क्यशिष्या त्या म्हणती साधु 'धन्य!' अगतनया[4]. ९
कोपे भृगुराम, प्रभु दे शांति क्षत्रकदनदक्षा या.
मग कैकेयीला ही क्षिति दशरथसत्यधर्म रक्षाया. १०
सत्यपराक्रम भगवान् सीतासौमित्रियुक्त जाय वना;
भवना देहा शोकें त्यजि नृप, भरत हि धरेचिया अवना. ११
रक्षाया मुनिमिष करि राम, वसे चित्रकूटनाम नगीं;
दे अभय पादुका प्रभु भक्ता भरतासि पुण्य कीर्ति जगीं. १२
अनिमिषपति[5]च्या कार्या सिद्ध कराया निघे, पुढें जाय;
वंदी अत्रिमुनीचे अनसूयेचे हि पुत्रसा पाय. १३
ती अनसूया श्रीला मातेपरि दाखवी बहु स्नेह,
करि अम्लानस्रग्वी[6] नित्य हि आर्द्रांगरागधर[7] देह. १४
केला विराध राक्षस तुंबरु, निर्भय हि तें समस्त वन;

---

१. दैत्य व दानव यांचा असह्य शासनकर्ता. २. प्रसिद्ध आहे धैर्य ज्याचें असा. ३. देवशत्रुहंता. ४. न्यायनिष्ठाला. ५. देवांचा स्वामी जो इन्द्र त्याच्या. ६. न कोमेजणाऱ्या मालेनें युक्त. ७. ओली चंदनाची उटी धारण करणारा.

करि तो प्रभुचें प्रेमें वाचस्पतिसा उदारधी स्तवन. १५
अतिवत्सळ नरविग्रह सर्व जगाचा धणी करी धन्य,
[1]वन्य प्राशुनि दंडकवनरति कुंभज तसे चि जे अन्य. १६
भूत[2]ग्रामक्षोणी पाहुनि लावूनि चरण निववि हरी,
गोदावरीतटीं मग लक्ष्मणरचितोटजीं निवास करी. १७
पंचवटींत श्रीमान् सीतापति सन्मुनिव्रती राहे,
रावणभगिनी विधवा शूर्पणखा आग्रहें वरूं पाहे. १८
न्याय करी सौमित्रि, छेदी तद्घ्राणकर्ण करवाळें,
बुडवूनि घेतलें प्रभुसह समर करुनि खरें हि अर[3]वाळें. १९
सर्व क्रव्यादांचा नेता भगिनीकुमंत्रितें क्षोभे,
तो भेक प्रभु सर्प श्रीस्त्रीरत्नीं मरावया लोभे. २०
जेंवि समीरण पर्णा मारीचा तेंवि दशमुख प्रेरी,
श्रीस कनकमृगरूपें लोभवि कीं काळबळ तया वेरी. २१
ज्यातें सहस्रमूर्धा विश्वात्मा यापरि स्तवी भावें,
तो प्रभु म्हणे स्वचित्तीं, 'सिद्ध [4]सहस्राक्षकार्य तें व्हावें.' २२
जैसा [5]सहस्रपात् प्रिय विश्वाचें व्हावया तमासि हरी,
तैसा प्रभु दशवदना मारायाचा मनांत काम धरी. २३
'द्या धरुनि' म्हणे सीता, लागे पाठीस चापशरधारी.
[6]आवर्त न जेंवि सुटों दे पतिता त्या वनांत विभु मारी. २४
'हा सीते! हा लक्ष्मण!' हाक अशी आर्त रामसा फोडी,
मोहनिवृत्तात्मा प्रभु, देवी ही धैर्य ऐकतां सोडी. २५
लक्ष्मण तत्व कथी, परि दवडी कोपोनि रक्षका सीता,
यतिरूप सं[7]वृतात्मा दशमुख ये, होय ती सती भीता. २६
हरितां स्नुषेसि धांवे गृध्रेंद्र जटायु, शत्रुरथ मोडी;
अतिकुपित सं[8]प्रमर्दन करि तेव्हां त्या सतीस खळ सोडी. २७

---

१. उदक. २. प्राणिसमुदाययुक्त पृथ्वी. ३. उद्धटानें. ४. इंद्रकार्य. ५. सूर्य. ६. भोंवरा. ७. गुप्त आहे स्वरूप ज्याचें असा. ८. चांगलें मर्दन.

दशकंठ अधर्मानें करि वृद्धजटायुपक्षतिच्छेद,
तो राहुग्रस्त अहः[1]संवर्तकसा सतीस दे खेद. २८
विरथ क्षत हि श्रीतें वाहुनि ने, जाय हतक लंकेला,
स्पर्शे वह्निशिखेला जेंवि जड पतंग गतकलंकेला. २९
अनिळजवें खेचर ने तें नग पांचां कपींत ती टाकी,
[2]काकी न जयंताची, बहु वदले 'हंत! बत!' असें नाकी. ३०
धरणीधर ही कांपवि रावण तो त्या करूनि अन्याया,
सर्वंसहा न साहे खेदा, साहेल कोण अन्या या? ३१
वृत्त सुमित्रापुत्र क्षिप्र कथी साश्रु, खेद धरि राम.
धावुनि ये, 'हाय!' म्हणे, शून्य पहातां चि आपलें धाम. ३२
प्रभु शोधी सर्व वनीं असकृत् प्राणाधिकप्रियारत्ना,
अन्ना क्षुद्विकलात्मा प्राणी तैसा करी महायत्ना. ३३
जरि विश्वधृक्[3] स्वतनुतें ही तो न शके धरावया शोकीं,
स्त्रैणत्व विश्वभुक्[4] प्रभु मिरवी कामुक विडंबना लोकीं. ३४
करि पितृसखगृध्राचें जें उत्तरकर्म तें विभु लवाया
धर्मज्ञ कवींस यशें, गीतें हरिणासि तेंवि भुलवाया. ३५
गृध्राचा सत्कर्ता[5] त्या उद्धरि सर्व साधु हरिखाया,
जो सानुजासि योजनबाहु सुदारुण कबंध धरि खाया. ३६
सत्कृत[6] होउनि बसवी शबरीतें वरदनायक विमानीं,
जन्म सफळ या श्रवणें रोमांचव्याप्तकाय कवि मानी. ३७
साधुबहुमता केली पंपासरसी हि जह्नुकन्यासी,
प्रभुकृतविलाप तेथिल वर्णिति सप्रेम सर्व संन्यासी. ३८
पवनसुतें नारायण नर[7] नेला ऋष्यमूकगोत्रास,
सुगळ सखा होउनि नग दे, सोडी सूर्यसूनु तो त्रास. ३९

---

१. दिवसाचा प्रलयकर्ता. २. सीता च वदली असें नव्हे. ३. विश्वधारणकर्ता (राम). ४. विश्वपालक (राम). ५. सत्कार करणारा. ६. सत्कारयुक्त. ७. नररूपधारी (विष्णु) राम.

कळवि [1]असंख्येयात्मा प्रभु बळ वाळीस वधुनि रविजा तें,
कपिराज्य दे, यश करी सत्य अमृत म्हणति सर्व कवि ज्यातें. ४०
अर्कसुत प्रभुदयिताशोधा सर्वत्र पाठवी वीर,
मेर्वादिनगागत विभुविजया स्वात्मा हि वेचिते धीर. ४१
अमरांशभव विशिष्टज्ञानबळ भ्रमुनि ते दिशा तीन,
मासावधि न विलंघुनि आले उत्साहशक्तिनें हीन. ४२
ज्या पुण्यश्लोकाचें अत्यंत अशिष्टशिष्टकृत् स्मरण,
तत्कार्य न घडतां कपि म्हणति, ‘घडो सिंधुच्या तटीं मरण.’ ४३
[2]प्रायोपविष्ट अंगदमुख कपि वदले ‘जटायु जरि मेला,
तरि गांगशुचि यशातें जोडुनि सुकृती सुरालया गेला. ४४
आम्हीं अपुण्य मरतों व्यर्थ चि, सित्धार्थ जाहलों नाहीं.’
संपाती अनुजाला पुसुनि म्हणे, ‘भय धरूं नका कांहीं. ४५
सीता लंकेंत असे. व्हा लंघुनि सिंधु सित्धसंकल्प.
[3]मत्सुत वधिता पारि अरि पथ मागे म्हणुनि सोडिला [4]अल्प. ४६
पुरुषार्थसिद्धिदप्रभुदयितेचा शोध सांगतां आले,
रविदग्धपक्ष गेला [5]गृध्र उडुनि, सर्व कपि सुखी झाले. ४७
प्रभुकार्यसिद्धिसाधनपटु पवनतनय उडे नभीं [6]सुरसा,
मैनाकातें पाडी, ठकवि मुखीं शिरुनि निघुनियां सुरसा. ४८
जी छाया धरि ओढी, मारी त्या सिंहिकेसि; जलधीतें
लंघी, [7]शंभुवृषा[8] ही निववि जवें त्या हि निहतबळधीतें. ४९
प्रभुसंकल्प शिव वृषभ पवनतनुज जाय सिंधुच्या पारा,
लंका धुंडी प्रभुची निरखि अशोकीं वनीं प्रिया दारा. ५०
विष्णुप्रियेसि येउनि तो ‘महिषी हो’ असें म्हणे पापी,
दापी त्या मत्तगजा सिंहीसी, जाड्य तच्छिरीं स्थापी. ५१

१. अपरमित धैर्य ज्याचें असा. २. अन्नोदकादिक सर्व विषय सोडून आसनावर नियम धरून बसलेले. ३. माझा पुत्रवत् (कनिष्ठ बंधु) जटायु. ४. नीच, हलका. ५. संपाती. ६. कोणी राक्षसी. ७. शंकराच्या नंदीला. ८. गरुडाला.

नेणे ईशकलत्रा पुण्या तो मूढ जेंवि वृष पर्वा[1],
आज्ञापी जाचाया अत्युग्रा राक्षसी कुमति सर्वा. ५२
श्रीस नमुनि मुद्रा दे, कुशळ कथुनि हरि म्हणे, 'परभरा[2] या
प्रभु हरिल खळबळशमन, जठर जसें तृण वृषोदर भराया[3].' ५३
घे श्रीचूडामणि सुरजयवर्धन वन चुरी करी कळहा,
बळहानिकर घनरवा अक्ष वधुनि सांपडे महाबळ हा. ५४
तो वर्धमानतेजा हरि करि पाण्यापरीस पातळ त्या
दशकंधरा, निवारी साधु बिभीषण असीस आतळत्या[4]. ५५
एक विविक्तें[5] बिभीषणमंदिर रक्षी स्वपुच्छदहनातें
मेरुनि पापपुरातें जाळी जैसा दवाग्नि गहनातें. ५६
ये, मणि दे, कुशळ कथी, श्रुतिसागर हि प्रभु स्तवी कपिला,
[6]कपिलादि यद्विभूति स्तविती यत्कीर्तिला महाकपिला. ५७
सुभुज प्रभुचे हरितें आलिंगुनि करिति विष्टपीं धन्य,
वन्य हि हा जेंवि असा झाला नर सुर न एक ही अन्य. ५८
सर्वसुरासुरदुर्धर कपिबळ घेउनि पयोधिला पावे,
वाग्मी[7] बिभीषण प्रभुचरण नमी, जे सुरद्रुमीं गावे. ५९
जेंवि महेंद्र खगा जळ, किंवा यजमान पावका आज्य,
वत्सळवर लंकेचें तैसें शरणागतासि दे राज्य. ६०
जलधिमतें सेतु करवि विभु जों तों वसुदबंधु[8] तो पाप,
ताप श्रीतें बहु दे, प्रभुचेंसें दाखवूनि शिर चाप. ६१
वसुरुद्रादित्य 'प्रभुविजय असो' म्हणति, जपति मुनि वेद,
दे दमुनि खळा प्रथम चि सुगळ सुख सुरांसि, परमतिस खेद. ६२
जरि नैकरूप कपिबळ जलनिधि वेढी, पुरी बहुत खवळे,
श्रीरामदूत अंगद 'साम कर' म्हणे, तथापि खळ न वळे. ६३

---

१. पर्वणीला. २. शत्रुरूप भारास. ३. परलिखित हस्तदोष—भाराया. ४. खड्गाला स्पर्श करणाऱ्यास. ५. पवित्र. ६. सिद्धानां कपिलो मुनिः—**पंत**. ७. युक्त भाषण करणारा. ८. कुबेराचा बंधु रावण.

आपण भंगे, झाले व्यसु बहु, घननादकपट हि न चाले,
बंधु बृहद्रूप मरे घटकर्ण हि, यद्भरें धरा हाले, ६४
शिपिविष्ट[1] प्रभु सानुज सबळ घनरवें शरव्रजें खिळिला,
उठला मारुतियत्नें, सुटला रवि जेंवि राहुनें गिळिला. ६५
विश्वप्रकाशन प्रभु अरिचें हि यश प्रसिद्ध करि लोकीं,
घनरवकृतमायाश्रीहननें 'हा!' म्हणुनि बुडवि मन शोकीं. ६६
ओजस्तेजोद्युतिधर[2] लक्ष्मण मारी तशा हि उग्रास,
प्रभुनें त्या स्वकरें तो दिधला काळाननांत सुग्रास. ६७
प्रबळतर सचिवसोदर सुतशोकाकुळमना विलाप करी,
प्रभुदयितेच्या नाशा पापात्मा तो दशास्य खड्ग धरी. ६८
सचिवें सुरप्रतापन तो हित बोधूनि वारितां सेना
बहु धाडी तत्कदनीं, प्रभु रुद्राहून ऊन भासेना. ६९
ऋषि सिद्ध सुर स्तविती प्रभुच्या त्या अतुळचापतेज्यातें;
मग दशमुख ये युद्धा, भ्याले पावोनि ताप ते ज्यातें. ७०
मद्यमदें क्रोधें ही स्पष्टाक्षर वच नये चि तुंडास,
कुंडा समिद्धशिखिच्या शलभ तसे त्या हि कीश पुंडास[3]. ७१
सौमित्रि मूर्छित करी, मारुति उठवी, महेंद्र रथ धाडी,
मंत्र घटज दे कीं, 'अरि न मरे प्रभु जरि हि शत शिरें पाडी.' ७२
द्विषदुर[4] विभु तरणिवरें बाणें ब्राह्माभिमंत्रितें फोडी,
निववि यशें विश्व, म्हणति चंद्रांशु 'स्वीय शक्ति बहु थोडी.' ७३
धरि भास्करद्युति प्रभु, करि सुरमुनिवृंद पुष्पवृष्टि बरी,
हरिहरविधि करिति स्तुति, भरि नभ बहु वाद्य, गीत ताप हरी. ७४
अमृतांशूद्भव[5] रस जे प्राशिति सादर चकोर खग नातें,
ते प्रभुसीं कवि लाविति, सेविति मुखरुचि भरूनि गगनातें. ७५
भानुकुळालंकार प्रभुवर सांगुनि बिभीषणा बरवी

१. विष्णु. २. प्राण, बल, शौर्य आणि कांति यांतें धारण करणारा. ३. दांडगा रावण त्यास. ४. शत्रूचें वक्षःस्थळ. ५. चंद्रापासून उत्पन्न होणारे.

निजबंधु म्हणुनि अरि जरि परि तापद सांग तत्क्रिया करवी. ७६
केला रामप्रभुनें देवद्विजशत्रुसिंह शश, बिंदु[1]
तद्दत्त दुःखसागर, लाजविला निर्मळें यशें इंदु. ७७
केला भूप बिभीषण, दिव्य करी श्री हि, भेट दे तात,
मृतबळ उठवि सुरेश्वर, कवि या चरितासि हृदय देतात. ७८
भवरोगाचें औषध चरित करुनि पुष्पकीं चढे राम,
ससुगळ बिभीषण निघे तो जगतःसेतु[2] नवघनश्याम. ७९
श्रीस कथि सत्यधर्मपराक्रम[3] वदला वरूनि विरहातें,
जें पंचवटीपंपासागरतीरस्थदेव चिर 'हा!' तें. ८०
तारेसि भूतभव्यभवन्नाथ श्रीप्रियार्थ घेवून
शबरीकबंधकृत कथि, तें ती शीतार्त जेंवि घे वून. ८१
भेटोनि भरद्वाजा पवनतनय पाठवी, कुशळ कळवी,
खळवीरघ्न प्रभु तो भेटुनि गुहभरतहृद्व्यथा पळवी. ८२
पावनयशा प्रवेशे साकेतीं, स्वप्रजा करी मुदित,
राजा होउनि रंजवि, जेंवि चकोरांसि चंद्रमा उदित. ८३
अनळ ब्राह्मण तर्पी, देवांचा सर्व काम हा पुरवी,
सर्वेष्टकामकृत्प्रभुरीति यश तसी न केळ कापुर वी. ८४
श्रीचा कांत श्रीमान् पूजी सुगळा बिभीषणा सबळा,
मारुतिस दे वर वरा तात जसा बाळका निजा कबळा. ८५
शत्रुघ्न काम पुरवी भूदेवांचा वधूनि लवणातें,
कोटित्रय गंधर्व हि भरत वधी, निववि यश न कवणा तें? ८६
श्रितकामप्रद सद्गुण चवघांचे आठ पुत्र बळशाली,
जळ शालीस[4] जगा कुळ तें, विभुसुतपंक्ति[5] अमृतकलशाली[6]. ८७
विधिशिव नेती हृदयीं, यश कोण न ने कवि. प्रभु लवाया

---

१. केला अशी द्विरावृत्ति. २. जगाचा तारक. ३. रामचंद्र. ४. शालिनामक धान्यास. ५. रामलक्ष्मणादिकांच्या मुलांची रांग. ६. अमृतकलशाची ओळ.

आळस न धरीं, श्वखग हि बहु सुखवि अनेक विप्र भुलवाया[३]. ८८
त्रेतायुगांत होय श्रीराम प्रभु युगादिकृत् स्पष्ट,
कष्ट नसे कोणा ही जीवांस, भरी सुखें दिशा अष्ट. ८९
'स्तोत्ररामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें. ९०

इति श्रीस्तोत्ररामायणं [ तृतीयं ] संपूर्ण।

---

# चतुर्थस्तोत्ररामायण

साधूंच्या [१]समनस्का नेत्रयुगा '[२]वर्ते मुदित' जे म्हणती,
त्या चरणांतें करिती दशमुख मारावया सुर प्रणती. १
आराधिला हयमखें त्रिभुवनगुरु विष्णु दशरथें भूपें,
तो [३]नैकमाय तत्सुत होय, धरी च्यार सुंदरें रूपें. २
ते राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न कुमार; गाधिजक्रतुला
रक्षी, [४]महाशनवधें प्रभु सुयशें दे सुधेसि [५]तक्रतुला. ३
होते अदृश्य गौतममुनिचे जे दार वरुनि शापातें,
केले प्रकट प्रभुनें चरणरजें हरुनि पापतापातें. ४
त्र्यंबककार्मुक मोडुनि जनकपुरीं व्यक्तरूप तेज करी,
म्हणती सहस्रजित् कवि किति यासि अनंताजित् परेश हरी. ५
ज्यासि परानंदात्मक म्हणुनि म्हणति इष्ट वेद कवि गीता,
त्याला माळा घालुनि वरि तद्दयिता धरोद्भवा सीता. ६
सद्गुणविशिष्ट अनुज प्रभुचे भरतादि जे तयांला ही
देउनि सुता दशरथक्षितिपतिचा जनक जाहला व्याही. ७
शिष्टेष्ट प्रभु भार्गवरामा दावूनि तेज करि शांत,

---

१. मनानें सहित अशा. २. रहा. ३. अनेक मायारूपी. ४. दैत्यवधानें. ५. ताकाची तुलना.

ज्यातें क्रुद्ध विलोकुनि दशरथ भय धरुनि होय बहु तांत.[1] ८
घनदर्शनें शिखंडी विजयी प्रभु पाहतां तसे पौर
बहु नाचले प्रहर्षें गावुनि यश इंदुहूनि जें गौर. ९
नरपति सज्जनबहुमत दोषरहित सद्गुणक्रिया रामा
युवराज करूं पाहे, वारी सुर[2]भिन्नधी प्रिया रामा[3]. १०
नृप सत्यधर्मवश पतिवश वृषसा फार विनवितां भागे;
'मनुवर्षें राज्य करू भरत, वरू राम वन' असें मागे. ११
प्रभु सत्यरक्षणोद्यत कैकेयीला पुसे, म्हणे या 'जा',
वल्कल दे नेसाया, धरि शोक क्रोध, 'हा!' वदे राजा. १२
तो क्रोधकृत् स्वयें कां प्रभु होयिल देवविप्रहितकर्ता?
श्रीलक्ष्मणसहित निघे, शोकाकुळ होय सपुर महिभर्ता. १३
व्यरि[4] करुनि विश्व[5]बाहु ख्यात कराया जगीं यशें धवळें,
नृप शापमुक्त व्हाया, प्रभु निजशोकानळा म्हणे, 'खवळें'. १४
बसुनि पितृरथीं जाउनि विभु निववि गुहा निषाद जो वन्य,
जो चित्रकूट मुनिसतमहित महीध्र तया करी धन्य. १५
दशरथ नृप अच्युतसुत शोकें पावे म्हणोनि 'हा!' निधना,
कष्टार्जिता सुकृपण प्राणी होतां चि जेंवि हानि धना. १६
मातुलकुलागत भरत जननीतें श्रवण करुनि तत्कथित
व्यथितस्वांत म्हणे 'धिक्!' परि झाला सर्वसज्जनप्रार्थित. १७
तातक्रिया करि, निघे; शंका सोडुनि गुहें भरद्वाजें
राम प्राण समजतां सत्कारें निववि‍ला गत[6]व्याजें. १८
झाला प्राणद् वत्सळ राम प्रभु अभयपादुकादानें,
परले, बाहेर वसे, वांचे प्रभुच्या चि साधुवादानें. १९
त्या चित्रकूटगिरितें पुसुनि निघे वासवा[7]नुज स्वामी,
दर्शन दे अत्रिस, तो साधु वदे, 'आजि पावलों स्वा[8] मीं.' २०

---

१. म्लान. २. सुरानीं जिचा बुद्धिभेद केला ती. ३. स्त्री कैकेयी. ४. शत्रुरहित. ५. राम. ६. निष्कपटानें. ७. इन्द्राचा बंधु उपेन्द्र (राम). ८. आत्मस्वरूपास.

अनसूया दे श्रीला जी वाळेना असी उटी माळा,
दे शांतिचा अपांनिधि[1] सुगति विराधा पलाशभूपाळा[2]. २१
धन्य अधिष्ठान[3] करी ऋषिचें तो भाँउ दंडकवनांत,
वाल्मीकिच्या तयाची आहे शोभा उदंड कवनांत. २२
प्रभु अप्रमत्त सत्य ममुदित करि गृध्रनायका वडिला,
या कीर्तिला कवि जपे, गंगेच्या जेंवि काय कावडिला. २३
गोदावरीतटीं तो झाला उटजीं प्रतिष्ठित[5] स्वामी
वसता क्षीरसमुद्रीं वैकुंठीं कीं महन्मनोधामीं[6]. २४
शूर्पणखा स्कंदपितृध्येया[7] प्रार्थी कुबुद्धि भोगाया,
लक्ष्मण तद्घ्राण हरी; हें चरित म्हणे कवींस 'हो! गा या.' २५
प्रभु मग मथी सखर खर खचर चतुर्दशसहस्र हरसा च,
स्कंद म्हणे 'नांवाचा मीं, हा रघुवर चि शक्तिधर साच.' २६
सुरकार्यधुर्य[8]रामप्रभुदयिता कपटपटु दशास्य हरी,
विरथ क्षत होय रणीं, छेदी खड्गें जटायुपक्ष अरी. २७
श्रीविरहीं 'हाय!' म्हणे, तातसखा दिव्य धाम दे वरद,
या अतिधवलयशा बहु मानिति गजवदन वामदेव रद. २८
भीषण कबंध राक्षस धरि खाया राघवा युवा हनन
करि उद्धरी तया प्रभु, या चरिताचें चि करिति मुनि मनन. २९
शबरीस वासुदेव प्रभु गति दे, प्रथम चाखिलीं हो! तीं
भक्षी बदरें पदरें घे, जी चिर जपुनि राखिलीं होतीं. ३०
सुतदैन्यतिमिर[9] काहीं वारूं न शके चि भानु, राम हरी,
या वात्सल्यें पावे सत्य 'बृहद्भानु[10]' हें सुनाम हरी. ३१
मत्ता वाळीस वधी लीलेनें आदिदेव, वित्रास

---

१. सागर. २. राक्षसराजाला. ३. राहण्याचें स्थान. ४. विश्वबंधु—**पंत.** ५. राहिलेला. ६. साधूंच्या मनोरूप गृहीं. ७. कार्तिकेयाचा पिता महादेव त्यानें ध्यान करण्यास योग्य जो राम त्यास. ८. धुरंधर. ९. पुत्र जो सुग्रीव त्याचा दैन्यरूप अंधकार. १०. मोठा सूर्य.

करूनि सुरांश कपीश्वर कारि सुग्रीवाख्यसाधुमित्रास. ३२
हर्षे सूर्य, पुरंदर[1] जगदीशकृतस्वपुत्रवध साहे,
राहे उगा चि अनघा अनुजा स्त्री हरुनि ही वधू पाहे. ३३
व्हाया अशोक राम प्रभु शोधायासि तत्प्रिया राजा[2]
कपि धाडी, त्यांसि म्हणे, 'जा कार्य करूनि सद्यशें साजा.' ३४
संसारसिंधुतारण राम विरहसागरांत ताराया
गेले प्रभुकार्यार्थे स्वप्राण हि ते सुभक्त साराया. ३५
शोधुनि दिक्त्रय आले, किति गेले दक्षिणेसि ते शोध
लागेना म्हणुनि म्हणति 'तार प्रायोपवेशना!' योध. ३६
अग्रज जटायुचा कथि शोध श्रीचा, परंतु शतगावें . .
जलधि, म्हणति शूर हि कपि ' येथें बळ धैर्य लेश न तगावें.' ३७
शौरि पुढें जो झाला, त्या दशरथिप्रभूत्तमा स्मरला,
भरला नभीं मरुत्सुत भंगुनियां विघ्न सिंधुला तरला. ३८
साधुजनेश्वर[3] कपि तो जिंकी लंकाधिदेवता आधीं;
ती विधिवाक्य स्मरली, वदली, 'जा कार्य विष्णुचें साधीं.' ३९
अनुकूळ प्रभु असतां दुर्घट भक्तांस काय हो! आहे?
श्रीस अशोकवनीं तो शोधुनि लंकेंत निपुणधी पाहे. ४०
ज्यांत शतावर्त[4] अशा सिंधुसि लंघुनि न पावला ताप;
श्रीस दशास्य म्हणे, 'ये शयनीं' तें त्यासि तापवी पाप. ४१
स्तविला प्रभु कपिनें खळ जातां बडबडुनि वीर्यमधुपानें[5],
जैसा हंसीपासीं पद्मी[6] कासारराज मधुपानें. ४२
पद्मानिभेक्षणमुद्रा देतां श्री हर्षली, तया कपिला
कुशळ पुसे, दे चूडामणि, कारि वत्सीं दया जसी कपिला. ४३
संदेश पुसे, हर्षे, नमुनि निघे पद्मनाभभार्येतें,
वनबळ[7] अक्ष मथुनि कपि लंका जाळूनि सुखवि आर्येतें. ४४

---

१. इंद्र. २. सुगळ—पंत. ३. साधुजनश्रेष्ठ. ४. शंभर भोंवरे. ५. वीर्यरूप मद्यप्राशनानें. ६. कमलयुक्त. ७. वनरक्षकांचें सैन्य.

अरविंदाक्षप्रभुचें दर्शन, देवूनि सुमणि मारुति, घे;
अनिमिषनयनांहीं ते पति पीती तन्मुखाब्जचारु[1] तिघे. ४५
प्राशी श्रीवाचिक[2] विभु, मधु जैसें मधुप पद्मगर्भगत,
झाला शरीरभृत्[3] प्रभु कीं विरहीं तें[4] नसे तयास मत. ४६
आली महर्धि[5], वाटे झालों अत्यंत ऋद्ध[6] देवास,
आनंदें वृद्धात्मा होय हरि, हरिस भुजांत दे वास[7]. ४७
मानी महाक्षम प्रभु, वर्णी उपकार आठवूनि तया,
स्तवनें लाजवि, साजवि विश्रांत यशें, करी उदंड दया. ४८
गरुडध्वज प्रभु निघे सानुज ससुगळ असंख्य हरिसेना
घेउनि तोयधितीरा पावे, कीं, शत्रु साम परिसेना. ४९
अतुलदय शरण्य प्रभु धरि अरिचा बंधु या न शंकेतें;
नमितां बिभीषणाला दे दवडुनि दैन्य दूर लंकेतें. ५०
सेतु करि, जलधि लंघी, प्रथम चि भंगी सुकंठ त्या अरिला,
साम न करितां अंगद होय भयद त्या, जसा शरभ हरिला. ५१
भीम समर कपिराक्षस करिति, भरिति मांसकर्दमें महितें;
अहिपाशबद्ध केला लक्ष्मण राम हि घनस्वनें अहितें. ५२
समयज्ञ गरुड पन्नगपाशांतुनि मुक्तिदासि मुक्त करी;
त्यातें जेणें केला नक्रापासुनि पळांत मुक्त करी. ५३
गमला मूर्त हविर्हरि[9], घटकर्ण हवि[10] 'प्लवंगबळ खावें
सर्व' म्हणे; होय घन प्रभु, तद्बळ यावरूनि वळखावें. ५४
अनुजसह सर्वलक्षणलक्षण्य[11] प्रभु हि मेघनाद खिळी,
मारुति उठवि महौषध्यगशिखरें, पाडि शत्रुशक्ति शिळी. ५५
मायासीता वधितां लक्ष्मीवान् प्रभु हि बोलिला 'हाय!'
भ्रम हरि बिभीषण, व्यसु केला तो लक्ष्मणें महामाय. ५६

---

१. सौंदर्य. २. सीतारूप लक्ष्मीचा निरोप. ३. शरीराची आस्था बाळगणारा झाला. ४. शरीर. ५. मोठी संपत्ति. ६. समृद्ध. ७. आलिंगन दे. ८. होमद्रव्य. ९. सुग्रीव. १०. होमी; यजनकर्ता. ११. सर्व लक्षणानीं लक्षिला जाण्यास योग्य असा.

श्री वधितां सचिव खळा मारुत जैसा घना तसा फिरवी,
जिरवी खळबळजळधिस समितिंजय[1] घटजयश[2] जगीं मिरवी. ५७
विक्षर[3]पराक्रम प्रभु सबळ वधाया स्वयें निघे अंतीं,
पाडी सौमित्रिस परि बहु शक्तिसुधा मरुत्सुतीं संतीं. ५८
रोहित[4] होवुनि वेदोद्धार करी प्रभु, तयासि हा काय ?
राय रघूंचा बैसे शक्ररथीं, म्हणवि खळबळा 'हाय!' ५९
युद्धारंभीं वदला कल्याणविचार विजितभार्गव[5] हा[6],
"मच्चरणावरि सीता शीर्षासह धरुनि साममार्ग वहा. ६०
बुडवितिल चि दशकंठा ! जे कामक्रोधलोभ हे तुज गा !
बुडत्यासि म्हणसि 'हरिहरसे धर्मन्याय भव्यहेतु जगा.' ६१
वरुनि सदा मोद रहा, दे सीता, स्वस्थ वांच, पापा! या
सोडी दुराग्रहा, हा लाविल न तुला चि कां चपापाया ?" ६२
खळ न वळतां तयासह सप्ताहोरात्र रण करी अजित.
अजि ! तत्काळ चि वधिता क्रीडेपरि अरिस ही यशें सजित. ६३
कांपे मही महीधरसहिता त्या मारितां रणीं अहिता,
या विजया परमहिता गाती कवि विधिशिवादि पर महितां[7]. ६४
द्वेष करुनि मरुनि रणीं झाला वर्णितयशा महाभाग,
जो शतशिरें हि हरितां न मरे चि, म्हणे तशा महा[8] 'भाग'. ६५
त्या जळ, बिभीषणा पद, देववि देव विधिनें तयां[9] तो, कीं,
अतिवेगवान् पित्याचा स्नेह सदा करि हितोदया तोकीं. ६६
श्री दिव्य करी तेव्हां अमितांशन[10] होय भीत शीतरुची,
गंगाह्रदवसती न स्वर्गींच्या सावली तशी तरुची. ६७
ज्यांपासुनि विश्वाचा उद्भव ते आदिदंपती[11] व्रातें

---

१. राम—**पंत**. युद्धांत जय मिळविणारा. २. अगस्त्य मुनीचें यश. ३. नाशरहित—**पंत**. नाश पावणारा आहे पराक्रम ज्याचा असा रावण. ४. मत्स्य—**पंत** ५. जिंकिला आहे परशुराम ज्यानें असा. ६. राम. ७. शत्रूला. ८. तेज—**पंत**. ९. तया बिभीषणा इत्यन्वयः—**पंत**. १०. पुष्कळ खाणारा (अग्नि). ११. आद्य प्रकृतिपुरुष.

देवर्षींच्या स्तविले, दे यश मोहा प्रकंप तीव्रा तें. ६८
पुरुष [1]प्रकृतिक्षोभण तो प्रभु सानुज सदार जनकास
विनयें वंदी, धरिती या रीतीची च साधुजन कास. ६९
मृतकटक [2]देवराजें सर्व उठविलें, बिभीषणें भावें
प्रभुवचनें गौरविलें सुगळसहित, हें हि यश सदा गावें. ७०
वंदुनि बिभीषणानें दिधला पुष्पकविमान [2]वरधामा,
त्यांत प्रथम प्रेमें बसवी श्री [3]गर्भवासहरनामा. ७१
परमेश्वर बहु सुखवी त्रिजटासरमाकळासुपार्श्वमन
देउनि अति [4]यतिपतिमतिरतिकर निजपादपद्मभक्तिधन. ७२
जो विश्व [5]करण कारण कर्ता भगवान् स्वयें [6]विकर्ता या
प्रभुनें पौरासि दिला वर आनंदें करूनि वर्ताया. ७३
श्रुतिशास्त्रगहन भगवान् नर होउनि करि अशा चरित्रा, त्या
गाती सुरमुनिकवि बहुशत निघतां पुष्पकें पवित्रात्या. ७४
स्मरुनि प्रथम गुहभरतशत्रुघ्नांतें निघे, वरविमाना
प्रेक्षिति जे त्यांकरवीं तो पुष्पक उन्नता करवि माना. ७५
[7]व्यवसाय प्रभुमतिचा जाणुनि पुष्पक नभःपथीं चाले,
झाले कष्ट कथी प्रभु, सीतेचे कर्ण त्या रसें धाले. ७६
[8]विश्वव्यवस्थिति जया ठायीं, श्रुति म्हणति ज्या [9]व्यवस्थान,
तो नळसुगळबिभीषणयश कथि तें उरवि [10]कव्यवस्था न. ७७
[11]संस्थान दाखवी तें जेथें विरहीं अतिक्रमी [12]वर्षा,
पंपा दावी, शबरीकृत कथि वर्णुनि कबंध दे हर्षा. ७८

---

१. प्रकृतीला क्षोभवून तिच्यापासून जग उत्पन्न करविणारा पुरुष=परमेश्वर. २. श्रेष्ठ आहे तेज ज्याचें असा. ३. जन्ममरण चुकविणारें आहे नाम ज्याचें तो (राम). ४. श्रेष्ठ संन्यासी जे त्यांच्या बुद्धींस प्रीतिकारक. ५. [जगताचें] मुख्य साधन, कारण व कर्ता. ६. विकाराना कारण असा. ७. निश्चय, आशय. ८. उत्पत्तिस्थितिलयात्मक व्यवस्था. ९. अधिष्ठान. १०. कवींची अवस्था. ११. उत्तम स्थान. १२. पावसाळा.

वर्णी रम्यस्थानद[१] पंचवटीदेश नमुनि गोदेतें,
दावि जटायुवट[२], श्री आठवि तो संकटांत ओ दे तें. ७९
ध्रुव जय जेणें केला समयीं समरीं कथूनि मंत्रास,
त्या घटजाचा आश्रम दावी, हारिता त्रितापसंत्रास. ८०
मग अत्र्याश्रम दावी, ज्यांत तपाची परर्धि[३] नगराजा
वर्णूनि चित्रकूटा दाखवि, सुरमुनि हि गाति नगरा[४] ज्या. ८१
शुचिपरमस्पष्टतपःसुरभिप्रियतोक[५] विप्रयागांत
योगांत भरद्वाजस्तुत नमिला तो कवि प्रयागांत. ८२
प्रभुसंप्रेषित मारुति कथि गुहभरतांसि विजय आगमन,
त्या कुशलामृतपानें झाले ते तुष्ट पुष्ट सस्वजन. ८३
पण[६] पूर्ण करूनि मुदित गुहभरतहृदय म्हणे 'शुभेक्षण हो'
पाहत होते प्रभुतें, मोर वनातें तसे उभे क्षण हो! ८४
राम प्रभुवर भेटे, वाटे राकेश[७], भक्त चातकसा,
पातक सारी स्मरणें विश्वाचें, तो करील घात कसा? ८५
राजा झाला देवद्विजशत्रूंचा विराम[८], विश्वास
चरितें रंजवि कंजविशालाक्ष वसवि पदीं च विश्वास. ८६
विरज[९] जग कारि स्वयशें, वैकुंठ चि होय पामरा जगती,
कपि यातुनाथ[१०] पूजी, दे सर्व जनांसि रामराज गती. ८७
स्वभजनसुमार्गं लावी प्रभु, ने यमभय समस्त विलयातें.
दुसरा असेल कोणी जरि कविवर यासम, स्तविल यातें. ८८
सव सर्व सिद्धितें ने, शुचि नय धर्म प्रवर्तवि प्राज्य.
ज्यांत अनय न स्वप्नीं श्रीराम प्रभु असें करी राज्य. ८९

---

१. रमणीय स्थान देणारा असा (राम). २. ज्या वटवृक्षाखालीं रावण व जटायु यांचें युद्ध झालें तो. ३. श्रेष्ठ विभूति. ४. प्रयागाला. ५. पवित्र व उत्कृष्ट स्पष्ट तपोरूप कामधेनूचा प्रिय बालक. ६. अन्वयार्थ? ७. पौर्णिमेचा चंद्र. ८. नाशक. ९. मलरहित. १०. बिभीषण.

'स्तोत्ररामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं आर्पिलें कृतवंदनें. १०

इति श्रीस्तोत्ररामायणं चतुर्थं संपूर्णं ।

---

# पंचमस्तोत्ररामायण

विधि वीर सार्वभौमा श्रीशा[1] विनवी दशास्य माराया,
कीं शक्तिमतांश्रेष्ठ[2] क्षम हा चि श्रितविपत्ति वाराया. १
रक्षाया धर्म द्विज दशरथसदनांत चार मूर्ति धरी,
नामें श्रीराम भरत लक्ष्मण शत्रुघ्न होय देव हरी. २
धर्मविदुत्तम[3] भगवान् प्रथम कुशिकनंदनाध्वरा पाळी,
मग राम अहल्येचें श्रीचरणरजें अशेष अघ जाळी. ३
गाधिसुतें वैकुंठ प्रभु दावुनि फार निववीली मिथिला,
भंगी हरचाप, करी वीरशतोत्साहशक्ति जो शिथिला. ४
पुरुषमुकुटमणि वारिला सीतेनें, पुरवितां चि तूर्ण पण.
पूर्णपण[4] जनकहृदया मोही, कारि मोहगिरिस चूर्ण पण[5]. ५
तो याज्ञवल्क्यशिष्य स्वप्राण प्रभुपदांबुजीं वाहे,
दे लक्ष्मणादिकांला कन्यात्रय, विश्व उत्सवा पाहे. ६
गुरुहरकार्मुकभंगें क्षोभे शत्रुघ्न* भार्गव क्रोधी.
त्यातें जिंकी, होय प्राणद, तच्चित्त शांति दे शोधी. ७
प्रणव[6]जपविचारें जो जाणावा, दुर्लभा तया दवडी,
जोडी भू कैकेयी, मौक्तिक टाकूनि मेळवी कवडी. ८
सीता लक्ष्मण घेवुनि जाय पृथुयशा वनासि उत्साहें,
पितृसत्यावन हित, पारि मानी प्रभु अहित मातृकुत्सा हें. ९

---

१. विष्णूला. २. शक्तिमान् जे त्यांत श्रेष्ठ. ३. धर्मवेत्त्यांमध्यें उत्तम. ४. पूर्णत्व-पंत. ५. परंतु-पंत. ६. ओंकार. * शत्रुहंता.

व्हाया [1]हिरण्यगर्भप्रमुख अमर हृष्ट दुष्टजनघातें,
राम निघे दुःख हरूं, मुनिलक्षा दे दशास्य अनघा तें. १०
शोकें दशरथ मेला, तेव्हां सुत एक ही न याजवळ,
[2]दूतकृतत्वर आले सोडुनि शत्रुघ्नभरत आजवळ. ११
गुरुशोकव्याप्त भरत कैकेयीतें म्हणे, ‘न तोक रितें
पुर कुळ हि पाडिलें कीं हा पापे!’ प्रिय तिचें न तो कारि तें. १२
तातक्रिया कारि, निघे, गुह, वायु घना, तसा बळा रोधी,
दे भरता वाट तरी, भरतहृदय जेधवां बरें शोधी. १३
भरतमति भरद्वाजें सत्कार करूनि देखिली अमला.
मग भक्त चित्रकूटीं नमुनि अधोक्षजपदांबुजें शमला. १४
ऋतुवर वसंत जैसा [3]माकंदवना पिका, तसा राम
गुरुजननीप्रमुखजना भरता निववी महादयाधाम. १५
पिंड पित्याला दे तो, ‘सुमुख’ सुदर्शन म्हणे, ‘नको फिरवूं,
गुरुसत्यधर्म रक्षूं, वत्सा! सद्यश जगत्त्रयीं मिरवूं. १६
[4]मनुसंवत्सर काळ क्रमुनि वनीं [5]वासरक्षपा येतों,
धर्मनयाचे करुनि स्वसचिवसह वास रक्ष [6]पायें तों.’ १७
शास्ता [7]परमेष्ठीचा ऐसें सांत्वूनि फिरवि भरतातें,
दे पादुका वहाया जो दिधला सर्व राज्यभर तातें. १८
[8]आज्ञापरिग्रह करी, परते, त्या पादुका शिरीं वाहे,
राहे नंदिग्रामीं, शीतातपवृष्टि वल्कली साहे. १९
प्रभु मग आत्रिस भेटे, अनसूया श्रीस दे उटी रमुनीं,
तेथें निघे, यदर्थें भजति सदा [9]उग्रतप [10]कुटीर [11]मुनीं. २०
उद्धरुनि विराधातें, बहु संवत्सर, उदंड कवनांत
वाल्मीकिच्या रसिकसा, प्रभु रस पाहे सुदंडकवनांत. २१

---

१. ब्रह्मदेवप्रभृति. २. दूतानीं केली त्वरा ज्यांला असे. ३. आम्रवना. ४. चवदा वर्षें. ५. दिवसरात्री. ६. आधार. ७. ब्रह्मदेवाचा. ८. स्वीकार, ग्रहण. ९. उग्र तपश्चर्येनें युक्त असे. १०. आश्रम. ११. यमकार्थ सानुस्वार.

श्रितरक्षणदक्ष प्रभु शरभंगसुतीक्ष्णघटजचित्तातें
निववी, जाणों निर्धन ते केले पात्र विपुलवित्तातें. २२
पितृसख गृध्र जटायु प्रमुदित करि सत्य पुत्रसा राम,
गोदातटपंचवटीमाजि रची उटज विश्वविश्राम[1]. २३
बहु निववि विश्वदक्षिण[2] भुज विभुचा लक्ष्मण स्वशुद्धयशें,
जेणें केलें दास्य प्रभुचें प्रेमें सदा पदाब्जवशें. २४
विस्तार काननाचा जे स्थावर पर्वतादि जे स्थाणु
उद्धरिले मृग पक्षी सर्व हि; किति बोलण्यांत ते आणु? २५
श्रुतिशास्त्रसदनुभव[3] ज्या प्रभुच्या सत्वीं प्रमाण जो बीज,
अव्यय या विश्वाचें, ज्या सुरसीं म्हणति कवि मना भीज. २६
तो परम अर्थ झाला ताराया विश्व सयशें नरसा,
श्रीचरणपल्लवांहीं ऐसी बहु निववीली कधीं न रसा. २७
प्रभुच्या अनर्थ व्हाया शूर्पणखा कामुकी गळां पडली;
तद्घ्राणकर्ण लक्ष्मण हरि, बहु ती रावणस्वसा रडली. २८
सबळ खर हि संहारितां क्षोभे दशमुख पडावया शोकीं,
मत्त महाकोशी[4] महाभोग[5] महाधन बळाढ्य जो लोकीं. २९
अनय असंख्य करुनि जो नित्य अनिर्विण्णसज्जनद्वेषी[6],
मारीचराक्षसातें श्रीचें मन लोभवावया प्रेषी. ३०
वैराजरूप[7] यास्तव ज्याचें नाम स्थविष्ठ[8], तज्जाया
मोहाया होय कनकमृग तो परमापदेंत मज्जाया. ३१
तत्वेंकरुनि अजन्मा म्हणुनि 'अभू[9]' म्हणति ज्यासि, तद्भार्या
मायामृग मागे त्या, सिद्ध कराया सुरांचिया कार्या. ३२
मख धर्मयूपशोभित महिवरि सर्वत्र हि प्रवर्ताया,

---

१. विश्वाचें विश्रांतिस्थान (राम). २. विश्वांत कुशल. ३. ज्या रामाच्या ठिकाणीं वेद, शास्त्र व साधु यांचा अनुभव एकवटला आहे. ४. मोठा धनसंग्रह ज्याचा तो. ५. महाशरीर. ६. संतुष्टचित्त अशा साधूंचा द्वेष करणारा. ७. विराटस्वरूप. ८. अत्यंत स्थिर. ९. जन्मरहित.

जाय मृगामार्गें तो, ने दूर, वधी त्रिलोकभर्ता या. ३३
'हा सीते ! हा लक्ष्मण!' ऐसी मारी कुबुद्धि तो हाक,
ऱ्हाया समरमहामख ती देवी जानकी धरी धाक. ३४
श्री लक्ष्मणा म्हणे, 'जा, रक्षीं पतिला, जसें क्षतत्राणीं,[1]
न क्षत्र नेमिलें बा ! इतरीं तैसें दया करीं प्राणीं.' ३५
तो तीस म्हणे, एक त्रिजगीं विजयी स्वनाथ लक्षावा,
अरि वधिला, नक्षत्रें नक्षत्री[2] काय देवि ! रक्षावा? ३६
सर्वाहित माराया, ताराया क्षम समस्त विश्वास,
आला चि आर्य, आर्ये! मद्वचनाचा धरीं च विश्वास.' ३७
क्षामविचारा[3] वदली, 'त्वच्चित्तीं मदभिलाप गुरुघात.'
सौमित्रि साश्रु तीतें सोडी, जोडी, त्यजूनि धृति, हात. ३८
जो खळ, नव्हे[4] समीहन, तो दशमुख तों चि ये, हरि सतीतें;
मानी हरण सुदुःसहतर वृकहतशिशुमृगीपरिस ती तें. ३९
अरिस जटायु विरथ करि, जो वृद्ध हि पक्षिपतिसम रयज्ञ,
सोडवि सुनेसि, देखति सुर होउनि चित्रगति समरयज्ञ. ४०
पक्ष च्छेदुनि पाडुनि गृध्रकुलेंद्रासि ईज्यवरमहिला[5]
ती नेली दशकंठें, दिधला अत्यंत शोकभर महिला. ४१
टाकी स्वालंकार श्री जातां प्लवग पांच पाहूनि,
लंकेंत महेज्यस्त्री[6] राहे प्रभुविरहताप साहूनीं. ४२
देव शतक्रतुहितकर लक्ष्मणकथित प्रियाकटुकवचन
परिसुनि म्हणे, 'कुवाँगिषु[7] एक हि साहे असें पटु कवच न.' ४३
शून्य उटज पाहुनि विभु 'हाय !' वदे, शोकसत्र घाली तें
वर्णावें काय ? म्हणे अचळांस हि 'दाखवा चि आलीतें.' ४४

---

१. क्षतापासून रक्षण करण्याच्या कार्मी. २. चंद्र. ३. कृश (अल्प) आहे विचार जिचा अशी (सीता). ४. ज्याची इच्छा चांगली नाहीं. ५. पूज्यांत श्रेष्ठ जो राम त्याची स्त्री. ६. अतिपूज्य जो त्याची स्त्री. ७. कुत्सितवाणीरूप बाण.

क्षेणत्व सतांगति तो दाखवि, हुडकी, करी विलापातें,
पहिल्याहुनि गुरु शोक प्रभुला पितृबंधुच्या दिला पातें. ४५
जरि सत्य सर्वदर्शी क्षतहेतु पुसे तयासि, खगतात
कथुनि मरे, त्या सुतसा जळ दे, कवि या यशें चि जगतात. ४६
नित्य विमुक्तात्मा हरि तरि पुनरपि हुडाकि नवनवी अटवी,
सुगति कबंधा दे प्रभु, शोकें वनदेवतांस ही फैटवी. ४७
सर्वज्ञ ही कबंधें कथिलें हित आदरी, करी शबरी
धन्या, ज्याच्या स्मरणें गति पावे संकटीं करीश बरी. ४८
होतें प्राप्त जडा ही ज्या स्मरतां ज्ञान उत्तम स्पष्ट,
तो प्रभु पंपातीरीं विरहें 'हा!' म्हणुनि दाखवी कष्ट. ४९
नमिला श्रितसंरक्षणसुव्रत विभु पवननंदनें रविजा
सुगळातें भेटविला तो, म्हणति 'शरण्यगुरु' असें कवि ज्या. ५०
सुमुख प्रभु होय, सखा तो दावी सूक्ष्म उत्तरीयपट,
तद्बद्धनग श्रीचे ते झाले प्रभुसि अमृतपूर्णघट. ५१
तप्ता विभांडकाला निवविति जैसे सुघोष, देवास
तैसे चि अळंकार श्रीचे, त्यां स्वहृदयीं च दे वास. ५२
वाळीस वधुनि देवुनि सुगळा कपिराज्य सुखद होय हरी.
विश्वसुहृत्प्रभुदयिताप्राप्तिस्तव सुगळ हि प्रयत्न करी. ५३
प्रभुचें मनोहर स्त्रीरत्न पहायासि कपिबळें शिरलीं
सर्व दिशांत, तयांतुनि जीं दक्षिणदिग्गतें न तीं फिरलीं. ५४
टळला अवधि, न लागे शोध, जितक्रोध राम, परि नाथ
वधिल चि म्हणुनि मराया बसले कपि, सेविती न फळ पाथ. ५५
खाया ये तों ऐके संपाती गृध्र बंधुचें नाम,
कपिवीरबाहु फुगवी शोध कथुनि, पूर्ण तो करी काम. ५६
परहृदयविदारणपटु पवनसुत उडे समुद्र शतगावें,

---

१. मुमुक्षु जनांचा आधार (राम). २. जटायूच्या. ३. फसवी (मोहित करी). ४. परलिखित हस्तदोष—शर्व. ५. प. ह. दो.—म्हणाणि. ६. उदक.

न तगावें इतरें, सुर म्हणती, 'होवूनि यासि नत गावें.' ५७
श्रीस अशोकवनीं पुर शोधुनि मारुति विधूदयीं पाहे,
स्वाप[1] न रुचे, कुमति ये प्रार्थी, 'धिक्!' श्री म्हणे, न तें साहे. ५८
व्हाया स्ववश सतीमन खळ सांगे राक्षसीस बोधाया,
जातां ती[2] मरतां, कपि मुद्रा दे, कळवि कुशळ तो धाया. ५९
श्री चूडामणि दे, घे आज्ञा, मोडूनि तरु वधी पापी,
दापी अक्ष वधुनि बहु, दव गहना तेंवि घनरवा व्यापी. ६०
एक हि गमे परांला नैकात्मा मथुनि बहु बळें अरिला,
ब्रह्मास्त्रें सांपडला, दाटुनि जड म्हणति 'घनरवें धरिला.' ६१
नेला सभेसि, वदला जे धर्मन्याय भावि ते सर्व,
धरि नैककर्मकृत्[3]बळ आसि, सूक्तें ही खिजे महागर्व. ६२
बहु वत्सर नांदाया त्यासि बिभीषण विचार दे, वारी.
मग शासनार्थ पेटवि पुच्छ क्रोधें समस्तदेवारी. ६३
वत्सळ हि प्रभुसेवक तात तसा शासनार्थ अरिपुर तें
रक्षुनि बिभीषणसदन, जाळी, क्षम तरि, न भस्म करि पुरतें. ६४
प्रियभक्तवत्सवत्सी[4] जो, कपि वंदी तया, कुशळ कळवी,
बळविस्मित होवुनि विभु भेटे, वर्णी, श्रम भ्रम हि पळवी. ६५
ये रत्नगर्भतीरा[5] देव बिभीषण हि तों चि धिक्कारी,
हित कथितां त्या त्यजि हा, कीं, खळ सद्सेव्य जेंवि हिक्कारी[6]. ६६
शरण बिभीषण ये, त्या दे लंकाराज्य, अभय जळधीतें;
प्रभु हृष्ट धनेश्वर करि, लाजवि दृढ सेतु रचुनि खळधीतें. ६७
द्विजधर्मगुप्[7] सुरप्रियकर्ता लंघुनि पयोनिधि, सुवेळा
गिरिवरि चढुनि सुकंठा सांपडली विजयदा बहु सुवेळा. ६८

---

१. झोंप. २. ती सीता आत्मघात करण्यास तयार झाली असतां. ३. अनेक. पराक्रम करण्याचें सामर्थ्य असलेला रावण. ४. वत्सांचें पालन करणारा. ५. समुद्र-तीराला. ६. लशुन-पंत. उचकीचा शत्रु. ७. ब्राह्मण आणि धर्म यांचें पालन करणारा.

[1]जगाद्दिष्टधर्मकृत्प्रभुदयिताधनतस्करा दशास्याला
ठोकी सुकंठ, परि त्या न विटावि, जासि बहु हि दुर्दशा स्याली[2]. ६९
धर्मी प्रभु लंकेतें वेढी, सामार्थ अंगदा प्रेषी,
परि तो न वळे, बुडवी स्वपर दुरभिमाननिधि महाद्वेषी. ७०
सत्साम[3] न करुनि बुडे, बुडवि सचिवपुत्रबंधुसह सारे,
कवि म्हणति, '[4]रचितघटजस्पर्धा या सर्व अंधुस[5] हसा रे!' ७१
कारि बद्ध असत्कर्मा घननाद प्रभुसि नागपाशानीं,
सोडवि गरुड; धरावें जाळानें काय तिमिंस[6] दाशानीं[7]? ७२
घटकर्ण वधी क्षर दशमुख अक्षर पुरुष रामभद्र, असें
जाणति सर्व, उठवितां बळप म्हणति, 'पवनजा! चिरायु असें.' ७३
मेघरव रणीं दावी सीता मायामयी, करी घाता,
लीलानररूप प्रभु बहु 'हाय!' म्हणे, जसा अविज्ञाता. ७४
सौमित्रिनें खपविला शक्रसहस्रांशुमेघरवराहु,
तेव्हां वदले सुरमुनि, 'बा! हें त्वत्सुयश नित्य नव राहु.' ७५
त्याच्या सुचिर विलापा अतिकरुणा करुनि बहुविधा तातें
असि धरिला माराया, [8]ज्या स्तवि नमि नित्य बहु विधाता तें. ७६
त्यासि सचिव प्रयत्नें फिरवी कृतलक्षण[9], प्रभु वधाया
बहुबळ मारवुनि निघे, भक्तिरसा सेवि जो खळ न धाया. ७७
संतत गभस्तिनेमी[10] विश्वहितीं जो तदीयवंशमणी
क्षोभे दशकंठीं, कीं, अनुजा कारि शक्तिनें विमूढ रणीं. ७८
भंगुनि दशकंठातें सत्त्वस्थ[11] हि मूर्छितानुजा शोची,
दे प्राणदान पूर्वीं साधु जगत्प्राणपुत्र[12] दे तो ची. ७९

---

१. जगाला आवडता आणि प्रिय धर्म करणारा जो राम त्याच्या स्त्रीरूप द्रव्याच्या चोराला. २. मेहुण्याला. ३. साधुजनाशीं सख्य. ४. केली आहे अगस्त्य ऋषीशीं स्पर्धा ज्यानें असा. ५. विहिरीस. ६. एक प्रकारचा फार मोठा मासा. ७. धीवरानीं. ८. सीतारत्नातें. ९. शौर्यादिकानीं प्रसिद्ध असा ( सचिव ). १०. सूर्य. ११. सत्त्वगुणमंडित असून देखील. १२. वायुपुत्र मारुति.

सिंह जसा मत्तगजा मारी, दशकंधरा रणीं राम,
पूर्ण करी लीलेनें देवब्राह्मणमहीमनःकाम. ८०
भूत[1]महेश्वर भगवान् देवाहीं पूजिला कुसुमवर्षें,
बहु वाद्यें वाजवुनि स्तविला वर विजय वर्णिला हर्षें. ८१
तो आदिदेव करवी शत्रूत्तरकार्य, आर्यधी रमवी,
शमवी शोक, बिभीषण बसवि पदीं, श्रीस दिव्य हित गमवी. ८२
जिष्णु विधि महादेव प्रमुदित करि, दशरथा नमी, निववी,
शिव वीतबा[2]ध दे प्रभु, जे रणमृत कीश शक्र ते जिवें[3]वी. ८३
प्रभुच्या वचनें सबळा सुगळा लंकेश दिव्य दे वेश,
पुष्पकनामविमानीं बैसुनि ये निजपुरासि देवेश. ८४
सेत्वादिकथा सांगे, तीस सुधेहुनि सती बरवि मानी,
तारेसि देव[4]भृद्गुरुदयिता श्री आणवी वरविमानीं. ८५
उत्तरदिशेंत पुष्पक गगनपथें रविविमानसा चाले,
प्रभु कथि आश्रम तीर्थें, श्रीकर्ण स्वामिसूक्तिनीं धाले. ८६
मुदित भरद्वाज करी; मग गुह शत्रुघ्न भरत गुरु माता;
गोपति[5] होय विभु जगीं, मह[6] नसता जरी असीम गुरु मा[7]ता. ८७
विश्वाचा गोप्ता क्षितिपति होउनि रंजवि प्रजा, माता
तात किती? जनकाचा दिनमणि करि कंज विप्र जामाता. ८८
कपिराक्षसराजातें तत्सैन्यातें उदंड सत्कारी,
जो ज्ञानगम्य तो प्रभु मारुतितें भजनसद्वरें तारी. ८९
धर्मनयपथ पुरातन उर्जरी, सव सर्व ही करी राजा,
सांगे जरागदातें, 'सांडुनि सर्व प्रजाशरीरा, जा.' ९०
शत्रुघ्न लवण भरत हि गंधर्वें वधी प्रमत्त जे कामी,

---

१. रामचंद्र. २. निर्दोष. ३. जीवंत करी. ४. देवांचा भर्ता इंद्र, त्याचा गुरु राम, त्याची भार्या सीता. ५. पृथ्वीपति राम. ६. उत्सव. ७. मावता. ८. निर्मल करी. ९. शैलूष गंधर्वांचे तीन कोटी वंशज.

आठ सुत करी राजे स्वभुजसम शरीरभूतभृत्[1] स्वामी. ९१
उच्छिष्टबदरभोक्ता होय, म्हणति, रामराय शबरीतें
तारी, देईल न कां गातां गति पामरा यश बरी तें?' ९२
'स्तोत्ररामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. १

इति श्रीस्तोत्ररामायणं [पंचमं] समाप्तं ।

---

# षष्ठस्तोत्ररामायण



देवर्षि कपींद्र म्हणति, भूम्युद्धारा वराह जो झाला,
त्याला विधिहर विनविति, दशरथदारोदरासि तो आला. १
कौसल्या कैकेयी तिसरि सुमित्रा तयांसि करि माता,
त्या अदिति भूरिदक्षिण[2] तज्जठरीं अन्यथा न हरि माता. २
सोमप[3] दशरथ ठेवी चवघां पुत्रांस चार जीं नामें,
तीं राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न असीं सुखाधिचीं धामें. ३
अमृतप गाधिज केला रामें, राक्षस वधून, यज्ञातें
रक्षूनि, गौतमा सुख दिधलें, तारुनि वधू, नयज्ञा तें. ४
सोमप्रियदर्शन विभु जनकपुरा गाधिनंदनें नेला,
प्रभुनें हरधनु भंगुनि, लीलालेशें चि पूर्ण पण केला. ५
बहु जिंकिले निशाचर गाधिजयज्ञघ्न म्हणुनि, रामातें
पुरुजित्[4] कविवर म्हणती, त्या सीता वरि सुकीर्तिधामातें. ६
पुरुसत्तम जनक सुता रामाचे अनुज जे तिघे त्यांतें
दे, फिरतां मार्ग धरी भार्गव, जो नुरवि हेति[5] वेल्यांतें. ७

---

१. शरीर उत्पन्न होण्यास कारण जीं पंचमहाभूतें त्यांचें पोषण करणारा. २. अत्यंत सात्त्विक. ३. सोमरस प्राशन करणारा. ४. बहुतांना जिंकणारा. ५. शस्त्र धरणाऱ्यांतें (क्षत्रियांतें).

विनय न सोडी, जिंकी भृगुरामा, राम ये पुरा, पौर
रौरवहर यश गाती प्रेमें शरदिंदुहूनि जें गौर. ८
जयमुदित दशरथ स्वज्येष्ठसुता यौवराज्य जों दे, तों
कैकेयी वर मागे, तीस म्हणे सत्यसंध तो 'देतों'. ९
दाशार्ह[1]अदयपण जें तें धारि दयिता हि राज्यलोभानें;
'रामा वन, भरता पुर,' म्हणतां त्याजिला चि साधु तो भानें. १०
तें सात्वतांपति[2] प्रभु ताताचा सत्यधर्म रक्षाया
मान्य करि, निघे वल्की फळमूळ चतुर्दशाब्द भक्षाया. ११
सीता लक्ष्मण घेउनि, नमुनि गुरुजना, निघे पुरा, जीव
देहा तसा, त्यजी प्रभु यन्मुख जनमधुप[3]कुळसुराजीव. १२
ज्यास विनयिता[4] साक्षी विश्वाचा म्हणति सर्व कवि, पैत्ती[5]
जाय वना, रथ दे त्या राजा, सोसे न बाळकाविपत्ती. १३
दे भेट मुकुंद[6] गुहा, स्तवुनि म्हणति 'धन्य हा निषाद' मुनी.
तो कीं हा यशार्में शिव कंठीं धारि महाविषा दमुनी. १४
धाडुनि सुमंत्र नगरा गुहतरिनें जाय जाह्नवीपारा,
तो अमितविक्रम प्रभु कीर्ति भरद्वाजमुनिस दे सारा. १५
मुनिनिकर चित्रकूटीं रामप्रभुदर्शनीं सुखें दाटे,
अंभोनिधि आल्हादे बहु पर्वविधूदयीं तसा वाटे. १६
ते[7] म्हणति, 'अनंतात्मा[8] देव महोदधिशय प्रभो! रामा!
दुष्टांचा अंतक तूं, सर्वसदाधार[9] नीरदश्यामा!' १७
अजपुत्र देह सोडी सुतशोकें, तें तसें घडे शापें.
मातुळकुळागत भरत गांजी मातेसि तो तिच्या पापें. १८
संस्कारूनि महार्ह स्वपित्याचा देह, साधु तो भरत
स्वामीस चित्रकूटीं जाय शरण शीघ्र भक्तिलोभरत. १९

---

१. रामाविषयीं निर्दयत्व. २. पार्षदगणांचा स्वामी. ३. लोकरूप भ्रमरसमुदायाचें उत्तम कमळ. ४. नेता (जगाचा नायक). ५. पादचारी. ६. मुक्तिदाता (राम). ७. मुनि. ८. विविधरूपधारी. ९. सर्व साधूंस आधारभूत.

दे पादुका विनवितां वत्सळ तो त्या बहिश्चरा प्राणा,
स्वां[1] भाव्यें[2] यशोलाभें सांत्वी, लावी प्रजापरित्राणा. २०
नंदिग्रामीं राहे साधु जिता[3]मित्र सुव्रत ज्ञानी,
ध्यानीं प्रभुच्या लावी चित्त, स्तविला अशेषतज्ज्ञानीं. २१
भक्तप्रमोदन प्रभु अत्रिस आनंद दे, विराधातें
वधि, उद्धरी; यश म्हणे भूदेवांसि 'न भवें विरा, धा' तें. २२
दंडकवनवासि द्विजनंदन[4] विभु वल्कली जटायुत या
दे घटज विष्णुशर्में, सुखवी जो तातसख जटायु तया. २३
श्रीसह सानंद प्रभु उटजीं गोदावरीतटीं राहे;
आहे कार्य मनीं जें देवांच्या तें करावया पाहे. २४
तो देव सत्यधर्मा जी विधवा रावणस्वसा चंडी,
मायारूप धरुनि ये ठकवुनि भोगावया, तिला दंडी. २५
दुष्ट तिचा कैवारी खरनामा जो वसे जनस्थानीं,
तो मारितां त्रिविक्रम बहुत चि सत्कारिला वनस्थानीं. २६
जैसा महर्षि कपिलाचार्य सकळ सगरपुत्र भस्म करी,
तैसे चि मत्त राक्षस सखर चतुर्दशसहस्र राम हरी. २७
ऐकुनि शूर्पणखोक्त क्षोभे दशकंठ, कनकमृग दावी,
श्रीचें हरण कृतज्ञ[5] प्रभु हि करूं दे, अनर्थ हित भावी[6]. २८
जो गृध्रमेदिनीपति जोडूं दे त्यासि कीर्ति परमगती
देतां[*] चि प्रभु, होती न ख्याति जगत्रयांत पर मग ती. २९
दावी स्त्रैणपणातें त्रिपद[7] प्रभु 'हा!' वदे, वनीं हुडकी.
लेववीली सच्छूवर्णी निर्गुणता, सगुणता दुजी कुडकी. ३०
त्रिदशाध्यक्ष[8] प्रभु दे गृध्राला अग्नि पिंड तोय, शेतें[9]
स्तविलें, न मेळवी तो, जो तीर्थें सुयति हिंडतो, यश तें. ३१

---

१. प्राणा–पंत. २. होणार–पंत. ३. जिंकिले शत्रु ज्यानें. ४. ब्राह्मणांस आनंद देणारा. ५. कर्मांचा साक्षी. ६. मानी; समजे. ७. विष्णु (राम). ८. देवांचा मुख्य (राम). ९. कर्वांच्या–पंत. * हस्तदोष–देता.

पुनरपि शोधी लंघी राम महाशृंग गिरि वनें बाहु
योजनदीर्घ जयाचे प्रभुसि धरि कबंध तो जसा राहु. ३२
त्यातें[1] कृतांतकृत् प्रभु मारुनि दे देहभाव, तो आर्य[2]
सांगे, 'रविसुतसुगळा भेटें, करिसील तद्बळें कार्य.' ३३
होवुनि महावराह क्षिति उद्धरि म्हणुनि म्हणति कवि ज्याला
गोविंद, उद्धरी तो शबरीतें, अभय, सख्य रविज्याला. ३४
प्रभु वाळितें वधी, करि सुग्रीवा प्लवगराज, या आले
तार सुषेण गज गवय ऋक्ष कपि, प्रणत सर्व ही झाले. ३५
सीतेतें शोधाया अंगद कनकांगदी यमाशेला,
पूर्वादिदिशांसि इतर सुगळाज्ञेनें जसे, तसा गेला. ३६
टळतां अवधि, मराया बसला कपिबळसमेत वधभीता[3]
गुह्य[4] जटायुभ्राता कथि, 'ती लंकेंत दिसतसे सीता.' ३७
ऋक्षेंद्रबोधितबळी[5] पवनसुत गभीर सिंधु शतगावें
लंघी लीलेनें, त्या कर्मी परधैर्य लेश न तगावें. ३८
शोधुनि परपुर, शोधी गहन अशोकाख्य, मग सती पाहे,
तों ये अरि, जें बोले अश्राव्य अवाच्य तें हि तो साहे. ३९
गुप्त वसे वृक्षीं, श्रीधिक्कृत खळ जाय, मग तिला नमुनीं,
प्रभुमुद्रा दे, सांगे कुशळ, पुसे, खूण घे, क्षण क्रमुनीं. ४०
तरुवर मोडी, राक्षसचक्रगदाधर तसा चि तो खपवी,
अक्ष वधी, घननादा व्याकुळ करि, धरि अनंत तोख पवी. ४१
पवनसुतें न गणुनि शतमखदुःसहमेघनादशस्त्रास
वेधा बहु हर्षविला, त्याच्या देवूनि मान अस्त्रास[6]. ४२
बद्ध स्वांग करूं दे, नेतां दशमुखसभेसि जाय कपी,
हित बोधामृत दे, परि न घे तो क्षीणायु मूढनायक पी. ४३
अजितप्रभुदूत उडे, निजपुच्छाग्रानळें पुरी जाळी,

---

१. केलेल्या जगाचा नाश करणारा. २. विश्वावसु गंधर्व. ३. वधामुळें भ्यालेल्या अंगदास. ४. गुप्त गोष्ट. ५. जांबवानानें जाणविलें बळ ज्याचें असा. ६. ब्रह्मास्त्रास.

पाळी बिभीषणसदन, कीं तो याच्या वधा स्वयें टाळी. ४४
पुर कवळि कृष्णवर्त्मा स्व[1]प्रियसखसूनुतें करी तुष्ट;
पुष्ट समीर करी त्या, श्रमले, 'हा! हा!' चि बोलिले दुष्ट. ४५
दृढ[2]बळ जलधि विलंघुनि ये, कळवी अंगदादिकां कृत्य,
नृत्य कराया लावी, विजयी श्रीरामकीर्तिकर भृत्य. ४६
साधुहृदयसंकर्षण[3] अच्युत बहु सुप्रसन्न होय, दया
करि, भेटे श्रीचूडामणि देता नतमयूरतोयद या. ४७
अमित सुरांशकपिबळें घेउनि विभु व[4]रुणसदनतीरातें
जाय, बिभीषण वंदी तों सकळशरण्यमुकुटहीरातें. ४८
दे[5]वनगपल्लवारुणचरणयुगीं साधु जों शिर स्थापी,
त्या दे लंकाराज्य प्रभु; अमृत त्यजुनि कवि यशा या पी. ४९
वृक्ष[6] सुरांचे पांच हि लाजविले या यशें अ[7]जपदानें,
प्रभुच्या चरणस्मरणें नमनें जें भद्र, तें न जपदानें. ५०
तो पुष्कराक्ष निरुपम सेतु जलधिकथितनळकरें करवी,
परवीरहृदय तापवि, विनवी स[8]त्कोटि, कीर्ति हे बरवी. ५२
उतरे महामना प्रभु सागरपारीं, चढे सुवेळनगीं.
प्रथम चि सुगळ दशमुखा भंगी, प्रकटी भुजप्रताप जगीं. ५२
लंका वेढुनि भगवान् सीताछळकाकडे स्वयें दूत
अंगद साम कराया धाडी, बोले विचार तो पूत. ५३
साम न करी दशवदन, ख[9]ळभगहा रामभद्र समरांत
भस्म करी बहु राक्षस, विजयें दे हर्ष नित्य अमरांत. ५४
दशमुखभंग विलोकुनि घनरवकृत नागपाश मोव हरी
आनंदी होय प्रभु, परबळ, तृणपर्ण जेंवि ओघ, हरी. ५५

---

१. आपला प्रिय मित्र जो वायु त्याचा पुत्र जो मारुति त्याला. २. शक्तिमान् मारुति. ३. आकर्षण करणारा. ४. समुद्रतीरास. ५. कल्पवृक्ष. ६. पांच कल्पवृक्ष. (१ मंदार, २ पारिजात, ३ संतान, ४ कल्पवृक्ष, ५ हरिचंदन). ७. जन्मरहित राम त्याच्या चरणानें. ८. कोट्यवधि साधुजन. ९. दुष्टांचें ऐश्वर्य हरण करणारा.

पाळी हें त्रिभुवन वनमाळी जो, तद्वधा महाकाय
ये घटकर्ण, विलोकिल मग काळाचें न धाम हा काय? ५६
गगनीं घननाद वदे, 'वधितों सर्वांसि आजि परिसा रे!'
तातासि मद्द भला दे युद्धीं पाडूनि धरणिवरि सारे. ५७
आदित्य अंधकारा प्रभुमोहा तेंवि पवनतनय हरी,
आणी महौषधीनगशिखर, निवे, स्तवि तयासि मनुजहरी.[1] ५८
घनरव मायाश्री वधि, विकळ करि जगत्प्रकाशक[2] ज्योति,
मारुतिकपीश्वरादि त्यजुनि धृतिस दीन तेधवां होती. ५९
'माया' असें बिभीषण सांगोनि करी सहिष्णु देवातें,
जो पदपद्मरज्याच्या ज्ञान स्मरतां जडासि दे वातें. ६०
त्या घनरवा वधुनि दे गतिसत्तम[3] लक्ष्मण, प्रभावातें
गाय हरि, हरिलि अरिची सहसा जसि दीपकप्रभा वातें. ६१
श्रीस वधूं धांवे, परि सचिवें दशकंठ फिरविला मार्गे,
बहु बळ वधी सुधन्वा प्रभु खळ ही युद्ध मग करी रागें. ६२
खरशक्तिनें सुमित्रापुत्रातें अरि रणांगणीं पाडी,
खंडपरशुजेता[4] प्रभु पंक्तिवदनमद[5] न अल्प ही झाडी. ६३
त्या[6] चि उपायें मारुति लक्ष्मणमोहव्यथाव्रण हि उडवी,
दारुण समर करी प्रभु, शक्ररथीं बसुनि अरिचमू बुडवी. ६४
द्रविणप्रदबंधुशिरें[7] शत खंडी प्रभु, तऱ्ही न तो पडला,
कुंभजदत्त 'रविहृदय' जपतां तन्नाश रविवरें घडला. ६५
झाला विजय दिवस्पृक्[8] प्रभुचा सर्वत्र, अमृतघन 'नाचा'
भक्तमयूरांसि म्हणे, शक्रा बहु हर्ष शत्रुहननाचा. ६६
होय प्रभुसि पहातां आनंदें करुनि सर्वदृग्व्यास[9],

---

१. मनुष्यरूपी विष्णु (राम). २. राम. ३. उत्तम गति, मोक्ष. ४. शत्रुखंडन करणाऱ्या परशूतें जिंकणारा (राम). ५. रावणाचा गर्व. ६. महौषधींच्या. ७. कुबेरबंधु रावण त्याचीं शिरें. ८. स्वर्गातें स्पर्श करणारा. ९. सर्वांच्या दृष्टीचा विस्तार.

दास ब्रह्मादि बहु स्तविति, अति ऱ्हास पावला त्रास[1]. ६७
स्तव पुष्पवृष्टि करिती बहु कवि वाचस्पतिप्रमुख शर्मी.
त्या मीं वर्णूं न शकें हर्षां, कोणी तदा न सुरधामीं[2]. ६८
करवी अयोनिज प्रभु मग उत्तरकार्य शत्रुचें सांग,
बसवी बिभीषणाला राज्यपदीं, त्या यशा स्तवी गांग[3]. ६९
मग तो प्रभु त्रिसामा[4] श्रीकरवीं दिव्य करवि, शंकेतें
हरवि, हरविधिस्तुतपद लावी निजचरणभक्ति लंकेतें. ७०
सामगगीतगुण[5] प्रभु करि सुरमुनिमहित दशरथा नमुनीं,
‘बाळांसि तुष्टिपुष्टिद हें यश’ म्हणती ‘असें न थान’ मुनीं[6]. ७१
साम पित्यापुत्राचें होय परस्पर, रणांत मृत होते
जे ऋक्ष कपि, प्रभुला वर देउनि, उठवि शक्र जो तो ते. ७२
निर्वाणप्रद भगवद्भेषज यश करि भिषकप्रवर राम,
सांगुनि बिभीषणाला सबळ सुगळ पूजवी, पुरवि काम. ७३
स्मरला विरहें, झाले केवळ संन्यासकृत् स्वबंधुमणी,
धांवे समयीं भेटुनि जिववाया पुष्पकीं बसोनि धणी. ७४
सांगे स्वविरहतापा शम व्हाया श्रीस रामचंद्र कथा,
सबळसुकंठबिभीषणसह हर्षें लंघितां अमर्त्यपथा. ७५
तीर्थें पर्वत गहनें शांतमुनिवराश्रम स्वयें दावी,
लावी निष्ठा स्वयशीं, सर्व प्रभुसूक्तितें सुधा भावी. ७६
पावति शांति सकळ ही प्राशुनि ते बोल, कान सेकाहीं
अमृताच्या भरिति. गमे, वेद असा बोलका नसे काहीं. ७७
दे हर्ष तीर्थपादा तो तीर्थपरायण[7] प्रयाग मुनी,
तातसख भरद्वाज प्रभुनें केला सुखी पदें नमुनी. ७८
प्रथम पवनतनयकरें गुहभरतचकोरमानसा निववी.

---

१. त्रास अगदीं नाहींसा झाला. २. स्वर्गांत. ३. गंगेचें उदक. ४. तीन सामानीं स्तुत असा. ५. सामवेद गाणाऱ्यानीं गाइले आहेत गुण ज्याचे असा. ६. यमकार्थ सानुस्वार. ७. तीर्थपरायण मुनी [ आणि ] प्रयाग.

त्यावरि शुभांग विभुविधु देवुनि दर्शन वचोमृतें जिववी. ७९
तापत्रयशांतिद पुरगुरुमातासचिव बुडवि हर्षांत.
सुर हि स्तुतिगीतमधुरवाद्यध्वनिदिव्यपुष्पवर्षांत. ८०
स्रष्टा[1]शिवशतमखसुरमुनि रघुपतिच्या महाभिषेकमहा
अवलोकुनि म्हणति, 'अघा गाल्यांच्या भस्म कां करील न हा?' ८१
सुरनरमंडलकुमुद प्रभु भासे पूर्णचंद्र विकसविता,
कीं त्या कमळवनीं हा शोभेचें पिकवि विपुळ पिक सविता. ८२
तापविती कुवले[2] शय धरितां दुर्धर जसे, तसे चि अरी
जे कामादि हृदय ते कुवलेशय[3] विभु जगांत शांत करी. ८३
गोहित विप्रहित प्रभु सुरहित सुरमहित सर्वदासहित,
ज्यांसीं कारुण्य तसें नांदे औदार्य सर्वदा सहित. ८४
गोपति[4] रघुवीर करी प्रेमा सर्वप्रजावरि प्राज्य,
प्रभुचें ज्यांत न आधिव्याधिजरामृत्युभय असें राज्य. ८५
विश्वाचा जो गोप्ता तो दे दासांसि रामराज गती,
वैकुंठाहुनि अधिका झाली सर्वा हि पामरा जगती. ८६
वृषभाक्ष प्रभु कुंभजवदनें दशकंठजन्मकर्मकथा
ऐके, मारुतिची ही दाखविता जो स्वभक्तिमुक्तिपथा. ८७
सबळ सुकंठ बिभीषण पूजी परमादरें पवनतनया,
जैसा वृषें[5] प्रिय शिवा, हा प्रभुस, दुजा असा अवनत न या. ८८
अनिवर्ती[6] प्रभु देता झाला पवनात्मजासि वर सहित,
चिरजीवित्व स्वयश:श्रवण करि असें स्वदासपरमहित. ८९
विषयनिवृत्तात्मा परि विषयींसा रामराज नासत्य[7],
ज्याचे पाय चि देती मोक्षसुख हि पामरा जना सत्य. ९०
लयसमयीं विश्वाचा संक्षेप्ता[8] देवदेव हा राम,
विस्तार सर्गकाळीं करिता श्रित[9]कल्पभूरुहाराम. ९१

---

१. ब्रह्मदेव. २. शब्दार्थ? ३. विष्णु. ४. राजा. ५. नंदी. ६. धर्मापासून निवृत्त न होणारा. ७. खरा. ८. नाशकर्ता. ९. आश्रितांना कल्पवृक्षांची बाग.

यातें चि स्थितिसमयीं म्हणति कवि क्षेमकृत्[1] करी क्रीडा,
ताराया विश्व यशें, द्याया अमृता सुरद्रुमा व्रीडा. १२
'श्रीराम श्रीराम श्रीराम' असें जपे सदाशिव, तें
कोणा न रुचे भाग्य स्वीकाराया स्वयें पदा शिवतें? १३
'स्तोत्ररामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं वाहिलें कृतवंदनें. १४

इति स्तोत्ररामायणं षष्ठं ।

---

# सप्तमस्तोत्ररामायण

श्रीकांत भक्तवत्सळ वरद क्षाळावया यशें दोष,
श्रीपूर्ववत्सवक्षा[2] दशरथसुत होय, दे जगा तोष. १
श्रीवास राम झाला कौसल्यापुत्र, धन्य रविवंश,
कैकेयीसुत दुसरा भरत, महासाधु विष्णुचा अंश. २
श्रीपति च सुमित्रासुत, लक्ष्मण शत्रुघ्न अंश, यश तातें
पंक्तिरथें मेळविलें, उडवुनि जडजीवसंशयशतातें. ३
तो श्रीमतांवर[3] नृपति गाधिसुता यागरक्षणा आधीं
दे रामलक्ष्मण, म्हणे, 'आर्या! कार्या अनुग्रहें साधीं.' ४
श्रीद प्रभु शिष्यपणें अस्त्रें घे, ताटका वधी रानीं,
श्री त्यजुनि वरिलि ज्याचे न्हायाला भाट कार्व[4] धीरानीं. ५
सिद्धाश्रम धन्य करी श्रीश जयावरि न कोपला शांत,
ते सर्व वधी प्रभु, जरि सदय मुनि म्हणे, 'नको पळाशांत.' ६
स्वमख करुनि जनकमखा जातां मुनिनें मुकुंद ही नेला,
जी ऋषिवधू शिळा त्या उद्धरि तो श्रीनिवास हीनेला. ७

---

१. संरक्षणकर्ता. २. श्रीवत्सलाक्ष=श्रीवत्सचिन्ह ज्याच्या वक्षःस्थळीं शोभतें असा. ३. लक्ष्मीसंपन्नांमध्यें श्रेष्ठ. ४. एक प्रकारची माती.

श्रीनिधि गुण जोडी, हळु ओढी, तरि रुद्रचाप तो चुरला,
पुर लागे बहु गाया, सीतेचा काम बहुदिसां पुरला. ८
तो श्रीविभावन[1] प्रभु सीतेनें निरुपमादरें वरिला.
तरि लाजली पहाया मुख, ती श्री भजलि जरि तया हरिला. ९
श्रीधरविभुचे भ्राते जे त्यांसि तिघी सुता दिल्या जनकें,
कनकें रत्नें वस्त्रें अर्पुनि तें लग्न वर्णिलें सनकें. १०
श्रीकर होय श्रीकरें[2], भृगुरामा कीं मिळे महाशांति,
आली पुन्हां स्वधर्मैं[3], जी परधर्मैं विटे त्यजी कांति. ११
श्रेय स्वमनीं समजुनि गेला भृगुराम तप करायातें,
सुतयश चि गोड वाटे, जें सुरमत अमृत सपक राया तें. १२
श्रीमान् दशरथ आला साकेताला सुतस्नुषासहित,
महि तज्जयें निवाली, पौर हि झाले तया महीं महित[4]. १३
लोकत्रयाश्रय प्रभु युवराज करावया पिता पाहे,
सुरहृतमति कैकेयी धरि, पति, सांत्वी, तथापि ताप हे. १४
वर घे, 'वनवासातें हा स्वक्ष[5] स्वंग राम पुत्र वरू
तापससा मनुवर्षें, होउनि युवराज भरत राज्य करू.' १५
कार्थ शतानंद[6]कथित दशमुखवध तातसत्यसमवन तें
वरिलें लक्ष्मणसीतासहितें पितृमातृचरणसमवनतें[7]. १६
कैकेयी वल्कल दे, तें नेसे, आदरें दिला वंदी,
पात्ति निघे वनवासानंदि प्रभु सत्यधर्मशिवनंदी. १७
ज्योतिर्गणेश्वर[8] निघे राक्षसभयतिमिरवारणा राजा
'स्वरथीं तरि बसुनि' म्हणे, 'बा अस्मत्प्राणतारणारा! जा.' १८
बसवि सुमंत्र पितृरथीं, विजितात्मा राम जाय अटवीतें,
पुरजनवृंद न सोडी, जें रात्री हळुच निघुनि फटवी तें. १९

---

१. श्रीचा उत्पन्नकर्ता. २. शोभा करणारा. ३. विप्रधर्मानुरोधानें. ४. पूजित. ५. चांगले नेत्र ज्याचे असा. ६. जनकाचा पुरोहित. ७. पितृमातृचरणीं अत्यंत नम्र अशा. ८. सूर्यादिक गणांचा स्वामी (राम).

[1]अविधेयात्मा प्रभु तो भेटे भक्ता गुहा निषादास.
गुरु सचिवा ‘ जा च ’ म्हणे, तो सेवी त्या वचा विषा दास. २०
करुनि जटा, गुहतारिनें उतरुनि गंगा, पुसे निषादातें,
राहवि तथा दयानिधि सत्कीर्ति प्रभु हरी विषादातें. २१
नमुनि भरद्वाजातें तदनुमतें चित्रकूट नग वसवी,
जो छिन्न संशय करी नामें चि, जडा कळीस न गवसवी. २२
राजा [2]उदीर्णशोकें मरतां, मातुळपुरस्थभरतातें
आणवितां, माय म्हणे, ‘ घे, तुज दिधला स्वराज्यभर तातें.’ २३
निंदुनि तिला, पित्या जळ देवुनि, सत्वर निघे, म्हणे, ‘ रक्षु
प्रभु चि मही;’ पावे त्या गिरिस, वसे ज्यांत सर्वतश्चक्षु. २४
प्रभुसि नमी, जळ देववि तातातें, मग म्हणे तया, ‘ परतें,
तूं ईश, मी अनीश चि,’ न करि जरि हि देव तो दयापर [3]तें. २५
वदला प्रभु, ‘ निजधर्मा वत्सा! चित्तीं विचारुनि पहा या;
गुरुवच पाळावें म्यां, त्वां ही, यश शाश्वत स्थिर रहाया.’ २६
घे अभयपादुका, ये नंदिग्रामीं वसे, प्रजा रक्षी,
[4]भूशाय वल्कजटाधर भरत गुरुव्रत वरी, फळें भक्षी. २७
रघुकुळभूषण भेटे अत्रिस सुतसा नमूनि, तज्जाया
अनसूया श्रीस उटी दे वनवासीं सुखांत मज्जाया. २८
मग [5]भक्तभूति भगवान् राम विराधासि उद्धरी, तिपट
वारादिंदुहूनि धवळी प्रभुचा विश्वासशुद्धरीतिपट. २९
विभु विप्र विशोक करी राक्षसभय हरुनि दंडकवनांत,
ऋषिवृंदीं होय जसा मुनिच्या सद्रसिक थंड कवनांत. ३०
तो शोकनाशन घटजदत्त पुराण स्वशस्त्र पूजनिं घे,
पितृसखगृध्रजटायुप्रिय करुनि पुढें [6]सबंधुभूज निघे. ३१

---

१. ज्याचा आत्मा दुसऱ्यानें करण्यास अशक्य आहे असा. २. उत्पन्न झालेल्या शोकानें. ३. परत फिरणें. ४. जमीनीवर च निजणारा. ५. भक्तांचें आश्रयस्थान. ६. बंधु लक्ष्मण व भूजा सीता यांसह.

गोदावरीशुचितटीं अर्चिष्मान्[1] प्रभु पुरीं तसा राहे,
परमर्षींहीं अर्चित पंचवटीस्थान सत्यसें[2] पाहे. ३२
तो अमृतकुंभसा प्रभु उटजीं होता सदार, देवा या
ये राक्षसी शुनीसी रावणभगिनी सजूनि सेवाया. ३३
हांसोनि विशुद्धात्मा धाडी ती स्वानुजाकडे नवरी,
न वरी तो, प्राण हरी, न करूं द्याया दहांत मान वरी. ३४
करिता पापविशोधनें[3] शुद्धयशोधन सुरांत शोभावा,
तो त्या शूर्पणखेच्या ‘भस्म’ म्हणे ‘संगरांत हो’ भावा. ३५
दव अनिरुद्ध तृणांहीं तैसा प्रभु जो रणीं परबळांहीं,
मरणार्थ गांठिला तो राम मनुसहस्रदुर्मतिखळांहीं. ३६
अप्रतिरथरघुनायककृत[4] शूर्पणखा दशानना सांगे,
तो मूढ म्हणे, ‘हरितों तदसु, उगीं, प्रथम न कथिलें कां गे!?’ ३७
प्रद्युम्न[5] जसा रुद्रा, श्रीरामा वश करावया माया-
कनकहरिण तो योजी दशमुख, सदतिक्रमें लया जाया. ३८
कनकमृगरूप खेचरें[6] सीता पाहोनियां तया धरवी,
त्या अमितविक्रम प्रभु वेधी, कीं वरि च तत्तनू बरवी. ३९
‘हा सीते! हा लक्ष्मण!’ तो बोले; कांलवे मनीं सीता,
नेणें मिष निशिचरकृत, ‘हाय!’ म्हणे, लक्ष्मणा छळी भीता. ४०
कटुवाक्शरक्षतहृदय तो वीर हि धैर्य उटज ही सोडी,
जोडी श्रीस कर, निघे; स्त्रीच्या चित्तीं विचारणा थोडी. ४१
शौनकमुख मुनि ज्याच्या चरितश्रवणीं महासुधी रमले,
त्या प्रभुकडे चि गेला. श्रीकूर्ते कर्ण तापले श्रमले. ४२
तों ती शूरजनेश्वरदयिता त्या रावणें खळें हरिली,
हरि लीलार्थ उपेक्षी, श्वानें सिंही तसी जडें धरिली. ४३
तों पत्रिपति विलोकी, विरथ करुनि अरिस सोडवि सतीतें.

---

१. तेजस्वी. २. ब्रह्मलोक–पंत. ३. शुद्धीकरण. ४. ज्याला प्रतिस्पर्धी नाहीं अशा रामानें केलेलें. ५. मदन. ६. गंधर्व (मारीच). ७. व्याकुळ होई. ८. जटायु.

काळचि गमे महात्मा दुष्टा त्या तात दीन दिसतीतें. ४४
खळ गृध्रपक्ष तोडुनि हरि त्रिलोकेशहृदयवसतीतें,
लंकेंत अशोकवनीं स्थापी; मानी मनीं दव सती तें[1]. ४५
लक्ष्मण कथि वृत्त; म्हणे लीलामानुषशरीर केशव 'हा!'
भूमि म्हणे, 'नावरिला तरि दशमुख यौवता[2]! न केश वहा.' ४६
स्त्री न दिसतां म्हणे प्रभु, 'हा सुंदरि! हा सुकेशि! हा सति!' तें[3]
गोदेस ये प्रथम, मग शोकातिशयें नये चि हास तितें. ४७
स्वरत[4] हरि स्त्रैण तसा करि नानापरि विलाप, वन धुंडी,
रडुनि रडवि शार्दूला सिंहा, किति खगमृगांचिया झुंडी. ४८
गृध्रातें सावधपण बोलाया राम दे, वदे, 'वद यां[5].'
'पुत्र सुगति हो' असि करि पुरवुनियां काम देवदेव दया. ४९
निजभक्तकामपाळ प्रभु गति करुनि क्रिया तया दे, हें
यश साधूंचीं करि बहु रोमांचित हरुनि भवभया देहें. ५०
'हा सीते! हा सीते!' वदत फिरे राम, जारि न हा कामी,
चित्तांत म्हणे, 'तरतिल जड; कां न प्रकट करिन हाका मीं?' ५१
श्रीकांत कबंधा दे गति, शबरीभाग्य या फळें फळलें.
स्वोद्धारार्थं कृतागम[6] विभु, हें गुरुभक्तिनें जिला कळलें. ५२
देव अनिर्देश्यवपु हि नरसा विरहज्वरें धरी कंपा,
पंपातटीं विलाप प्रकट करी, स्मरुनि कांतिजितशंपा[7]. ५३
तो लक्ष्मणप्रबोधित लीलानररूप विष्णु रविज्यातें
पवनसुतें भेटविला, अतिदुर्लभ म्हणति सर्व कवि ज्यातें. ५४
सुगळ श्रीभूषा दे, तत्प्रियसख होय पद्मकर वीर,
यत्पदरजा कवि म्हणति विजयश्रीकेलिसद्मकरवीर[8]. ५५

---

१. अशोकवन–पंत. २. स्त्रीसमूहा!–पंत. ३. तें [ऐकून] गोदेस प्रथम हास ये. ४. स्वस्वरूपीं रममाण असणारा. ५. मज–पंत. ६. केला आहे आगम (येणें) ज्यानें असा. ७. कांतीनें जिंकिली वीज जिनें अशी (सीता). ८. विजयलक्ष्मीचें क्रीडास्थानरूप करवीरक्षेत्र.

श्रीहरवधेच्छु वाळी शक्रसुत अनंतबळ तया मारी,
प्रभु त्याची राज्यश्री दयिता तारा हि दे सख्या, तारी. ५६
ते पवमानधनंजय तैसे कपिनरपति प्रबळ लोकीं,
प्रभु पारि गुहेंत कंठी वर्षा[1] बुडवुनि मन प्रियाशोकीं. ५७
ज्यातें श्रुति कवि म्हणति ब्रह्मण्य[2] ब्रह्मकृत्[3] सदा शांत,
ब्रह्मा ब्रह्म ब्रह्मविवर्धन[4] जो ब्रह्मवित्सभाकांत, ५८
जो ब्राह्मण जो ब्रह्मी[5] ब्रह्मज्ञ ब्राह्मणप्रिय स्वामी,
विश्वोद्धार कराया होता विरहार्त गिरिगुहाधामीं. ५९
सुग्रीवें पाठविले श्रीच्या अन्वेषणार्थ कपि वीर,
त्यांत महाक्रम[6] मारुति लंघी शतयोजनांबुनिधि धीर. ६०
श्रीस अशोकवनीं दे मुद्रा, वन बळ मथी, न धारि शंका,
सांपडुनि महाकर्मा धिक्कारी अरिस,[7] भस्म कारि लंका. ६१
फिरुनि महातेजा ये, दे श्रीचूडामणि, प्रभुसि वंदी,
प्रभु आलिंगन देउनि वर्णी त्यातें स्वयें जसा बंदी. ६२
सबळ निघे प्रभु, जैसा कुपित महोरग, बिभीषणा प्रणता
दे राज्य, सेतु करवी, कुतुकें देता चि अब्धिला कणता. ६३
लंकेंत रणमहाक्रतु कारि, अरि वारि साम न, स्ववध मानी
दशवदन स्वीकारी, नर गणिला लोकनाथ अधमानी.[8] ६४
श्रीराम महायज्वा, जें राक्षससैन्य तें विपुळ सर्पी,
उग्रप्रतापपावककुंडीं संतत शरस्रुवें[9] अर्पी. ६५
तो समरमहायज्ञ प्रभुचा शतमखमुख त्रिदश गाती,
होता लक्ष्मण ऋत्विक्, सुग्रीवादिक महर्षि बहु धाती. ६६
ज्यांत घटश्रुति तत्सुत घनरव जे हे महाहवि प्राज्य,
पूर्णाहुति दशमुख, अवभृथ जें दिधलें बिभीषणा राज्य. ६७

---

१. पावसाळा. २. ब्राह्मण. ३. वेदकर्ता. ४. वेदवृद्धि करणारा. ५. ज्याच्या ठायीं ब्रह्म रहातें असा. ६. मोठा आहे पादविक्षेप ज्याचा असा (लांब पावलें टाकणारा). ७. बिंदुत्व, लघुत्व. ८. यमकार्थ निरनुस्वार. ९. बाणरूपी पळ्यानीं.

दशवदननिधनकाळीं सुरमुनिवरकोटिनीं महाहर्षें
स्तविला स्तव्य प्रभु तो, स्वःपुष्पांच्या समर्चिला वर्षें. ६८
सांगे स्तवप्रिय प्रभु, 'बिभीषणा ! योग्य होय देहातें
भ्रात्याच्या संस्कारीं, बा ! विधिनें पिंड तोय दे हातें.' ६९
स्तोत्र प्रभुचें करिती या कारुण्यैकरूनि सुर साचें,
वात्सल्य हें चि भुलवी रसिका माधुर्य या चि सुरसाचें. ७०
स्तुति केली शतधृतिनें[1], स्तोता प्रभुचा महेश्वर हि झाला;
मग त्या बिभीषणाच्या अभिषेकें शोकपावक विझाला. ७१
वदले 'रणप्रिय असा त्रिजगीं भूत न भविष्य, यासम हा.'
पात्र विलोकुनि झाले सीताकृत दिव्य सर्व दास महा. ७२
झाला पूर्णमनोरथ दशरथ भेटोनि नंदना रामा,
क्षणमात्र हि न निवाला सुचिर हि सेवूनि नंदनारामा. ७३
जो निजमनोरथांचा पूरयिता प्रभु, तयासि 'वर माग'
शक्र म्हणे, मागे, 'कपिबळ उठिव' असें स्वभक्तपरमाग. ७४
पुण्यजन[2] रणीं मेलें बळ हरि उठवी प्रभुप्रसादानें,
देवद्विजां यशांचीं अर्पी, सुरतरु न दे असा, दानें. ७५
मग पुण्यकीर्ति भगवान् स्वप्रिय सांगे बिभीषणा, 'बा! जें
या सबळा सुगळाचें पूजन करिसील सत्य तें माजें.' ७६
तें चि करि, बिभीषण दे पुष्पक सुविमान तो करायाला
सानुज भरत अनामय वत्सलतिलका त्रिलोकरायाला. ७७
सबळ सुकंठ बिभीषण घेऊनि सानुज सदार सुखयान[3]
समधिष्ठूनि[4] मनोजव देव निघे, कां गमेल सुख या न ? ७८
तीर्थंकर[5] वियोगासुख कथि, तेणें श्रीस जेंवि सुख गानें.
पाहों दिलें विमानें सर्व जसें वैनतेयसुखगानें. ७९
वसुरेतासा[6] जो द्विजपूज्य भरद्वाज सुखविला नमनें,

---

१. ब्रह्मदेवानें. २. पुण्य जनानीं युक्त. ३. उत्तम विमान. ४. आश्रय करून. ५. राम. ६. अग्नीसारखा.

गुह भरत हि पवनसुतें हर्षविला कथितरघुविरागमनें. ८०
जेंवि उदार वसुप्रद करितो भेटोनि धन्य अधनातें,
तेंवि गुहा भरता प्रभु, याचें चि सं[1]मुच्च, अन्य अं[2]ध नातें. ८१
नित्यनवसुखप्रद विभु नृप होवुनि विश्व रंजवि, प्राशी
स्वकथा शिवसा आपण जो श्रितहितपादकंज विप्राशी. ८२
लवणा हि वधुनि करुनि त्रिभुवन सुरवां[3]ड वासुदेव, 'रहा
सानंद' म्हणे, स्वयशें निववी सुरवांडवासु, दे वर हा. ८३
झाले सुतृप्त रुद्रादित्यवसुप्रमुख सुर न यज्ञानें,
श्रीरामें वैकुंठ चि केलें साकेतपुर नयज्ञानें. ८४
लुब्ध व[5]सुमना तैसा भक्तमना प्रभु बिभीषणा सुगळा
सबळा समळंकारी, पाहुनि निववूनि घे स्वदृग्युगळा. ८५
प्राशी अग्नि कथी जें श्रौ[6]त सकळ पुस्त, राघवा हवि तें
होय, अवभृथस्न[7]पन प्राण्यांचें दुस्तराघ वाहवितें. ८६
सद्गति अंतीं आधीं सुखखनि बरवि प्रजांसि दे, वरवी;
प्रभु कारि शू[8]द्र विमानग, समजे वरविप्र उंयांसि देव[10]रवी. ८७
बहु सत्कृति मारुतिची केली प्रभुनें भले दिले वर हो!
वदला 'स्वयशोमृत पी सुचिर, चिरंजीव बा! इले[11]वर हो.' ८८

'स्तोत्ररामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें.

इति स्तोत्ररामायणं [सप्तमं] समाप्तं।

---

१. फार मोठें. २. हलकें ३. सुखरूप. ४. देवब्राह्मणांचा आत्मा. ५. द्रव्यावर मन ज्याचें असा. ६. श्रौत ग्रंथ. ७. यज्ञांगस्नान. ८. शंबुक. ९. यमकार्थ सानुस्वार. १०. इंद्र. ११. पृथ्वीवर.

# अष्टमस्तोत्ररामायण

लक्ष्मीपति धर्मद्विजसुर रक्षाया, वधावया मत्ता
दशकंठा, दशरथसुत होय, जयाची जगत्रयीं सत्ता. १
सद्भूति[1] भूप करि हयमेध, दहन दे तयांत पायस या;
कौसल्यादि तिघी तें प्राशिति, पतिचे नमूनि पाय सया. २
ये सत्परायण[2] प्रभु त्यांच्या पोटासि, च्यार धरि रूपें,
तन्नामें राम भरत लक्ष्मण शत्रुघ्न ठेविलीं भूपें. ३
दे शूरसेन[3] राजा गाधिसुता यज्ञरक्षणा दोघे,
मोघेच्छे[4] न करि अर्थी, परमानंदेकरूनि ते तो घे. ४
मुनिशिष्य लक्ष्मणासह होय श्रीराम भीतिदक्ष[5], पणें
तत्प्रिय दुर्घट घडवी, सर्वसुरश्रेष्ठ नीतिदक्षपणें. ५
जनकपुरातें जातां श्रीमुनिसह सन्निवास तो भार्या
उद्धरुनि पदाब्जरजें दे बहु आनंद गौतमा आर्या. ६
सुरमणिकार्मुक मोडुनि अत्यद्भुत दाखवि प्रभु जगा या,
मुनि जनक निवावि, सीता वरि, लावी लाख विप्र भुजें[6] गाया. ७
भूतावास[7]प्रभुच्या आत्यांला सानुजें तिघी दुहिता
जनकें दिधल्या, कौशिकमुनिवरवचनेंकरूनियां सुहिता. ८
हरधनुभंगक्रुद्धा भृगुरामा वासुदेव समजाया
दावी तेज, नुराया शत्रुत्व, द्युमणि जेंवि तम जाया. ९
सर्वासुनिलय[8] अनळ चि जो क्षत्रियदर्पहा[9] महेशवर
ज्या दर्पद[10] दम[11] सदा, दुर्धर अपराजित द्विजप्रवर, १०

---

१. उत्तम आहे ऐश्वर्य ज्याचें असा. २. साधूंविषयीं तत्पर. ३. शूर लोक आहेत सैन्यांत ज्याच्या असा दशरथराजा. ४. निष्फळ इच्छा ज्याची असा. ५. भय निवारण्याच्या कामीं कुशल. ६. बाहुपराक्रम. ७. प्राण्यांचें वसतिस्थान जो अशा. ८. सर्व प्राण ज्यामध्यें लय पावतात असा. ९. क्षत्रियांचा गर्व नष्ट करणारा. १०. अभिमानी. ११. परशुराम.

त्या विश्वमूर्ति भगवान् विष्णु महामूर्ति दीप्तमूर्ति यशें
शोभित अमूर्तिमान् प्रभु नरॅरूप अनेकमूर्ति कार्यवशें. ११
अव्यक्त हि होतो शतमूर्ति शतानन असें बरें कळलें,
मळलें सुख न परिभवें, त्यजुनि भ्रम चित्त विभुकडे वळलें. १२
जो एक प्रभु झाला मायेनें नैकरूप तो क्लिजया
जोडुनि ये साकेतीं, पौर म्हणति, 'आयु सुख दिलें निज या.' १३
उत्पूर्वसव[1] जगा दे, ब्रह्म सुख म्हणुनि जया म्हणति कवि कं[2]
एकाक्षर किं यत्तत् तिसरें यन्नाम सत्सभाभविकें[3]. १४
श्रुति म्हणति पद अनुत्तम ज्यातें तो लोकबंधु राम हरी
युवराज करूं पाहे नृप, कैकेयी भ्रमोनि विघ्न करी. १५
'पद भरता, वन रामा मनुवर्षें दे' म्हणे, नृपा अडवी,
करि लोकनाथ तत्प्रिय, कीं, तातीं तत्प्रिया नसो कडवी. १६
सानुज माधव हर्षें कैकेयीदत्त वल्क नेसून;
तातातें नमुनि निघे, कौसल्येची वनासि ने सून. १७
पायीं च भक्तवत्सल जातां राजा न दुःख तें साहे,
सूत सुमंत्र तिघांतें राजरथीं राजशासनें वाहे. १८
शरदभ्रवर्ण लक्ष्मण, सजलजलदवर्ण राम, तद्दार
ते शुचि सुवर्णवर्ण, व्याकुळ तद्विरह करि पुरा फार. १९
ज्या हेमांग वरांग श्रुति म्हणती तो गुहें निषादानें
वल्की पाहुनि धरिला, ताप धरावा जसा विषादानें[4]. २०
जो राजसुत दुकूली[5] सूष्णीषी[6] चंदनांगदी[7] गेहीं,
वल्की जटी फलाशी मिरवी भस्मांगराग तो देहीं. २१
सचिव सुमंत्र न सोडी, जरि करि नुतिपाठ, वीर[8] हा यास
मागें शोकाकुळनरपतिपाशीं पाठवी रहायास. २२

---

१. 'उत्' उपसर्ग पूर्वीं ज्याच्या असा 'सव' म्हणजे उत्सव. २. ब्रह्म. ३. कल्याणरूप. ४. विष भक्षणाऱ्यानें. ५. पीतांबरधारी. ६. चांगलें पागोटें घालणारा. ७. चंदनयुक्तबाहुभूषणधारी. ८. राम–पंत. ❀ सदोष पदच्छेद–**नर रूप**.

ज्यास सम नसे यास्तव विषम असें नाम, तो गुहा मागे
'गंगापारीं ने' हें, तरुनि भरद्वाजमुनिपदीं लागे. २३
सर्वविशेषरहित याकरितां ज्या शून्य म्हणति तो राम
प्रभु वसवि[१] चित्रकूटीं बंधुकृतोटज, न आठवी धाम. २४
निपट विगलिता सुतपुनरागमनप्रार्थना[२] म्हणोनि नृप
होय धृताशी[३] व्यसु तो, शापें झाला दयाब्धि हातकंप[४]. २५
मातुळकुळागत भरत निंदी मातेसि, राज्यपदलोभें
वातें अचळ तसा न स्थिति सोडी, यश म्हणे तया 'शोभें'. २६
अग्रजचरणीं प्रेमा जो चळ होवूं न दे चि तो भरत.
'हो' भर 'तस' म्हणे त्या राज्याचा जो असाधु लोभरत. २७
तातक्रिया करि निघे भरत, अमानी[५] असें कळे, सुतरी
सजुनि निषादेश्वर गुह बहुमानद होय, सुरनदी उतरी. २८
मान्य भरद्वाजा ही झाला, तो साधु पूजिला तेणें.
लेणें शील चि, सुज्ञें व्हावें वश या, जसें स्वरा एणें. २९
उटजीं लोकस्वामी जो होता चित्रकूटसुखवासी,
प्रभु घन तयापुढें तो चातकसा भरत भक्त मुख वासी. ३०
आधीं त्रिलोकधृक्प्रभु 'हाय!' म्हणे, दशरथासि दे तोय,
मग अभयपादुका त्या भक्तातें, स्वस्थ लेश तो होय. ३१
परते, वसे सुमेधा[६] नंदिग्रामीं, धरी जटा रीती
प्रभुची च, वन्य[७] सेवी, तद्धृदयीं मातृमति कटारी ती. ३२
हयमेधीं संभवला मेधज हें म्हणुनि पावला नाम,
राम प्रभु तो गिरितें सोडुनि करि पूर्ण अत्रिचा काम. ३३
मुनि धन्य होय, लागे श्रीरामा सत्यसंगरा[८] गाया;

---

१. वसतियुक्त करी (राहे). २. पुत्र जो राम त्याच्या परत येण्याची प्रार्थना. ३. धारण केले आहेत आशीर्वाद ज्यानें असा दशरथ. ४. टाकिली आहे दया ज्यानें असा (राम) ५. अभिमानरहित. ६. बुद्धिमान (भरत). ७. अरण्यसंबंधीं (फळें वगैरे). ८. सत्यप्रतिज्ञा ज्याची त्याला.

अनसूया प्रेमें दे, ज्या वर्णी श्री हि अंगरागा या. ३४
सदयवर सत्यमेधा[1] राम विराधा हि वधुनि, दे सुगती,
प्रभुतें भेटोनि सुखें दंडकवासी तपोनिधी फुगती. ३५
ज्याचें तल्प धराधर[2], शरभंगसुतीक्ष्णघटजतातसखा,
गृध्र हि निववी तो प्रभु वांछी गोदातटीं द्विजारिमखा[3]. ३६
अर्कादिकांवारि करी तो तेजोवृष्टि म्हणुनि ज्यासि कवी
तेजोवृष[4] म्हणती, तो कुमतिदमन अवरजा[5] निजा शिकवी. ३७
शूर्पणखेच्या दंडें तद्भ्राता दुष्टधी खर क्षोभे,
त्या सबळातें वधितां द्युतिधर रघुवीर बहु जयें शोभे. ३८
श्रीराम सर्वशस्त्रभृतांवर[6] विख्यात जो जयें लोकीं,
त्या दशमुख कपटें स्त्री हरि, मग्न करावया महाशोकीं. ३९
गृध्रेंद्र जटायु तया विरथ करी, सून सोडवी जीर्नें[7],
विप्रग्रहमथनीं[8] त्या श्री हि वदलि 'अरिस मोड, वीजीनें*.' ४०
भारी निग्रह करितां गृध्रेश्वरपक्ष रावण च्छेदी,
ने सीतेतें, तेणें बहु होय जटायु न क्षतें खेदी. ४१
लीलानरतनु राम श्रीविरहें व्यग्र होय, याहून
बहुत चि तातप्रियसख गृध्र क्षतविकळ पतित पाहून. ४२
त्याची क्रिया करि, निघे, शोधी प्रभु नैकशृंगनग[9] गहनें,
निववी कबंध शबरी, आपण संतप्त जरि विरहदहनें. ४३
लक्ष्मण शोकगदाग्रजपरिसांत्वनदक्ष[10] गुरुसम स्तवना
झाला पात्र व्यसनीं 'हाय!' म्हणत हुडकितां समस्त वना. ४४
देव चतुर्मूर्ति करी पवनसुतीं रविसुतीं दया भारी,

१. सत्यबुद्धि. २. शेष–पंत. ३. ब्राह्मणशत्रु जे राक्षस त्यांच्या नाशरूप यज्ञास. ४. सर्वदा आदित्यरूपानें तेजाची वृष्टि करणारा (राम.) ५. कनिष्ठा (लक्ष्मणास). ६. श्रेष्ठ. ७. वृद्ध ( जटायु ). ८. विप्रच्छलक रावणाचें मथन करिताना. ९. अनेक शृंगें ज्याला असा पर्वत. १०. शोक हा च आहे रोग ज्याला असा वडील भ्राता राम त्याच्या सांत्वनाविषयीं दक्ष. * [तुला मी] वारा घालीन.

मारी वाळीस पळामाजि चतुर्बाहु तदनुजा तारी. ४५
कपिराज्य चतुर्व्यूह[1] प्रभु दे सुगळा, करी कृपा मोटी.
तो हि श्रीसीतेतें शोधाया पाठवी प्लवगकोटी. ४६
शतयोजन जो मध्यें गोष्पद त्या मारुती करि समुद्रा,
मुद्रा चतुर्गति[2]प्रभुदयितेतें दे, बहु च्छळी क्षुद्रा. ४७
श्रीचूडामणि आणुनि ये, चतुरात्मा[3] प्रभु प्रसाद करी,
देवांशर्क्षकपिबळें घे, शीघ्र निघे, वधावयासि अरी. ४८
राज्य चतुर्भाव[4] प्रभु लंकेचें दे बिभीषणा प्रणता,
सेतु करुनि उतरे, जरि म्हणता, देता चि सिंधुतें कणता. ४९
प्रथम चि सुगळ दशमुखा भंगी, मग कपिबळें परी रोधी,
दूतमुखें साम तया राम चतुर्वेदवित्स्वयें बोधी. ५०
'मारा' म्हणे दशानन अंगद तो वालिपुत्र कवि चार
खळ वधुनि एकपात्प्रभुवर्या कळवी सुरद्विड[5]विचार. ५१
सम्यग्[6]भवचक्राचा आवर्तक म्हणुनि जो सम्यगावर्त,
तो प्रभु म्हणे, 'खळ मरो' नमितां म्हणता चि 'बहुसमा[7] वर्त.' ५२
जरि देव निवृत्तात्मा विषयांपासूनि तरि करी युद्ध,
कपिपति करुनि पुढें यश खळबळ मारूनि मेळवी शुद्ध. ५३
घटकर्ण, सुत तयाचे घनरव, तद्बंधुसचिव, हरि खपवी;
मग दुर्जय प्रभु वधी दशकंठा, धरि अनंत हरिख पवी. ५४
सूर्यादि यदाज्ञेतें न अतिक्रमिती म्हणोनि ज्या वेद
दुरतिक्रम[8] म्हणती, त्या लंघूं जातां न होय कां खेद? ५५

---

१. शरीरपुरुष, छंदःपुरुष, वेदपुरुष आणि महापुरुष असे चार पुरुष ज्यापासून तो विष्णु (राम). २. चार आश्रमांस आधार असा जो राम त्याची स्त्री सीता तिला. ३. मन, बुद्धि, अहंकार आणि चित्त हें चतुष्टय आहे आत्मा ज्याचा असा राम. . धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हें चतुष्टय उत्पन्न होतें ज्यापासून असा राम ५. देवांचा द्वेष्टा रावण त्याचा अविचार. ६. संसारचक्राचा सम्यक् (उत्तम) आवर्तक (आवरणारा). ७. पुष्कळ वर्षें. ८. ज्याच्या आज्ञेचें उल्लंघन करणें कठिण असा.

दुर्लभ जय सुलभ करुनि दिधला, करुणासुधार्णवें हरिला,
हरिला विश्वाधि, वधुनि सर्वामरविप्रपीडका अरिला. ५६
दुर्गम लंकादुर्ग त्रिदशांस कपींस होय तें सुगम,
गंगेचा तेंवि जयश्रीचा प्रभुच्या पदांबुजीं उगम. ५७
दुःखें योगी चित्तीं बसविति म्हणवूनि जो दुरावास
संस्कारवी अरिस तो, हा दुरितांतें म्हणे दुरा वास. ५८
विधिनें दुरारिहा प्रभु लंकेंत पदीं बिभीषणा स्थापी,
या पीते पुण्ययशा बैसविलें उत्तमीं पदीं पापी. ५९
श्रीतें शुभांग राम प्रभु मग करवूनि दिव्य घे अंकीं,
हर्षे देवी तसि, जसि उद्धरितां धेनु कष्टली पंकीं. ६०
स्नेह तसा चि करि पिता, जो प्रथम उडेल तो कसा रंग?
मृतकपिकटक उठविलें, प्रभुचरित्र सुगीत, लोक सारंग. ६१
प्रभु हा सुतंतु सद्गुणमौक्तिकमणिधरबिभीषणा बरवी
दे कीर्ति, सुगळ तद्वळ सत्कृति सांगुनि निजप्रिया करवी. ६२
ऋषिसप्ततंतुवर्धन राम प्रभु पुष्पकीं बसे, सरमा
त्रिजटा कळा, सुपार्श्व हि जो त्याला स्वपदभक्ति दे परमा. ६३
घेउनि सुगळ बिभीषण सबळ विमानें निघे जसा तरणी,
श्रीस कथि इंद्रकर्मा "शत्रु अहोरात्र गणि न सात रणीं. ६४
सति! शत्रु महाकर्मा शतमस्तक खंडितां न कोमेला,
सुतसोदरसचिवांसह सामसुधा म्हणुनियां 'नको' मेला." ६५
कृतकर्मा प्रभु दावी सेतु बिभीषणसमागमस्थान,
मग ऋष्यमूक पंपा, 'येथें केलें' म्हणे 'तुझें ध्यान'. ६६
तारा घे, शबरीतें वर्णी, गोदाकृतागम स्वामी
ये सत्वर प्रयागीं वंद्य भरद्वाजमुनिचिया धामीं. ६७

---

१. इंद्राला. २. लंकावेट. ३. चित्ताच्या ठायीं ज्याचें राहणें मोठ्या कष्टानें होतें असा. ४. उत्तरक्रिया करवी. ५. हें वरी–पंत. अन्वयार्थ? ६. दुष्ट शत्रूंचा नाशकर्ता. ७. हरिण. ८. ऋषींचे यश वाढविणारा.

वंदुनि मुनितें उद्भव[1] देव करी पवनजा, पुढें धाडी,
तो कुशळ गुहा भरता कळवुनि आनंदसागरीं पाडी. ६८
शशिमदनकोटिसुंदर भेटोनि गुहा करी प्रथम धन्य,
शत्रुघ्न भरत निववी माता गुरु सचिव पौर बहु अन्य. ६९
ज्या करुणाकर यास्तव भक्तांहीं नाम ठेविलें सुंदें[2]
कुंदप्रभरद आणी राजा होवुनि सुखें जनीं तुंदें[3]. ७०
तो रत्ननाभ पूजी सबळ बिभीषणसुकंठ जे त्यांतें,
स्तवुनि म्हणे, 'विश्व तुम्हां गावू दुर्जयसुरारिजेत्यांतें.' ७१
ज्यांज्यांकडे सुलोचन करुणामृतसिंधु राम तो पाहे,
राहे त्यांचा न श्रम; नित्य नवें सुख बहु प्रजा लाहे. ७२
अर्क जसा पद्मांतें, कुमुदांतें चंद्र, तात तोकांतें
लोकांतें हर्ष तसा प्रभु दे, स्पर्शों न मोहशोकांतें. ७३
वाजसेन[4] नाम पावे अन्नार्थि जनासि अन्न दे तेणें,
मारुतिस लेववि प्रभु करुनि चिरंजीव भक्तिचें लेणें. ७४
शृंगी[5] होउनि जो श्रुति उद्धारि तो चि प्रजा नृपालपणें,
कोणा हि न स्मरों दे ज्याची अंबाधिका[6] कृपा लँपणें[7]. ७५
सत्य जयंत त्रिजगीं रघुनाथ चि, शक्रतनुज नांवांचा;
सकळाहित मथुनि म्हणे, 'चिर' लीलामनुजतनु जनां 'वांचा'. ७६
तो सर्ववित्[8]प्रभु जयी[9] शत्रुघ्नभरतकरीं वधवि लवणा,
गंधर्वबळा हि, यशें या अमृत विरस न-भासलें कवणा? ७७
दुस्तरभवार्णवातें प्रभुनामसुवर्ण बिंदु करितात,
हरितात शिवमनातें, रक्षी न असा दयालु जरि तात. ७८
'स्तोत्ररामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ७९

इति स्तोत्ररामायणमष्टमं संपूर्ण ।

---

१. जन्मयुक्त २. करुणाकर. ३. पुष्कळ. ४. अन्नदाता. ५. मत्स्यविशेष. ६. मातेहून अधिक ७. शब्दार्थ? ८. सर्वज्ञ. ९. जयनशील.

# नवमस्तोत्ररामायण

श्रीपति सुरमुनिकथित श्रवण करि दशास्यकृतजगत्पीडा,
अक्षोभ्य तरि क्षोभे, होय नर करावया रणक्रीडा. १
दाशरथि सर्ववागीश्वरेश्वर[1] त्रिभुवनावना झाला.
या चरितामृतपानें रसिक ब्रह्मादि सर्व ही धाला. २
दे दशरथा सुख महाह्रद देतो जेंवि तोय यादास,
तात तसा चि सकळ ही अवलोकुनि धन्य होय या दास. ३
संसारमहागर्त प्रभुनें सुखरूप बहु बरा केला.
कौसल्येला शोभा जी आली ती कधीं न राकेला. ४
कौसल्यापुत्र महाभूत[2] प्रभु नाम 'राम' हें पावे,
दोन सुमित्रानंदन लक्ष्मण शत्रुघ्न आदरें गावे. ५
कैकेयीपुत्र भरत शीलमहानिधि सुरूप हे चवघे,
अवघे स्तुत, अमृताची यांच्या चरणावलोकनीं चव घे. ६
क्षितिस अपरिमित सुख दे होवुनियां क्षितिपतींद्रसुत राम,
खळदलनसवसमवनें पावे मुनिदत्त कुमुद[3] हें नाम. ७
कुंदकुसुमशुद्ध सुकृतफळ यश गौतमवधूसि दे वरद.
पावे सुंदर कुंदर[4] हें नाम प्रभु मुकुंद कुंदरद[5]. ८
क्षिति कश्यपासि देतां कुंद[6] असें नाम होय तो स्वामी,
कौशिकसह जनकाच्या सानुज सत्कार पावला धामीं. ९
भक्तजनमयूरांचा पर्जन्य त्रिपुरदहनचापातें
ओढी मोडी, जोडी श्री, हें यश तुरवि विश्वतापातें. १०
तो विश्वपावन प्रभु वरिला प्रेमेंकरूनि सीतेनें,
लक्ष्मण हि उर्मिला जी जनकसुता त्या हि साधुगीतेनें. ११

---

१. सकळ वाणींचे जे ईश्वर त्यांचा स्वामी. २. ज्याचें रूप कालत्रयानें अवच्छिन्न होत नाहीं असा. ३. पृथ्वीला आनंद देणारा. ४. पृथ्वीतें विदारण करणारा. ५. कुंदपुष्पाप्रमाणें दांत ज्याचे. ६. पृथ्वी देणारा.

कौशिकआनिळ प्रेरी जनकघना पंडिता महोदारा.
न म्हणेल भरत शत्रुघ्न हि कां तदनुजसुतेसि[1] 'हो दारा'? १२
[2]अमृताशपीतकीर्ति प्रभु भृगुरामासि दाखवी तेज्या,
झाले पावुनि भस्म चि शूरांचे शूर लाख वीते ज्या. १३
[3]अमृतवपु प्रभु वदला त्या 'हृदयीं शांति' भार्गवा 'राहो,'
न दिसो दे यत्क्रोधें सुटला क्षणमात्र मार्ग वारा हो! १४
सर्वज्ञ गुरु वदे शिव, तरि दशरथ भार्गवासि तो भ्याला.
सुतघातें त्या बहु भय, धननाशें जेंवि फार लोभ्याला. १५
हरि ताप सर्व तो मुख दावुनि, बहु गायिला पुरजनाहीं.
कोणाचें अनलंकृत गृह? कोठें वाजला मुरज नाहीं? १६
दुर्लभ हि सुलभ झाला जय, सुव्रत पुत्र राम या कांतें[4]
युवराज करूं पाहे, करि कैकेयी कुबुद्धि आक्रांत. १७
'भरत चतुर्दशवर्षें युवराज असो, वनीं वसो राम,'
ऐसा करी दुराग्रह, होउनि सिद्ध प्रभु त्यजी धाम. १८
जरि शत्रुंजित्[5] क्षमापति सत्यव्रत परमसंकटीं पडला,
रडला, तरि हि न वळली, शोकें मूर्छित महीतळीं जडला. १९
जरि [6]शत्रुतापन, स्त्रीपासुनि अत्यंत पावला ताप.
परि सत्यधर्मरक्षणकामें रामें हि सोडिला बाप. २०
बसवि सुमंत्र नृपरथीं, भेटे सानुज सदार राम गुहा.
तो साश्रु [7]न्यग्रोधद्रुमपय दे भक्तकामकल्परुहा. २१
सानुज रची जटांतें विरहीं रक्षावया पिता धार्मी,
फिरवी सरथा सूता [8]कांडफळांचा उदुंबर स्वामी. २२
अश्वत्थ यद्विभूति प्रभु तो भेटोनियां भरद्वाजा,

---

१. जनकाच्या बंधूचे मुलीस. २. देवानीं प्राशन केली कीर्ति ज्याची असा. ३. अमृतमय शरीर ज्याचें. ४. कैकेयीकांत दशरथ. ५. [देवांच्या] शत्रूला जिंकणारा. ६. शत्रूस ताप देणारा (दशरथ). ७. वडाच्या झाडाचा चीक. ८. ब्रह्मांडरूप फळांचा.

करि वास चित्रकूटीं; सांगे तो सूत वृत्त हें राज्या. २३
पुत्राच्या[1] आणूनि ध्यानीं रूपा स्मरांतकध्येया[2],
शोकमहाभूध्रभरें[3] तनु शत्रुनिषूदन[4] त्यजी गेया. २४
शोकाग्निसहस्राचिं क्षोभे ग्रासावया पुरा, दूत
प्रेषुनि मातुळपुरगतभरता आणवि महर्षिपुरुहूत[5]. २५
भरत प्रसूसि निंदी, विधिनें दे सप्तजिह्व[6], तातातें
करि नमन, चित्रकूटीं प्रभुसि कथी राजदेहपातातें. २६
वेदादि म्हणति ज्यातें सप्तैधा[7] सप्तवाहन[8] ज्ञाते,
तो जळ पिंड पित्या दे. जे मुक्त प्राशिती यशा या ते. २७
जो प्रभु अमूर्ति, झाला तो सगुण मनुष्यधर्म साधूनीं,
जीव यशें ताराया पावाया पुण्यशर्म साधूनीं. २८
अपकीर्तित्रस्त अनघ भरत तया दे स्वपादुका नातें
रक्षाया, ताताच्या शून्यत्व न यावया दुकाना[9]तें. २९
दत्ताभय भरत फिरे, नंदिग्रामीं वसे, त्यजी विषया,
होय अचिंत्यप्रभुच्या विरहीं तापस, फळांबु ही विष या. ३०
भयकृत्पलाशघाता अत्रिस वंदूनि, दंडकीं शिरला,
वधुनि विराधा झाला मुनिभयनाशन, तपोवनीं फिरला. ३१
ऋषिभयगिरिस अणु करी, दे कुंभजमुनिवरासि सुख गाया,
भेटे जटायुसि, मिळे यश, गरुडास हि न तें हि सुखगा या. ३२
गोदातीरीं सानुज राम बृहत्कीर्तिजानकीयुक्त
राहे, भोगूं पाहे शूर्पणखा त्यासि, गाति ज्या मुक्त. ३३
कृशमध्य स्थूलस्तननितंब पृथुनयन कनकवर्ण, असी
कपटें होय, हरि तिची नासा लक्ष्मणकरांबुजस्थ असी. ३४

---

१. सुखमुखोच्चारणार्थोयं यकारः—पंत. २. महादेवानें ध्यान करण्यास योग्य अशा. ३. शोकरूप पर्वताच्या भारानें. ४. शत्रुनाशक. ५. महर्षींद्र वसिष्ठ. ६. अग्नि. ७. सात आहेत दीप्ति ज्याला तो. ८. सप्तनामक अश्व आहे वाहन ज्याचें तो. ९. राज्यकारभारला.

कुपित जनस्थानाहुनि सखर खचर मनुसहस्त्र जे आले,
गुणभृत्कोदंडधरप्रभुतेजें व्यसु रणांत ते झाले. ३५
निर्गुण रावण पाहे भगिनीतें, ती न दुर्दशा साहे,
मारीचातें वाहे स्वरथीं, सीता हरावया बाहे. ३६
व्हाया महान् कुळक्षय त्यास बळें हेमहारिणता धरवी,
करवी करुनि विलोकन पतिस[1] म्हणे श्री हि, 'जाति हे बरवी. ३७
कोणीं ही अद्भुत कसा कनकहरिण राहिला असा रानीं?
यातें धरा चि, एकें जें प्रिय, बहुनीं न तें असारानीं.' ३८
'मुदित कराया सर्व स्वधृतधनुर्बाण राम हारिणा मीं
धरितों' म्हणे, निघे, श्री तापे मृगलोभ धरुनि परिणामीं. ३९
स्वास्य[2] प्रभु दूर वनीं जाय, शरें त्या निशाचरा ताडी;
'हा सीते! हा लक्ष्मण!' म्हणुनि श्रीचित्त तो भ्रमीं पाडी. ४०
दशमुखवध करुनि यशें प्राग्वंशज[3] भूप गौरवायास
प्रभुवर उपक्रम करी, चुकवाया जीवरौरवायास[4]. ४१
रघुवंशवर्धनप्रियबंधुसि राक्षसकृतार्तरवभीता
'स्वाम्यवना धांव' म्हणे सुरमुनिकार्यार्थ ईश्वरी सीता. ४२
तो 'हें मृगकपट' म्हणे तद्रक्षणभारभृत्[5], खरें तारि ती
त्या गांजुनि साश्रु निघुनि जाय बळें जाहली असें कारिती. ४३
परमात्मा एक असा जो श्रुतिकथित प्रभूत्तम तयाची
दयिता हरिलि दशमुखें, प्रभुला यद्वध हारि भ्रमत[6] याची. ४४
गृध्र जटायु मुहूर्त प्रभुदयिता सोडवी, खला मोडी,
त्या 'धन्य!' म्हणति योगी, तों झटला, पक्ष शत्रु जों तोडी. ४५
पाडुनि गृध्रा, सीता नेउनि लंकेंत दुष्ट तो रोधी,
योगीशध्येय प्रभु बहुत करि विलाप, काननीं शोधी. ४६

---

१. मूळ पाठ—मा पतिला 'जाति हे' म्हणे 'बरवी'. २. सुंदर मुख ज्याचें तो (राम). ३. पूर्वज. ४. जीवाना रौरवनरकसंबंधीं पीडा. ५. सीतेचें संरक्षण करण्याचा भार घेतला ज्यानें तो. ६. त्रस्त.

गृध्रासि सर्वकामद परमेश्वर सुगति दे, वरी सुतता,
करुनि क्रिया तयाची, सत्कीर्ति त्रिभुवनीं करी सुतता[१]. ४७
उद्धरुनि कबंधातें, आश्रम बहु धन्य करि मतंगाचा,
शबरीस बरी गति दे प्रभुवर, जो दीप परपतंगाचा. ४८
पंपातीरीं बैसे, करि फार विलाप, जडजनश्रमण[२]
श्रमण प्रियार्थ आदरि, परि न घडे विरहविपदतिक्रमण. ४९
दयिताविरहीं होय श्रीराम क्षाम[३], या न संपादे
फळजळसेवन भाषण, रम्या हि तशांत ताप पंपा दे. ५०
श्रीराम म्हणे, 'असतों सुपर्ण[४] कीं वायुवाहन रहातों
पळ हि न, चकोर चंद्रा मी तेंवि प्रियतमामुख पहातों.' ५१
लक्ष्मण म्हणे, 'धनुर्धर तूं आर्या! जाणसी धनुर्वेद,
खेद करिसि कां? देवी आणसिल करूनि असदुरोभेद[५].' ५२
आर्धी मारुति भेटे, तरणितनुज सुगळ कपि सखा झाला.
मग दंड करी वाळी शक्रात्मज कीशराज जो त्याला. ५३
दे कपिराज्य दमयिता दुष्टांचा सोदरापरि सखा तो,
वानर शोधा धाडी, प्रभुसि म्हणे, 'मद तुझ्या आरिस खातो.' ५४
मारुति मूर्त दम[६] गमे, जिंकुनि सुरसेसि, सिंहिका मथुनीं,
जलधि विलंघी, श्रीतें मुद्रा दे, हर्षवी कुशळ कथुनीं. ५५
तरु मोडी, रावणसुत अक्ष कटक वधुनि सांपडे अरितें.
हित कथि अपराजित तो, दावी त्रिपुरीं महेश [७]जें कारि तें. ५६
सर्वसह मरुत्सुत ये, चूडामणि दे, नमी, कुशळ कळवी,
पळ वीतभान विभुतें करि, सुखवुनि तन्मनोव्यथा पळवी. ५७
देवांशर्क्षकपिबळें घेउनि सानुज सुकंठ जळधीतें
तो जगदेकनियंता पावे भिववावयासि खळधीतें. ५८

---

१. फार विस्तार पावलेली. २. जडजीवांला श्रम देणारें. ३. कृश. ४. गरुड. ५. दुष्टांचा हृदयभंग. ६. साक्षात् इंद्रियदमन. ७. दहन.

[1]अनियमअयमनियमयम जो तो नमितां बिभीषणा आधीं
दे लंकाराज्य, म्हणे, 'बा! तूं मद्बंधु, कार्य हें साधीं.' ५९
मग सत्ववान् प्रभु करी त्रस्त समुद्रासि, विनवितां यातें
दे अभय, सेतु करवी, विभु देतां[2] शक्ति हि नवि तोयातें. ६०
सेतुपथें पारातें पावे, प्रथम चि खळा मथी सुगळ,
दूतमुखें सात्विक विभु हित सांगे, 'न गिळ हिरकणी, उगळ.' ६१
दूता मारूं पाहे खळ, केवळ पशु चि, मान सामातें
देना, तैं सत्यप्रभु वदला, 'रे अशुचिमानसा! मातें[3].' ६२
सैन्यासि सत्यधर्मपरायण तो देवदेव युद्धाज्ञा
दे कीं, समुचित दंड; क्रुद्धाशां[4] दंड, अभय शुद्धा ज्ञां[5]. ६३
पूर्ण अभिप्राय करी सुरपतिचा, करुनि शत्रुबळकदन,
मद न उरवि, आर्द्र रणीं दशवदनाचें न एक ही वदन. ६४
सर्वप्रियार्ह[6] भगवान् घनरवकृतकपटनागपाशातें
उडवी, पूर्ण कराया शक्रातें, जेंवि नागपा[7] शातें[8]. ६५
अर्ह स्तुतिसि घटश्रुति होय, प्रभुसीं करूनियां समर,
समरय[9] काळासीं हा, वदले अमर स्तवूनि यास 'मर'. ६६
उठवुनि सबळा ओषध्यगशिखरें शल्यपीडिता देवा
झाला विश्वप्रियकृत् पवनात्मज करुनि आदरें सेवा. ६७
लक्ष्मण वधुनि घनरवा होय बहु प्रीतिवर्धन स्वर्गा,
स्वर्गायक या गाती प्रेमें अंधकवधीं जसे भर्गा. ६८
शक्रादि विहायसगति[10] विभु मुदित करी वधूनि दशतुंडा,
पुंडा त्या कवि वदले, 'शलभ चि तूं रामबाणशिखिकुंडा.' ६९

---

१. स्वैराना मर्यादिणारा व अशांताना शांतविणारा. २. पाण्याला नवी शक्ति देणारा. ३. मत्तस्य तवैव नाशो भविष्यति–पंत. ४. रागावलेल्या अशास. ५. शात्यास. ६. सर्वांस प्रिय आणि योग्य असा (राम). ७. गजेन्द्रास. ८. सुखानें. ९. शक्तीनें बरोबरीचा. १०. आकाशांत गति ज्यांची असे. (विहायस=आकाश).

सर्व ज्योति सुरुचि धरि, हिम मंद सुगंध सुख पवन वाहे,
करुनि कुसुमवृष्टि म्हणति कवि, 'देती चरण मह न बरवा हे?'[1] ७०
हुतभुक्प्रमुख सुर स्तुति करिति, भरिति सर्वकर्णनभ वाद्यें;
केलें कविमुनिवृंदें रामप्रभुबाहुवर्णन भवाद्यें[2]. ७१
रघुपति दशाननाची सांत्वूनि बिभीषणा क्रिया करवी,
क्षीराधि विधुसि, विभु यशा दिव्योत्तर[3] धरुनियां प्रियाकर वी. ७२
रविसा बसुनि विमानीं दशरथ ये, प्रथम बहु जसें होतें
प्रेम तसें चि, प्रभुबहुमत जें होइल उणें कसें हो! तें? ७३
त्यातें नमी विरोचन[4]कुळभूषण देव, तात शिर त्याचें
हुंगी, दृढ आलिंगुनि वपु निववी भुजयुगांत शिरत्याचें. ७४
रणमृत ऋक्षकपिबळ त्रिदशेंद्रें जिवविलें अमृतवर्षें,
पूजी बिभीषण तया सूर्यसुतासह सुभूषणें हर्षें. ७५
पुष्पकविमानरलें प्रभु गमला लंघितां नभा सविता,
बहु कुळगुरुप्रियार्थं चि भासवि रुचि, अन्यथा न भासविता. ७६
रविलोचन सुखद प्रभु सबळ बिभीषणसुकंठसह तूर्ण
भेटोनि भरद्वाजा, गुहभरतमनोरथा करी पूर्ण. ७७
होय अनंतसुखप्रद दर्शन, हर्ष न जगांत तो मावे,
राजा झाला प्रभु कीं, निजविरहें जन पुन्हां न कोमावे[5]. ७८
पूजी सबळा सुगळा लंकेशा बहुत अंजनाभूतें[6];
हुतभुक् सुर मुनि तर्पी, प्रभु निववी करुनि रंजना भूतें. ७९
'भर्ता भोक्ता सुखद प्रभु नैकजनाघपापतापहर,'[7]
भरताचा अग्रज यापरि कविनीं वर्णिला वसुप्रहर[8]. ८०
'नित्य अनिर्विण्णमना[9] सत्पाळक सत्य हा सदामर्षी[10]

---

१. देतां, असा निश्चय. २. महादेवप्रमुखानीं. ३. सीता अग्निप्रवेश करून आल्यावर. ४. सूर्य. ५. कामेजावे, म्लान व्हावे. ६. मारुतीला. ७. या सामासिक शब्दांत 'अघ' व 'पाप' असे एकार्थी शब्द आहेत. ८. अष्टौ प्रहर, नेहमीं, सदैव. ९. प्रसन्न, खेदरहित. १०. निरंतर क्षमा करणारा.

लोकाधिष्ठान परम अद्भुत ' म्हणती असें [1]सुधामर्षी. ८१

किति बुध '[2]सनात् [3]सनातनतम कापिल,' असें रघूद्वहा म्हणती,

कपि ' पापांचा अव्यय ' यापरि संस्तविति, कारिति या प्रणती. ८२

'स्तोत्ररामायण ' प्रेमें मयूरें रामनंदनें

श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवदनें. ८३

इति श्रीस्तोत्ररामायणं नवमं संपूर्णं ।

---

# दशमस्तोत्ररामायण

[4]स्वस्तिद् लक्ष्मीभर्ता दशरथसुत होय ' राम ' या नावें,

तदनुजनि भरत लक्ष्मण शत्रुघ्न, तयां तसें चि मानावें. १

अवतरला रविवंशीं देवनुत स्वस्तिकृत् प्रभूत्तम हा,

प्रथम चि सव संरक्षुनि विश्वामित्रासि दे प्रभूत महा. २

ज्या स्वस्ति म्हणति कवि तो गौतममुनिची समुद्धरी भार्या,

आर्यानंदकरप्रभुचरणरजें होय विश्वसत्कार्या. ३

तो [5]स्वस्तिभुक् प्रभुवर प्रेक्षुनि धन्या करी पुरी मिथिला,

तिथिला त्या पुण्य म्हणवि, पाडी स्वप्रेक्षकाक्रिया शिथिला. ४

विसरे समाधि जनक हि पाहुनियां [6]स्वस्तिदाक्षिणप्रभुला,

तो याज्ञ[7]वल्क्य हि भुले 'नामारूपासि ' जो म्हणे ' न भुला '. ५

रुद्रधनु अरौद्र[8] प्रभु मोडी, पणपूर्तिच्या चि अवसानीं

वरिती झाली सीता श्री श्रीरामा अनेक नवसानीं. ६

जनकें केला मुकुटी केयूरी रत्नकुंडली हारी

कटकी निष्की, प्रेमें ध्यातां जो सर्व पाप संहारी. ७

---

१. देव. २. सर्वकाळ राहिलेला. ३. सर्वदा राहणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ. ४. मंगलदायक. ५. मंगलोपभोगी. ६. मंगल करण्यांत कुशल अशा. ७. ब्रह्मज्ञानी जनकाचा उपाध्याय. ८. सौम्य.

चक्री प्रभु जामाता जैसा केला तसा चि तो भरत
लक्ष्मण ही शत्रुघ्न हि जनकें, कीं हा सुकीर्तिलोभरत. ८
जो विक्रमी दहन करि मधुकैटभशुष्कदर्भ, तो कांत
श्रीचा त्या ही जिंकी, ज्या घडलें क्षत्र[1]गर्भतोकांत. ९
ऊर्जित[2]शासन रामप्रभु रामा होय धर्मशांतिद, या
प्रभुची तो बहु वर्णी निर्दोषा शक्ति कीर्ति कांति दया. १०
शब्दातिग[3] महिमा तो प्रभुचा दशरथवसिष्ठमन मोही,
इंगिति शिरीं, म्हणों दे माया प्रभुची मनीं हि न 'नमो' ही. ११
स्तुतिशब्दसहस्रार्चित दशरथ वेवूनि ये पुरा तनया,
साकेत हर्ष पावे, प्रभुसम पति नावडे पुरातन या. १२
जरि शिशिर शर्वरीकर[4] तापहर हि, रामभद्रसम नाहीं;
प्रभुयश जें पौरांच्या स्तविला बहु हा चि सद्रस मनाहीं. १३
अक्रूर सदा पेशल[5] दक्ष हि दक्षिण[6] हि पौरमत राम;
क्षमिणांवर[7] करितां युवराज सभरत प्रभू पुरवि काम. १४
विद्वत्तम सत्यव्रत दशरथ तद्धर्मसमवनासि, कवी
बंदी करी, निघे प्रभु सेवाया वन्य, समवना सिकवी. १५
राम सदार सलक्ष्मण दशमुखपीडित अमर्त्य तापस जे
ते वीतभय कराया न हरुनि तातादिपौरताप सजे. १६
फिरवि रथ, तरे गंगा, नमुनि भरद्वाज, तीर्थशतधामीं
करि वसति चित्रकूटीं तो पुण्यश्रवणकीर्तन स्वामी. १७
उत्तारण[9]सुतविरहें दशरथ नृप शोकसागरांत बुडे,
मग मातुळसदनागत भरत हि गतशोष पौरधैर्य उडे. १८
मातेची दुष्कृति 'हा!' म्हणवी भरतासि, करवि कुत्सा ही.

---

१. क्षत्रियांच्या गर्भस्थ बालकांचा नाश. २. तेजस्वी आहे आज्ञावचन ज्याचें असा. ३. शब्दाला अगम्य. ४. चंद्र. ५. सुंदर. ६. मागें ५ वी गीति पहा. ७. सहनशीलांत श्रेष्ठ. ८. ही आर्या मूळांत बरी च हरताळलीं असल्यामुळें दुर्वाच्य झाली आहे. ९. संसारसागरांतून उतरून नेणाऱ्या अशा पुत्राच्या वियोगानें.

तातक्रिया कारि, निघे फिरवाया प्रभुसि साधु उत्साही. १९
पुण्ययशा भरत गुहा कळवि भरद्वाजमुनिस ही शुचिता,
देती मार्ग प्रेमें त्या शुद्धा करुनि सत्क्रिया उचिता. २०
दुःस्वप्ननाशन प्रभु भरतें पावोनि चित्रकूटनगा,
नमिला, पितृवृत्तें, 'हा!' वदला, यद्यश करी विशोक जगा. २१
'मनुवर्षे क्रमुनि वनीं येतों' रघुवीर हा असें भावा
सांत्वूनि पादुका दे, फिरवी, निववी दयारसें भावा[1]. २२
रक्षण करी प्रजांचें नंदिग्रामीं वसोनि तो धर्में,
चर्में वल्कें वे, फळ भक्षी, धारि जीव पादुकाशर्में. २३
अत्रिस नमी, विराधा मारुनि, विभु सर्व संत निववि वैरी[2]
नमुनि तदाशी, प्रेमें ज्याचे सद्गुण सदैव शिव विवरी[3]. २४
तो विश्वाचा जीवन शरभंग सुतीक्ष्ण घटजबंधु असे
बहु तापस धन्य करी, भक्षुनि फळमूळ तदुटजांत वसे. २५
विश्वव्यापक यास्तव ज्या म्हणती पर्यवस्थित[4] ज्ञानी,
त्या वैष्णवशस्त्रें दे घटज, कराया सुरारिची हानी. २६
भेटे अनंतरूप प्रभु गृध्रा पितृसखा, हरी तापा,
त्या पावनकीर्ति म्हणे, 'रक्षीं सीतेसि या वनीं बापा!' २७
तो सांगे, 'पंचवटी रम्या गोदावरीतटीं आहे.'
तींत, अनंतश्री प्रभु तदनुमतें पर्णगृह करी, राहे. २८
जितमन्यु[5] प्रभु करवी शूर्पणखाघ्राणकर्णकर्तन हो!
तें लक्ष्मणकर्म म्हणे, 'सुरराजसभेंत गान नर्तन हो.' २९
खपवी भयापह[6] प्रभु खरदूषणसहित मनुसहस्रबळ.
कनकमृगकपट कारि, हरि वधुनि जटायुसि महीसुतेसि खळ. ३०
चतुरस्र[7] प्रभु लीलानररूप स्त्रैणसा वदे 'हंत!'

---

१. अंतःकरणा–पैंत. २. घेई. ३. विस्तृत करी. ४. व्यापून राहिलेला. ५. जिंकिला आहे कोप ज्यानें असा. ६. भयाचा पाश करणारा. ७. सर्वविषयप्रवीण, चतुर.

संतप्त होय शोकें, गृध्रा दे पिंड, कथिति हें संत. ३१
तारी कबंध शबरी, ज्याचें कुतुकें चि मोह नाम हरी;
परम गभीरात्मा तरि करि नानापरि विलाप राम हरी. ३२
विविध फळ विशेषें दे अधिकारि जना, म्हणोनि ज्यासि कवी
विदिश[1] म्हणति, तो मारुति हृदयक्षेत्रीं महत्सुखा पिकवी. ३३
शक्रादिकांसि विविधा आज्ञा करितो म्हणोनि ज्या वदतो
व्यास व्यादिश[2], रविज्या सुगळा दे वधुनि हरिसुता[3] पद तो. ३४
श्रुतिरूपें कर्मांचें फळ दे, दिश हें म्हणोनि ज्या नाम,
राम प्रभु तो होउनि मित्र पुरवि भानुसूनुचा[4] काम. ३५
विरहीखिन्नअनादिप्रभुदयितेतें भजोनि तो धाया
यन्माता भू, तीतें धाडी सैन्यें सुकंठ शोधाया. ३६
लंकेंत भुवोलक्ष्मी[5] प्रभुदयिता कथि जटायुचा बंधु,
मारुतिनें शतयोजन मकरालय लंघिला जसा अंधु[6]. ३७
मैनाकाचळ सुरसा ठकवूनि सुवीर सिंहिका दुष्टा
मारी, प्रभुची मुद्रा देउनि करि जनकनंदिनी तुष्टा. ३८
सबळा अक्षा मारी, कुंठित करि दशमुखा, पुरी जाळी,
रुचिरांगद[7] प्रभु निवे ऐसें करि मारुती विजयशाळी. ३९
विधिजनन जयापासुनि तो जनजन्मादि[8] देव मारुतिचें
यश करि, भेटुनि कीं दे प्रेम शिरोमणिमिषें सुचारु तिचें. ४०
सानुज ससुकंठ निघे प्रभु खलदलना, रवें गगन भरिती
ते भीम ऋक्ष वानर भीमपराक्रम, करीं नग चि धरिती. ४१
अपमानिला दशाननगुरुनें[9] सागरतटीं शरण आला,
त्याला आधारनिलय लक्ष्मीचा राज्य अर्पिता झाला. ४२
जलनिधि काय? प्रभुच्या जग रचिता न उत्तरे कसा धाता.

---

१. विविधफलदाता. २. देवांस आज्ञा करणारा. ३. वालीस. ४. सुग्रीवाचा. ५. पृथ्वीमध्यें लक्ष्मीसारखी. ६. विहीर. ७. सुंदर बाहुभूषणें ज्याचीं. ८. प्राण्यांच्या उत्पत्तीचें आदिकारण. ९. वडील बंधु रावण यानें.

जरि शोषिता करविता सेतु न तारि हर यशें कसा धाता[1]? ४३
उतरुनि पारीं करिती भक्षुनि बहु सुफळ पुष्पहास[2] हरी.
प्रथम चि दशवदनाचा मदगद सुग्रीव रामदास हरी. ४४
विश्वावनीं प्रजागर[3] अतिकरुण महाविभूतिचा भर्ता
सामार्थ अंगदातें प्रेषी सद्धर्मनीतिचा कर्ता. ४५
तें ऊर्ध्वग[4] प्रभुवचन न करी वरमत्त पंक्तिकंधर तो,
राम म्हणे, 'खळ मारा, राज्यश्रीसीं न संपदंध रतो.' ४६
'साम करावें' म्हणतां झाली जी ती कथी कथा चार,
त्या दुष्टाचारातें भंगी श्रीराम सत्पथाचार. ४७
साधुप्राणद राम प्रभु दुष्टांचे रणीं हरी प्राण,
बाण प्रभुचा पवि गुरु काय करिल त्यापुढें तनुत्राण? ४८
जो प्रणववाच्य[5] यातें घनरव कारि नागपाशबद्ध रणीं,
दुर्लभ यश ये गरुडा प्रभुनरलीलेकरूनि तद्धरणीं[6]. ४९
जनकाचा पण पुरवीं, हरधनु भंगी, तयापुढें काय
किति दृढ घटकर्णाचा? म्हणेल गिरि, 'अशनि तें कुंढें[7] काय?' ५०
वधितां घटकर्ण, गमे सर्व बिभीषणवच प्रमाण तरी
न करी साम, अमला पापें शापें मदें गतायु अरी. ५१
होय ससैन्यप्रभुचा घननाद प्राणनिर्लय[8] भासविता
प्रभु मारुतिसदुपायें धारि, जैसा राहुमुक्त भा सविता. ५२
स्तवुनि सुर सकळ वदले त्या विश्वप्राणभृत्पवनतनया[9]
ओषध्यगशिखरधरा, झाले मुनि कोण हो! अवनत न या?' ५३
दे प्राणजीवन प्रभु यश मारुतितें, अनंत भय अरितें,
कपिचक्रें खळ खपवी, जो धरि जोडावयासि जय अरि[10] तें. ५४

---

१. तृप्त होता. २. फुलाप्रमाणें शुभ्र हास्य. ३. जागृत. ४. श्रेष्ठ. ५. ओंकार-शब्दवाच्य (ओंकारस्वरूप). ६. त्या नागपाशाच्या हरणसमयीं. ७. वांकडें; वाईट. ८. प्राणान्त झाला असें दाखविणारा. ९. विश्वाचे प्राण राखणाऱ्या वायु-पुत्रास. १०. सुदर्शनचक्र.

तत्वज्ञ जसा मोहा, रामानुज घनरवा तसा रगडी,
अनूकूळ प्रभुला हा, दहनाला जेंवि वात सारे[1] गडी. ५५
बहु तत्ववित् सुरर्षि व्याकुळ झाले दशास्यशक्तीनें,
लक्ष्मण मूर्च्छित पडतां, मारुति उठवी तयासि भक्तीनें. ५६
एकात्मा प्रभु हर्षे, शक्ररथीं बसुनि तुमुळ युद्ध करी,
सप्तअहोरात्र झटे, ब्राह्में व्यसु होय तो दशास्य अरी. ५७
जो देव जन्ममृत्युजरातिग[2] आपण असे चि दास करी,
तो पूजिला सुरानीं पुष्पस्तुतिवृष्टि करुनि राम हरी. ५८
करुणाब्धि भूर्भुवस्वःस्तरु[3] राम दशाननक्रिया करवी,
तारें[4] प्रभुवर विधिनें राज्यपदस्थिति बिभीषणा वरवी. ५९
धन्य करी दास पिता विश्वाचा प्रणतपद्मवनसविता,
भारि पापशोकपर्वतभेदीं प्रभुचा प्रताप हा पविता. ६०
प्रपितामह राम प्रभु दिव्य करवुनि क्षमासुतेसि वरी,
प्रभुच्या प्रियार्थ उठवी रणमृत कपि अमृतवृष्टि करुनि हरी. ६१
होतां समाप्त राक्षसयज्ञ प्रभुला महेंद्रसख जनक[5]
भेटे, वंदी सगुणब्रह्म तया, स्तविति सहर विधिसनक. ६२
सबळा सुगळा पूजी भक्त बिभीषण, तयासि यज्ञपती
घे, पुष्पकीं बसे, ये स्वपुरा द्रुत, कीं बहु प्रजा जपती. ६३
मुदित करि भरद्वाजा, त्या हि गुहा, सानुजा नता भरता,
राजा होवुनि यज्वा होय प्रभु, दाखवी जगीं नरता. ६४
यज्ञांग यज्ञवाहन जो भगवान् यज्ञभृत् सदा मुक्त
तो होय यज्ञकृत् सुरभूसुरकविकोटितर्पणीं युक्त. ६५
यज्ञी संतत दीक्षित झाला तो यज्ञभुक् प्रभु प्रेमें,
जो मुख्य यज्ञसाधन वांटी यज्ञांतकृत् समणिहेमें. ६६
जरि यज्ञगुह्य आपण सर्वात्मा देव अन्न अन्नाद[6]

१. खरा, योग्य. २. अतिग=अतीत. ३. कल्पवृक्ष. ४. श्रेष्ठ. ५. पिता दशरथ. ६. अन्न खाणारा.

जनसंग्रहार्थ ऐसें करि, विस्तारी स्वकीर्तिसन्नाद. ६७
दे आत्मयोनि भगवान् रंजवुनि यशें प्रजांसि सुख भारी;
श्रीरामाचा महिमा झाला [1]कामादिशत्रुमुखभारी. ६८
[2]पूजी बिभीषणातें बहु सुगळातें प्रभु स्वयंजात,
पवनसुतीं श्रीराम प्रेम करी बहु सुतीं जसें तात. ६९
क्षितितें खणुनि विशेषें दैत्य हिरण्याक्ष जो तया मारी
किटिरूपें, यास्तव हा वैखान प्रभु, यशें जगा तारी. ७०
हा सामगायन प्रभु लोकार्थ महाविभूतिस त्यागी,
लवणादि दुष्ट मारुनि करिता झाला जगांत सखा गी. ७१
हा [3]पृश्नि दे[4]वहूती कौसल्या देवकी सती ज्या या
नंदन होवुनि सुखवी, प्रभु चरित करी तरावया गाया. ७२
हा स्रष्टा विश्वाचा, हा पालक बहु दयार्द्र, हा हर्ता,
'वर्ता' म्हणे 'तराया जैसा मीं वर्ततों रमाभर्ता.' ७३
राम क्षितीश जिववी मृतमुनिसुतजन असा, रमे यम न,
राष्ट्राकडे विलोकी, प्रभु तापों दे न [5]सारमेयमन. ७४
तो पापनाशन प्रभु चवघांचे आठ सुत करी राजे;
जपती धर्मन्याया राष्ट्रा बहुत, न निजा शरीरा, जे. ७५
सुख [6]शंखभृत् प्रभूत्तम दे रुद्रसहस्रवत्सर प्राज्य.
राज्य प्रेमें करि तो सुचिर वसिष्ठर्षिचा असे [7]याज्य. ७६
वाल्मीकिकृतिस्वकथा केवळ कल्याणराशि कुशलवती
सप्रेम नं[8]दकी प्रभु ऐके, गाती सुपुत्र कुशलव, ती. ७७
चक्री प्रभु 'दिव्य करीं' श्रीस म्हणे; मान्य करुनि पुनरपी ती
शिरली महींत देवी, हें यश होवूनि साश्रु सुनर पिती. ७८

---

१. कामादिकरून सहा शत्रूंच्या मुखांच्या शोभेचा वैरी. २. खंड ७, पृष्ठ ३४५, टीप २ पहा. ३. सुतपाप्रजापतीची स्त्री. ४. कर्दमऋषीची स्त्री व कपिलाची माता. ५. कुत्र्याचें मन. ६. पांचजन्य शंखधारी ७. यजमान. ८. नंदकनामक खड्ग धरणारा.

तो देव शार्ङ्गधन्वा प्रभुवर निजसत्यसंधतात्राणा,
आज्ञालंघन घडतां, त्यागी अनुजा बहिश्चरप्राणा. ७९
मग देव गदाधर घे शत्रुघ्नभरतसुकंठसह सैन्य
सर्व प्रजा, विमानीं बसवी, त्यांचें न पाहवे दैन्य. ८०
शरयूस्नानें देऊनि सर्वांतें दिव्यरूप वरलोकीं
वत्सळ [1]रथांगपाणि स्थापी, स्वाश्रित बुडों न दे शोकीं. ८१
अक्षोभ्य प्रभु राम प्रकटी अत्यद्भुता चरित्रास,
जें सर्वां गात्यांचा श्रोत्यांचा सर्व ही हरि त्रास. ८२
वदला प्रणतां सर्वां, 'संरक्षीन चि बुधाबुध स्वा मीं.'
भक्तमयूरदयाघन हा [2]सर्वप्रहरणायुध स्वामी. ८३
'स्तोत्ररामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ८४

इति दशमं स्तोत्ररामायणं समाप्तं ।

---

# पूतरामायण*

(शार्दूलविक्रीडित)

... ... ... ... रविला पुत्रा ! तुवां हा पण,
क्षोणीतें परिपाळ, बाळक तशा पाहें प्रजा आपण.' १३९
बोले शक्र, 'बहु प्रसन्न तुज मीं झालों, नरा मारणीं
कैची शक्ति परा ? शकें दशमुखा पाहों न रामा ! रणीं.
देतों, माग वर.' प्रभूत्तम म्हणे, 'जे संगरीं मारिले
व्हावे सासु शतक्रतो ! सकळ ते त्वां पाहिजे तारिले.' १४०
देवांचा पति तत्क्षणीं च उठवी सेना, सुधा वर्षला;
तो सुप्तोत्थितसा महा कपिगण श्री पाहतां हर्षला.

---

१. चक्र आहे हातामध्यें ज्याच्या तो. २. सर्व च आहेत प्रहार करण्याचीं आयुधें ज्याचीं तो. * खंड ७, पृष्ठ ३४५, टीप २ पहा.

अर्पोया विनवी बिभीषण, म्हणे त्या राम, 'भूजा करीं
देतां पूजित मीं; सुकंठ कटकें यांची च पूजा करीं. १४१
शत्रुघ्नाभरताविना विकळ मीं, चित्ता न कांहीं रुचे,
जाणें दूर, उपाय शीघ्र समयीं जाया न या बा! सुचे.'
जोडी हस्त, म्हणे बिभीषण, 'विभो! बोलें न 'हा!' हें मुखें.
आहे पुष्पक सद्विमान, नगरा एकें दिनें जा सुखें.' १४२
सुग्रीवा सकळा बळा मुदित तो लंकेश पूजी वनें
द्यावीं जेंवि घनें, धनें बहु तसीं दे; भूमिभूजीवनें[1]
तें औदार्य चि वर्णिलें बहु बहु प्रेमें; असेना च ती
कोठें रीति, शिखी न वृष्टि समयीं कीशांअसे नाचती. १४३
श्रीरामें त्रिजटा सुपार्श्व सरमा तत्कन्यका जी कळा,
त्यां सर्वांसि दिली स्वभक्ति, नुरवी जी लेश ही धीमळा.
लंकेशार्पितपुष्पकीं सकळ ते घेवूनि नाकर्षितें
गाया तें यश लाविलें कविमना हें फार आकर्षितें. १४४
जाणे स्वामिमनोरथ द्रुत नभोमार्गीं निघे यान तें,
भास्वान्[2]मानुनियां किति द्विजशतें झालीं तदा या नतें?
दावी श्रीस रणांगण प्रभु, कथा सांगे, मना रंजवी,
ज्याचें विश्वकरा हि नाभिज चतुर्वक्त्रा महाकंज[3] वी. १४५
सांगे सेतुकथा, बिभीषणकथा, कीशेश्वराची कथा,
सौरि[4]प्राप्तिकथा, मरुत्सुतकथा, पंपातटींची व्यथा[5].
तारा वाहुनि पुष्पकांत, शबरी जी तारिली तत्पथा
वर्णी, राम कबंधसद्गुण कथी, लोकीं करी तत्प्रथा. १४६
गोदापंचवटी विलोकवि, कथी गृध्रेश्वराची कथा,
'जो सीते! तुज सोडवी सदरिच्या मोडून शस्त्रा रथा,
सोडी प्राण रणीं पितृप्रियसख प्रख्यात अस्मत्प्रिया

---

१. रामचंद्रानें. २. भास्वान्=सूर्य. ३. कमल. ४. सौरि=सूर्यपुत्र सुग्रीव. ५. त्यांची प्रसिद्धि.

केली त्यां गुरुची तसी च सुतटीं गोदावरीच्या क्रिया. १४७
सीते ! आश्रम हा अगस्त्यमुनिचा, हा अत्रिचा शोभतो;
वंदावा सति ! चित्रकूटनग हा, या सर्व ही लोभतो;
श्रीगंगा यमुना प्रयाग निरखीं, साकेत तें पाहिलें
कांते ! वंदुनि पाहिजे मज भरद्वाजाश्रमीं राहिलें ' १४८
स्वामीच्छा समजे, विमान उतरे क्षिप्र, प्रयागीं शमि-
श्रेष्ठा राम सदार सानुज भरद्वाजा द्विजेंद्रा नमी.
ते ही वानरराक्षसेंद्र नमिती, राहे, तदाज्ञा करी;
प्रेषी त्या भरताकडे प्रभु कृती वातात्मजन्मा हरी. १४९
आधीं हृष्ट गुहा करूनि भरता भेटे अरिघ्ना तया
नंदिग्रामगता, कथी प्रभुकृत त्रैलोक्यभाग्योदया.
श्रीराम प्रभु मेघ, मारुति गमे तन्नाद; ताप क्षया
जातां बंधु मयूर नाचति सुखें जाणोनि केली दया. १५०
झाले पूर्ण चतुर्दशाब्द, मुनितें वंदी, निघे, घे बळें,
न्हाया तृप्त वर प्रभूत्तम पथीं प्राज्यें असाया फळें.
त्या भक्ता सुखवी गुहा, मग जगद्भर्ता पुरा ये, पळें
सद्भ्रात्या निववी, जसा जलद जो तो चातकाला जळें. १५१
सद्भ्रातृद्वय हर्षवूनि भगवान् वंदी वसिष्ठा, सती
कौसल्यासहिता नमी; अदितिच्या सर्वा स्वसा भासती.
मंत्री पौर सुहृत्सखे निववि, ते सुग्रीव लंकापती
स्नेहें भेटवि बंधुला; पुर निघे अत्युत्सवें तें अती. १५२
भ्राते वानरराक्षसेंद्र कटकें त्यांचीं स्वयें शोभवी,
स्वामी आपण घे सुवेष, नयनें जंभारिचीं[१] लोभवी;
झाली स्वस्तरुपुष्पवृष्टि, अमितें वाद्यें नभीं वाजलीं,
स्तोत्रें रम्य पुरप्रवेशसमयीं मुन्याननें गाजलीं. १५३
देवी जेंवि नभांत, पौररमणीकन्या पुरीं हर्षल्या;

---

१. इंद्राचीं.

त्या द[1]ध्यक्षतलाज पुष्कळ रघूत्तसीं पथीं वर्षल्या.
सीतेतें बहु वर्णिती पुरवधू, तारेसि ही वानिती;
माता हि प्रभुच्या सुनेपरि बहु प्रेमें तिला मानिती. १५४
आधीं वंदुनि पादुकायुगुळ तो पादद्वयीं लेववी,
श्रीरामा भरत स्वराज्य विधिनें प्रार्थूनियां घेववी.
ब्रह्मादि प्रभुच्या चि वर्णिति महाराज्याभिषेका कवी;
सत्या हे चि कथा सुधा, सुरमता जी ती दिसे काकवी. १५५
तें अत्यद्भुत रामराज्य कविनीं अत्यंत वाखाणिलें,
पापद्वि[2]ट्कुळ द्यावया निजजना अत्युत्सवा खाणिलें;
केलें पूजुनि धन्य कीशपलभुग्भर्ते रमामंदिरें,
सैन्यें हर्षविलीं तसीं च, कुमुदें जैसीं शरच्चांदिरें. १५६
सीताराम मरुत्सुतासि परम प्रेमें अलंकारिती,
त्या भक्ता ह्मणती, 'कधीं तुजविना होती न लंका रिती.'
देवी दे निजरत्नहार, सदया माता जसी नंदना;
या प्रेमें बहु तो निवे, नच असें हें देववे नं[3]दना. १५७
वाटे रामभुजप्रताप घटज ब्रह्मर्षि वर्णी, वदे,
'दिक्कंठाहुनि उग्र मेघरव, हें आश्चर्य देवांस दे;
त्यातें रावणजन्मकर्म कळवी भूदेव तो, वातजा
वाखाणी, विधिच्या वरें न घडला शस्त्रादिकीं घात [4]जा. १५८
श्रीरामप्रभु गर्भिणी जनकजा लोकापवादें मनीं
ठावी आदिसती, त्यजी कविवर प्राचेतसाच्या वनीं.
झाले मुन्युटजीं तिला कुशलव, प्रेमें तयां तो कवी
श्रीरामायणकाव्य जें स्वकृत तें भाग्योदया घोकवी. १५९
सीता स्वर्णमयी करूनि विधिनें सर्व क्रतूंतें करी,
नित्यानंदसमृद्धि दे गततुळा सर्व प्रजांतें बरी;
शत्रुघ्नें वधिला रणीं लवण तो, जो ब्राह्मणांचा अरी;

१. दहीं, अक्षता व लाह्या. २. पापरूपी शत्रूचें कुळ. ३. नंदनवना. ४. ज्या.

घाली संसृतिसिंधुमाजि भगवान् सत्कीर्तिरूपा तरी. १६०
वाल्मीकिप्रिय शिष्य ते कुशलव प्रेमें गुरूक्तें महा-
काव्या गाति, निजा यशा परिसतां श्रीराम पावे महा;
दिव्यातें हयमेध होत असतां सांगे कराया; सती
भूगर्भांत भरोनि दे स्वविरहें नाथा परायास ती. १६१
जे गंधर्व अतिप्रमत्त भरतें ते तीन कोटि स्वयें
केले भस्म, जयांचिया अनुदिन क्षमाचित्त कांपे भयें.
केले आठ कुमार भूपति पृथक् संपन्न धर्में नयें,
भूदेवाभ्युदयें कृताहितजयें रामें नतांच्या[1] अयें. १६२
न्यायें रुद्रसहस्रवत्सर करी राज्य, प्रजा पाहुनि
प्रस्थानीं[2] विरहासहा[3] वरनभोयानायुतें वाहुनीं
ने सुग्रीव सुरांश ऋक्षकपितें संतानका, राम हा
दे सर्वां हि समा, जसा न करितां संता नकारा महा. १६३
'गावा भक्तमयूरमेघ भगवान् श्रीरामसीतापती,
याच्या भव्य यशें निवे मति, भवीं अत्यंत जी तापती.'
ऐसें सांगति साधु, येत हि असे गातां यश प्रत्यय;
स्वामीच्या स्मृतिनें घडो कलियुगीं दुर्बुद्धिला अत्यय[4]. १६४
'पूतरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. १६५

इति श्रीपूतरामायणं संपूर्णम् ।

---

# तन्वीरामायण

(तन्वीवृत्त)

श्रीपति झाला दशरथतनय क्रूरदशास्यदुरितमदनाशा,
पूर्ण कराया त्रिदशमुनिधृता मत्तनिशाचरकुलकंदनाशा[5].

---

१. भाग्यानें. २. प्रयाणसमयीं. ३. विरहासह्यांस. ४. नाश. ५. नाशाची इच्छा.

राम वडील प्रभु, भरत दुजा, लक्ष्मण दुग्धधवल, तनुज्याचें
नाम अरिघ्न क्षितिपति चवथ्या ठेवि यथार्थ सुभग (?) जनु ज्याचें. १
गाधिज मागे स्वमखसमवना राम सलक्ष्मण, नरपति चिर 'हा!'
प्रार्थुनि बोले, 'बळसह मज ने, बा! क्षम मीं न दयितसुतविरहा.'
बोध वसिष्ठ प्रभु करि, मग दे धीरशिरोमणि [२]असुसम, यज्ञा
लाभ यशाचा अतुल तरि च या, यापरि होय न असुसमयज्ञा. २
मारवि मार्गीं कुमति निशिचरी देउनि अस्त्रशतक रुचिराशी,
जावुनि सिद्धाश्रमयश उभवी, घे परदुर्लभ गुरुरुचिराशी.
राक्षस मारी, मख सफळ करी राम यशोनिधिपति, समहर्षी
कौशिक झाला रघुरमणयशें सोडुनि भान जनकसम हर्षी. ३
गौतमभार्या प्रभु चरणरजें शुद्धिमती करि, बहु यश जोडी;
यावरि सीता जनकनृपसुता राम वरी, स्मरहरधनु मोडी.
कौशिकवाक्यें भगवद्वरजां तीन तिघां दशरथतनयांला
मैथिल कन्या उपयमविधिनें पूजुनि दे [३]समधिगतनयांला. ४
भार्गव कोपे गुरुधनु चुरितां, राम तया प्रकटुनि बळ अंगी;
तो हि निवाला दशरथ नृप ही, जे मुनि पौरसहित नृपसंगी.
होय अयोध्या सुरपुरमहिता नाथकुमारविजयवरलाभें,
भूप धरीना तिळभरि हि मनीं, तो मृतिचें बुध भव तरला भें. ५
मातुळ ने त्या अनुजानिसहिता आत्मपुरा शुचिगुणभरतातें,
त्यावरि देतां गुरुसचिवमतें ज्येष्ठ सुता निजभूभर तातें,
केकयकन्या नृपतिस अडवी, दत्तवरद्वय, करि हठ, मागे,
'राज्य अपत्या, गहन मनुसमा मेघनिभा.' पति विनवुनि भागे. ६
सत्य पित्याचें व्रत परम हित श्रीश तयास न चलन घडाया
लक्ष्मणसीतासह सदय निघे, भव्य करी यश दुरित झडाया.
तें पुर लागे प्रभुवरजननीताततृपांहुनि बहुत रडाया;
जाय वनाला बसुनि गुरुरथीं, आप्तमना पळ कळ न पडाया. ७

---

१. प्राणतुल्य पुत्र. २. सुसमय न जाणणाऱ्याला. ३. ज्ञातनय अशांस.

भेट गुहातें रघुकुळमणि दे, सूत सुमंत्र फिरावि मग मार्गे,
देवधुनीतें उतरुनि मुनितें तीर्थपदीं नति कारि अनुरागें.
'चित्र' असें जो पद धरि शिखरी 'कूट' दुजें सुजनमाहित नामीं,
ईश्वर तेथें प्रमुदित वसला लक्ष्मणनिर्मिततृणदळधामीं. ८
नंदनशोकें दशरथ नृपति व्याकुळ होउनि अतितर तापें
'राम!' म्हणोनि त्यजि निजतनुतें पुत्रवधार्दितमुनिवरशापें.
शीघ्र वसिष्ठें भरत निजपुरा आणविला, परिसुनि जननीच्या
निंदित कर्मा तळमळुनि म्हणे, 'माय न तूं, मदहितजन नीचा.' ९
उत्तरकार्य त्वरित करुनि तो जाय दयानिधिस शरण भावें,
त्या गुह गंगा उतारि, मग भरद्वाज म्हणे, 'सुख यश बहु पावें.'
त्यावरि वंदी प्रभुपदकमळें; ऐकुनि तातगतिस चिर 'हा! हा!'
बोलुनि पिंड प्रथम गुरुसि दे, अक्षम होय जनकविरहा हा. १०
पाय धरूनि स्तवुनि 'फिर' म्हणे भक्त, तया प्रभुवर समजावी,
'तातनिदेशानुसरण हित, बा! चित्तरुजा असुगतिसम जावी.
येइन वर्षें मनुमित सरतां, तोंवरि तूं हि गुरुवचन पाळीं.'
बंधु वदे, 'हे तनु दहनमुखीं होमिन, येसि न जरि कृतकाळीं.' ११
घे प्रभुपादू, मग भरत निघे, वल्कजटाधर वनभव भक्षी,
बाहिर राहे, पुरजनपद तो धर्मनयज्ञ जनकसम रक्षी.
राम हि सोडी निकट म्हणुनियां चित्रशिरानग, जगदिन लक्षी
अत्रिमुनीतें, फळभर नमितां जेंवि रसाल तरुसि पिक पक्षी. १२
दे अनसूया क्षितिजानिस उटी जी सुखदा चिरवर गुण दावी,
स्वर्ग विराधा खळरजनिचरा दे प्रभु, विप्रशत नुतिस लावी;
ने शरभंगा प्रतिविधिसदना, त्या हि सुतीक्ष्णमुनिस विभु वंदी;
कुंभभवातें अनुगसम भजे, ज्या प्रभुचे विधि निगम हि बंदी. १३
स्वायुध घे जें कलशज मुनि दे, गृध्र जटायु जनकसख जो त्या
भेटुनि मानी गुरु, यश विधुतें लाजवि, कां मग न विरवि मोत्या?

---

१. अर्दित=दुःखित. २. चित्ताचा रोग—खुरखुर.

सन्नुत गोदातट वरुनि वसे पंचवटींत रचुनि दलशाला,
सेउनि ज्याचें चरित सुरसिक प्रेक्षिति हीन अमृतकलशाला. १४
शूर्पणखा जी दशमुखभगिनी कामपरा सुरुचिरतनु झाली,
त्या प्रभुतें ती अतिकुमति म्हणे, 'मीं च बरी, न दुसरि तुज आली.'
लक्ष्मण तीचें प्रभुवरवचनें घ्राण सकर्ण धरुनि असि खंडी,
बंधु तिचा ये खर, अजित वधी; त्या अहिला उरविल न शिखंडी. १५
रावण ऐके सबळ खरवधा, यत्न रची महिजनिस हराया,
ज्या शतगावें प्रभुवर उडवी त्या करि कांचनहरिण मराया.
श्री अवलोकी कनकमृग, म्हणे, 'द्या मज हा' बहु विनवि धराया;
राम निघे शरधनु धरुनि करीं वासववांछित सफळ कराया. १६
होय भयातें त्वरित मृग पळे, त्या जगदीश्वर खरशर हाणी;
तो वदला, 'हा! जनकनृपसुते! लक्ष्मण! हा!' असि सकरुण वाणी,
ऐकुनि सीता विकळपण धरी, 'धांव' म्हणे 'समवन कर धीरा!'
'हे मृगमाया सति!' कळवि असें, ती उटजांतुनि हि दवडि दीरा. १७
रक्षक साधु च्छळुनि दवडितां एकलिला हरि दशमुख पापी,
गृध्र तयातें विरथ करि रणीं, तो खळ पक्ष असि धरुनि कापी;
सोडविली ने लघु गगनपथें पाहुनि 'हाय!' म्हणति मुनि नाकी,
स्वामिस बाहे, कपि गिरिशिखरीं पांच विलोकुनि पटनग टाकी. १८
नेउनि लंका निजकनकपुरी दाखवि, तींत सदुपवन होतें
रम्य अशोकाभिध, वसवि तयामाजि, सुतेज असें[2]दहित तो तें.
ठेउनि दासी बहु रजनिचरी कोपविषानळ खवळवि रोधी,
नाश घडाया निजसकळकुळा, आग असें करि जवळ विरोधी. १९
राक्षसरूपें स्वरवसमरवें शंकित होउनि विभु फिरला हो!
लक्ष्मण ये, जो अति विकळ म्हणे, 'नाथपदांबुजरज शिर लाहो.'
राम वदे, 'बा! त्यजुनि तिस वनीं मंद्रच लंघुनि अनुचित येणें.'
दुःख कथी तो, रघुपति वदला, 'त्वन्मति हि भ्रमविलि बहु एणें.' २०

१. स्त्री–पंत. २. तेजोविशेषण–पंत.

धांवुनि ये तों दलसदन दिसे शून्य, म्हणे, 'अहह!' गहन शोधी;
मूर्च्छित होतां हिमपवनजळें सावध लक्ष्मण करि, हित बोधी.
पक्षिमृगाच्या रडवि रडुनि तो नैकविलाप विकळमति झुंडी,
धुंडुनियां ही पुनरपि भगवान् मानुषलील विकळ तारि धुंडी. २१
तातसखातें विकळ निरखुनि स्वस्थ करी सकरुण जळवार्तें;
त्यासि पुसे, 'या क्षतविकळपणा कारण जें लव तरि कळवा तें.'
तो कथि, 'सीता हारिलि दशमुखें छेदुनि पक्ष निशितकरवाळें.
कीर्ति सदेवी मिळविसिल रणें, आधि मनीं न धरुनि पर वाळें.' २२
तों खग वृद्ध त्यजि वपुसि, म्हणे जों 'रिपुचें स्थळ बळ मज सांगें,'
देवधुनीच्या शुचितम धरिलें ज्या गुरुचे स्तुत पदरज भांगें.
उत्तरकार्य प्रभुवर करि तो, तत्सुतभाव सकळ वारि आंगें;
हें यश पीते 'विभुचरणरजों' साधु मना म्हणति 'सतत रांगें.' २३
योजनबाहु प्रखरतर कुधी राक्षस जो यमसम धारि दोघे,
मारुनि केला सुरुचिर सुरसा, भावि कथी हित शुचियश तो घे.
तारुनि भक्ता कृतनुति शबरी, वारुनि दीनजनहृदयकंपा
राघव पावे अनुजसहित तीं, जी सरसी गुणमणिखनि पंपा. २४
मारुति भेटे, रविसुत सुगळा भेटवि, सख्य करिति हरि दोघे.
ते नग दावी कपि, धरुनि उरीं 'हाय!' म्हणे प्रभु, जडपण तो घे.
धैर्य सुकंठ स्वद्युति कथुनि दे, 'भेटवितों तुज तव दयिता' हें
बोलुनि सांगे स्वयुवतिहरण; श्रीश वदे, 'सकळ हारिन बा! हें.' २५
युद्ध कराया हटकवुनि पळें एकशरें शतमखसुत वाळी
सर्वशरण्यप्रवर विभु वधी, त्या सुगळा कपिपति करि, पाळी;
ऋक्ष सुरांश प्लवग मिळविले, ते सुगळें मग महिजानिशोधा
पाठविले हो! अवधि करुनियां एक चि मास करुनि हितबोधा. २६
तीन दिशांतें हुडकुनि फिरले, सांगति 'तो खळ दशमुख नाहीं.'
त्यांत यमाशा निरखिति हरि जे, त्यां हि कळे न कुशळ गति कांहीं.

---

१. राम व वानर सुग्रीव.

शोध न लागे, अवधि हि टळला, उग्र सुकंठ म्हणुनि बहु भ्याले,
सागरतीरीं प्लवग सकळ ही सिद्ध मरों अनशन दृढ झाले. २७
त्यांसि जटायु[1]प्रथमजनु कथी[2] प्रत्यय दावुनि; महिजानिशोधा
शंभर गांवें जलधि पलिकडे जाय असें बळ पवनजयोधा
ऋक्षप जाणे, स्तवुनि कळवि त्या, पक्षिपसा अतिजवन निघाला,
तो गगनांत त्रिपुरजिदिषुसा,[3] न च्छलकुंठित, कुशळ रिघाला. २८
भग्न उरातें करि हिमगिरिजा,[4] जाय मुखांत, ठकवि सुरसेला,
सावलिनें जी धरि तिस खपवी, देति यशोमय वर सुर सेला.
पावुनि पारा पवनतनय तो जिंकुनियां प्रथम चि अधिदेवी
शोधुनि लंका अतिकुशळपणें आधि सतीस न निरखुनि सेवी. २९
जाय अशोकाभिधसदुपवनीं, श्रीस तयांत चतुरमणि पाहे;
तों अरि रात्री कुमति धरुनि ये, त्या अवलोकुनि तरुवरि राहे.
‘मन्महिषी हो त्यजुनि नर’ म्हणे, तें न सती विटकुवचन साहे;
ते वदली, ‘हे प्रभुसि नमुनि दे, रे! जरि वांछित असुवसु[5] आहे.’ ३०
रावण कोपे, कुमति निशिचरी ज्या महिजानिकट चि बहु होत्या,
‘तल्प[6] भजाया मम हित सिकवा’ सांगुनि हें खळ खवळवि तो त्या.
‘भक्षिन, मासद्वय अवधि दिला’ यापरि दापुनि सदहित गेला.
जाच सतीला मग बहुत तिहीं सोडुनि धर्म मृतिरुचिद[7] केला. ३१
त्या त्रिजटेनें कुमति भिवविल्या स्वप्न कथूनि तदहितफळानें,
पाश रची श्री, परि मरुं न दिली, मारुतिनें अजितनुतिबळानें;
देवुनि मुद्रा नमुनि कळविलें सानुजनाथकुशळ, रविज्याचें
सख्य, बळाचें प्रचुरपण अति स्तोत्र करी सुरमुनि कवि ज्याचें. ३२
श्री निजचूडामणि पवनसुता देउनि वाचिक कथि अरिघाता;
घेउनि आज्ञा उपवन विटपी लोळवुनि प्रमुदित करि वाता.
अक्षकुमारा रजनिचरबळा मारुनि होउनि वश घननादा

---

१. संपाती. २. खोडलेलें पूर्वपद—म्हणे. ३. शंकराच्या बाणाप्रमाणें. ४. मैनाकाला. ५. प्राणरूपी धन. ६. शय्या. ७. मरण बरें असें वाटावयास लावणारा.

जाय सभेला, गणि दशवदना लेश न, कोपवि मदकृतवादा. ३३
मारुतिघाता दशमुख असि घे, त्यासि बिभीषण नय कथि, वारी;
पेटवि पुच्छ त्रिदशरिपु, जगत्प्राणतनुज न कुमतिस मारी;
अग्निस देवी विनवि, कपि उडे बंधन तोडुनि, बहु खळ भाजी,
पाजळि लंका, तिळ हि नुरवि ती शक्रसुदुःसह परबळभा जी. ३४
जाळुनि लंका रडवि दशमुखा, एक बिभीषणसदन न जाळी;
पुच्छ समुद्रीं विझवुनि, पुसुनि श्रीस, उडे निरवधिबळशाळी.
लंघुनि सिंधु प्लवगबळवरें हर्षवि सर्व हि कळउनि केलें
तें युवराजें फिरुनि मधुवनीं चारुनि पुष्कळ मधुफळ [1]नेलें. ३५
मोडुनि आज्ञा दधिमुखकपिला ताडिति वानर मधुवनपाळा.
तो 'युवराजें मधुवन लुटिलें' हें कळवी [2]गतनयहरिकाळा.
ऐकुनि हर्षे सुगळ, समजला कीं, अवलोकुनि रघुपतिभार्या
निश्चित आले, पतिस न गणिती सेवक साधुनि गुरुतरकार्या. ३६
श्रीश विचारी, तदनुज हि तया सांगुनि तो प्रमुदित करि राजा,
सांत्वुनि सांगे सुगळ दधिमुखा 'तें बळ पाठिव लघुतर बा! जा.'
मारुतितारातनयसहित ते वानर गर्जत उडत चि आले,
दाशरथींच्या कपिमहिपतिच्या पादयुगास विनयनत झाले. ३७
श्रीश पुसे, 'हो! जनकनृपसुता देखिलि?' तें[3] चि पवनसुत बोले.
अर्पुनि चूडामणि सकळ कथी, भेटुनि त्यासि, निवुनि विभु डोले.
वर्णन मांडी, उपकृतिभर घे, लाजवि साजवि दिधि[4]गुरु दासा.
सत्प्रभुलब्धा पदभजनरता सत्कृति शोभवि बहु, जासि नासा. ३८
सर्व सुरांश प्रबळ बहु कृती ऋक्ष कपि त्रिभुवनपतिकार्या
उत्सुक झाले, म्हणति, 'यश मिळो या सुगळा अरि निवटुनि आर्या.'
भव्य मुहूर्तीं विजयद विजयीं राम निघे, पवनतनय वाहे;
अंगद घे त्या भगवदवरजा, सिंधुतटीं अगणित बळ राहे. ३९

---

१. रामाकडे–पंत. २. नीतिभ्रष्ट वानरांचा काळ च अशा सुग्रीवाला. ३. 'जनकसुता देखिली' असें. ४. राम–पंत.

धर्मनयांतें न गणुनि खवळे, बंधु सभेंत हि बहु अपमानी,
भाग्यमदानें अनुचित चि करी, न स्वतपासम परतप मानी.
संगति याची जसि तरि कुटकी, सोडि बिभीषण शुचि नयवक्ता;
ये शरण, श्रीपतिचरण नमी, दे अभय प्रभु चिरपद भक्ता. ४०
मार्ग न देतां त्रिदिन विनवितां साम्र गुणीं प्रभु खर [शर] जोडी,
भी, बहु तापे, शरण जलधि ये, 'रक्ष' म्हणे, निपट चि धृति सोडी.
'सेतु रचीं, मीं धरिन, तव यशें विश्व तरो' परिसुनि अशि वाचा,
दाश[1] अमोघें वधुनि शुचि शरें उद्धारि ते, करि लय अशिवाचा[2]. ४१
सिंधु कथी त्या नळकपिस यश श्रीपति सेतुसि रचवुनि ओपी.
शंभर गांवें रचिलि सरणि ती, जीस्तव संसृति बहुत चि सोपी.
रावण दावी शिर धनु, रडवी भूमिसुतेसि बहुत, 'परमाया'
सांगुनि रक्षी अति निपुणपणें श्रीशधना शुभमति सरमा या. ४२
तीं दिवसानीं उतरुनि कटकें ने कपिभूपति जलनिधिपारा,
दूत धरूनि त्रिभुवनरिपुचे सुज्ञ बिभीषण कथि, 'खळ मारा.'
राम म्हणे, 'हे परचर बरवे दावुनि सर्व बळ सकळ सोडा;'
ते दशकंठा नमुनि कळविती रामबळा न परिगणन जोडा. ४३
राम सुवेळक्षितिधरशिखरीं वेधुनि कांचनमयपुर पाहे,
रावण दुर्गी हरिपति निरखी, तत्कृत दुर्नय पळ हि न साहे;
जेंवि भुजंगीं पतगपति तसा पंक्तिमुखीं कपिवर पडला हो!
ताडुनि पाडी वर मुकुट, म्हणे, 'दंड कृतात्यवफळ जड लाहो.' ४४
दंतनखांहीं अरिस भुजरणीं फाडुनि तोडुनि कपिपति घाला
घालुनि कोपें बळमद सहसा झाडुनि पाडुनि परतुनि आला.
राम म्हणे, 'बा! अनुचित तुज हें साहसकर्म, दशवदन भारी;
यास उपायें बुडविसिल सख्या! दारुण हा सुरपरिभवकारी.' ४५
वेढुनि लंका स्वबळजलधिनें अंगद पाठवि रघुपति सामा;
बोध करी हा, 'जनकनृपसुता दे, न पहा कुळसह यमधामा.'

१. नीच राक्षस. २. अकल्याणाचा.

घे उपदेश क्षत शिव न जसा [1]व्यायुगदातिविकळ शिशु आमा.
मारित होता धरवुनि, परि तो ये पर मर्दुनि, कथि कृत रामा. ४६
युद्ध कराया कपिपतिस कथी राम, दशास्य हि निजसचिवाला;
वानरसैन्यें रजनिचरबळें यांसह संगर खरतर झाला.
शत्रुबळाचा [2]प्रकर पति मरे होउनि भग्न दशवदन गेला.
रक्तनद्यांनीं अरुण जलनिधि प्रेक्षकदेवमुनिभयद केला. ४७
दारुणमायें दशमुखतनयें मेघरवें कृतकपिबळनाशें
सानुज केला रघुपति समरीं बद्ध महोरगमयदृढपाशें.
दिग्वदनाज्ञा वरुनि जनकजा नेउनि दाविति रजनिजरी, ती
पाहुनि शोकीं सुमृदुमति बुडे, घे त्रिजटा श्रुतिसम हितरीती. ४८
पक्षिप वारी व्रणविषसहिता मोहकरा लघुतर अहिपाशा,
होय जयाची धरिलि बारे मनीं ती विफळा निशिचरमहिपाशा.
तो घटकर्णा दशमुख उठवी आत्मबळें निरखुनि परभग्नं
काळ चि वाटे, कारि कपिकटकें मर्दुनि पुष्कळ परिभवमग्नें. ४९
कश्मलमग्ना धरुनि कपिवरा तो परते, हरिबळ धृति सोडी.
सावध होतां सुटुनि सुरारिपुघ्राण सकर्ण रवितनय तोडी.
क्षोभुनि युद्धा आरि पुनरपि ये, कीश गिळी बहु, बहु वधि, सारी;
राम तयातें अवयव समरीं तोडुनि सोडुनि खरशर मारी. ५०
ऐकुनि कुंभश्रुतिमरण रडे, रावण आठवि निजदुरितातें,
'सिद्ध न झालें नरकपि समरीं स्वानुज अद्भुत बळ [3]पुरिता तें.'
यापरि शोची निजजनक, तया दे धृति तो घनरव, पण साचा
भासवि, पाडी कपिबळ, विभुचा देह सखा चि निपट पणसाचा. ५१
जांबवदुक्तें जगदसुतनय त्र्यंबकपर्वतनिकट पळानें
जाउनि आणी परम निपुण तो ओषधिपर्वतशिखर बळानें.
सर्व विशल्यव्रणरहित हि ते सेश्वर तत्क्षण सुमुदित झाले,
स्वोषधिवातें बहु अमृतरसें तेंवि विमोह सरघुपति धाले. ५२

---

१. जिवावरच्या दुखण्यानें पडलेला. २. प्रहस्त—पंत. ३. यमकार्थ निरनुस्वार!

मारुति आला त्वरित शिखर तें पावुनि, सानुज रघुपति हर्षे;
रावणसेना बहुत चि खपवी; वारिदसा खरतरशर वर्षे.
मेघरवानें कपटजनकजा मारुनि मग्न करुनि बळ शोकीं
एक मुहूर्त भ्रमवुनि कथिलें 'हाय!' असें सुरपतिस हि 'वोकीं'. ५३
सभ्रम शोक त्वरित चि उडवी साधु बिभीषण, कथि रघुनाथा,
'होम कराया घनरव बसला साश्वरथार्थ नतकमळपाथा![१]
त्या रथरत्नीं अमरपण तया येइल, यास्तव झडकरि बापा!
लक्ष्मणदेहा झटुनि वधवितों विघ्न मखासि करुनि अतिपापा.' ५४
वीर सुमित्रासुत रघुपतिनें पाठविला कपिबळसह तूर्ण
स्वर्गिवरें स्वप्रियकरपाविसा, तो करि मेघरवागिरिस चूर्ण.
नंदनशोकें तळमळुनि करें घेउनि खड्ग जनकतनयेतें
जाय वधूं, त्या शुचि सचिव म्हणे, 'रत्न करूं असिकवळ नये तें.[२]' ५५
सानुज राम व्यसु करिव रणीं, काम असे, असुकर तुज कर्म,
स्त्री न वधावी, नरयुगमथनें प्राप्त चि होइल निरवधि शर्म.'
मंत्र्युपदेशें परतुनि कटकें पाठवि, 'राम अनुजसह मारा'
हें जड सांगे. प्लैव[३] सजुनि म्हणे, 'जाइन दुस्तर जळनिधिपारा.' ५६
तीं चतुरंगें प्रखरतर बळें राम वधी जरि बहु शतकोटी,
त्या प्रभुबाणांप्रति नमन करी स्तोत्र महेंद्रसहित शतकोटी[४].
त्यावरि आला खिजुनि दशमुख श्रीशवधार्थ बळ सजुनि आंगें,
भग्न कराया मद धरुनि जसें आम्रफळास मदसहित वांगें. ५७
वानरसेना मथन करुनि तो शक्ति उरांत अशनिसम हाणी,
लक्ष्मणवीर क्षितिवरि पडला, 'हा!' असि बोलति कपि सुर वाणी.
भंगुनि उग्रा स्वरिपुसि अनुजा भेटुनि घे उचलुनि शिशुवाणी,
फार विलाप प्रभु करि, तंव तें शृंग पुन्हां पवनतनुज आणी. ५८
ओषधिच्या दे अमृतसम रसें नस्य सुषेण, उठवि पळमात्रें,

१. भक्तरूप कमळाना उदक अशा! २. तें सीतारत्न तरवारीच्या तोंडीं देऊं नये.
३. बेडूक. ४. वज्र.

निर्व्रण झाला, बळ रुचि धरिती कश्मळ सोडुनि सुरुचिर गात्रें.
पावुनि आला शिखर पुनरपि स्वामिसमीप पवनसुत, याची
स्तुति करि राम, प्रभुभजन मनें जो इतर प्रिय किमपि न याची. ५९
दिग्वदनाशीं प्रभु समर करी, मातलिला कथि हरि, रथ धाडी,
त्यावरि बैसे अजितसदारि तो, मार्गणवृष्टि अनवरत पाडी.
सप्त अहोरात्र सतत कलह श्रीपति शत्रुमद सकळ झाडी.
रावण या हा रघुपति हि तया सोडुनि दारुण शरतति ताडी. ६०
स्वक्षतजाहीं जरि अरि हरि ते स्नात तरी न विकळ पळ झाले.
मस्तक खंडी शत अजित रणीं, छिन्न न तेंवि दश हि जरि आलें.
ईश्वर मानी स्वभुजबळ उणें, स्वास्त्रज तेज चि किमपि न चाले.
कुंभज सांगे, 'रविहृदय' जपे, दे वर सूर्य, भिवुनि मही हाले. ६१
ब्रह्ममहास्त्रें खरतरशर जो तो अभिमंत्रुनि रघुपति सोडी,
दिग्वदनाचें उर उरगारिपुस्यंदन[1] वज्रसुदृढ परि फोडी.
शत्रु पडे तो अवनिवरि तसा, जेंवि महाबळ तरुवर वातें.
वर्षति पुष्पें अमर रघुवरीं, दाखवि उत्सव दिन बरवा तें. ६२
दुंदुभि वाजे घनरव[2] गगनीं, मंद सुगंध हिम पवन वाहे,
नाचति गाती सकळ कुशळ ते, न स्तवितां सुरमुनिशत राहे.
वाजवि वीणा प्रमुदित मुनि तो गावुनि नाचुनि सुखवि अजातें,
सद्यश मोठ्ठा शिवविधिहृदया, घेति शिरीं सुर चरणरजातें. ६३
रामनिदेशें निशिचरपतिचें साधु बिभीषण ससचिव सारें
उत्तरकार्य द्विजकथित करी, दे द्रविणें[3] अकृपणमति सारें.
राघव लंकापति करि विधिनें त्या अभिषेक करवुनि नयज्ञा,
तत्प्रणिपाता प्रभु सुयश जसें दे बहु, तेंवि चिरतर न यज्ञा. ६४
वातसुतास्यें स्वविजय कळवी दाशरथि प्रभु महितनयेला,
हृष्ट तिणें त्या कुमति निशिचरी रक्षुनि तो जगदसुसुत केला.
दर्शनकाम क्षितितनुजनिचा मारुति जाणवि, रघुपति भक्ता

१. गरुडवाहन विष्णु. (राम) २. मेघाप्रमाणें नाद ज्याचा तो (दुंदुभि). ३. द्रव्यें.

सांगुनि सीता निजनिकट तदा आणवि आत्मपदभजनसक्ता. ६५
पूजुनि सीता अभिनवशिबिकायानवरीं बसवुनि बहुमानें
आणिलि, तीस प्रभुवर वदला, ऐकुनि जें त्यजिलि च तनुभानें.
'कीर्त्यवनार्थें वधुनि दशमुखा सोडविलीस, परसदनवासें
संशय होतो, न रुचसि मज, जा; वंश मळेल चि जगदुपहासें.' ६६
त्या समयीं श्री वदलि, 'जरि सदा शुद्ध असेन तरि दहन रक्षु;
लक्ष्मणजी! व्हा न च विकळ; करा क्षिप्र चिता, अशुचि तनुसि भक्षु.'
दिव्य करी ती सिरुनि हुतवहीं कीं, व्रततेज अमरशत लक्षु.
वर्णिति भावें मुनि च न, ते ही शंभु पितामह दशशतचक्षु.[1] ६७
अग्नि म्हणे, 'हे रघुकुलतिलका! भूप्रभवा जनकनृपतिकन्या
संततशुद्धा सुरनुतचरिता आदिसती पतिपदरति धन्या
बैसिव अंकीं त्रिभुवनमहिता आलि वना रतिमति जसि वन्या,
बा जगदीशा! तुज अनुसरली; सिंधुसि सिंधु चि भजलि, न अन्या. ६८
तों चि महात्मा दशरथ उतरे भूवरि सोडुनि रुचिर विमाना,
सानुज राम प्रभु नमन करी, श्री हि तया सुरबहुकृतमाना.
भेटुनि हुंगी शिर, निवुनि म्हणे, 'धन्य तुवां दिनकरकुळ केलें.
हे शुचि सीता सुमति न विटवीं; पाप इचें यश परिसुनि गेलें. ६९
राज्य करावें, स्वपुर जनपदक्लेश हरुनि सुचिर सुखवावें,
सद्यश यावें तुज, सुजनशतें त्वच्चरित त्रिभुवननुत गावें.
सादर पावें नुबगुनि सकळा, गोद्विजदीनहृदयभय जावें.
सत्वर वत्सा! भरतभर हरीं, काय वदों बहु? जग बहु धावें[2]' ७०
शक्र म्हणे 'बा त्रिजगदभयदा! काय करूं प्रिय? वद, वर मागें.'
मागितलें त्या, 'मृतबळ उठवीं' हें स्वपदाश्रितजनपरमागें.
वृष्टि सुधेची करुनि उठविलें तत्क्षण, तें प्रभुसि सकळ वंदी.
होय विधाता स्मरहर हि तदा नारदमुख्य सुमुनिजन वंदी. ७१
वंदुनि भावें कळवि रघुवरा भक्त बिभीषण अपचितिकाम[3];

---

१. इंद्र. २. तुष्ट व्हावें. ३. पूजेच्छा.

श्रीश म्हणे ‘ बा! मज भरताविना केवळ दुस्तर युगसम याम.
भेटि तयाची त्वरित घडिव, हा पूज ससैन्य सुगळ, गुणधाम
प्राणसखे! हे प्लवग, समज मीं पूजित होईन अनुदिन राम.’ ७२

पूजुनि ऋक्षप्लवगपतिसह स्वर्णसदंबरमणिनिकरानीं
पुष्पक जाया त्वरित निजपुरा दे चरणद्वय नमुनि करानीं.
त्यांसह यानीं प्रभु बसुनि निघे, युद्धकथा कथि जनकसुतेतें,
भव्य विमानीं कपिबळ बसलें प्राज्य सुखें बहु भरुनि उते तें. ७३

दाखवि सेतु प्लवगविरचित, श्री क्षण चित्र चि निरखुनि होय.
कीं, बुडवीं जें कण तिळसम ही तें धरि भूधर दळसम तोय.
‘यत्न’ म्हणे ‘हा बहु मजकरितां या प्रभुनें कपि मिळवुनि केला.
हा! नयधर्म त्यजुनि वरमदें व्यर्थ ससैन्य सकुळ खळ मेला!’ ७४

राम म्हणे, ‘या सलिलनिधितटीं भेटि बिभीषण ससचिव दे हा;
हर्षुनि जातों तरि च सुमुखि! मीं सानुज लब्धविजय निजगेहा.
या शुभशैलीं सुगळ करि कृपा, होय सखा, तव नग मज दावी,
दे अभयातें मिळवुनि हरि हे, शोध तुझा परमनिपुण लावी.’ ७५

आणवि देवी प्रभुसि विनवुनि स्वालिपदोचित गुणखनि तारा,
दावुनि पंपा रघुपति शबरीरीति कथी विधिगुरु अतिसारा;
त्या हि कबंधें निजहित कथिलें तें कळवी, मग निरखवि गोदा
पंचवटी, जी निरसुनि अघ दे जंतुसि देव करुनि बहु मोदा. ७६

रास जटायुस्तव करि, कळवी उत्तरकार्य पुसुनि नयनातें;
आठवि देवी गहिवरुनि मनीं तत्कृत धर्म सफळ नय नातें.
कुंभभवाचें सुरमुनिमहित श्रीस सदाश्रमपद मग दावी
दूरुनि अत्रिस्थल हि नमुनि तो, सेवित पर्वत शिवनग भावी. ७७

भास्करकन्येसह सुरतटिनी दावुनि वंदुनि, निजपुर साजे
स्वर्ग तसें तें कळवुनि सुखवी वानरराक्षस बळशत राजे.
पुष्पक तेथें स्थिर करुनि भरद्वाजपदांसि नमुनि विभु राहे,
तो मुनि देवा विरहि जनकसा हुंगुनि मस्तक अनिमिष पाहे. ७८

तेथुनि रामें पवनसुत पुढें पाठविला करि मुदित गुहातें,
त्यावरि भेटे ससचिव भरता, जेंवि दिवाकर सलिलरुहातें.
सारुनि वर्षें मनुमित गहनीं त्या मुनिला प्रभु पुसुनि निवाला,
हर्ष निषादा बहु मग अनुजा दे, नगरा मह निरवधि झाला. ७९
प्राण शरीरीं रघुतिलक निजीं तेंवि पुरीं सुखकर शिरला हो!
त्या अभिषेक प्रभुसि गुरु करी सांग, म्हणे, 'जग सुख चिर लाहो.'
हर्षवि माता द्विज पुरंजन, ते गौरवि वानरनिशिचरभर्तें.
स्वव्यवहारीं निजजनक तसा धर्मनयांसि अनुसरुनि वर्ते. ८०
वत्सलवर्य प्रभु पवनसुता पूजुनि दे वर निजयश गाया,
श्री हि समर्पी निजतनुजसमा सन्मणिहार भजनवशग[1] या.
गौरव पावे बहु, न पर असा, कीं, करि सादर निरवधि सेवा.
वाटवि, 'झालों अनुजसह ऋणी' बोलवि हें फिरफिरुनि हि देवा. ८१
राज्य करी जें प्रभु निरुपम तें, दुःख नसे तिळभर हि, जनाला
रंजवि भव्यें नवनवचरितें, गायन ज्यापरि हरिणमनाला.
तापस येती, स्थिर वसति पुरीं, सोडुनियां सुपरिचित वनाला;
सेविति राज्या बहु यतिपति ही, चातक जेंवि ससलिल घनाला. ८२
दोन कुमार प्रभुसि कुश लव ख्यात, तसे चि भरतसुत दोन;
लक्ष्मणशत्रुघ्नतनय हि सुधी आठ असे सुगुण न जॆनिदोन[2].
आदिकवींद्रें रचुनि पढविलें रामचरित्र मधुररव दोघे
गाति महीजातनुज, मुनि जसें यद्यश तें परिसुनि सुख तो घे. ८३
लक्ष्मण बंधु प्रभुवरवचनें जाय, वधी द्विजरिपु लवणातें;
सद्यश झालें, अमृत शतमखा तृप्ति न देइल, मग कवणातें?
उद्धत कोटित्रय महिवर जे निर्जरगायक विचरति खोटें
ते भरतें ही वधुनि मिळविलें राज्य सुतांसि अनुजसम मोटें. ८४
आठ हि केले तनय नरपती, अ[3]ध्वर सर्व करुनि सुर वेद
ब्राह्मण गाया निजगुणमहिमा लावुनि वारुनि भवभयखेद,

१. पित्याहून कमी. २. यमकार्थ सानुस्वार? ३. यज्ञ.

दिव्य विमानीं स्वपुरजनपदप्राणिसमूह बसवुनि सुलोका
नेउनि रामें मुदित वसविलें हें बुधहो! प्रभुसुचरित घोका. ८५
'तन्वीरामायण' प्रेमें मयूर रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ८६

इति श्रीतन्वीरामायणं संपूर्णं ।

---

# आद्यार्यारामायण*

(आर्यावृत्त)

श्रीरमण दशरथाच्या सुरकार्यास्तव कुळांत अवतरला,
तें यश गातां प्राणी अगणितभवसागरीं तरला. १
पंक्तिरथाची महिषी कौसल्या, राम नाम तत्तनया;
हा माराया त्या जो लंघी दशकंठ मत्त नया. २
नृपदयिता कैकेयी, तत्तनुजा नाम भरत हा स्थापी,
याचें यश साधुसभा हृदयांत धरूनि आस्था पी. ३
सुमति सुमित्रा तत्सुत लक्ष्मण शत्रुघ्न गुणपद भ्राते,
रामा भरता देती प्रीति गुरुजना अदभ्रा[१] ते. ४
राजा मुनिच्या पुरवी देउनि सुत जेंवि ताट[२] कामातें,
तो त्या म्हणे, 'अभय दे, मारुनि हे ताटका मातें.' ५
जीची जसि मारीची[३] प्राणिक्षयहेतु तत्समा रीती,
विश्वामित्राज्ञेनें कौसल्यावत्स मारी ती. ६

---

* 'आर्या' नामक मात्रागणात्मक वृत्तांत प्रथम व तृतीयपदीं बारा, द्वितीय पदीं अठरा व चतुर्थपदीं मात्र पंधरा अशा मात्रा असतात. म्हणजे नेहमींच्या गीतिवृत्तापेक्षां चतुर्थपाद च भिन्न झाला. मात्रागणवृत्तांत 'आर्या' हें 'आदि' वृत्त असल्यामुळें कवीनें 'आद्यार्यारामायण' असें नांव दिलें आहे. १. पुष्कळ. २. अन्नपात्र. ३. महामारीची.

त्रिजगद्गुरुला गाधिज शत दिव्यें सयशोर्थ दे अस्त्रें,
स्वामी प्रसन्न होउनि कृतकार्याला जसीं वस्त्रें. ७
सिद्धाश्रमीं प्रभु करवि विनवुनि मुनिला नवा सवारंभा,
राक्षस वधी, जसि रुचे हे कीर्ति न वासवा रंभा. ८
दे कीर्ति अहल्येतें अर्पुनि रज रामपादराजीव,
तरले भवार्णवीं या धरुनि यशीं आदरा जीव. ९
पापी तरावयाला धरिति प्रभुचा चि लोक विश्वास,
जो ऐके, सोडीना नामरहित तो कवि श्वास. १०
रघुपति सीतेसि वरी मोडुनि पुररिपुधनुष्यवल्लीला,
दिसला मनुष्य, भासे प्रभुची न मनुष्यवल्लीला. ११
दे जनक गाधिजोक्तें रामावरजां[1] तिघां तिघी कन्या,
दशरथ होय प्रमुदित, पाहुनियां त्या स्नुषा धन्या. १२
भार्गवराम महेश्वरकार्मुकभंगें धरूनि वाटेतें,
क्रुद्ध प्रसन्न ही तो होय; महाश्चर्य वाटे तें. १३
शत्रुघ्नसहित भरता मातुळ ने पुसुनि आपल्या नगरा,
तन्मातृदुर्मता भी नृप भीता तापल्या न गरा. १४
युवराजत्व गुरुमतें देवूं लागे नृपाळ रामातें,
मागे वरद्वय दिलें जें ती दुर्बुद्धि रामा[2] तें.
"मत्सुत युवराज असो, राम वसो अब्द काननीं चवदा,
सुज्ञ महाराज! तुम्हीं सत्यव्रत कीं 'अवश्य' वदा." १६
जनकाचें रक्षाया सत्य, निघे मुदित राम; सीता तें
मान्य करी, लक्ष्मण ही, 'वरिलि' म्हणे 'तामसी[3] तातें.' १७
नमुनि गुरुजना नेसुनि कैकेयीदत्तवल्कलें गेले,
नेले रथें सुमंत्रें, पौर म्हणति "'हां!'[4] वनीं केलें." १८
भेटुनि गुहा निषादा भक्ता, गंगातटों जटा रचिती,

१. रामाच्या धाकट्या भावांस. २. स्त्री (कैकेयी). ३. तमोगुणी स्त्री.
४. रुदन.

गुहसचिवांच्या हृदयीं होय मुनिश्री[1] कटार चि ती. १९
फिरवुनि नृपसूतातें गंगा उतरूनि विप्रयागातें
सफळ कराया जाय प्रभु पद लावि प्रयागातें. २०
नमुनि भरद्वाजातें प्रभु वसवी चित्रकूटगोत्रास,
सोडी मुनीस जो खरमुखरक्षोदत्त[2] तो त्रास. २१
सूत कथि, 'चित्रकूटीं झाले बा! सर्व तापसा मान्य.'
शोकें भूप मरे तो. काय तया ताप सामान्य?२२
जन म्हणति, 'नृपें केला आपलिया आत्मघात हा हातें.'
शोकविषाब्धींत बुडे, बोले साकेत 'हा! हा!' तें. २३
सानुज भरत वसिष्ठें धाडुनि अतिशीघ्र दूत आणविला,
राज्यार्थ यत्न केला मातेनें त्यासि जाणविला. २४
भरत म्हणे, 'हा! मूढे! दूपुनि निजवंश काय गेहा हा
शोकाग्नि लाविला त्वां, केलें हित काय गे! हा! हा! २५
ज्येष्ठ गुणश्रेष्ठ वना राम दवाडिला, जया सखे दास
शोचिति, राज्य किति? रुचे जीवन हि न या सखेदास[3].' २६
कौसल्या समजावी भरता, बोधुनि गुरुक्रिया करवी;
मग जाय चित्रकूटा, तुष्टि भरद्वाज दे बरवी. २७
प्रभुला वंदुनि साश्रु स्वपित्याच्या कळवि भरत हा निधना,
राम म्हणे 'हा!' होतां अतिलोभी जेंवि हानि धना. २८
पिंड पित्यासि दिल्यावरि भरत म्हणे धरुनि पाद या, 'परतें'.
ऐके न सत्यसंध त्रिदशहितोद्यत[4] दयापर तें. २९
"म्यां त्वां हि न लंघावें स्वगुरूक्त, 'अवश्य' शब्द च वदावा,
राज्य करीं, बा! येतों मी सरतां अब्द चवदावा." ३०
सिंहासनीं बसाया मागुनि घे पादुका, शिरीं वाहे,
राहे नंदिग्रामीं, अंत्याब्दसमाप्तितें पाहे. ३१

---

१. रामाची मुनिसदृश तेजस्विता. २. खरप्रमुख राक्षसांनीं दिलेला. ३. दुःखी अशा मला. ४. देवहिताविषयीं तत्पर.

अत्रिस सानुज रघुपति, अनसूयेचीं पदें नमी सीता.
दे अंगराग माल्यें ती सुप्रीता सतीगीता. ३२
दंडकवनीं विराधें हारिली व्याघ्रें मृगी तसी तन्वी,[1]
सोडी तीतें धरि तो ते वधिती त्या महाधन्वी. ३३
शरभंग सुतीक्ष्ण घटज ऐसे दंडकवनीं तपा रचिते,
जे विप्र पावले सुख विभुसि पहातां अपार चि ते. ३४
गृध्रपति जटायु सखा ताताचा तातसा चि तो अजितें
हर्षविला, थोरपण प्रभुचें वदवेचिना अजि! तें. ३५
गोदावरीवरतटीं पंचवटींत छेदालयीं[2] राहे,
प्रभुतें दशमुखभगिनी शूर्पणखा कामुकी पाहे. ३६
मायारूपवती ती प्रभुसि म्हणे, 'मीं च सार सत्य, जुनी
स्त्री न बरी, कुटजकुसुम चुंबि न आळि सारस त्यजुनीं.' ३७
स्मित करुनि प्रभु सांगे, 'स्त्री आहे मज, न लक्ष्मणा तरुणा;
जा, त्या भज; वरिली जी ईतें सोडूं न दे करुणा.' ३८
लक्ष्मण हि म्हणे, 'वेड्ये! त्यजुनि प्रभु वांछितीस कां दास?
प्रतिबिंबासि चकोरी न भजे सोडूनि चांदास.' ३९
पुनरपि गळां पडे ती निर्लज्जा, म्हणुनि हांसली[3] सीता;
क्रोधें खाया धांवे शूर्पणखा, होय ती भीता. ४०
राम म्हणे, 'सौमित्रे! न करू सीताविनाश हे चंडी,'
तों लक्ष्मण तत्कर्णघ्राणातें तत्क्षणीं खंडी. ४१
तद्बंधु सबळ खर ये माराया, त्यासि रामभद्र वधी.
प्रभुची दुर्जनदंडीं धरि करुणार्द्रां हि न द्रव धी. ४२
प्रथम अकंपन[4] राक्षस, मग शूर्पणखा कथी परिभवातें,

---

१. सुंदर स्त्री. २. पर्णशाळेंत. ३. पंतानीं रामकथेंतील सर्व बारिकसारिक गोष्टी कोणत्या हि एका रामायणांत गोंविल्या नसून वर्णनाच्या ओघांत त्या इतस्ततः कोठेंतरी कथन केल्या आहेत. ४. रावणदूत; याला पुढें मारुतीनें मारलें.

त्या दशमुखा न सोसे, विधिसह रुचलें परि भवा[1] तें. ४३
स्त्रीरत्नजनकतनयाहरण मनीं धरि, निघे, 'न हो ग्रास
काळाचा' ऐसें त्या मारीच कथी महोग्रास. ४४
त्या सांगे, "सीतेतें हरितों म्हणवावया अरिस 'हाय!'
मारीन तुज, न होसिल या कार्यातें जरि सहाय." ४५
'रामशरें मरण बरें' मारीच असें स्वमानसीं आणी,
ये आश्रमीं, कपटमृग होय, विलोकी तया राणी. ४६
प्रभुतें म्हणे, 'धरा हा, नेऊं स्वपुरासि, चांगला, गावें
हें हरिणरत्न, याचें पुर पाहूं[2] आंग लागावें[2].' ४७
लक्ष्मण[3] म्हणे, 'न मृग हा, राक्षस मारीच होय मायावी,
जी ताटका निवटिली त्वां ती रक्षोधमा या वी.' ४८
सीता म्हणे, 'उगे हो! लक्ष्मणजी! काय घालितां मोडा?
जोडा चापीं गुण, घ्या बाण, स्वामी! न या सोडा.' ४९
श्रीराम म्हणे, 'वत्सा! सीतेचें तूं करीं परित्राण,
मृग असतां धरिन, हरिन राक्षस जाणोनि मीं प्राण.' ५०
दृश्यादृश्य[4] मृग पळे, ब्रह्मास्त्रें बाण राम जों हाणी,
'हा! सीते! हा लक्ष्मण!' ऐसी राक्षस वदे वाणी. ५१
मरणीं राक्षसजाति प्रकटी जी आपल्या स्वरें हाक,
प्रभु शंके, पतिनाशें सीता हि धरी मनीं धाक. ५२
'स्वपतिप्राणत्राणा सत्वर जा लक्ष्मणा!' म्हणे सीता,
सौमित्रि कथी, 'राक्षसकपट,' करी क्रोध ती भीता. ५३
'तूं ज्ञातिस्त्रीकाम[5] श्रीकाम भरत तसा, अरे मूढा!
गूढाप्रियनिरता! गुरुघातकरा! दुर्नयारूढा! ५४
मद्रत रक्षिल मज, जा, जवळ मनुष्याधमा! नसावास.'

---

१. शंकराला.(मागें आर्या ४०, टीप पहा.) २. पाहूं लागावें. ३. मागें आर्या ४०, टीप पहा. ४. दिसला न दिसला तों च. ५. स्वगोत्रस्त्रीविषयीं पापवासना धरणारा.

लक्ष्मण निघे, न सोसे तो त्याच्या मानसा वास. ५५
'हाय !' म्हणे काय करिल? काय न गणि, गरण[1] माय दे खाया,
घाय उरीं स्वायश[2] तो जाय प्रभुपाय देखाया. ५६
तों ये रावण, देवी सिद्ध करायासि देवकार्यातें
नेऊं दे, गृध्रेंद्रा सोसेना सेवकार्या तें. ५७
सुर म्हणति, 'हरूं देइल हा पावक काय या तुपा?' सून
सोडविली रथ भंगुनि सीता क्षतयातुपासून[3]. ५८
पक्ष अधर्में खड्गें दुष्ट दशानन जटायुचे छेदी.
ने श्रीस गगनमार्गें, सन्मुनि झाले तदा खेदी. ५९
सुग्रीवादि विलोकुनि, कपि पांच तयांत ती सती टाकी
स्वालंकार सपट ते, पाहुनि 'हा!' बोलिले नाकी. ६०
मारी 'हा राम!' अशा ती 'हा लक्ष्मण!' अशा नभीं हाका,
काका हंसीसी श्री त्या सांपडली गमे नाका[4]. ६१
लंकेंत अशोकवनीं नेउनि दशकंठ खळ तिला ठेवी,
देवी 'हा राम!' म्हणे, हें नामामृत चि ती सेवी. ६२
लीलामानुषविग्रह राम प्रभु राक्षसा वधी, परते;
तों लक्ष्मण भेटे, जो गुरुपदभजनेतरीं न रते. ६३
तो साश्रु नमुनि सांगे आर्येचें परुष बोलणें सारें,
प्रभु 'हा!' म्हणे, सिकविलें तद्वचनें डोलणें सारें[5]. ६४
'माझ्या तुझ्या हि दैवें तद्वचनें गरळ घातलें कानीं,
दशरथसत्कीर्तीचा केला कीं घात लेकानीं.' ६५
धावुनि येवुनि पाहे तों शून्या प्रभुसि ताप दे शाला,
रम्या स्थळा हि न भजे, यति जैसा पापदेशाला. ६६
बहु शोध विलाप करी खिन्नतसा राम काननामाजीं,
'गोदे! कोठें ती? दे माझ्या मन कान नामा जी.' ६७

---

१. गरळ, विष. २. स्वायश तो घाय–पंत. ३. जखमी राक्षसापासून. ४. स्वर्गाला (देवादिकाना). ५. योग्य अशा (तद्वचनें).

अग नग खग मृग विनवी, रडवुनि करि राम दीन वाघांस;
न गिळी पोत मुखींचा, घेइल कैसा नवा घांस? ६८
वन शोधितां क्षतार्त स्वपित्याचा देखिला सखा पडला,
घडला नाश कथी तो, प्रभु पितृशोकें तसा रडला. ६९
त्याची क्रिया करि, निघे; धरिला सानुज वनीं कबंधानें,
तच्छाप हरी. याचा अरि ही तापे न बंधानें. ७०
बसुनि विमानीं सांगे, 'सुग्रीवा भेट रविसुता आधीं
सख्य करुनि देवांच्या कार्यांतें आपुल्या साधीं.' ७१
भेटे मतंगशिष्या प्रभुपूजा आदरें करी शबरी,
ती गति पावे, यातें स्मरतां चि जसा करीश बरी. ७२
प्रभु पंपासरसीतें पावे, दयितेसि आठवि, श्वास
सोडी उष्ण, यदंश[1] प्रतिपाळिति आठ विश्वास. ७३
मारुतिनें भेटविल्या श्रीरामें मुदितमानस, ख्यातें,
होय सुकंठ, तयाच्या प्रभु दे बहुमान सख्यातें. ७४
सुग्रीव अळंकारांसह दावी उत्तरीय देवास,
त्यातें उदश्रु होउनि निजवक्षीं राम दे वास. ७५
रविसुत सुग्रीव पुसुनि नेत्रें सांत्वूनियां 'सखे! दास
मीं तुज भेटावितों स्त्री' ऐसें बोले सखेदास. ७६
"दयिता हरूनि जपतो अग्रज हि वधावया मला वाळी,
भक्ता प्रणता हि जसा अतिपापाला भला वाळी[2]. ७७
तरि कपि हि मीं न कांहीं गडबडलों धैर्य धरुनि बा! पाहें,
तूं नर, कां 'हा!' म्हणसी? हरितों त्वद्दुःख बापा! हें." ७८
त्यासि म्हणे राम, 'सख्या! हरितों त्वद्दुःख सर्व मीं आधीं,
कार्य करुनि मग माजें सद्यश तूं ही सख्या! साधीं.' ७९
अतिबळवान् वासवसुत जो वानरराज दुष्टधी वाळी,
त्या मारी, दे राज्य, प्रेमें प्रभु भानुजा पाळी. ८०

१. अष्ट लोकपाल. (ही आर्या मूळांत द्विरावृत्त झाली आहे). २. त्यागितो.

सर्व दिशांत सतीतें शोधाया सुगळ कपिबळें प्रेषी,
दिक्त्रय हुडकुनि आले, देखिलि न श्री न तो द्वेषी. ८१
दक्षिणदिग्गत लंघुनि मासावधि कोश चिंतितां चंडी
प्रायोपविष्ट झाले सिंधुतटीं, धाकले दंडी. ८२
संपाती गृध्रेश्वर भक्ष्यार्थ महेंद्रनगगुहा सोडी,
'भक्षीन' म्हणे, 'कपि हे, याच्या मांसीं असे गोडी.' ८३
'मेला धन्य जटायु श्रीरामाच्या करूनियां कार्या,
आम्हीं व्यर्थ चि मरतों, प्रभुची न विलोकिली भार्या.' ८४
ऐसें अंगद बोले, स्वावरजजटायुमृत्यु जाणून
संपाती वृत्त पुसे, शोकें नेत्रांत तोय आणून. ८५
अंगद सविस्तर कथी, 'प्रियसखदशरथसुतप्रियाहरण
करि रावण, तत्खड्गें जटायुला जाहलें मरण.' ८६
ऐकुनि अत्यप्रिय तें गृध्रेश्वर शोकमग्नधी होय,
तो यत्नें मन आवरि, अनुजा दे सागरीं तोय. ८७
"शतयोजनाब्धिपारीं लंकेंत दशाननें हृता आहे
सीता, सुदूरदर्शी गृध्र म्हणुनि हा तितें पाहे. ८८
कपिहो! वधी अधर्में ज्या काळीं देवराज वृत्रास,
आम्हांपासुनि भंगे, पावे तो वज्रभृत् त्रास. ८९
सूर्याकडे बळमदें आम्हीं भ्राते उडोनि जों गेलों,
रविच्या उग्रें तेजें व्याकुळ दोघे नभीं केलों. ९०
पोटाखालीं धरिला म्यां अनुज जटायु, कीं म्हणे 'रक्ष'.
पक्ष जळाले माझे, जैसें दावानळें कक्ष. ९१
पडलों या चि महेंद्रीं, मज[ला] मद्बळ चि ताप दे, वांचे
जीवित, वाटे झाले पतिभंगीं शाप देवांचे. ९२
वारुनि ताप निशाकरमुनि सांगे, 'या नगीं असा चि रहा,

१. भयंकर शासनाला. २. भ्याले. ३. मागें आर्या ४०, टीप पहा. ४. नजर-चुकीनें हें पद्य गीतिवृत्तांत रचिलें गेलेलें दिसतें. ५. मी.

रामप्रभु हि म्हणेल स्त्रैण[1] नर जसा तसा चिर ‘हा!’ ९३
तद्दूत श्रीसीताशोधा येतील ऋक्ष कपि योध,
त्या अतिचिंतार्तातें जेव्हां कथिसील तूं शोध, ९४
तेव्हां तत्काळ तुझे फुटतिल हे दग्ध पक्ष नव दोन,’
गेला आणिक कांहीं तो सुतपोदक्ष न वदोन. ९५
सीताप्रवृत्ति कथिली, कपिहो! मज पक्ष हे पहा आले!”
ऐसें कथुनि उडे तो, अंगदमुख हरि सुखी झाले. ९६
अतिदुर्घट शतयोजन सिंधुविलंघन, सचिंत कपिलक्ष;
‘जाइन, येणें नुमजें’ वालिसुत असें वदे दक्ष. ९७
त्या जांबवान् म्हणे, ‘बा! तूं स्वामी, राजपुत्र साजावें,
त्वां आज्ञा करुनि यशें प्रेष्यजनें साहसा जावें.’ ९८
मारुतितें स्तवुनि कथी अत्यद्भुत जन्म कर्म ऋक्षप हा,
‘बा! तूं वसंत, सफळ चि करिसिल संकल्पवृक्ष पहा. ९९
प्रभुचें कार्य करावें बा! त्वां न घडावयासि कुत्सा हें,’
ऐसें म्हणतां चि उडे वातात्मज वीर उत्साहें. १००
त्या अंजनातनूजा प्रभुमार्गणगरुडपवनवेगा ते
गाती धांवत येउनि आनंदें नवनवे गाते. १०१
द्याया विश्राम उठे मैनाकाचळ, तया उरें ताडी,
मानुनि विघ्न स्तंभा स्तंबेरमसा[2] तळीं पाडी. १०२
शतयोजन मुख पसरी सुरसा, त्यामाजि मग समा[3] नवती[3]
गांवें[3] स्वतनु तनु[4] करुनि शिरुनि निघे, देव मानवती. १०३
छाया धरूनि वोढी यासि गिळी सिंहिका, तिला मारी;
सागरपारा पावे, हें कर्म नसे तया भारी. १०४
लंकाधिदेवतेतें भंगुनि रजनीमुखीं[5] पुरीं शिरला,
अंतःपुरांत ही तो सीता शोधावया फिरला. १०५

---

१. मागें आर्या ४०, टीप पहा. २. हत्तीसारखा. ३. नव्वद गांवांएवढें. ४. सूक्ष्म. ५. सायंकाळीं.

होउनि सचिंत हनुमान् हुडकी अंतीं अशोकवन उरलें,
त्यांत श्रीतें पाहे, हुरलें भय, इष्ट तें पुरलें. १०६
तों रावण ये श्रीतें प्रार्थाया, कपि वनीं दडाला हो!
अरिस सती धिक्कारी, 'नाश' म्हणे 'तुज जडाला हो.' १०७
तो राक्षसींस सांगे, 'बोध करा, मासयुग असे अवधी,
मग मानुषी मला द्या खाया हे, जंरि[1] नव्हे नव धी. १०८
तो[2] कोठें? हे[3] कोठें? त्या नरतेजें पहा कसी उडती?
त्यजुनि सुख, दुरभिमानें मुग्धा दुःखीं बळें बुडती.' १०९
तो जातां रात्रिचरी म्हणती, 'सीते! न सर्प[4], दारा हो
राज्याची; तैज्जीवित[5] भोगाया संपदा राहो.' ११०
सीता म्हणे, 'रहा गे! दासीनीं भव्य[6] काय सांगावें?
हंसीनीं निजहंसा काकीनीं वायसां गावें.' १११
दासी म्हणती, 'म्हणत्ये राजाहुनि अधिक कीं नरा! खावी,
मोटी खोटी कोटी, प्रभु निंदी, हे न राखावी.' ११२
त्रिजटा म्हणे, 'कुमतिहो! वांचा साध्वीस हात जोडून,
म्यां स्वप्न देखिला दशमुख मरतो धर्म सोडून.' ११३
उद्बंधनें[7] मराया वेण्युद्ग्रथनें[8] सती गळा बांधी,
कां धीर कपि उपेक्षिल? तुटली आशा पुन्हां सांधी. ११४
प्रभुतें स्तवूनि वंदुनि मुद्रा दे, कुशळ वृत्त आयकवी,
तच्चूडामणि घेउनि, पुसुनि निघे वीरराय कवी. ११५
वन मोडी, वनपाळप्राण हरी काळसा, महाबळ हा,
कळहा करि, वधि अक्षा, बहु मथिले, बोलिले खळ 'हा!' ११६
घननादब्रह्मास्त्रा दाटुनि घे सांपडोन बांधून,
नेती सभेसि, म्हणती, 'खावा हिरवा, न रांधून.' ११७

---

१. हिची बुद्धि पालटली नाहीं तर. २. राम. ३. ही सीता. ४. मरण पावूं नको. ५. येथें 'त्वज्जीवित' असा पाठ अधिक सरळ झाला असता काय? ६. कल्याण. ७. गळफांसानें. ८. आगवळानें.

पुसतां कथी दशास्या, 'शूर्पणखाघ्राणकर्ण कापविता
खरहंता मत्स्वामी श्रीराम खळांसि तापविता. ११८
मीं वातसुत हनूमान् दूत, श्रीजानकी पहायास
आलों, देखुनि धालों, सार्थक झाला महायास. ११९
प्रभुचें स्त्रीरत्न तुवां बहुधा न कळोनि आणिलें चौर्यें,
शौर्यें राम अधिक, दे, मरसील स्पष्ट तूं क्रौर्यें.' १२०
या वाक्यें पुत्रवधें वनबळभंगें अरी करी क्रोध,
मारुतिस म्हणे, 'प्रभुला करिसी तूं माकडा! बोध. १२१
मीं सर्वरत्नभोक्ता, विषयीं शक्र स्मरोनि न रते ज्या,
त्या मज विश्वप्रभुला भिवविसि वर्णूनि नरतेज्या.' १२२
क्षोभे, बडबड करि, घे त्या मारायासि खड्ग पूतातें,
साधु बिभीषण विनवी, 'बा! मारावें न दूतातें.' १२३
तो राक्षसांसि सांगे, 'स्नेहार्द्रपटेंकरूनि पुच्छातें
वेष्टुनि पेटवुनि पुरीं फिरवा, द्या दंड तुच्छातें.' १२४
केलें तसें चि अरिनीं; कीश मनीं, स्पष्ट दुष्ट तो, हांसे;
कां सेना हर्षेना न गणुनियां मृत्युचे फांसे? १२५
होय प्रदीप्त, सीतासंप्रार्थित वातसखे न या पोळी,
होळी करि लंकेची हरि, कर तो दुष्टधी चोळी. १२६
मारुति म्हणे, 'बिभीषणगृह रक्षीं, दे सुतासि वर, कढवा
लंकेसि करीं, दहना! तुज दिधले सर्व वरकड बा!' १२७
विझवी पुच्छ समुद्रीं लावूनि म्हणावया अरिस 'हाय!'
लंघुनि सागर भेटुनि ते सर्व सुखी करि सहाय. १२८
राजप्रियमधुवन तें मार्गीं सुसमृद्ध लागलें लुटिलें,
कुटिलें बळ दधिमुखसह, वनपाळें कळविलें कुटिलें. १२९
कृतकार्य असें समजुनि सुग्रीवें सैन्य शीघ्र आणविलें,
मारुतिनें चूडामणि देउनियां भव्य जाणाविलें. १३०

---

१. वायुमित्र अग्नि. (हें पद सहेतुक आहे).

आलिंगन दे प्रेमें श्रीराम प्रभु उठोनि भृत्यातें,
वर्णी असकृत् त्याच्या हरेषुच्या तेंवि कृत्यातें. १३१
देवांशर्क्षकपिबळें घेउनि गेला समुद्रतीरातें,
शरण बिभीषण आला ससचिव लोकैकवीरातें. १३२
अपमानिला दशास्यें, 'सीता द्यावी' नमूनि वदला हें,
नमितां चि म्हणे त्यातें प्रभु, 'लंकाराज्यपद लाहें.' १३३
आधीं मनुष्य मानी, अस्त्रें तापोनि सिंधु कर जोडी,
'नळ करु सेतु, धरिन मीं' म्हणतां चि प्रभु तया सोडी. १३४
पांचा दिवसांत रचुनि शतयोजन सेतु उतरला पारीं;
तीं तत्त्वयामकाळें[1] सिंधुसि लंघिति बळें सारीं. १३५
प्रभु चढुनि सुवेळाग्रीं लंकेतें, कपिचमूसि अरि पाहे;
प्रथम चि सुगळ तयातें भंगी, तद्घा न तो साहे. १३६
प्रभु निजबळें पुरीतें वेढुनि सामार्थ अंगदा प्रेषी,
राक्षस च्यार वधुनि ये, मारित होता चि या द्वेषी. १३७
दारुण रण प्रवर्ते, कपिराक्षस नाश पावले कोटी,
मोटी हानि न मानी, खळबळ काळाननीं लोटी. १३८
सेनापति प्रहस्त प्रथम मरे, तो दशास्य ही भंगे,
ती प्रभुची कीर्ति म्हणे, 'मत्सम धवला न तूं गंगे!' १३९
मग घनरव मायावी अहिपाशानीं मथूनि सेनातें
करि बद्ध दाशरथि, घे यश जें कोणा हि येना तें. १४०
ती पुष्पकांत वाहुनि रावणवाक्यें सती रणीं नेली,
मूर्छित रघुवीरांच्या शोकें श्री घाबरी केली. १४१
त्रिजटा[2] सांगे, 'दोघां वीरांच्या तेज आननीं आहे,
वैधव्यदोष नाहीं, तरि च तुज विमान हें वाहे. १४२
केली रावणपुत्रें घननादें नागपाश हे माया,
नाहीं त्वत्सौभाग्या रणदहनीं नाश हेमा या.' १४३

---

१. पंचवीस प्रहरांत. २. मागें आर्या ४०, टीप पहा.

त्रिजटेनें सांत्वुनि ती देवी नेली पुन्हां अशोकवनीं,
झाला शोक तिला जो [1]माझ्या तों ये न तो कवनीं. १४४
गरुड हरी नररूपप्रभुफणिपाशव्रणव्यथा, राज्या
होय सुख तया, त्रिजगीं रामावांचुनि न थारा ज्या. १४५
दाशरथि बहु बळक्षय करिति, तदा सर्वमारणा जागा
घटकर्ण करी, दशमुख सांगे, 'हो पारणा, जा गा!' १४६
तो मारीत चि सुटला अतिभीषण अद्रिसा महाकाय,
पळति कपि, म्हणति, 'काळ [2]प्लवगाशनकाम हा काय?' १४७
मूर्छित कपिराजातें धरि, परते कुंभकर्ण असहाय,
म्हणवी सुरांसि त्याचा अत्यद्भुत वीररस 'हाय!' १४७
सावध होवूनि सुटे, तत्कर्णघ्राण [3]कीशहीर हरी,
'जय! जय!' ऐसें वदले देव हि, केवळ न वीर हरी. १४९
जो सुरपराभव करी, बहुत विटंबी रणीं हरीश तशा;
परते पर तेजस्वी, सगळे गिळि, संहरी शतशा. १५०
तरुनीं गिरिशिखरानीं गिरिनीं ताडिति तयासि कपि कोटी,
वारि पडतां ही न गणी शक्ति असी यातुची मोटी. १५१
जैसा सुग्रीव बळा झाला प्रेक्षक हि सर्व तापविता,
प्रभुवर शर धरिति तया भेदाया पर्वता पविता. १५२
जे बाहु पाद मस्तक घटकर्णाचे रघूत्तम च्छेदी
ते दीर्घकाळ चुरिती कपि करिति कवीश्वरा खेदी. १५३
बंधुवधें 'हाय!' म्हणुनि केले अन्याय आठवी राजा,
रडत म्हणे 'न, न वधितां लोकाधिप आठ वीरों! जा.' १५४
स्वपराक्रम कथुनि तया तत्सुत घननाद धैर्य दे, वारी,
तो सबळ दाशरथि करि मूर्छित मायाज्ञ देवारी. १५५
धुंडिति बिभीषणपवनसुत रात्री, पुसति ऋक्षपा जीर्ना,

---

१. कवीच्या. २. वानरभक्षणेच्छु. ३. वानराधिपति सुग्रीव. ४. कुंभकर्णा! ५. वृद्ध अशा.

तो कथि, 'जीवनें[1] मारुति कां श्रितसुरवृक्ष पाजीना? १५६
धाडी महौषधींतें कैलासानिकट वृद्ध आणाया,
आणी शिखर चि, गुंते कवि जाणाया न खाणाया. १५७
झाले विशल्य निर्व्रण निर्मोह अशेष ते शिखरवातें,
भीतें पक्षिपतीच्या अतिदारुण ही विख रवातें. १५८
तें शृंग स्वस्थानीं स्थापुनि आला पुन्हां, तदा सुर या
वर्णिति, म्हणति, 'असावी अतिवृद्धि तुझ्या सदा सुरया[2].' १५९
सुत बंधु सचिव मेले, उरला घननाद मत्त मायावी,
'सीता' म्हणे 'पितृ[3]करा, सोडुनि रघुसत्तमा, यावी.' १६०
मायामयी जनकजा युद्धीं रघुवंशनंदना दावी,
मारी, म्हणे, 'यमगृहीं हे[4] चिर रे मंद! नांदावी.' १६१
शोकार्णवांत बुडवी हनुमत्सुगळादि लक्ष मायावी,
तों ये बिभीषण, म्हणे, 'भ्रांति जडा अक्षमा यावी. १६२
हें घनरवकृत कपट, स्वस्था आहे सती, अहो! माया
कां नुमजा प्रभुजी!? त्या द्यावा अवसर न होमाया. १६३
ब्रह्मवरें साश्व रथ प्रकटाया होम तो करायाला
गेला, अमर चि होइल, आटेल न लोकरायाला.' १६४
लक्ष्मण बिभीषणानें नेला, मग देवसत्तमा रविला
आनंद कुलजविजयें व्हाया तो मत्त मारविला. १६५
देवी निकुंभि[5]ला ज्या स्थानीं, तेथें चि लक्ष्मणें मथिला,
'हाय!' म्हणे रावण हा सुतघात जैसा[6] चरें कथिला. १६६
शमला पराभवज्वर निःशेष महाबळारिच्या पातें,
हर्षोंनि लक्ष्मणाच्या बहु गाय बळारि[7] चापातें. १६७
सर्वस्वविनाशाचें कारण सीता असें मनीं पाहे,
साहेना भंग, निघे श्रीघाता असि करीं वाहे. १६८

---

१. अन्वयार्थ? २. उत्तम वेगास. ३. रावणाच्या हातीं. ४. ही. ५. निकुंभिल-स्थानाची देवता. ६. जेंव्हां. ७. इंद्र.

त्या असिधरासि पाहुनि होय अशोकीं महासती भीता,
सीता आठवि हृदयीं गजवरवरदा जगद्गीता. १६९
त्या तन्मंत्री वारी, 'रामवधें होय वध इचा, राहो
स्त्रीघात, तुम्ही सुज्ञ प्रभुजी! न परा विचारा हो!' १७०
परते पर तेथून, प्रेषी चतुरंगिणी चमू, हानी
प्रभुची करावया; ती वधिली प्रभुशरसमूहानीं. १७१
बहुकोटि सैन्य मथितां आपण चि निघे रणा दुरभिमानी,
दुर्बुद्धि आपली जी तीतें जड तो सुरभि मानी. १७२
कथिति महोत्पात, 'रहा, रे! काळाचा हठें न हो ग्रास,'
साम न करि, रामप्रभुतेजा न गणी महोग्रास. १७३
दारुणतर समर करी, सौमित्रिस शक्तिनें उरीं ताडी,
पाडी मूर्छित कपिबळ खळ, बहु काळाकडे धाडी. १७४
लक्ष्मणपतनें क्षोभे, बळ मथुनि करी दशास्यभंगातें;
काढुनि शक्ति म्हणे 'हा!' प्रभु आलिंगुनि तदंगातें. १७५
करि बहु विलाप राम प्रभु, मारुतिच्या मुखांबुजा लक्षी,
तों चि शिखर तें आणी, भक्तोत्तम लक्ष्मणा रक्षी. १७६
दिव्यौषधिरसनस्यें[१] उठवी त्यातें सुषेण, हा जागा
निर्व्रण होय, विभु म्हणे, 'शृंग पुन्हां पाव बा! जा, गा!' १७७
प्रभु आपणासि बहीं मीन, तया मेघ तोयराशि वदे,
ऐसा व्यसनीं न पिता काय सखा सोयरा शिव दे? १७८
करिति समरयज्ञाच्या निववाया दृष्टिकान आरंभा;
त्या वीररसासि शची ही करि, करि कां न 'आ' रंभा? १७९
निज रथ सारथि धाडी शक्र, अहोरात्र सप्त रण अरिसीं
करि, जेंवि सिंधुरासीं[२] सिंधुर कीं हरि जसा हरिसीं. १८०
श्रीराम रावण रणीं झाले क्षतजार्द्रदेह शस्त्राहीं,
अस्त्राहीं इतरेतर झांकिति हे जेंवि वस्त्राहीं. १८१

१ नाकाचे द्वारां द्यावयाचें औषध. २. हत्तीबरोबर.

दशवदनशिरें शत जीं प्रभुबाणाहीं रणांगणीं तुटलीं,
सुटलीं न धडापासुनि, ऐसीं गमलीं नवीं फुटलीं. १८२
प्रभुला चुकतें लक्ष्य स्वास्त्रबळविपर्ययें असें गमलें,
श्रमलें भुजयुग, किंवा तें पाहुनि सुरमन भ्रमलें. १८३
तों घटजमुनि प्रकटे, त्याच्या नमि कपटमनुज[1] पायाला,
तो योगीश्वर सांगे सूर्यहृदयमनु जपायाला. १८४
जपतां हृदय रवि म्हणे, 'चिंता करितोसि कां महाबाहो!?
माझ्या वरप्रसादें पूर्ण तुझा काम हा बा! हो.' १८५
ब्रह्मास्त्रें अभिमंत्रुनि शर मग जगदीश शत्रुवरि सोडी.
त्या अत्यंतकठोरा परमशठोरा[2] पळें फोडी. १८६
तो पाडिला प्रभुशरें, पाडावा प्रबळ तरु जसा वातें,
'केलें जें' विश्व म्हणे 'भूतद्रोही[3] नसावा तें.' १८७
त्या अत्यद्भुत विजयीं सुरदुंदुभिराज वाजला, गाया
यश नारदमुनि लागे, अमृतरसा लाज लागाया. १८८
केल्या देवर्षींनीं दिव्यकुसुमवृष्टि राघवावरि, त्या
पाहुनि ज्या मेघांच्या त्या झाल्या लाघवा[4] वरित्या. १८९
करि सुरवृंद प्रभुचें, श्रुतिवृंद जसें तयासम स्तवन,
प्रभु तो वसंत शोभवि तें करुनि दया समस्त वन. १९०
सुर मुनि मयूर चातक, मेघ प्रभु, अप्सरा विजा लास्यें[5],
हास्यें करिति, निववित्या प्रभुच्या चंद्राधिकें आस्यें[6]. १९१
सांगुनि बिभीषणाला प्रभु बरवी रावणक्रिया करवी,
हरवी नरक. हितकरी सद्रस माता बळें भरवी. १९२
राज्यपदीं बैसविला दास बिभीषण महादयानिधिनें,
अभिषेक करविला, निज अनुजा सांगोनियां विधिनें. १९३
श्रीसीता दिव्य करी, भेटे प्रेमें पिता जसा पाहिला;

१. राम. २. मोठा धूर्त त्याचें वक्षःस्थळ. ३. जीवद्रोही. ४. अल्पत्वाला. ५. नृत्यें. ६. मुखानें.

सांगे, 'सुखवीं महिला, रक्षीं धर्में नयें महिला.' १९४
शक्रें 'वर माग' असें म्हणतां मागीतला जगद्धटकें[1]
'कटकें उठीव;' उठल्या मरण क्षण भासलें लटकें. १९५
प्रार्थी प्रभुसि बिभीषण 'पूजा घेवूनि शुचि करीं धाम.'
'सबळसुगळपूजेनें बा! पूजित मीं' म्हणे राम. १९६
'अवकाश अल्प उरला, दूर पुरी, अवधि लंघितां भरत
सानुज मरेल, आहे समयीं मद्दर्शन स्मरत.' १९७
लंकेश सबळ सुगळा पूजुनि पुष्पकविमान देवातें
अर्पी, जें सुख गंधें नादें बहु हर्ष दे वातें. १९८
सबळ सुकंठ बिभीषण बसउनि सानुज सदार सुरयानें[2].
त्रिजटा सरमा निबवुनि फार, निघे राम सुरयानें[3]. १९९
त्या पुष्पकें विमानें क्रमितां सानंद अंतरिक्षपथा,
अंकीं घे सीतेतें, प्रभु सांगे सर्व युद्धकथा. २००
'दिनपंचकें नळानें शतयोजन सेतु निर्मिला, रुंद
सुंदरि! हा दशगावें, येणें आलें जया तुंद. २०१
देवि! बिभीषण मज या उत्तरतीरीं दया करी, भेटे;
याची नीति व्याघ्री, आम्ही दोघे तिचे पेटे. २०२
या ऋष्यमूकगोत्रीं मारुतिनें मज सुकंठ भेटविला,
याणें प्रताप वातें ज्वलन तसा देवि! पेटविला. २०३
सुमुखि! विलोकीं इकडे हे किष्किंधा गुहा, इतें वाळी
पूर्वी, आतां माझा प्रियसख सुग्रीव हा पाळी.' २०४
आलिंग्वें बाहून श्रीतारा पुष्पकांत वाहून,
हर्षातें लाहून, प्रभुसि पुसे पाय पाहून. २०५
प्रभु सांगे, "हे पंपा त्वद्विरहीं देवि! दे मला कंपा,
वदलों 'असुहो! संपा' तूं मज मेवा जसी शंपा. २०६
देवि! मतंगाश्रम हा, येथें बहु हृष्ट मज करी शबरी,

१. सृष्टिकर्त्यानें. २. देवयान जें पुष्पक त्यानें. ३. मोठ्या वेगानें.

निर्वृति[1] वरि हा तसि, आसि पावुनि सरसी करीश बरी. २०७
येथें कबंध राक्षस आम्हां दोघांसि देवि! धरि खाया,
त्वत्प्राप्त्युपाय सांगे तो, होउनि दिव्य, हरिखाया. २०८
गोदावरी पहा हे, पंचवटी हे त्वदीय दलशाला;
मुनि या पदा जपति, सुर जैसे पीयूषकलशाला. २०९
सीते! देवि! पहावा ज्याचा आश्रित जटायु हा वड तो,
माझ्या दृष्टिस तातप्रासाद तसा चि आवडतो." २१०
घटजाश्रम अत्र्याश्रम दावुनि जगदीश जानकीस मग
सांगे, 'मुनिहित तो हा देवि! पहा चित्रकूटनग.' २११
प्रभु मग दावी गंगायमुना तत्संगमप्रयागा ती
स्वपुरी हि सच्चारित्रा प्रेमें सद्विप्र या गाती. २१२
उतरे प्रभु प्रयागीं नमुनि भरद्वाजपादराजीवें,
राहे, धरुनि तरावें यन्नामजपादरा[2] जीवें. २१३
गुह भरत हर्षवाया मारुतितें पाठवी पुढें राम,
हा मतिमान् पूर्ण करी 'आला प्रभु' हें कथुनि काम. २१४
वनवास [3]तीर्थराजीं पूर्ण करी [4]भक्तसुरनगाराम,
निघुनि म्हणे 'गुहपुर गा, शक्राचें पुर न गा' राम. २१५
भेटुनि गुहासि भेटे सानुज भरतास गुरुस मातांस
सचिवांस पुरजनांस प्रेमें सुत जेंवि तातांस. २१६
विधि हर शतमख सुरमुनि बहु सुरतरुपुष्पवर्ष लाख रची,
कनककुसुमवृष्टि करी पुरजन, धन हर्षेला खरची. २१७
मानुषरूप सुवेषप्लवगर्क्षनिशाचरस्वबंधुसह
स्वपुरीं प्रवेश करितां राम प्रभु होय मूर्त मह. २१८
करिती प्रभुवरि पौरस्त्रीकन्या कोटि वृष्टि लाज्यांच्या,
दृध्यक्षतरत्नांच्या पक्ष्म अहित दृष्टिला ज्यांच्या[5]. २१९

---

१. सुख. २. ज्याच्या नामाच्या जपाविषयीं आदराला. ३. प्रयागीं. ४. भक्त-कल्पवृक्षोपवन असा राम. ५. पापण्यांचें लवणें ज्याना शत्रूप्रमाणें दुःसह झालें.

राज्याभिषेक केला प्रभुसि वसिष्ठें महोत्सवें विधिनें,
सर्व प्रज्या सुखविल्या राजा होउनि दयानिधिनें. २२०
ऋक्ष प्लवग निशाचर तत्पति सद्वस्त्ररत्नकनकांहीं
गौरविले श्रीरामें, जेंवि तसे ते न जनकांहीं. २२१
मारुतिला सत्कारुनि मोक्षसुख जिहीं असे दिले वर, हो!
वदला प्रभु, 'मत्सम तूं सत्पूज्य सदा इलेवर हो.' २२२
श्री दे मणिहार, म्हणे, 'प्रभुयश ऐकत असें चिरंजीवें[1].
अस्मन्मन रंजविलें सद्धृदय असें चि रंजीव.' २२३
पाहे[2] प्रजा बहु सुखी कोठें ही न अज रामरायाच्या
राज्यांत सदा धन्या वर्णी अजरामरा याच्या. २२४
संपेना कोणाची जरि म्हणति वदान्य 'संप दानांहीं.'
बहु राज्यें त्यांमध्यें परि ऐसी संपदा नाहीं. २२५
शास्त्रा तसे चि जाणति चवघांचे पुत्र आठ वेदास.
प्रभुला तसा तयांला स्वधर्मी ही आठवे दास. २२६
शत्रुघ्न वीर लवणा अंतातें कां न ने? कविप्रहित
श्रीरामें जो शरसा क्षिप्र करि अनेकविप्रहित. २२७
गंधर्व तीन कोटि श्रीशाज्ञेकरुनि आशु भरतानें
वधिले, स्तावक[3] केले सुर भूसुर या शुभरतानें. २२८
कुश लव सुत सीतेचे, वाल्मीकिकवीश्वरें प्रिय छात्र
शास्त्र श्रुति स्मृति श्रीरामायण काव्य या पात्र २२९
आठ हि केले प्रभुनें स्वसमबळज्ञानवर्ण ते राजे,
ज्यांच्या सदैव हि मुखीं सन्मनुचे[4] वर्ण तेरा जे. २३०
यज्ञ अशेष करुनि सुर विप्र सुखी श्रीरघूत्तमें केले,
नेले ताप दिगंतीं, अर्थी होउनि धनी गेले. २३१
ताताकडे विमानीं बैसवुनि प्रथम पाठवी माता,

१. चिरकाल जीवंत रहा. २. अन्वयार्थ? ३. स्तुति करणारे. ४. उत्तम राम-नाममंत्राचे.

धाता पूजी त्यातें झाला देवर्षि ही गाता. २३२
सर्वांतें ताराया यश विस्तारुनि जगीं मरुत्तनया
ठेवी; प्रभुचा महिमा निरुपम, पावे मरुत्त न या. २३३
प्रभु राज्य असें धर्में करि एकादशसहस्रहायन हो!
'व्याकुळ' म्हणे 'स्वविरहें कोणी हि वदोनि 'हाय!' न हो.' २३४
सर्क्ष कपि सुकंठ सगज हयपशुशुकसारिकादि खग पौर
दिव्य विमानीं बसवी, करि यश शिवहास्यसें गौर. २३५
सानुज रामप्रभु ही सरयूंत स्नान करुनियां विष्णु
झाला, स्तविती पुष्पें वर्षुनि विधि कामजिज्जिष्णु. २३६
संतानकलोकीं त्या पौरांतें देवदेव हा स्थापी,
या वैकुंठयशातें मोक्षेच्छु धरूनि आस्था पी. २३७

## [उपसंहार]

(स्रग्धरावृत्त)

आद्या आर्या कवीड्या अतितरमधुरा प्राकृतीं हे न आली,
झाली देवी प्रसन्ना प्रभुचरितसुधासिंधु सेवूनि धाली,
आली श्रीमच्छितेची निजशिशुवचनीं आदरें चित्त घाली;
व्याली दे पांडुपुत्रा मुनिशतसुहिता भानुची भक्ति थाली. २३८
'आद्यार्यरामायण' हें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. २३९

इति रामनंदनमयूरविरचितं संपूर्णम् ।

---

१. राजविशेष. २. शिव व इंद्र. ३. कवींना स्तुत्य. ४. श्रीसीतारूपी लक्ष्मीची आलि म्ह० सखी सरस्वती. ५. समाधानकारक अर्थ लागत नाहीं.

# मंत्ररामायण

( क्रौंचपदावृत्त )

श्रीपति देवप्रार्थित झाला दशरथनृपसुत दशमुखकदना,
अंश तयाचे बंधु तिघे ते सुरुचिर करिति विगतरुचि मदना.
अग्रज राम प्राज्यगुणश्री तदनुज भरत महित कारि सदना,
लक्ष्मणनामा आणि रिपुघ्न प्रविकसविति निजगुरुजनवदना. १
गाधिज रामा लक्ष्मणयुक्ता, रघुकुळवरदशरथनुति कारि, घे,
तत्सव रक्षी; ब्राह्मणचित्तीं निशिचरकृत भय तिळभरि न रिघे.
गौतमभार्या उद्धरि राम प्रभु, हरधनु चुरि, वारि जनकसुता.
कौशिकवाक्यें त्या हि तिघां दे रैवसदनुजनितनुजनि विबुधनुता. २
दे भृगुरामा शांति, पुरा ये, प्रमुदित कारि गुरुपुरजनमतितें;
केकयकन्या ती वर मागे बहु कठिन वदुनि अडवुनि पतितें.
'राम वनातें जाउनि वर्षें वसति करु वरुनि मुनिपथ चवदा,
तोंवरि राजा होउनि राहो भरत; अजि! वचन इतर न च वदा.' ३
लक्ष्मणसीतायुक्त निघाला प्रभु, वन वारि, गुरुवचन कारि खरें.
भूप म्हणे 'हा!' तन्महिषी ही, पुरजन वदति, 'नृपतिकृत न बरें.'
राजरथें ने सूत सुमंत्र, त्वरित निरखि रघुपति सुरसरिता;
भेट गुहा दे जो न भरून त्रिजगदधिप गुणमय सुरस रिता. ४
लंघुनि गंगा राम भरद्वाज मुनि नमुनि वरशिखरगिरिवरी
ब्राह्मणवृंदीं पर्णगृहातें रचुनि वसति ऋषिसम नियम करी.
हें गुह सूता, सूत नरेंद्रा कथि, दवदहन चि गणि सुतविरहा;
भू तनु सोडी, स्वर्गीत जोडी नृप शतमखसख हि म्हणुनि चिर 'हा!' ५
सानुज आला मातुळगेहाहुनि भरत, कळवि निजकृत जननी;
'हाय!' म्हणे तो, तीस म्हणे, 'गे! न वचकलिस गुरुकुळसुतहननीं!

---

१. निस्तेज. २. नुति=स्तुति. ३. आपल्या सुशील धाकट्या भावाच्या मुळें.

मेळविलें त्वां दुर्यश दुष्टे! श्रितहित रघुपति दवडुनि गहना,
तूं बरि आलि स्वाश्रयनाशें अतिखरतरमति गमसिल दहना.' ६
उत्तरकार्य क्षिप्र करूनि स्वगुरुसचिवजनसह भरत निघे,
भेटि गुरूची तो तासि, जैसी चिरविरह विकळमति तनुजनि घे.
देउनि ताता पिंड, सुभक्ता[1] प्रभु कथि, 'जनकवचन करुनि वनीं
येइन, रक्षीं तोंवरि भूतें, सुकृतयश मिळिव, धृति वसिव मनीं.' ७
देउनि पादू पाठवि मागें; तप करित चि पुर न वरुनि वसला.
वंदुनि सिंहस्थानग पादू, यतिमुनिनियम धरुनि दृढ वसला.
अत्रिस भेटे राम निघे तो, जयिं मुनियुवतिस सुमति अवनिजा.
दे अनसूया श्रीस उटी, जी सुख कवळवि बहु सतत नव निजा. ८
मुक्ति विराधा दे परमोग्रा, मुनिजननिशिचरभय सकळ हरी,
ब्रह्मपदातें ने शरभंगा, प्रमुदित बहुशत अवनिसुर करी.
घे घटजाची भेटि, सुतीक्ष्णा निववुनि निजधनुशरसदासि वैरी,[2]
तातसखा जो गृध्र तयातें प्रभुवर बहुत चि सुखवि गुरुपरी. ९
पावुनि गोदापंचवटीतें मुनिसम अवरजकृतदलसदनीं[3]
राहुनि पाहे राम निमित्त प्रबळरजनिचरदशमुखकदनीं.
तद्भगिनी ये शूर्पणखा ती कपटरुचिरतनु 'हरिस हि न कटी
हे असि' बोले, श्रीस हि हांसे, तिस करि भगवदनुज बुध नकटी. १०
ती खर धाडी, त्या सबळातें रघुकुळवरखरतरशर माथिती,
ते दशकंठा हानि घडाया निशिचरकुळसह अघमति कथिती.
तो खळ मायाहेमकुरंगें क्षितितनुजनिमन अतिरुचिर हरी,
त्यासि धराया पाठवि कांता, तदनुगमन करि वनिं सुचिर हरी. ११
राक्षस जाणे त्या प्रभु, ताडी कनकतनुसि अतिजवनखरशरें.
'हा! सति सीते! हा! प्रियबंधो!' म्हणुनि वारिलि मृति कपटिनिशिचरें.
तो स्वर मानी आर्तपतीचा, क्षितितनुजनि मृदुमति गडबडली.

---

१. भक्ता–पंत. २. सीताघातक समजून गृध्रावर प्रथम हत्यार उपसलें. ३. अवरज=धाकटा भाऊ.

लक्ष्मण रक्षाछद्म[1] कथी, त्या गुरुहितरिपु समजुनि बडबडली. १२
देवर तीतें सोडुनि गेला रडत गहनगत सदय गुरुकडे.
तों उटजीं ये, रावण ने, ती स्मरुनि जनक[*]पतितद्वरज रडे.
सोडवि गृध्र श्रीस, यशें त्या त्रिभुवन सकळ हि बहुत चि धवळे.
तोडुनि पक्ष क्रूर पळे तो, क्षत विरथ रजनिचरवर खवळे. १३
'हाय!' म्हणे श्री, वस्त्रविभूषा त्यजि शरमित[2]कपियुतधरणिधरीं,
रोधिलि लंकेमाजि अशोकीं, वदलि अरिस 'मरसि, न अनय करीं.'
लक्ष्मण भेटे, वृत्त कथी, 'हा!' कपटमनुजतनु सद्भयद वदे;
या दयितेचा ताप वियोग द्विपपतिस[3] गहन कवळुनि दव दे. १४
तातसखाचें उत्तरकार्य प्रभु करि, पुनरपि वन[4] वनं[4] हुडकी,
कीर्ति जयाची शंकर[5]मुख्यश्रुतबहुमत, सुरुचिररुचि[6] कुडकी.
मुक्ति कबंधा दे जगदीश, स्वपद्भजनरुचि जिस अनिश[7] बरी
उद्धारि भोळी भक्षुनि बोरें सदयवरद रघुपति वानि शबरी. १५
पावुनि पंपा आठवि सीता, प्रकट करि अजित विरहिजनगती;
लक्ष्मण बोधी, भव्ययशोधी प्रभु मग सुखवि धरुनि धृति जगती.
मारुति भेटे, भेटवि भर्ता रवितनय सुगळ, रघुवर हि करी
सख्य तयासीं, तो नग दावी, प्रभु नयन पुसुनि हृदयगद हरी. १६
'मीं तुज देवी भेटवितों' हें वदुनि सकळ निजपरिभव हि कथी,
स्त्रीहर याचा अग्रज जो त्या प्रणतपरमहितरत अजित मथी.
राज्य कपींचें साधुनि देतां सुगळ मिळवि महिवरिल बहु बळें,
त्यां कथि, 'सीता सत्वर शोधा हारिलि कपटपटुदशवदनखळें.' १७
अंश सुरांचे ते प्लवगर्क्ष क्षितिवरि हुडकिति वन गिरि जळधी,
दिक्त्रय आले धुंडुनि, नाहीं दिसलि अवनिजानि[8] न परम[9]मळधी.
सैन्य यमाशा शोधुनि चिंता करि रघुपतिधन[10]पदवि न कळतां,

---

१. राक्षसकपट. २. पांच वानरानीं युक्त अशा पर्वतावर. ३. गजाधिपाला. ४. जळस्थळ. ५. शंकरादि देवाना श्रुत [व] बहुमत अशी. ६. कीर्ति. ७. नित्य. ८. सुता सोडवील–पंत. ९. शुद्धबुद्धि. १०. सीता. * जनक, राम व लक्ष्मण यांस.

सिद्ध मराया सर्व हि झाले पतिकृतअवधिदिवसगण टळतां. १८
शोध जटायुज्येष्ठ कथी, दे स्थविर विधितनुज बळ पवनसुता,
शंभर गांवें सिंधु विलंघी, प्रकटि गति सकळ खगमहिपनुता.
अद्रि उरानें ताडुनि पाडी, रिघुनि निघुनि वदनीं ठकवि सुरसा;
सावळि ओढी जी तिस मारी कविशतनुत पवनज गुरु सुरसा. १९
शोधुनि लंका श्रीस विलोकी; दशमुखकुवचन परिसुनि महिजा
कोपलि 'धिक्!' त्या बोलिलि, उग्रा वचकति बहुत नयनविष अहि ज्या.
होय सतीच्या अद्भुत तेजें प्रमुदित कपि; मग कुमति निशिचरी
गांजिति, सोसी. देति समुद्रा प्रभु कुशळ, कथुनि परमहित करी. २०
त्या महिजा ही दे निजचूडामणि, खुण कळवि कपिस, वैथि 'वद या
'शत्रुसि मारीं, येउनि तारीं, त्यजिन असु उशिर जरि तरि सदया!'
मारुति बंदी होउनि वंदी, उपवन चुरि निशिचरि अरि खपवी,
संगरदक्ष द्विट्सुत अक्ष व्यसु करि, हरिवर धरि हरिख पवी. २१
मेघरवानें पद्मभवास्त्रें सकळबळितिलक पवनज धरिला,
भावि विनाश स्पष्ट वदे त्या 'तृण'; कपिमणि गणि न भिवुनि अरिला.
खड्ग वधा घे रावण, वारी तदनुज शुभमति विनउनि वडिला;
पेटवि पुच्छा दुर्मति तो, कीं, अनयकपटअघ मिळउनि वडिला. २२
मारुति कोपे, रावण लोपे, सुटुनि रजनिचर बहुशत निवटी,
तें पुर जाळी, सद्गृह पाळी, खळबळतम हरि उजळुनि दिवटी.
'हाय!' म्हणाया लावुनि सारे त्रिजगदहितकर निशिचर पर ते,
तो अतिपूत श्रीपतिदूत क्षितिजनिस नमुनि पुनरपि परते. २३
गांजुनि दुष्टा त्या, जळधीतें उतरुनि निजकपिबळ मुदित करी;
स्वल्प चि वाटे कांड हि, दाटे मह, निघति सकळ, अहित करि हरी.
ते हरिखाया जे हरि खाया विनविति मधुवन लुटवि पवनभू,
नाक हि नादें गाजविती हो! विजयमुदित भट निपट न वनभू. २४

---

१. वृद्ध जांबवंत. २. भयंकर. ३. म्हणाली. ४. मागें पृ. ३९७, टीप ३ पहा.
५. खोडलेला पाठ—छळि मळधीतें मग. ६. मारुति.

अंगदमुख्यान्याय सुकंठा मधुवनपति कपि दधिमुख कळवी,
निश्चित केलें कार्य कळे हें प्रभुसुगळहृदय अनय न मळवी;
तें बळ आलें गर्जत हर्षें पतिचरण नमुनि पवनसुतमुखा
पाहत राहे, तो मणि अर्पी, कथि कुशळसकळ, अजित वरि सुखा. २५
त्या प्रभु भेटे, फार चि वर्णी तदुपकृति, मुकुट सुरुचिर मिरवी,
उत्सववेगा धीर हि चित्तीं कुतुकमनुज पर्[1]पुरुष न जिरवी.
स्पष्ट 'ऋणी मीं' यापरि बोले, बळसुगळसहित निघुनि उदधितें
पाउनि राहे, यद्यश हांसे अमृतनिधिस; किति सुरभिसुदधि तें? २६
तों प्रभुला ये दिग्वदनाचा शुचि अनुज शरण कुमतिस विटला,
ईश्वर लंकाराज्य तया दे, जड हि जळ अमळ करि पट किटला.
ताप मनींचा तत्क्षण होतां प्रणत रघुपतिस सकळ हि मिटला,
पाश भवाचा जो दृढ तो ही जपतप हि इतर न करुनि फिटला. २७
तापवि अस्त्रें सागर, भेटे, विनवि, 'रचिल नळ कपि सुपथ जळीं.'
शंभर गांवें सेतु समुद्रीं करवुनि उपजवि अजित भय खळीं.
रावण मायानिर्मित दावी प्रभुशिरधनु, बहु गडबडलि सती;
सत्य चि तीच्या दृष्टिसि तेव्हां घडिभरि निपट लटिक परि दिसती. २८
शत्रुकनिष्ठ भ्रातृवधू जी सुकृतसुपथरति शुभमति सरमा
ती कथि, 'माया हे, सखि! राया भजसिल, वरिसिल रति अति परमा.'
सेतुपथें त्या सिंधुसि लंघी अमितबळसहित विभु खळदमना;
दे अमरांच्या जेंवि शिखींच्या प्रकट करुनि गुण मह जळद मना. २९
राम सुवेळीं वेधुनि पाहे गिरिवरि कनकरचित परपुर तें.
तो दशकंठा देखुनि दावी सुगळ पडुनि वरि अघफळ पुरतें.
साम कराया अंगद धाडी हरि, परि धरि अरि तिळभरि न मनीं;
त्या अहिताच्या यूथप योजी प्रभुवर खरनिशिचरबळदमनीं. ३०
भव्य दिसेना मारवि सेना खळ दशमुख नर कपि न गणि, बुडे.
कीं, जय युद्धामाजि अशुद्धा असुमिळ निरखुनि अरिस खग उडे.

---

१. राम. २. रावणाच्या. ३. सुग्रीव. ४. दुर्मिळ. ५. कोण?

सैन्यप मेला आपण गेला पारिभव वरुनि, तदपि करि समर.
श्रीप्रभु खेळे. काय म्हणाया मृगमहिपतिस उशिर करिस 'मर'? ३१
वासवजेता[1] पन्नगपाशें त्रिभुवननुत दशरथतनय कसी,[2]
दाखवितां ते शोक करी श्री, गिळिल असुखविषय असदनय[3] कसी?
सांत्विलि देवी ती त्रिजटेनें, भजलि म्हणत 'बत! अहह!' उपवना,
सोडवि त्यातें तार्क्ष्य निवाया प्रकटि हिमसुरभिसुखदसुपवना. ३२
नाश बळाचा फार चि होतां अनुजनिस उठवि रजनिचरपती,
त्या घटकर्णा पाहुनि धाकें बहु पळति चढति मळति करपती.
काळ चि वाटे, लेश न आटे, कपिबळ मथुनि सुगळ धरि, परते,
घ्राण सकर्ण च्छेदुनि कीशक्षितिप रडवि अतिखर जरि पर ते. ३३
होय विनास क्रुद्ध विनाश क्रूर अरि करित परतुनि सुटला,
यूथप मारी तो अविचारी, म्हणति 'न निशिचर, जलनिधि फुटला.'
खाय कपी जे त्यांतुनि नासाश्रवणपथ वरुनि निघति हि सगळ.
कोण तशातें पाहुनि युद्धीं प्रभुहुनि इतर भय धरुनि न गळे? ३४
कज्जलवर्णा त्या घटकर्णा अजित भुजचरणशिर हरुनि वधी.
या विजयानें फार निवाली सकळअमरपतिशतधृतिशिवधी.[4]
रावण झाला शोकेंदवांत,[5] स्मरुनि अनुजगुण बहुत चि रडला,
दुःखभरानें वज्र तसा तो कठिनहृदय तरि बहुत चिरडला. ३५
दे हरिजित्सा[6] धैर्य दशास्या, प्रभुसह तदनुज कपिबळ निजवी,
अश्रुजळानें मारुति तैसा प्रभुकृतनिशिचरपति उर भिजवी.
जांबवदुक्तें ओषधिशृंगें उठवि अतिजवन पवनसुत रणीं,
कष्टसमुद्रामाजि मिळाली अनुचरतनु चरणनत सुतरणी. ३६
मारुनि मायानिर्मित सीता प्रभुसह सकळ कपिकटक रडवी,
जें न घडावें तें चि पयोदध्वनि[7] परम कपटपटु खळ घडवी.
तो नव लंकानायक शंका हरि, भगवदनुज मग वधि अरिला;

१. इंद्रजित्. २. बांधी. ३. दुःखाला कारण असा त्या दुष्टाचा अन्याय. ४. महादेव. ५. शोकरूपी वणव्यांत सांपडला. ६. रामाला जिंकण्याची इच्छा. ७. मेघनाद.

ऐकुनि दुष्टें श्रीस वधाया त्यजुनि उशीर खरतर असि धरिला. ३७
पाहुनि भीता कांपलि सीता, स्मरलि मृतिसमय समजुनि पतितें;
राहविला श्रीघात सुपार्श्वे, शतमखमुखसुरमत यश अति तें.
पाठवि कोपें राक्षसकोटी, कथि, 'करुनि सुगळसह हरिसैव धा;
जो नर आला कीर्ति हरूं त्या तदनुज मथुनि झटुनि अरिस वधा.' ३८
दों चि मुहूर्तीं राक्षसकोटी बहुशत रघुपति करि असुरहिता.
तापवि पुंडा त्या दशतुंडा करुनि अतुळ परिभव असुरहिता.
ऐकुनि राक्षस्युग्रविलापा निहतसकळसुतसचिव तळमळे,
आठवि पापा दारुण शापा, निरवधि अपयश वरुनि खळ मळे. ३९
जीवित खोटें दुःख चि मोटें समजुनि समुचिततर परमरणा
घेउनि सेना प्राज्य निघाला, कारि न गणुनि असुवसु परम रणा.
यूथप मारी, विक्रम भारी कळवि, पळवि बळ विसकटुनि रणीं;
लक्ष्मणवक्षीं शस्त्र समर्पी, यदतिखरपण न दिनकरकिरणीं. ४०
मूर्छित होतां बंधु म्हणे 'हा!' प्रभुवर दशमुखपरिभव करुनीं,
मारुति आणी त्या शिखरातें, उठवि पतिस, रविसम तम हरुनीं.
युद्ध करी श्रीराम अरीसीं त्रिभुवनगतसुरमुनिजनविजया,
पाठवि वज्री मातलियुक्त प्रभुवरनिकट सजुनि रथ निज या. ४१
त्यावरि बैसे पक्षिपवाह त्रिदशहृदयगतविशिखनिरसना.
त्या समरातें वर्णिल गीर्ची न पण करुनि बहु रसखनि रसना.
सोडिति शस्त्रें, योजिति अस्त्रें, दशमुख रघुपति दिसति पळससे.
काढिती धाकें सैनिक जैसे मृगपति निरखुनि कुपित पळ ससे. ४२
दिग्वदनाचे मस्तक खंडी शत जरि दिसति अपरिहृत तरि ते.
राम म्हणे, 'कां मच्छर लक्ष्या चुकति अनिकट हि अरिशिर हरिते?
आजि च झाले अक्षम कैसे? न वधिति रिपुसि मुदित मज करिते.
हें विपरीत स्पष्ट, पडावे जलधि हि, मम इषु पळभरि न, रिते.' ४३
कुंभज रामा भेटुनि सांगे 'रविहृदय', अजित जप करि, रवि तें

१. हाम (नाश). २. वाणीदेवीची.

संकट वारी, दे अरिनाशा वर, 'तव शर करु नुतिकर पवितें.'
मातलि बोधी, 'पद्मभवास्त्रश्रित इषु वधिल चिरुनि उर रिपुला.'
सारथिवाक्यें श्रीश जयश्रीसह वारि सुरमुनिकृतनुति विपुला. ४४
रावण होतां प्रेत नभांत त्रिदशमुनिरचित जयरव गाजे,
दुंदुभि दिव्य प्रोच्चनिनादें प्रलयसमयजलधरसम गाजे.
क्रुद्ध करीती युद्ध तसें तें मुनिमित दिवसरजनि हि आविरत,
प्राज्य यशीं या सर्व हि झाले विखरुनि सुकुसुमनिकर कविरत. ४५
स्वर्वरवेश्या नाचति गाती निपुण मधुरतर; विधिशिव आजितें
केवळ वेडेसे क्षण केले. कवण न भुलविल सुचरित आजि! तें?
दिग्वदनाचें उत्तरकार्य द्रवुनि विभु करवि तदनुजनिकरें,
सांगुनि भावा राज्य पुन्हां दे सविधि, निववि पुर शुचिगुणनिकरें. ४६
मारुति धाडी, आणवि सीता प्रभु, कारि तिस निजभजनसमुचिता;
दिव्य करूनि श्री सकळाला कळवि अमरमुनिबहुमत शुचिता.
तात विमानें येउनि भेटे, प्रभुवर चरण नमुनि बहु निववी.
वासव हर्षे, पुष्कळ वर्षे अमृतरस, सकळ मृतबळ जिववी. ४७
तो नव लंकानायक रामा विनवि, 'अनुजसह अपचिति वरणें.'
श्रीश म्हणे 'बा! पूज सुकंठा; मज अनुचित मणि सुवसन धरणें.
सानुज वल्की बंधु जटावान् त्यजुनि भरत कसि निजतनुरचना
मान्य करूं मीं? होमिल देहा निरखुनि चलन तिळ अभयवचना.' ४८
'भेटि तयाची मीं समयीं बा! घडविन' निशिचरपति नमुनि वदे,
पूजुनि सेनायुक्त सुकंठा कुसुमक[1] विभुसि समाधिगतशिव[2] दे.
बैसुनियां त्या दिव्य विमानीं प्लवगरजनिचरपतिसहित निघे
राघव अंकीं निर्गतपंकीं[3] सुखवुनि अवनिजानि सुगुणखनि घे. ४९
श्रीस रणाच्या आपण सांगे प्रभु कपिनिशिचरसुभटबळकथा,
सेतु समुद्रीं प्रेक्षवि, लंघी विरहजचरित वदत गगनपथा.
'देवि! मला या सागरतीरीं दशमुखसदनुज सुसचिवसहित

१. हार. २. प्राप्तराज्य-पंत. (बिभीषण). ३. निर्दोष अशा (अंकीं.)

प्रेयसि! भेटे संकटकाळीं तनुधर[1] विजय चि हितकर महित. ५०
मारुति भेटे, भेटवि सीते! मज सुगळ परम उचित हरि सखा,
दे तवभूषा, सांत्वुनि सांगे, 'म्हणसिल निजशरतातिस अरिस 'खा.''
आणवि तारा कीशपदारा भजुनि मुनिगुरुस मिळवि यश बरी.
दावुनि पंपा ती अनुकंपानिधि विभु माहिजनुसि कळवि शबरी. ५१
वारुनि बंधा मुक्त कबंधा करि रघुपति माहिजानिस कळवि तें.
दाखवि गोदा, दे बहु मोदा. प्रभुयश निरुपम सुख सकळ वितें.
राम पवित्रा त्या गुरुमित्रा स्मरुनि घटजमुनिपद करि उजवें,
अत्रिपदा त्या चित्रसुकूटा निरखुनि नमि विभु सुरधुनि सुजवें. ५२
राम भरद्वाजद्विजवर्या नमुनि सुखवि उतरुनि पवनसुता
पाठवि भावा स्वस्थ कराया, गुह निववुनि करि मुदित बुधनुता.
त्या वनवासा सारुनि राम प्रभु मुनिस नमुनि पुसुनि झडकरी
भक्तनिषादा हर्षवि, जैसा शिखिवरि सकरुण जलद झड करी. ५३
चातक कीं तो भक्तचकोर प्रभुवर जलधर हिमकर अथवा
देवमुनींचा[2] तेंवि जनांचा भुलुनि निजसदन पथ धरि न थवा.
श्रीसह पायीं मस्तक वाहे अनुज सचिवयुत भरत सविनय,
गाति विभूचा तेंवि तयाचा अमळ शमळहर सकळ कवि नय. ५४
राम वसिष्ठा वंदुनि शिष्टा बहुत सुखवि निजपुरजनजननी,
ते हि पहाती उत्सव तो, जे यतिपति रत गुरुसमुदितमननीं[3].
वे वरवेश श्रीत्रिदिवेशस्तुत अवरज कपि निशिचरसहित
होय अयोध्या स्वर्गवरिष्ठा, अखिल हि पुरजन सुरजनमहित. ५५
हर्षलि तारा, दिग्रथदारा करिति अवनिजनिवरि तसि च दया;
ईश्वर राजा होय सुलग्नीं, निजपदसमधिक दशरथपद या.
वर्षति दिव्यें निर्जर पुष्पें, नटति सुरयुवति, नुतिपद पुर तें.
वाजति वाद्यें, सुस्वरगानें पुरजनपदजन सुख वरि पुरतें. ५६
गौरविले ते यातुकपींचे पति अतितर नरवरशतनामितें;

---

१. मूर्तिमान्. २. खं. ७ पृ. ३४५, टीप २ पहा. ३. ब्रह्मचिंतनीं.

भूषणमुख्यें लेवविलीं त्या प्लवगरजनिचरततिस हि अमितें.
मारुति केला धन्य मुकुंदें सुतसम अभिमतसुवरावितरणें,
तेंवि यशें या ज्यापरि केलें सुरवरमुनिवरपरमहित रणें. ५७
यापरि केली कीर्ति जगीं या पसरुनि अनुदिन निरुपम, करणें
नाश तमाचा जेंवि करावा प्रकट करुनि निजवररुचि अरुणें.
श्रीशगुणौघें मोहिलि सद्धी[1] तसि जसि तरुणयुवतिमति तरुणें,
हें यश भव्यच्छत्र बहावें लघुतर समजुनि जळपतिवरुणें. ५८
श्री अपवादें गर्भवति ही त्यजिलि जरि सुमति तरि सपदि[2] सती,
सिद्ध तसी ती सुद्युति[3] झाली सुदृढ सुनियम धरुनि तप दिसती.
भूजनि वाल्मीक्याश्रम सेवी, सदुचितगुण सुत कुश लव तिस ते.
तात तसे चि स्वाकृति झाले गुरुसुचरितरत मुनिमत दिसते. ५९
त्या चवघांचे आठ कुमार क्षितिपति पितृसमगुण शुचि तगती,
दुर्जन ते तद्दृष्टिपुढें न, प्रभुपरि समजति बरि उचित गती.
वीर रिपुघ्न ब्राह्मणपीडा परिहरि वधुनि मधुतनयलवणा,
मारुनि कोटी तीन अरी दे प्रभुसम भरत अति सुख न कवणा? ६०
हेममयी श्री निर्मुनि सर्व ऋतु मुनिबहुमत अनवरत[4] रची;
क्ष्मावेन[5] वर्षे रुद्रसहस्र प्रभु करि, जनमानें बहुत सुख खची.
आदिकविनें काव्य विरचिलें श्रवण तनय करविति रघुपतितें;
तच्छ्रवणानें मुक्त चि व्हावे सकळ निजकुलजसह लघु[6] पतितें. ६१
श्री हयमेधीं दिव्य करी, तों न करुनि पळ हि उशिर महि चिरली.
मूर्तिमती भू घे स्वशुभांकीं पुनरपि कळउनि शुचिपण शिरली.
पद्मभवाचें प्रार्थित सांगे क्षितिसुरतनुधर सविनय शमन[7];
श्रीपति वैकुंठासि भजाया गमन वरि, कठिन पण धरि न मन. ६२
दिव्य विमानें आणवि, पौर प्लवगसुगळसह सकळ हि बसवी,
उत्तमलोकीं नेउनि त्यांतें प्रमुदित करुनि अनुजसम वसवी.

---

१. सज्जनांची बुद्धि. २. लगेंच. ३. उत्तम कांति जिची. ४. निरंतर. ५. पृथ्वीचें संरक्षण. ६. त्वरित. ७. ब्राह्मणरूपधारी यम.

रामपयोदें भक्तमयूर प्रकटुनि तदसुख हरुनि जिववि‍ले,
चातक कोणी केवळ जे ते स्वचरितअमृत वितरुनि निववि‍ले. ६३
'मंत्ररामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ६४

इति श्रीमंत्ररामायणं संपूर्णम् ।

---

# निरोष्ठरामायण*

(गीतिवृत्त)

श्रीहरि दशरथनंदन झाला दशकंठसंक्षय कराया,
दर[1] शेष चक्र ही जानि घेती जगदखिलसंकट हराया. १
अंगज[2] च्यार तिघींचे संस्कृत[3] साक्षर नरेंद्रकीर्तिकर
निरखी, नितांत हर्षे हा चि न तैसा चि नागरिकनिकर. २
गाधिज यज्ञत्राणा याची, ने ज्येष्ठसह कनिष्ठ, तया
दे ताटकाक्षयकरा अस्त्रें, करि तातसा ऋषींद्र दया. ३
रक्षी तद्याग, करी रक्षःक्षय राजतनय हा ज्येष्ठ,
सत्कृति करिते झाले सकळ धरात्रिदश[4] जे अति श्रेष्ठ. ४
यानंतर चरणरजें जीतें तारी क्षणें सदयराज,
ती दे सती अहल्या आशी, 'ऐसा चि सद्यशें साज.' ५
हरसायकासनातें नाशी, क्षितिकन्यकाकरासि[5] धरी,
जनकांगजानि तिघी ज्या त्या हि दयानिधि कनिष्ठदार करी. ६
येतां नगरा अयनीं[6] क्षत्रांतकगिरिशशिष्यतेज[7] हरी.

---

* या रामायणांत ओष्ठास ओष्ठ लागणारे प, फ, ब, भ आणि म या पांच वर्णांची योजना कवीनें केली नाहीं म्हणून या काव्याचें नांव '**निरोष्ठरामायण**' असें ठेविलें आहे. हें रामायण पंतलिखित उपलब्ध नसल्यामुळें चातुर्मासेबोवांच्या स्वतंत्र प्रतीवरून छापलें आहे. १. शंख. २. पुत्र. ३. विद्वान्. ४. ब्राह्मण. ५. जनककन्या. ६. मार्गांत. ७. परशुराम.

जननीजनकहितार्थं त्यजी गृह, निघे, अरण्य सदन करी. ७
सकनिष्ठ सदार निघे चरणगति, तयासि तात रथ धाडी.
सारथि गंगा तरतां त्यजि अजित, निषाद खेद ही झाडी. ८
कारि चित्रशृंगशैलीं ऋषि हर्षित, दशरथ त्यजी देहा;
आज्याच्या नगरींचा कैकेयीतनय आणिला गेहा. ९
तेणें जननींनिंदा तदनंतर दशरथक्रिया केली,
अग्रजचरणनिकट निजजननी जनतति अनन्यगति नेली. १०
जनकासि अजित तिळजळ तदनंतर धैर्य दे कनिष्ठाला;
धाडी धरणीत्राणा त्या त्रिजगन्नाथ एकनिष्ठाला. ११
साकेतनिकट राहे, धरि सतत जटादि आननीं 'हाय!'
खाय सदा ऋष्यन्न चि तें हि अनासक्त कृश करी काय. १२
अन्यादिकांसि इच्छित आनंद श्रीश दंडकीं दे हा,
घटजा अर्ची, गृध्रा तातसखा धन्य करि धृतस्नेहा. १३
गंगातीरीं राहे तृणसदनीं[1] अजित यां[2] जिचा दादा[3]
राक्षसराजा, ती[4] ये रति याची हृद्वरा[5], धरी नादा. १४
तत्कर्णघ्राणांतें खड्गें दाशरथि धाकटा खंडी,
अजितशरनिहत सकटक खर तें कथि रडत अग्रजा चंडी. १५
लंकेश कनकहरिण श्रीदृगातिथि कारि[6], 'अजी! धरा यास'
ऐसें ती सांगे, तें जाय अजित ही तया धरायास. १६
कळतां खळ, अज हाणी शर, हरिसा तार आर्त नाद करी
'हा सीते! हा सखया!' ऐसा, अरि तत्क्षणीं च धैर्य हरी. १७
न त्रास धरी, न निघे अग्रजसंरक्षणासि निजदीर,
याकरितां रागेजे सीता, गांजी तया, त्यजी धीर. १८
[7]अतितीक्ष्णगीःशरक्षत जाय रडत दाशरथि, तशांत शिरे

१. गवताच्या खोपटींत. २. याकडे; रामाकडे. ३. वडील भाऊ. ४. शूर्पणखा. ५. मनोहरशब्दवती—**पंत**. ६. सीतेच्या दृष्टीचा पाहुणा करी, म्ह० तिच्या दृष्टीस पीडा. ७. [सीतेच्या] अत्यंत तीक्ष्ण वाग्बाणानीं घायाळ झालेला.

दिक्कंठ अजितसदनीं, श्रीस हरी; शस्त्र गिळि जन्ही न जिरे. १९
गृध्रेंद्र करि खळातें रथरहित क्षतशरीर निर्यत्न,
छेदी तया अशस्त्रा खड्गें, लंकेसि ने सतीरत्न. २०
ज्येष्ठा कनिष्ठ गहनीं चरण धरी, गरसखाधिते[1] सांगे,
अजितास्यें हि निवे, 'हें त्वां आस्यीं आणिलें असें कां गे!?' २१
ये अजित शीघ्र, निरखी निजदयितारहित अन्यसंगेह,[2]
'हाय!' असें आस्यातें आणी, जगदीश[3] नच धरी देह. २२
अंगीकृतगहनाटन दाशरथी त्यक्तधैर्य हाक रिती
तरि हि तसें चि हटाकिती; गृध्र निरखितां क्षतातें 'हा!' करिती.[4] २३
गृध्रकथित आकर्णी रक्षःकृतदारहरणशल्यधरें,[5]
त्याची क्रिया करि अजित तनय तसा, गाय या दयेसि हरे. २४
[6]अत्यायत कर ज्याचे राक्षस गहनांत यांसि धरि खाया
सद्गति तया दयानिधि दे सकळ हि संतराय हरिखाया. २५
करि आतिथ्य निषादी,[7] शिष्या ऋषिची, तिला हि गति दे हा;
घे आंजनेय कीश स्कंधीं, त्याच्या हि तेज अति देहा. २६
अर्काच्या तनयातें सदय हृषीकेश[8] करि सखा तारी,
शक्रांगजा[9] निधन दे, सखया तत्कीशराज्य, हितकारी. २७
त्रिदशांश कीश ऋक्ष हि अगणित एकत्र करि तरणितनय,
धाडी सकळाशांतें निरखाया श्रीस अरिस ते सनय. २८
[10]हतगृध्रज्येष्ठ कथीं, लंघी जलनिधिसि आंजनेय हरी,
शीतनगांगज[11] जननी नागांची न गणि, सिंहिकेसि हरी.[12] २९
लंकेंत जाय रात्री, निरखी यत्नें अरातिगृहगहनीं[13]

---

१. [सीतेच्या वाग्बाणांमुळें झालेल्या] विषतुल्य मनोव्यथेला. २. पूर्वीचा छापील पाठ—**अन्यसें गेह**. ३. रामाला मूर्च्छा आली. ४. हाका मारण्याचा कांहीं उपयोग होत नव्हता तरी. ५. धारण करणारा (राम) ६. फार लांब. ७. शबरी. ८. इंद्रियाधिपति (राम). ९. वाळीला. १०. जटायु. ११. हिमालयपुत्र मैनाक—**पंत**. १२. मारी—**पंत**. १३. उपवनांत.

श्रीस खळा ही निकट चि अत्यागें ज्यासि लय चितादहनीं. ३०
एकांतीं अजिताच्या अंगुलिचा श्रीस दे अळंकार,
घे तीच्या हि शिखेचा, सांगे संदेश या सती सार. ३१
शाखी[1] शत[1], तदनंतर अक्षादिक रात्रिचरकटक नाशी,
राशी हताहितांचे करि, ये त्रिदशर्षि[2]लक्षदत्ताशी. ३२
दशकंठज्येष्ठांगज धरि धात्रस्त्रें रणीं, जनकनिकट
ने कौशिल्याला[3], आणी[4] न्यायें अरयासि, गदित हा तिखटें[4]. ३३
रागें खड्ग धरि शिरश्छेदा दिक्कंठ, तत्कनिष्ठ दया
करि रक्षाया या ही त्या ही, कथि 'दे चरांत[5] हानि जया.' ३४
तद्दीर्घांगातें खळ झांकी तैलाक्तनैकसिचया[6]हीं
दे अग्नि, कीश चिंती, 'गांजिलिसे सृष्टि हे असि च याहीं.' ३५
निसटे, गगनांत शिरे, गर्जे, जाळी क्षणांत लंकेतें,
न धरी चित्तीं कांहीं त्या अरिच्या आंजनेय शंकेतें. ३६
नगरीदाह करि, निघे, लंघी जलनिधिसि, ये अजितनिकट,
सांगे निजशीर्षातें 'श्रीचरणासीं च आदरें चिकट.' ३७
श्रीदत्तशिखालंकृति दे, कथि संदेश, यासि हृष्ट करी,
आलिंगी तत्कृतितें, गाय जगज्जनक अतिकृतज्ञ हरी. ३८
तरणितनय कीशकटकसहित निघे, जाय, धरि जलधितीर,
शरणागतीं करी दशकंठकनिष्ठीं दया त्रिदशहीर. ३९
दे लंकाराज्य नता अरि[7]सहज्या सागरांत आलि[8] रची,
ने दक्षिणतीरा निजसैन्य अजित, धरि सहर्ष आधि शची. ४०
किष्किंधेशें दिसतां दिक्कंधर गांजिला चि लाख[9] रची,
जी शक्ति अंग[10] निर्जर जिगजिग करि हा रणीं तिला खरची. ४१

१. शेकडों वृक्ष. २. देव आणि मुनि यांच्या असंख्य आशीर्वादांतें घेता झाला. ३. बद्धाला—**पंत**. ४. हा चरण दुर्बोध वाटतो. ५. दूतवधें जयास हानि होते—**पंत**. ६. वस्त्र—**पंत**. तेलानें भिजलेल्या अनेक वस्त्रांनीं. ७. बिभीषण—**पंत**. ८. सेतु—**पंत**. ९. लक्ष अपराध—**पंत**. १०. अपराध—**पंत**.

शीर्ष शरासन रचि, तद्दर्शन दे, नाथकदन कथि खळ, तें
सत्य श्रीहृदय गणी, आग असें कारि; कसें निधन टळतें? ४२
अंगद अति हित सांगे, नैके, तत्कदन अज्ञ हा इच्छी,
आणी आस्या याची या आचारें सखेद आइ 'च्छी!' ४३
कलह कारि अशृंखळ खळ, काळ गिळी सैन्य, जय न ये चि रणीं,
कीं अंधकार देइल काय कधींतरि अशक्तता किरणीं? ४४
घननाद दाशरथि ते अहिनीं रचितर्क्षकीशनाश[1] कसी,
निरखी तसी दशा जी सीता रडली, धरील धैर्य कसी? ४५
तें संकट तार्क्ष्य[2] हरी, श्रीरंगदयाश्रयें चि यश साधी;
अजित तृण चि घटकर्णा कारि, झाला तैं दशास्य अति साधी[3]. ४६
निरखी श्रीरंग रणीं श्रीचा घननादकृत शिरश्छेद,
कारि 'हाय! हाय!' सत्य क्षण तसा, सैन्यसह धरी खेद. ४७
दशकंठकनिष्ठ हरी खेद, कथी तद्रहस्य, दे धीर,
त्या संस्थितें[4] घननादा शेषें[5] करी, गाति या जया धीर. ४८
खळ दयिततनयनिधनें झाला अत्यार्त, जनकजाघाता
घे असि, निघे, तया दे दासास्यें तद्दिनें[6]नाशधी धाता. ४९
जें सहजतनयहितकर[7], जें अगणित कटक, तें रणीं सरलें;
त्यजि दशकंठ तरि न हठ; खळचित्त कधीं न आग्रहा सरलें. ५०
केला रणीं दशास्यें दाशरथि कनिष्ठ शक्तिनें हतसा,
त्यासि रडे अज गातां, ज्या जाले अहित ही जडा नत सा. ५१
अगदाचळशिखरातें आणी तत्काळ अंजनातनय,
जागें कारि दाशरथिस, अजित न साहे अरातिचा अनय. ५२
शक्राच्या रथरत्नीं अजित चढे आजियज्ञ कारि अरितें,
संतत सात दिन झटे, दे अर्का[8] अहितनिधनयश हरि तें. ५३

---

१. केला आहे ऋक्ष व वानर यांचा नाश ज्यानें. २. तृक्षाचा (कश्यपाचा) पुत्र (गरुड). ३. दुःखी. ४. मृत–पंत. ५. लक्ष्मण. ६. राम–पंत. तिचा पति. ७. बंधु–पंत. बंधुपुत्रादिकांस हितकारक. ८. षड्रिपु.

दशकंठाच्या निधनें अतिहर्षें जगांत सारखा झाला,
त्याची क्रिया कराया सांगे अज, गिरिश या यशें धाला. ५४
दशकंठसहज राजा लंकेचा खचररक्षणा केला,
अग्निस्नानानंतर खेद श्रीचा लया अजें नेला. ५५
दशरथ हि गगनयानें तृषितहृदय नंदनाकडे आला,
जगदीश चरण धरि, दे हर्ष नच कधीं सरे असा त्याला. ५६
जागीं केलीं रणहत सैन्यें शक्रें निजें रसें[1] सेशें[2]
तीं अर्चिलीं अशेषें लंकेशें चरणें[3]नतहितादेशें. ५७
श्रीदगर्ग[4]नयानांत श्रीश चढे, कटक घे, निघे, सरसा[5]
सीतेसि कथा सांगे दयिता[6]संगातिसक्तधी नरसा. ५८
लंकाकिष्किंधांचे केले कृतकृत्य नाथ, तत्कृतितें
कथि. गाय नळादिक जें त्यांच्या करि तद्यशासि सत्कृति [7]तें. ५९
इष्टें सहर्षिस्थानें तीर्थें सांगत सतीस हाकेतें
दे हाक, ये तराया आधि[8]नदीनायकांत साकेतें. ६०
आधीं निषादराज्या दर्शन दे जलद चातकासि तसा;
तदनंतर कैकेयीतनया, ज्या नत अराति खळ जित सा. ६१
स्नेहें गाढालिंगन अजित अरिघ्ना तदग्रजा दे हा,
आनंद न त्यजी त्या, आतळला हर्षजलधि ज्या देहा. ६२
धाला आचार्य, सकळ जननी नागरिक अखिल देहातें
गेहातें नेणति, हें देणें हा एक अजित दे हातें. ६३
क्षितिदासहिता राजा जाला चिरकाळ अज करी राज्य,
यद्दर्शनार्थ करिती साधन दहनांत यति शरीराज्य. ६४
जग नष्टकष्ट संतत, अतिदक्षिण यज्ञ सांग सकळ करी,
गति दे अरितें, चरितें कृतरंजन कंजनयन चित्त हरी. ६५

---

१. अमृतें-पंत. २. धन्यासह. ३. रामाज्ञेनें-पंत. ४. पुष्पक विमानांत. ५. गोड. ६. स्त्रीच्या प्रेमपाशांत अति लुब्ध अशा. ७. अन्वयार्थ? ८. दुःखसमुद्रांत. ९. वसिष्ठ. १०. पृथ्वी आणि सेवक यांच्या हिताकरितां.

(अनुष्टुप् वृत्त)

'निरोष्ठरामायण' हें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ११

इति निरोष्ठरामायणं समाप्तम् ।

---

# दामरामायण*

(गीतिवृत्त)

श्रीपति झाला दशरथसुत राम दशाननासि माराया,
मा राया जनकाची होय सुता त्रिजगदाधि साराया. १
सारा[1] या प्रभुची हे लीला गाती सदैव ही, सुकवी
सुकवी भवजलनिधितें, निरुपम सुख रसिकजनमनीं पिकवी. २
पिक वीतबाधें[2] कवि या चरित्र[3]वनांत कूजिती, सुरस[4]
सुरसद्मींचा लाजे; 'यश हें' श्रीशिव म्हणे, 'शिवे! परिस.' ३
परिस सुवर्ण करितसे लोहा जीवासि, शिव चि हा[5] महिमा;
महि मान्या स्वर्गीं ही, 'स्वकुळ' म्हणे 'धन्य!' यत्प्रभ अहिमा[6]. ४
अहिमान्य[7] होय लक्ष्मण जो श्रीपतिरामभक्तिलाभरत,
भरत दरवर, सुदर्शन शत्रुघ्न स्वजनशत्रुनाशरत. ५
'शर तरणिकुलमणीचे यश करुत' असें म्हणोनि ये नगरा,
नगराज[8]सा चि कौशिक मागे सावरंज[9] राम राजवरा. ६
जेंव[10] रामाच्या दानीं न करी नृप, तों वसिष्ठ समजावी,

---

* या काव्यांत पद्यांतील प्रत्येक अर्धाचीं शेवटचीं अक्षरें दुसऱ्या अर्धाच्या प्रारंभीं आणिलीं असल्यामुळें सर्व पद्यांचा एक 'दाम' म्हणजे हार च बनून गेला आहे. 'निरोष्ठरामायणा'प्रमाणें हें रामायण छापताना हि चातुर्मास्ये बोवांची प्रत आधारास घ्यावी लागली असून ही प्रत स्वतंत्र लिहिलेली आहे. १. उत्तम. २. निर्भय. ३. हस्तदोष–**श्रवणांत**. ४. अमृत. ५. हा रामाचा. ६. उष्ण (असा सूर्य). ७. शेष–**पंत**. ८. गिरीश–**पंत**. ९. धाकट्या भावासह. १०. त्वरा.

'जावी चिंता, द्यावे पुत्र, त्वद्विजय मज दिसे भावी.' ७
[1]भावी हित, मग नृप दे, ने मुनि, गुरुसा च बहु करी माया,
[2]मायापतिला विद्या सांगे क्षुत्तृट्श्रमासि वाराया. ८
'[3]वारा यातूंच्या प्रभु मर्दु' म्हणे विप्र, जेंवि कामारी
मारी प्रथम पथीं जी पीडी साधूंसि ताटका भारी. ९
भा रीति बहु प्रभुची निववी, अस्त्रें द्रवोनि शत दे हा,
देहा कवच कृपेचें करि कौशिक, हर्षवी रमागेहा. १०
मागे हानि कराया षडरींची ज्यासि शक्ति यति सारा,
साराया मखविघ्ना तो विधि सिद्धाश्रमांत अरि[4]वारा. ११
वारा करी पदांबुजरेणु अहल्येचिया अघाभ्रा त्या,
भ्रात्या भरताच्या ती पूजी अत्यादरें महाधात्या. १२
'[5]धा त्यागासि न करितां' गौतममुनितें म्हणे 'यशा या गा.'
यागा जाय जनकनरपतिच्या [6]जो आत्मचिंतनीं जागा. १३
जागा दे त्या स्वपदीं वैदेहा, तत्सुता रमा नवरी,
न वरी, जी हरकार्मुक सज्ज न करितां करी न मान वरी. १४
मानवरीतिधर प्रभु शिवधनु मोडी, तिचा धरी पाणी,
पाणी सोडी जनक प्रेमाश्रु हि, तत्सुखा नसे वाणी. १५
[7]वाणी चार विवाह प्रेमभरें गाय नारदासहित,
दासहित प्रभु भार्गवरामा करि तेज हरुनि ही महित. १६
महि [8]तनयार्थ हरि, म्हणे स्त्री 'वनवासासि' [9]रत्नहारा 'जा.'
'हा!' राजा वदला, श्रीलोभें कांहीं च न द्रवे [10]भाजा. १७
'भाजा शोकांत' म्हणे, राम निघे, त्यजि न सानुजा शीता,
शीतातपवृष्टीनीं झाली नाहीं च भिववितां भीता. १८
भी तापा विरहाच्या, [11]शाप म्हणे, 'त्यजुनियां शरीरा जा.'

---

१. मानी. २. रामास. ३. समुदायास. ४. शत्रुसमूहास. ५. तृप्त व्हा. ६. जनक. ७. सरस्वति. ८. भरतासाठीं. ९. रामा–पंत. १०. भार्या (कैकेयी). ११. श्रावणाच्या बापाचा शाप.

राजा मरे, भरत ये, मातेसि वदे, ‘विनाश हा माजा.’ १९
‘माजाया शोक पुरीं, आवडलें कर्म हें कसें? हाय!
हा यत्न पतिसुतांच्या नाशीं केला, विटंबिला काय.’ २०
काय पित्याचा विधिनें संस्कारुनि अग्रजाकडे आला,
[1]आलापी गुण, विनवी प्रभु यातें फार सांत्विता जाला. २१
‘जा, लाभ यशाचा हो तुज मज ही, अब्द सारितों चवदा,
चव दास्यांत पित्याच्या अमृतीं ऐसी नसे चि, ‘हा!’ न वदा.’ २२
नवदाम सुरतरूचें तैसें प्रभुवाक्य घे शिरीं भरत,
भरतम न व्हायाला मणिकांचनपादुका हि [2]पादरत. २३
दर तद्विरहाचा ही आज्ञा ही लंघितां नये, परते,
पर तेथें चि मन वसे, विषयीं स्वप्नीं हि धीर तो न रते. २४
नरतेतें स्वीकारुनि भेटे अत्रिस, वधी विराधाला;
धाला दंडकवासी मुनिजन पाहोनि या अलभ्याला. २५
भ्याला त्यावरि कोणीं हि जनस्थानस्थिता न विप्र खरा,
प्रखरासि चापधर दे अभय प्रभु हा पित्यासमान खरा. २६
नखरानीं कनककशिपु वधिता दावी जटायुतें सुतता,
सुतता कीर्ति करि, [3]जिणी देवांची हा [4]प्रसादचंचु लता. २७
[5]चुलता सांगे गोदातीरीं सुरकार्य आठवी राहे,
वीरा हेति[6]धरा या रावणभगिनी गतत्रपा पाहे. २८
पापा हे शूर्पणखा कामांधा प्रभुचिया गळां चि पडे.
चिपडे डोळे मुरडी कपटें शोभवुनि ती [7]अनुजनिकडे. २९
निकडे येतां धाडी, तत्कर्णघ्राण वीर तो हरि तें,
[8]हरितें कर्म करि सुखी, मग सबळा प्रभु वधी खरा अरितें. ३०
[9]अरि तें वर्णी प्रभुशरयश, मग कां वर्णना न करिल पवी?

१. गाई. २. रामपदभक्त. ३. जिंकी. ४. प्रसाद करण्यांत कुशल असा. ५. पितृसख जटायु. ६. खड्ग धारण करणाऱ्याला. ७. लक्ष्मणाकडे. ८. रामाला. ९. सुदर्शन–पंत.

लपवी न मुख कुधी ती दशकंठा कथुनि जानकी हरवी. ३१
हर विश्वस्त्रष्टा ज्या गाती, रक्षी पळांत करिपातें[1],
करि पातें[2] शोकें वपु विकळ, रडवि सर्व जें वदे 'हा!' तें. ३२
देहातें गृध्राच्या संस्कारी, उद्धरी कबंधाला.
बंधाला शबरीच्या हारि, सुखवी पवनजा तपनजाला. ३३
ज्याला रावण जोडी कर, जो भक्ता निजानुजा वाळी,
वाळी मारुनि कपिपति करि सुगळ, प्रभु पदानता पाळी. ३४
पाळी धाया सीता शोधायाची मनीं धरी आशा,
आशाचक्रीं[3] धाडी कीश न भीते रणांत कीनाशा. ३५
नाशाया रामाधिप्रति लंघी सिंधुतें पवनभू, तें
भूतें वर्णिति यश, जें गातां होती मुखें मनें पूतें. ३६
पूतें[4] दशकंठाच्या पावुनि रात्रौ प्रवेशुनि यशोधी,
शोधी श्रीस अशोकीं पाहे, तों तो हि ये सुरविरोधी. ३७
रोधी अनर्थे 'महिषी हो' म्हणतां त्या खळा, गुणोदारा
दारा श्रीरामाची धिक्कारी; बहु करूं न दे चारा. ३८
'चारा निशाचरीहो! सीतेचें न वळतां मला मास,
मासद्वय अवधि दिला' ऐसें बोलोनि जाय धामास. ३९
धामा[5] सतीश्वरीच्या वर्णी कपि रामगुण वदोन, तिला
नति लास्य करुनि मुद्रा दे, कुशळ कथी, स्तवी तिच्या पतिला. ४०
चाप तिलापद[6] अरिला प्रभुचा होतो असें कळवि भावी,
भा वीरवराची स्तवि चूडामणी घे, पदांसि शिर लावी. ४१
शिरला वीर मथुनि वन अक्ष घनरवासि सांपडुनि नगरीं,
न गरीं जें तें दावी क्रौर्य, दशमुखा म्हणे, " न हानि करीं. ४२
'हा!' निकरीं म्हणसिल रघुराजशरांच्या भ्रमोनि रे! देवी

१. गजेन्द्राला. २. खेप. ३. दिग्मंडळीं. ४. पुरीतें—**पंत.** ५. तेजाप्रत. ६. शत्रूस तिलोदक देणारें प्रभुचें धनु—**पंत.**

दे, वीतभय रहा रे ! खरअहि गुरु[1] रामबाण भासे वी." ४३
सेवींना बोधसुधा, मारूं लागे प्रमत्त देवारी,
वारी त्यासि बिभीषण, तरि पुच्छ करी प्रदीप्त अविचारी. ४४
चारी पुरुषार्थं भजति यद्भक्ता, विघ्न जोडिती हात,
हा तद्दूत व्यसनीं पावेल स्मृति असोनि कां पात? ४५
'कांपा' तयां खळांतें 'पवनसुत' म्हणे, उडे, पुरी जाळी,
जाळी[2] जेंवि दवानळ, साधुबिभीषणगृहासि तो गाळी. ४६
गाळी दशकंठातें देती लंकेंत राक्षसी कुपिता.
कुपिता घननादाचा मानी तुच्छा मनुष्यता, कांपिता. ४७
ताकांपिता जेंवि पया, कुमतरुचि तसा अनादरी सुमता,
सुम[3] तापद निर्दैवा सुरतरुचें तेंवि साम या अहिता. ४८
अहि ताडुनि गरुड जसा जाय कपि, नमी स्वभक्तमंदारा,
मंदा राक्षसराज्या छळिलें तें वृत्त कथि नराकारां[4]. ४९
राकां[5]राजनुतयशा मारुति कथि सर्व जें वदे रमणी,
रमणीय[6]मणिदकपिची पुरवी प्रभु भेटुनि स्तवून धणी[7]. ५०
न धणी असा पवनजें हरि ते मारावया ससे नेला,
सेनेला घे मारुति, सुगळमतें अजित सागरा गेला. ५१
रागेला हित कथितां रावण, आला बिभीषण नमाया,
माया[8]विसंग सोडी खळसंसर्गोत्थपातक शमाया. ५२
माया[9] करि, दे लंकाराज्य, करुनि सेतु सिंधुला तरला,
तरला[10] सेना घेउनि गर्जत विभु शत्रुजनपदीं[11] भरला. ५३
भर[12] लावी कांपाया क्षितिस, सुवेळीं चढे अजित, पुर तें
पुरतें पाहे, सुगळें मथिला अरि निरखितां विजयसुरतें[13]. ५४

---

१. गुरु वी गरुड—**पंत**. २. 'करवंदीची तोरणीची जाळी' इति देशभाषा—**पंत**. ३. पुष्प. ४. रामचंद्राला. ५. चंद्रानें स्तविलें यश ज्याचें असा. ६. रमणीय चूडामणी देणाऱ्या वानराची. ७. आशा. ८. कपट्यांची संगत. ९. प्रेम, कृपा. १०. चंचल. ११. शत्रूंच्या देशांत. १२. सैन्यभार. १३. विजयाभिलाषी जो त्यानें.

सुर तें नियुद्ध[1] पाहुनि झाले संतुष्ट, म्हणाति आरिस ‘ मर ’,
समरप्रारंभीं खळ होय न विभुच्या पदांबुजीं भ्रमर. ५५
भ्रमरहित ऋक्ष कपिवर दाशरथिशर क्षपाचरास रणीं
‘ सरणीं[2] निजा ’ म्हणाति, न व्यसनसमुद्रीं तया मिळे तरणी. ५६
तरणिकुळमणि घनरवें केले अहिपाशबद्ध मानवसे,
न वसे श्रीहृदयीं लव धैर्य, त्रिजटा कथी कुशल, परिसे. ५७
परि सेज न चिंतेची सोडी[3] तों मुक्त करि तयां विवर[4],
विवर व्याळ वारिति ते पक्षध्वनि ऐकतां स्वहानिकर. ५८
‘ हा!’ निकर राक्षसांचा बोले पावोनि भंग हातनय[5],
हा तनय रावणाचा वरमे, स्वाधिक म्हणे जयास मयें[6]. ५९
समय कठिन जाणुनि घटकर्णा उठवी दशास्य, तोख रची,
तो खराचित्त[7] सुगळ धरि, हरि मारुतिच्या प्रभा मुखावरची. ६०
वरचील[8] काय यूथपें[9], तत्कर्णघ्राण सुगळ तोडि खळ,
तो डिखळ तेंवि रगडी त्या मारी स्वजनवज्रकवच[10] पळ. ६१
चपळत्व गांठि पडतां न करूं दे जेंवि हरिस शरभ वनीं,
शर भवनीं आरिच्या ‘ हा!’ प्रभुचे म्हणविति, निवे जयें अवनीं. ६१
अवनीं स्वबळाच्या पण करुनि घनरवें हि पाडिले शवसे,
लेश वसे न कपिबळीं धृति, केले प्रभु हि विकळ मानवसे. ६३
नव सेवक मारुति करि, यश आणी, स्वोषधीधरा शिखरा,
राशि खरा तेजांचा, उठवि प्रभुसहित विकळकपिनिकरा. ६४
निकरा[11] करिती राक्षस, लक्ष मथिति दाशरथि, तदा परमा
पर माया करि, सीतावध दावि, वदोनि ‘ हा!’ म्हणे ‘ वरमा[12].’ ६५
वर मागे विधिपासीं तेणें करि अमरतार्थ होमास,

---

१. द्वंद्वयुद्ध. २. प्रेतशय्येवर. ३. कर्ता ‘सीता.’ ४. गरुड. ५. त्यक्तनय. ६. मयासुर. ७. कठोर चित्त ज्याचें. ८. वरकड, इतर. ९. सेनापति. १०. स्वजनांचें संरक्षण करण्यांत सुदृढकवचरूपी. ११. घाई, पराकाष्ठा. १२. लज्जित व्हा.

‘हो मास कपिनरांचें राक्षसपुष्टिद’ म्हणे, कसी[1] कासे[1]. ६६
[2]कासर मत्त तसा हा अरि वधिला लक्ष्मणें महामानी,
मानी शक्र बिभीषण जय, विभु ही त्यासि भेट दे, वानी. ६७
देवानीं स्तविला बहु, मग दशमुख[3] आननें करी असितें[3],
असितें घे माराया श्रीतें, सोसील आग ती कसि तें? ६८
कसितें मुक्त हि करितें ज्याचें ईक्षण जडा, तया अजितें
आजि! तें हृदय[4] फिरविलें, न वधी, गेला वधावयास जितें. ६९
[5]साजि तेंवि उग्र बळ खळ, सिंधु जसें काळकूट, आजिस[6] ये.
‘आजि सये! जय’ म्हणतां, श्री सरमेतें म्हणे, ‘बरें सदये!’ ७०
[7]सदयेनवंशतिलकें वधिलें तें बल न शेष कांहि वसे,
कां हिवसे होतील न सुर? अधरा तो पलाशराज डसे[8]. ७१
जड सेना सजुनि निघे, दे कपिकटकास भय, न धृति उरवी,
उर वीरलक्ष्मणांचें भेदी, प्रभुला हि शोकविष भरवी. ७२
भर वीशसा[9] पवनसुत मोहाचा उडवि, उठवि लवलाहें.
लवला हें कर्म करुनि; यासि विभु म्हणे, ‘तुझा ऋणीं आहें.’ ७३
[10]आहेतुनि रामप्रभु शोकाग्नीच्या निघोनि बाहेर
बाहे रजनिचरेशा, त्यासि म्हणे, ‘फळ कुलाधमा! हेर.’ ७४
माहेर म्हणे ज्यातें कीर्ति सकळ साधुराजिं मानवली,
मानवलील रण करी, परि भारें भूमि तरिसमा[11] लवली. ७५
मालवली दीपाची वातें अरिची तसी प्रभा अहिता
अहितां[12] दे, विपतां[13] घे, निज चापलता जगीं करी महिता. ७६
महिताप हरी[14] बैसुनि शक्ररथीं, विजय विभु रणीं साधी,
साधि त्रिदश मुनि निववि शिवाविधिनुत राम विश्वभय बाधी. ७७

---

१. उद्योगास प्रवृत्त झाला. २. रेडा. ३. रावणाचीं तोंडें काळीं ठिक्कर पडलीं, उतरलीं. ४. रावणाचें मन. ५. सिद्ध करी. ६. युद्धास. ७. साधुशुभावह विभिरूप सूर्यवंशभूषण—**पंत**. ८. रावण दांतओंठ खाऊं लागला. ९. गरुडाप्रमाणें. १०. ओहोटुनि. ११. नौकेप्रमाणें. १२. सर्पपणा. १३. गरुडता—**पंत**. १४. निवारण करी.

'बा! धीरवीरवरदप्रवरा! विजयी रणीं असा चि रहा,
चिर हानि कवि खळाची गातिल,' मुनि म्हणति 'शक्र गाय महा.'
गाय महापंकांतुनि दुःखांतुनि सृष्टि उद्धरी परम,
पर मग सत्कारवि यश तें कथि विश्वास 'मदितरीं न रम.' ७९
नरमणि बिभीषणा दे विधिनें पद, दिव्य करि अनादि सती,
दिसती झाली दहनीं डोहीं नलिनी तसी सुरतातिस[1] ती. ८०
तिस तीर्थपाद घे, सुरमुनिदशरथवचन करि, अगाधबळ
धवळ करि त्रिजग यशें, उठवुनि मृत सर्व कीशराजबळ. ८१
जवळ बिभीषण बसवी तत्पूजित सबळ सुगळ अनुजनि तें
जनितेंदुद्युति[2] पुष्पक वरुनि निघे, सुखवि त्या सुगुणखनितें. ८२
खनितेंद्रशल्य[3] तारा घेउनि ये विरहवृत्त कथित तितें.
ततितें पुरनेत्रांच्या निववि, विसरती च पौर तापति[4] तें. ८३
पतितें स्मरुनि तरावें ज्या तो दे देव भेट भरतातें,
भर तातें दिधला घे; दावी सुख नित्य जें अज नतातें[5]. ८४
जनता तेंवि निववीली अमृतवनें जेंवि तीस मानवती,
मानवती[6] देवांच्या जी मुक्ति स्मरति ते न मानव ती. ८५
मा नव तीर्थपदार्पितमुक्तामणिहार दे पवनजाला,
ज्या लाजे मोक्ष भजन विभु ओपी सुचिर या सुखें ज्याला. ८६
जाळामाजि भवाच्या पशुपक्षी ही न राहवी, तारी,
वीतारिषट्कबाध[8] स्वजन करी प्रभु दयार्णव विचारी. ८७
चारी पुरुषार्थ नता दे भक्तमयूरमुदिर साधून,
'साधून[9] प्राकृत हि न, सर्वांसि' म्हणे 'भवाधि बाधू न.' ८८
'बा! धू न' म्हणति बाळ, स्नेहें परि तो धुतो, तसा जीव
'साजीव'[7] न म्हणतां ही साजवितो भक्तमधुपराजीव. ८९

१. देवमंडळींस. २. चंद्रवत् प्रकाशमान. ३. खणिलें इंद्रशल्य ज्यानें. ४. जें तापत होतें विरहें तें विसरलें–पंत. ५. जनतेस–पंत. ६. स्त्रिया. ७. जीवंत राहिला. ८. गेली आहे षड्रिपूंची बाधा ज्याची असा. ९. साधूहून हलके.

राजी वनजांची रवि सृष्टि सुखवि निजसुरद्रुमाराम,
मारा महेशसा हा तुरवि स्मरतां भवभ्रमा राम. १०
'दामरामायण' प्रेमें मयूरें रामनंदनें
श्रीरामचरणांभोजीं अर्पिलें कृतवंदनें. ११

इति श्रीदामरामायणं समाप्तम्।

# मंजुरामायण*

(शुद्धकामदावृत्त)

विधिमुखामरप्रार्थनावश, त्रिभुवनीं बरें व्हावया यश,
दशरथात्मभू जाहला हरी, प्रभु शुभा चतुर्मूर्तिता धरी. १
प्रथमनंदना नाम राम हें दशरथें नृपें ठेविलें महें;
भरतलक्ष्मणारिघ्न हे तिघे अनुज, तद्यश त्रिभुवनीं रिघे. २
मखसमाप्तिनें राम गाधिज्या सुखवि, ताप दे फार आधि ज्या.
पदरजें हरी शापजव्यथा, पुरवि गौतमस्त्रीमनोरथा. ३
धनु पुरारिचें क्षिप्र मोडिलें, सुयश तद्वधूरत्न जोडिलें.
भृगुपतिस्मय ध्वंसिला पळें त्रिभुवनस्तुतप्राज्यदोर्बळें. ४
जनकधर्म जो सत्यलक्षण, प्रभु कारि स्वयें तत्सुरक्षण.
त्यजुनु (नि?) राज्य घे वल्कलें मनीं, मुदित व्हावया सत्तपोवनीं. ५
अनुजजानकीयुक्त दे गुहा सुख, जसा रवी भक्तवारुहा.
वरुनि सन्नुता स्वर्धुनीतटा वटपयें रची श्रीश तो जटा. ६
पथ कथी भरद्वाज सन्मुनी स्मरति जा (?) कुळीं सुज्ञ जन्मुनीं.
वसति चित्रकूटाख्यसन्नगीं प्रभु करी, जसा शेष पन्नगीं. ७
सचिव ये पुरा, राम पाठवी; नृपति आपुला शाप आठवी.

१. कमलांची. * खंड ७, पृष्ठ ३४५, टीप २ पहा. २. गर्व. ३. जगत्रयाला स्तुत असें मोठें बाहुबल ज्याचें त्या रामानें. ४. भक्तरूपी कमलांना.

विकळ होय, 'हा राम!' हें वदे, मृति सखी तसी यासि खेंव दे. ८
भरत ये, करी दिग्रथक्रिया; न पुरवी सुधी तो प्रसूप्रिया.
धरुनि पादुका रंजवि प्रजा, म्हणति 'रामहृत्कंज' विप्र ज्या. ९
युवति अत्रिची जी महासती महिसुतामना दे महास ती.
धरि विराध तो मत्त मारला, हरुनि शाप तत्काळ तारिला. १०
सशरभंग ते विप्रसत्तम सुखवि भीत जे वारि तत्तम[1].
घटज ईश्वरा दे वरायुधा[2], विधिस जो म्हणे, 'दे वैरायुधा.[3]' ११
सुख पित्या तसें दे जटायुतें नमुनि मस्तकें त्या जटायुतें.
रचुनि पंचवट्याख्य आश्रम प्रभु वसे, हरी यत्कथा श्रम. १२
दशमुखस्वसा दंडिली, पर प्रबळ संगरीं मारिला खर;
कळवि रावणा ती निशाचरी, कनकरंकु तो पाठवी अरी. १३
चामालि ती खरी श्रीस एणता, धरवि, राम ही होय नेणता.
प्रभु शरें करी विद्ध तामसा, खचर तो म्हणे 'हाय!' रामसा. १४
दवडि लक्ष्मणा जानकी बळें, हारिलि तों चि ती रावणें खळें.
कारि जटायु त्या भग्न, तो अरी चिरुनि पक्ष या पाडि भूवरी. १५
करुनि मूर्छित क्ष्मातळीं खग, द्रुत निघे सती घेवुनी मग.
त्याजि कपींत ती आपले नग, भ्रमवि 'हा!' रवें जानकी जग. १६
खळ सतीस ने आपल्या पुरीं, भरि बळें सुरी कांचनी उरीं.
अरि अशोक ज्या नाम त्या वनीं वसवि, भी[4] दया न स्वकीं मनीं[4]. १७
मृग वधी, फिरे राम, तों वनीं अनुज भेटतां 'हा!' म्हणे मनीं.
उटज पाहतां शून्य 'हा!' वदे, महिसि शोक तन्मूलभाव दे. १८
पितृसखा खगा मूर्छिता वनीं निरखि, 'हा!' वदे, शोक घे मनीं.
करि जटायुची उत्तरक्रिया सुत तसा, भजे त्या गुरुप्रिया. १९
'हारिलि रावणें' खग कथी असें, हुडकि काननें प्रभु दयारसें.
धरि कबंध त्या वधुनि उद्धरी, सुहित तो कथी दनु सुखी करी. २०

---

१. त्यांचें अज्ञान. २. श्रेष्ठ आयुधाला. ३. वर आणि आयुध याना [?] ४. आपल्या मनांत भीति किंवा दया न वसवी.

न शबरी तसी मेळवी परा यश, बरी गमे ती रमावरा.
सुसरसी[1] प्रभुप्राण तापवी, स्वविरहा म्हणे जाणता 'पवी'. २१
पवनसुत कवि प्रथम मन हरी, सुगळ बहु सुखी प्रभुसि मग करी.
रुचिर नग हि तो करुनि कणव दे, 'करि न हित असा' प्रभु हि पण वदे.
बळसमुद्र जो त्या हि वाळिला वधुनि राघवें साधु पाळिला.
स्वपदसंश्रिता राज्य अर्पिलें, निजयशोमृतें विश्व तर्पिलें. २३
कपिवरें चमू साधु[2] बोधिली, जनकज्या तिणें फार शोधिली.
जलधि लंघिला वायुनंदनें, सुखविली सती स्तोत्रवंदनें. २४
प्रभुसमर्पिता मुद्रिका दिली, तिस सुखाब्धिची होय ती किली.
पवननंदनीं श्री करी दया, निजशिरोमणी खूण दे तया. २५
वन विनाशुनि क्रव्यभुग्बळें मथुनि मारिला अक्ष ही पळें.
घनरवा बळें वीर सांपडे जडनिसात्प्रियाऽनीरसां पडे (?). २६
तृण गमे तया वानरा सभा, हय न दे जसा मान रासभा.
दशमुखा तसा हा महापटू त्रिदशशत्रुला भासला कटू. २७
खळ म्हणे, 'धरा, पुच्छ पेटवा, त्वरित दुर्दशा यास भेटवा.'
करिति तें चि ते सर्व पामर, मुदित व्हावया लोक सामर. २८
पुच्छ[3] पेटतां मारुती उडे, पेटवी पुरी, ढांसळी हुडे.
फार वाहिला ये दया, स्तव श्री करी, न दे खेद यास्तव. २९
श्रीस[4] तो पुसे कीश पुनरपी, हे कथासुधा भक्त सुबर पी.
सिंधु लंघितां प्राज्यबळनिधी वानरागमें जेंचि शिवविधी[5]. ३०
कपि नमूनि दे श्रीशिरोमणी, असुद त्या मनीं श्रीश तो गणी.
मलयपर्वतीं चंदना फणी चिर तसा तया भेटला धणी. ३१
तदुपकार घे प्रभु शिरावरी, स्तुति पुनःपुन्हा साधुची करी.
सुगळ ने बळें सिंधुच्या तटा, लवति तद्भरें शेषसत्फटा. ३२
करि बिभीषण प्रणति तापला, शरण या गणी अनुज आपला.

---

१. पंपासरोवर. २. योग्य रीतीनें. ३. कामदावृत्त. ४. वृत्त कोणतें म्हणावें? ५. शिवविधिसदृश रामसुग्रीव वानरागमें—मारुतीच्या आगमनानें [ संतोषले ].

खचरराज्य दे, 'भय नसे तुतें,' प्रभु म्हणे, करी अयन[1] सेतुतें. ३३
शत महार्णवीं सेतु योजनें, अघ सरावया ध्येय जो जनें.
उतरले पथें या सहाय शें, चकित होय भूधी महायशें. ३४
खळ वदे, 'पहा शीर्ष हें, रणीं मम बळें तुझा मारिला धणी;'
वश करावया श्रीस दाखवी, स्वपतिचा तिला शोक चाखवी. ३५
नगशिरीं चढे सुगळ, पाहुनीं दशमुखा उडे अघ न साहुनीं;
पडुनि त्यावरी मुकुट पाडुनीं परतला बळी अरिस ताडुनीं. ३६
नयविशारदें दूत अंगद प्रबळ धाडिला शत्रुभंगद.
न खळ तो वळे, मानसीं जळे, धरवि कीं चळे दुर्मदें मळें. ३७
परम[2] नीच मूढा सळी, नया न गणि, पावती आपल्या लया.
परमनीं 'चमू ढांसळीन या' अरि म्हणे, 'रणीं ताप ल्याल, या.' ३८
न सरमा तिला शोक दे शिवूं, दशमुखा खळा लेश ही भिवूं,
हित बिभीषणस्त्री कथी, छळा कळवि तत्सुता ती हि जी कळा. ३९
उरगपाश जे घातले खळें घनरवें रणीं बांधिले बळें,
यदसुखें श्रमी लाख विप्र भू, महिसुतेसि ते दाखवि प्रभू. ४०
भय तिचें 'त्रि' पूर्वा 'जटा' हरी, प्रियसखी तसी फार जी बरी.
प्रभु खगेश्वरें रक्षिले, अही पळविले चि ते जाहले महीं[3]. ४१
दशमुखें उरीं अनुज ताडिला, प्रखरशक्तिनें विकळ पाडिला.
प्रभुवरें रणीं अहित झोडिला, करुनि भग्न तो विमद सोडिला. ४२
उठविला बळें कुंभकर्ण, न प्रवर ज्यापुढें काळवर्णन.
निजविला पुन्हां हा नुठावया, म्हणति तज्ज्ञ, 'दे भानु ठाव या.' ४३
रावणात्मजें बाह्य योजिलें, सप्तषष्टि तें कोटि मोजिलें;
सैन्य संगरामाजि ताडिलें, स्वामियुक्त जें आर्त पाडिलें. ४४
बळतम क्षणामाजि खाणिलें, पवननंदनें श्रृंग आणिलें.
अमृतसद्गुणा ज्यांत ओषधी, धारि खरारिची प्राज्य तोष धी. ४५
उठवि ओषधीगंध तीं बळें व्यसु तशीं च जीं पाडिलीं खळें,

१. रस्ता, मार्ग. २. अन्वयार्थ? ३. आनंदयुक्त.

जग यशा जसें स्तन्य तोक पी; स्वनुति आयके धन्य तो कपी. ४६
कलशकर्णजस्वात्मजक्षयें सचिवतत्सुतानीकिनी[1]व्ययें
तळमळे, रडे मृत्युच्या भयें करुनि मंतु ते रावण स्वयें. ४७
करुनि जानकीशीर्षकर्तन त्रिजगदीश्वरीं शोककीर्तन
करवि रावणी छद्म[2]शेवधी; करि बिभीषण स्वस्थ देवधी. ४८
उसळली चमू वदलि 'हाय!' जी, बसुनि ज्या स्थळीं कुमति हा यजी,
द्रुत सलक्ष्मणा सजुनि जाय, ती मृति तयासि दे नियति आयती. ४९
खळ म्हणे, 'मरो, मारणें असी.' धरि करीं वधाकारणें असी.
निरखितां तया होय कांपती मनिं वदे, 'न दे तोय कां पती?' ५०
सचिव रावणा विनवि वांचवी, करुनि बोध या सुकृत सांचवी.
कटक पाठवी बहुत, राम हा वधुनि दे सुरा बहुतरा महा. ५१
दशमुख स्वयें मग निघे रणें, जय वरावया गगनिं घेरणें.
म्हणति देव यां[3], 'शरभरा[4] महा विखर, सिंह तूं, शरभ राम हा.' ५२
स्वरथ पाठवी शक्र त्यावरी प्रभु चढे जसा पर्वतीं हरी;
कविजनप्रिया कीर्ति हो बरी, म्हणुनि युद्ध तो शत्रुसीं करी. ५३
अमर वेधले वीरसद्रसें समर त्यां गमे मुख्य भद्रसें[5].
यमरवी निवे, मोहपारदा समर नाचवी फार नारदा. ५४
सकळ वर्णिती अतुळ युद्ध तें, म्हणति, 'जोडिलें सुयश उद्धतें.'
घटज मंत्र दे, रवि हि दे वर, शचि म्हणे 'असो कुशळ देवर.' ५५
शत शिरें जरी तोडिलीं तरी न च पडे अरी; मातली बरी
सुचवि धी, वरि ब्राह्म तो, हरी उर शरें करी भग्न, भा हरी. ५६
दशमुखा वधी उर विदारुन ज्वलन लागतां उरवि दारु न,
शर तसें करी; परम दापिता खपविला अरी परमदाप्तिता. ५७
अतिबळा तया मथि पराशर, स्वमनु[6] या, गमे, कथि पराशर.
हरि म्हणे 'हिकां पुरवला, सदा जय असो तुला सुरविलासदा!' ५८

---

१. अनीकिनी=सेना. २. कपटांचा सांठा च असा. ३. रावणाला. ४. बाण-समूहा. ५. अत्यंत कल्याणप्रद असें. ६. स्वमंत्र. ७. हृष्ट.

करिति देवता कुसुमवृष्टितें, परम हर्ष दे विजय सृष्टितें.
अमरदुंदुभि प्रचुर वाजले, त्रिदशगायकध्वनि हि साजले. ५९
प्रभु मनोरथा पुरवि, नाचती सुरवधू, कळा उरविना च ती.
निववि सृष्टितें पवन वीजनें, सुरति सेविली नवनवी जनें. ६०
[1]स्तविति सुरमुनी प्रभुसि सर्व ही, म्हणति 'जय!' असें विधि हि सर्व[2] ही.
बरवि करवि त्या अरिचि हि क्रिया सदयहृदय तो अजितसत्प्रिया. ६१
मग बिभीषण स्थापिला पदीं तटपतत् जसा झष महानदीं,
जनकनृपसुता निकट आणवी, दहनमयसरीं शुचि हि न्हाणवी. ६२
अमर आत्मभू गिरिश वानिती, कथिति शुद्धता, बहुत मानिती;
कारिती ते शिखी भगवदंकगा, यश म्हणे जगा ''हरिन पंक' गा.' ६३
दशरथ स्वयें भेटला, 'भलें मज' म्हणे 'भवीं बेट लाभलें.'
उठविलीं बळें वासवें पळें, सुयश हें वदे पातका 'पळें'. ६४
[3]पुष्पकीं बसे नायका पुरा ये, अशा यशें काय कापुरा
लाज? चंद्रम्या जेंवि शारदा शारदा स्तवी जे विशारदा.[3] ६५
[1]भरत सुखविला, भार उतारिला; भजति कवि भवीं या चि सुतारिला.
बसुनि पितृपदीं विश्व निवविलें, दुरित भिवविलें, भद्र जिवविलें. ६६
प्लवगराक्षसक्षितिप गौरवी, प्रभु यश क्षपापशतगौर वी.
प्रसवलीं तपेंकरुनि भू जिला पवनभू तिणें स्तवुनि पूजिला. ६७
जनक मानवे रामरीतिला, दुसरि जी म्हणे पामरी तिला;
सम चि दे जगा साम राम हा, रव जनावनीं 'राम राम' हा. ६८
[1]श्रित मयूरसे, म्हणति जळद या, प्रभुसि देतसे भजनबळ दया.
करुनि ताप हा सकळ पळवितो, अति वदान्यता प्रकट कळवितो. ६९
परिसिलें असें सार या स्तव स्वयश आवडे फार, यास्तव
लिहुनि जानकीशासि वंदनें करुनि वाहिलें रामनंदनें. ७०

इति रामनंदनविरचितं मंजुरामायणं[4] समाप्तम्।

---

१. वृत्त? २. शर्व, शंकर. ३. अन्वयार्थ? ४. चातुर्मासेबोवांच्या दप्तरांतील तीच्या लेखकानें या रामायणास 'रामायणछंद' असें हि अन्य नांव दिलें आहे.

# दण्डकरामायण*

## बालकांड

दशरथनृप सूर्यवंशीं अयोध्यापति ख्यात लोकीं प्रतापें यशें शक्रसा शोभला. । परम अमरनाथ ज्याच्या गुणा भृंग पद्मास कीं मानसा हंस तैसा सदा लोभला. ॥ शतमखारिपु[1] पाहतां संगरीं त्यावरि श्रीशसा श्रीमहारुद्रसा जो प्रभु क्षोभला, । सकळ सुकवि बोलिले, 'हा जसा साधु न प्रार्थनापूरक स्वर्गशाखी तसा तो भला.' ॥ १ ॥

नरपति अनपत्य होता, तया प्राप्त झाली प्रजा आदरें पाळितां वृद्धता साधिता[2]; । विधिसुतकथित स्वयें ऐकिलें तें सुमंत्रप्रधानोक्त होय क्षमापाळ तो साधिता. । हयमख करि ऋष्यशृंगासि आणूनि, तों विष्णुहंसा वदे पद्मभू, 'रावणा वायसा । वधुनि सुखित्र, दिग्प्रथापत्य हो,' 'हो' म्हणे देव; पुत्रेष्टि होतां द्रवे अग्नि, दे पायसा. ॥ २ ॥

त्रिभुवनपति पायसीं त्या शिरे, दिव्य तें अन्न राजप्रिया ज्या तिघी सेविती सन्मती; । तदुदरभव च्यार साराकृति श्यामगौरप्रभ प्राज्यतेजस्क सत्पुत्र जे जन्मती. ॥ प्रथम तनुज कौसलेंद्रात्मजेचा तया 'राम' हें नाम ठेवी महात्मा सुधी तो पिता, । परममुदितचित्त होय, द्विजांकारणें भूषणें सद्धनें कल्पशाखी तसा ओपिता. ॥ ३ ॥

रुचिर 'भरत' हें दुज्या केकयाच्या सुतेच्या सुता नाम अत्यादरें भूवरें ठेविलें. । वडिल तनय जो सुमित्रेस झाला तया 'लक्ष्मण' प्रीतिनें साधुनीं स्वन्नसें सेविलें. ॥ तदनुजनिस नाम 'शत्रुघ्न;' आचार्यवर्यें वसिष्ठें यथाकाळ संस्कारिले नंदन, । श्रुति पढवुनि सांग केले, असे ज्यांस देवर्षि चित्तीं करीति त्रिकाळ स्वयें वंदन. ॥ ४ ॥

उपयम[3]विधियोग्य होतां सुत स्वांत चिंताकरीं आर्पिता जाहला राज-

---

*. दंडकवृत्ताचे अनेक प्रकार आहेत. त्यांपैकीं प्रस्तुत अर्णदंडक होय. १. इंद्रशत्रु राक्षस किंवा रावण. २. स+आधि+ता=मानसिक दुःखावस्था. ३. विवाहयोग्य.

चूडामणी, । अनुगसहित तों अयोध्येसि ये विश्वविख्यात तो गाधिज प्राज्य-तेजा मुनिग्रामणी. ॥ दशरथनृप पूजुनि प्रांजलि ब्राह्मणेंद्रा पुसे, 'काय इच्छा?' असें, विप्र भूपा वदे, । 'ममखपरिरक्षणा लक्ष्मणा रामभद्रा, विशुद्धें निवाया यशें क्षिप्र[1] भू, पाव, दे.' ॥ ५ ॥

खळ निशिचर पापकर्मे सदा ताप देती, न सत्तापसें त्यां तयां शाप द्यावा नृपा! । प्रकृतिकरुनि चंड जैसे चि वेतंड[2], होती न ते थंड सामें विनादंड, मोघा कृपा.' ॥ रघुकुलमणि हात जोडी, म्हणे, 'बा तपोब्धे! नसो घात, बाळांस मीं तात देवूं कसा? । निजबळसहिता मला ने, नको राम नेवूं, न संग्रामयोग्य, प्रभो! हा मदात्मा तसा.' ॥ ६ ॥

कुळगुरु वदला, 'तुज्या पात्र सर्वस्वदानासि कीं सत्तपोराशि भूदेव वीरा! महा;' । अतुळ सकळ गाधिज्याचा प्रताप स्वयें त्या नृपा जाणवी आणवी, देववी राम हा. ॥ मुदितहृदय होय वेऊनियां त्यां चिदोघांस दोघांस जातां पथीं दे बळाख्या क्षुधा । उडवि, अति बळा हि विद्या तृषा नाशिती दे दुजी, लाजली तद्यशें साधुगीतें सुधा. ॥ ७ ॥

कथुनि मदनदाहगंगावतारादि नाना कथा दे महास्त्रें शत त्र्यक्ष[3]-संपादितें; । प्रभु निवटुनि ताटकेतें करी दूर तत्काळ जें, प्राणिमात्रीं वसे मोहकंपादि तें. ॥ मग गुरुसह जाय सिद्धाश्रमीं, यज्ञ आरंभवी, तों चि ते चालिती शोणिताचे सडे. । मथि सबळ सुबाहुतें राम, तद्बाणवातें हि मारीच नामा उडे, सागरीं तो पडे. ॥ ८ ॥

जनकनृपतिनें मखा बाहिला कौशिक प्रार्थितां जाय घेवूनि तो सानुजा राघवा; । 'शतमख मळवी जिला ती अहल्या शिला' गाधिज-प्रोक्त वृत्तांत हा आयके आघवा. ॥ पदनलिनरजोनिळें[4] उद्धरी शुद्धरीति प्रभु क्षिप्र भूदेवजाया[5] स्वयें, यास्तव । प्रणति करुनि नाथयुक्ता महाशापमुक्ता सती ऐकवी तारका रामराया स्तव. ॥ ९ ॥

मुनिसह मिथिळेसि पावे, करी मैथिल प्राज्य सत्कार, वर्णी शतानंद या

---

१. लवकर. २. हत्ती. ३. शंकरापासून प्राप्त झालेलीं. ४. चरणकमलांतील परागानें युक्त अशा वाऱ्यानें. ५. ब्राह्मणपत्नी.

गाधिज्या. । नृपतिस पुसतां कथी 'दिग्रथाचे' असें तो, भयें ज्यांचियां जाय सोडूनि यागाधि ज्या. ॥ मग विनविति ते कुमार स्मरारातिकोदंड-संदर्शनार्थ द्विजाधीश तें जाणवी, । करुनि परमयत्न राजा स्वयें कौशिकाज्ञेसि वंदूनि ओढूनि रंगांत तो आणवी. ॥ १० ॥

रघुपतिस विलोकितां जानकी त्र्यंबकार्ते शिवेतें करी प्रार्थना मानसीं आपण, । 'जनकरचित जो महाकार्मुकारोपकर्ता सुतापात्र तो सिद्धिला पाववा हा पण.' ॥ मुनिस नमुनि वंदुनि श्रीगेळा त्या धनुष्यासि जोडी गुण, श्रीश आकर्ण आकर्षि तें, ॥ कडडडडड गर्जेलें भंगलें, रंगलें श्रीमन, त्रास मोही जगा, हर्ष नाकर्षितें. ॥ ११ ॥

प्रमुदितहृदया धराकन्यका रामकंठांत घालूनि माळा स्तवी धन्यता आपली; । सुरमुनिजनता निवाली यशें रावणाद्युग्र जे तन्मति त्रास पावोनियां तापली. ॥ मुनिवर जनकासि सांगोनि रामानुजा लक्ष्मणा देववी औरसी कन्यका ऊर्मिळा, । सुवर भरत आणि शत्रुघ्न यांला हि तद्बंधुच्या मांडवी ख्यातकीर्ती हि ज्या दुर्मिळा. ॥ १२ ॥

दशरथ मिथिलेसि आणूनि केले विवाहोत्सव प्रेमळें, सद्यशोवित्त संपादिलें । विपुळ अतुळ शुद्ध होतें गृहीं जें वरांला सुखें सर्व तें स्वर्द्रुच्या चित्तकंपा दिलें. ॥ रघुवर परते पुरा, होय उत्पात तों, कांपवी फार रोधूनियां मार्ग वारा मही, । द्युमणिस करि निष्प्रभ स्वप्रतापें असा जो सुतेजा महात्मा तया भार्गवा राम ही. ॥ १३ ॥

विजयितनुजयुक्त राजा प्रवेशे अयोध्येंत, कोणी हि पौरांत तेव्हां असानंद न. । म्हणति, 'शतमखा हि नाहीं जसा यास भाग्योत्तमा भूवरा राघवाला असा नंदन.' ॥ तदुपरि भरतासि ने मातुळ प्रार्थुनि क्ष्मावराला सुमित्रेचिया त्या हि तोका पुरा; । निवुनि पिवुनि दिग्रथाच्या यशा जो न चंद्रा बधे वर्णिल स्वच्छधी काय तो कापुरा? ॥ १४ ॥

बालकांड:

---

१. यज्ञविषयक चिंता. २. शिवधनुष्य सज्ज करणारा. ३. शंकराला. ४. आकाशरत्न अशा सूर्यास.

# अयोध्याकांड

स्वगुरुसचिवपौर यांच्या मतें रामचंद्र प्रजापालनीं योग्य, हें जाणुनि क्ष्मापती । करवि सकळ यौवराज्यार्थ संभार, तों मंथराभिन्नधी[1] दे प्रिया ही तऱ्ही ताप ती. ॥ निजवरयुग केकयाची सुता आग्रहें घे, म्हणे स्पष्ट, 'चौदा समां[2] राम जावा वना, । भरत चि युवराज व्हावा,' असें ऐकतां भूप सोडावया भी स्वसत्यव्रता पावना. ॥ १ ॥

करि बहु मळवावया दुर्यशें ती जगीं 'हा !' असें यावया काळ[3] सर्वं[3] स्वतोकानना; । नमुनि गुरुजनास जाय प्रिया बंधुयुक्त, त्यजी राज्य, वांटूनि सर्वस्व तो कानना. ॥ नरपतिवचनें सुमंत्रें रथीं वाहतां तीं तिथें बोलिले साश्रु ते पौर, 'वामाजितें[4] । स्वपरपरमघात केला नृपें. यापरी जें घडे कर्म पाडी उणें गौरवामाजि तें.' ॥ २ ॥

दशरथ महिषीगृहा जाय, दुःखें म्हणे, 'हाय !' तो सांवरी काय न स्वायशें लाजला. । पुरजन निजल्या स्थळीं सोडिला, जोडिला निर्दयत्वापवाद स्वयें, सद्यशें साजला. ॥ नरपतिहृदयीं जसा त्या पुरीं ही तसा शोक कक्षीं[5] महावायुनें वह्निसा माजला, । प्रियसख गुह पाहतां वल्कलें दुग्ध[6] देतां वटाचें जटा बांधितां अंतरीं भाजला. ॥ ३ ॥

'नृपतिजवळि जा' असें त्या सुमंत्रासि सांगोनि तो नौबळें क्षिप्र लंघी प्रभू आपगा, । अमृततनुत जिचें यश व्याकुळातें म्हणे, 'रे ! मला जावया सर्व ही आपला ताप गा.' ॥ कवि म्हणति जिभेस, 'हें तोय न, ब्रह्म; कीं ध्याति भावें सदा ही महाविप्र, या गा सये !' । कथितसुमहिमा असा श्रीश चिंती स्वचित्तीं 'भरद्वाज शोभा पहावि,' प्रयागास ये. ॥ ४ ॥

पितृसख भगवान् भरद्वाज सप्रेम रामें प्रयागाश्रमीं देखिला, तातसा लेखिला; । मग कळउनि नाम पायांवरि स्थापिला मस्तक प्रेमळें वानिला पुत्रसा मानिला. ॥ मुनिवरकथितें पथें चित्रकूटाख्य सद्बंधु होवूनि जो राहिला

---

१. मंथरेनें बुद्धिभेद केला जिचा ती. २. वर्षें. ३. सर्वकाळ. ४. स्त्रीजितें नृपें. ५. गवतामध्यें. ६. चीक.

अद्रि तो पाहिला, । उटज करुनि वास केला तया सन्नगीं श्रीकरें, फारसा साजला, मेरु ही लाजला. ॥ ५ ॥

गुहचरपुरुषोक्त[1] हें वृत्त ऐकोनि गेला पुरीं सूत झांकूनि वस्त्रें मुखा लाजुनीं; । श्रवण करुनि सर्व तें 'हा!' म्हणे भूप, याला तनू ती जसी दे न शाटी सुखाला जुनी. ॥ कथुनि मरणहेतु शाप प्रियेतें त्यजी देह; तो पुत्रशोकें सतीकांतशोकें विरे. । पुरजन वदले, "म्हणावें महावत्सळें 'बा! उदासीन होवूनि होणार हो कोंवि रे!?'" ॥ ६ ॥

त्वरित भरत आणिला, तो प्रसूतें म्हणे, "दुर्यशाचा भला जोडिला कांबळा! कापिसी । हृदय असिविना; सतीराजहंसीगणीं दुष्टवृत्ता मिळालीस तूं कां बळाका पिसी? ॥ दवडुनि पतिपुत्र देशांतरीं जोडिलें निर्दये! दुर्नये! राज्य वा काय गेहादि वा । गरळ चि मज हें? कुळीं या तुवां 'हा!' प्रजाहीं म्हणाया सदा लाविला काय गेहा दिवा?" ॥ ७ ॥

परम कुपित होय शत्रुघ्न, त्यापासुनि स्वाग्रजाच्या[2] भयें मंथरा साधु तो वांचवी;। भरत कळवि राममातेसि शुद्धत्व, ती हि द्रवे, प्रेमपात्रीं यशातें सती सांचवी. ॥ तदुपरि चिरतैलपात्रस्थतातासि[3] संस्कारुनि त्यक्तराज्याश आचार्यदत्ता[4] पदा । त्यजुनि शरण जाय रामा शरण्या, मनीं आठवी मातृमंतूत्तमा[5] सर्वसत्तापदा. ॥ ८ ॥

प्रथम विभुसखें गुहाख्यें निषादेश्वरें रामवैरी महाराज्यलोभी मनीं भाविला, । मग समजुनि रामभक्तोत्तम स्वर्धुनीच्या तटा भव्यनौकाशतें आदरें लाविला; ॥ तदुपरि मुनि तो भरद्वाज सर्वज्ञ ही स्वाश्रमीं शोध सत्कार भारी तयाचा करी, । करिति सकळ सिद्धि ज्या सत्तपोराशिची हस्त जोडूनियां नित्य व्हाया दया चाकरी. ॥ ९ ॥

भरत पुसुनि तापसा त्या निघे, चित्रकूटीं नगीं ताप सारावया भेटला राघवा; । नमुनि, करुनि हा पसा पुत्रसा होय, राम स्वयें बापसा तोपवी वारिता लाघवा. ॥ कुळगुरुजननीप्रधानाप्तपौरादि जे देखिले त्यांसि जें

१. दूतानें सांगितलेलें. २. रामाच्या. ३. खोडलेला पाठ—स्थिता तातदेहासि. ४. गुरु वसिष्ठानीं दिलेल्या राजसिंहासनाला. ५. आईच्या भयंकर अपराधाला.

योग्य जैसें करी सर्व तें. । जनकमरण ऐकतां 'हा!' वदे, तोयपिंडादि दे, वर्णिलें प्रेमळें नारदें पर्वतें. ॥ १० ॥

भरत 'परत' रामचंद्रा म्हणे, साश्रु पायांसि घाली मिठी, सोडिना, आळ घे बाळसा. । प्रभुवर वदला, 'तुवां म्यां हि आज्ञा पित्याची करावी च वेदोक्तिसी सोडुनी आळसा. ॥ सुखविन चवदा समा लोटतां, कीर्ति शुद्धा तुला न त्यजू जेंवि मल्लारिला म्हाळसा. । शिवतिल हृदया न बा! स्वप्नकाळीं हि कामादि जे प्राणियांचे महाक्रूर ते काळ सा.' ॥ ११ ॥

सकळ ऋषि हि बोलिले, 'अग्रजाच्या निदेशें यश श्रेय संपत्ति, लंघीं न या, वेद हा. । गुरुवचनरता गुण श्रेष्ठ जैसे गुणज्ञा गुणाढ्य स्वयें साधु शोधीत यावे दहा.' ॥ सुमणिकनकपादुका रामपादांबुजस्पर्शपूता शिरीं घे, तया नाथ तो खेंव दे; । 'अवधि जरि टळेल होमीन मीं अग्निकुंडीं तनू' हें मुखें भक्तहृद्दत्ततोखें वदे. ॥ १२ ॥

भरत परतला, अयोध्या न सेवी, वसे ग्रामें नंद्यादि जो त्यांत वल्की जटी होउनीं, । प्रभुसि न विसरे, म्हणे 'हाय!' मूळें फळें खाय, राहे हिमीं स्वस्थ वर्षीं सदा तो उनीं ॥ त्यजुनि विभु हि चित्रकूटा निघे, अत्रिच्या आश्रमा जाय, त्याचे नमी पाय, आशी वरी. । मुनिवरदयिता अँसूया नसे जीस ती श्रीस दे श्री, सखी बैसवी तोषराशीवरी. ॥ १३ ॥

अयोध्याकांड:

## अरण्यकांड

अनुजयुवतियुक्त लोकेश तो दंडकारण्य जें त्यांत गेला, ऋषी जे निराधार 'हा!'। म्हणति, अभय त्यांसि दे, श्रीहरातें म्हणे, 'जा स्वलोकीं वरीं तुंबरुत्वा विराधा! रहा' ॥ प्रमुदित शरभंग केला सुतीक्ष्णर्षि कुंभोद्भव स्वस्थधी जो जसा मेरु होता तसा, । स्वशरवरशरासनाद्यायुधें घे, निघे, दे जटायु स्वयें आसरा त्यास तो तातसा. ॥ १ ॥

---

१. पर्वत नांवाच्या मुनीनें. २. हट्ट. ३. खोडलेला पाठ—**जे दुर्जय**. ४ आलिंगन. ५. नंदिग्राम. ६. पावसामध्यें. ७. अनसूया. ८. श्री—लक्ष्मी सीता तिला हरण करून नेणाऱ्या विराध राक्षसाला. ९. अत्यंत आनंदित.

शुचितम रमणीय गोदावरीच्या तटीं पंचवट्याख्य जें स्थान तेथें दलागार[1] हा। करवि, नरविलासवान् जो महादोषतप्ता म्हणे, 'स्वस्थ वैकुंठपीठीं मला गा, रहा.'॥ रतिमति गतभर्तृका शूर्पणख्याह्वया राक्षसी राक्षसेंद्रस्वसा कर्णनासा धुर्या[2]। स्वदुरितमळ लक्ष्मणाच्या कृपाणासि दे; सेविती आदरें सद्यशोवर्णना साधु या. ॥ २ ॥

निशिचरवर जो जनस्थानवासी खर क्रूर रक्षोबळ प्राज्य घेवूनि ये हा रणा,। कारिति अजितबाण तत्प्राण सेवूनि जैसी करावी जळानें तसी तेधवां पारणा. ॥ मग जगदहिता खला रावणा दाखवी ती विनासा विकर्णा मुखा दुर्दशाकारणा,। वदलि, 'युवतिरत्न द्याया तुला यत्न गेलें करूं तों नरें दंडिल्यें, ऊठ तन्मारणा.' ॥ ३ ॥

अपशकुन न मानुनि स्यंदनीं जाल्म[3] बेसे, निघे, चित्त कोपें स्मरें जाहलें बावळें; । खळ दशमुख कार्य सांगे, म्हणे त्यासि मारीच, 'राम स्वयें काळ, जावूं नको बा! वळें.' ॥ तरि हि जड बळें तया जाय घेवूनियां पंचवट्याश्रमा, गुप्त राहे, पुढें पाठवी. । कनकहरिण होय, पाहे सती, 'द्या धरा' हें वदे, राम धांवे, गमे स्वेशता नाठवी. ॥ ४ ॥

कपटहरिण दूर धाकें पळे, सूरवंशोत्तमें शूरसन्नायकें ताडिला सायकें; मरणसमयिं 'हा प्रिये! हा सखे! लक्ष्मण!' प्रोच्चनादें म्हणे तों असें शोकभीदायकें. ॥ श्रवण करुनि जानकी भी; तिला यातुमाया कथी तज्ज्ञ सौमित्रि जों, तों करी कोप ती. । परमकटु वदे, तया घालवी स्वोटजांतूनि, कीं, धी बरी ही विपत्त्यागमीं लोपती. ॥ ५ ॥

नमन करुनि साश्रु रामाकडे जाय तेथूनि तो, तत्क्षणीं चोरिली जानकी यातुपें; । वदलि आरिस ती, 'कराया तुतें भस्म पेटेल मन्नाथकोपाग्नि जें आग हें या तुपें.' ॥ अहित पळवि, तों तिच्या आयके गृध्र हाका, उठे, मार्ग रोधी, रथातें चुरी, युद्ध तें। निरुपम सुर वर्णिती, सोडवी सून, तत्पक्ष खड्गें परि छेदिले, पाडिला उद्धतें. ॥ ६ ॥

गगन वरुनि नेत होता, तशा संकटीं श्री नग[4] स्वोत्तरीयांत बांधो-

१. पूर्णकुटी. २. धुण्याकरितां. ३. अविचारी (रावण). ४. अलंकार.

नियां आपले । आरिस न कळतां च पांचां कपींत त्यजी ऋष्यमूकीं, स्वताप-ज्वरें तापले. ॥ पवनजवन तो स्वलंकेसि पावे, अशोकीं वनीं होय देविस यायास 'हा!' स्थापिता. । दशरथ कर जीस जोडी मनीं, ब्रह्मविद्या च जाणे, धरी सर्वदा फार आस्था पिता. ॥ ७ ॥

वधि मृग दुसरा, फिरे राम, तों वाम नेत्र स्फुरे, लक्ष्मण क्षिप्र येतां पथीं आढळे. । 'त्यजिलि कसि?' असें पुसे, साश्रु तो कूक्त सांगे, स्व-धैर्याद्रिपासूनि, तेव्हां म्हणे 'हा!' ढळे. ॥ द्रुततर उटजासि पावे, परि प्रेय-सीतें न पाहे, श्रमें फार शोधी वनें[1] आयतें, । रडवि, खगमृगांसि ही स्त्री-वियोगी प्रभु स्त्रैणसा काननीं हिंडतां जें वदे 'हाय!' तें. ॥ ८ ॥

गहन हुडाकितां पितासा पित्याचा सखा मूर्छित क्षोणिपृष्ठीं वियोगा-कुळ पाहिला, । त्वरित म्हणुनि 'हा!' निजांकीं च तन्मस्तक प्राज्य-शोकें दयासागरें राघवें वाहिला. ॥ प्रभुसि हळुच वल्कलें वीजितां[2] 'जानकी तस्करें रावणें!' हें असें सांगतां राहिला । असुरहित. जटायुचा चंदनाच्या चितेमाजि देह स्वयें भुक्तिमुक्तिप्रदें दाहिला. ॥ ९ ॥

पुनरपि रघुनायक श्रीस शोधी, म्हणे, "हा प्रिये! 'हा!' न यावा मुखीं, यावया हास ये. । पळभरि हि न योग्य विश्लेष, अत्यंत तापप्रद, क्रूर माझ्या तुझ्या या वया हा सये!" ॥ अगणित सुकृतांचिया संग्रहें होय याची स्मृति प्राणियांला महाशोकबंधावधी, । अनुजसहित सांपडूनि द्विगव्यूतिबाहूंस[3] खंडूनि खड्गें वनीं तो कबंधा वधी. ॥ १० ॥

दनु मुनिवरशापमुक्त क्षणें होय, दिव्याकृति व्योमयानस्थ तो त्या निजोद्धारका । कथि हित, 'शबरीस भेटोनि तत्प्रोक्तमार्गें विलोकूनि पंपा-सुकंठा पहा तारका. ॥ मग समसुखदुःख तूं हो सखा, कार्य त्याचें करीं, सूर्यपुत्रा जगीं ज्या न कीशा तुला, । अकपटमति शूर होईल कार्यां सहाय, प्रिया भेटवील प्रभो जानकीशा! तुला.' ॥ ११ ॥

प्रभुवर शबरीस भेटे, सती सानुजा श्रीवराची करी उद्धराया सपर्या[4] कुळा. । स्तुति करुनि मतंगशिष्या निघे ब्रह्मलोका ज्वलत्पावकीं देह होमी

१. विस्तृत. २. वारा घालितां. ३. चार कोस लांब बाहूंस. ४. पूजा.

अपर्यांकुळा[1]. ।। बसुनि रुचिरमूर्ति भास्वद्विमानीं सुखें माय न, प्रेमळा जाय लीलानरा गाय ती. । धरिति परिसतां तशा स्वाधिका तद्यशा मानसीं त्या तिच्या भक्तिशीला न रागा यती. ॥ १२ ॥

रघुपति शबरीस देवूनि दिव्या गति क्षिप्र तत्प्रोक्तमार्गें ससौमित्रि पंपेस ये, । स्मरुनि हृदयवल्लभेतें म्हणे, 'हा प्रिये! त्वद्वियोगज्वरें जीवित स्पष्ट संपे सये!' ॥ अनुज मनुजनायकातें वदे, 'शत्रु शोधूं, वधूं, धैर्य उत्साह साधील कार्यास या; । गुरुमुख शशि, चंद्रिका ज्या सदाशी, सती-मानसीं ताप राहों न देतील आर्या सया. ।। १३ ।।

अरण्यकांडः

## किष्किंधाकांड

पवनतनय ऋष्यमूकासि जातां पथीं राघवा विप्ररूपें पुसे वृत्त, सांगे हि तें; । सुगळकपिस भेटवी, हा सखा होय, दे भूषणें तो, म्हणे, 'त्यागिलीं हीं हि कां गे! हितें[2]?' ॥ रविसुत पुसि अश्रु, बोले, 'सख्या! म्यां हतस्त्रीक-कीशें हि होवूं दिली बुद्धि न व्याकुळा; । त्वरित चि तुज भेटवीतों तुजी वल्लभा, संकटीं धैर्य बापा! तुझ्या योग्य भव्या कुळा.' ।। १ ।।

प्रभु कपिस पुसे, 'कसें बंधुसीं वैर झालें असें?' हा कथी, "एक मायाविनामा अरी । असुर हटकि, तद्वधा वीर वाळी निघे, हा हि तों तो पळे, भीति दोघांसि पाहे धरी; ॥ मजसह कपिराज पाठीस लागे, शिरे शत्रु भीमीं बिळीं, त्यांत तैसा चि हा ही हरी; । विवरवदनरक्षणाज्ञा मला आंत जातां करी, रक्त होतां समा[3] त्या बिळाला भरी. ॥ २ ॥

कपिपति वधिला अरीनीं असें वाटलें, म्यां शिळा त्या बिळाच्या मुखीं तद्भयें स्थापिली. । रडत चि सदनासि आलों, सुचेना रुचेना हि कांहीं च बा! बंधुशोकें मति व्यापिली. ॥ सचिव बसविती पदीं आग्रहें जों मला तों जसी दोबळें ती दृढा शत्रुसेना शिला । चुरुनि गुरु निजासनस्था विलोकूनि मातें म्हणे 'घातक', स्नेह कोपें पळे नाशिला. ॥ ३ ॥

सचिव सकळ दंडुनि क्रूर वाळी स्वयें काळसा मद्वधाकारणें पाठिला

१. स्वस्थचित्त अशी. २. येथें (?). ३. वर्षांतीं.

लागला, । गुरु म्हणउनि साहिलें, हिंडलों सर्व भूमंडळीं, या नगीं वांचलों, तो वृथा भागला. ॥ असुर महिषरूप जो दुंदुभी मारुनि क्षेपितां रक्त सांडे, मतंगर्षि दे शाप हा, । 'मरण चि तुज ऋष्यमूकीं घडो वीर्यमत्ता! प्लवंगाधमा! दूर हो, या न देशा पहा.' ॥ ४ ॥

महिधरशिखरें करें झेलितो कंदुकासारिखीं, ब्राह्मनामीं मुहूर्तीं उठे हा सदा, । तरणि नुगवतां चतु:सागरांमाजि संध्या करी, वायुला होय याची गति त्रासदा, ॥ खळ ममदयिता बळें भोगितो, बंधु जेणें निरन्याय ही घोर पापी तसा वाळिला[1], । अपरिमितबळा अशा मारिसील प्रभो! राघवा! माझ्तिताकारणें तूं कसा वाळिला?" ॥ ५ ॥

उडवि महिषदेह तो वामपादांबुजांगुष्ठपत्रें दहा योजनें त्या कपिप्रत्यया. । प्लवगवर वदे, 'झुगारी द्विगव्यूति वाळी' तदा आर्द्र राजा म्हणे संशया 'सत्य' या. ॥ तदुपरि कथि, 'एक एकें शरें शाल हे भेदितो सप्त कीशेंद्र' ऐसें तया राघवा; । प्रकटि अजित तत्क्षणीं सात ही ते महावृक्ष भेदूनि एकाशुगें स्वाञ्जुता लाघवा[2]. ॥ ६ ॥

विशिख अवनितें हि भेदी, वधी दैत्य पाताळवासी, मुहूर्तें फिरे, तूर्ण तूणीं शिरे. । निरखुनि कपि विस्मयें तो वदे, "बा! उरीं कोण न त्वत्प्रतापें चिरे? लोष्ट तैसा विरे? ॥ अरिस वधुनि रक्ष मातें, तुला न क्षमा! तें जड द्वेपिवक्ष, प्रभो! जोडितों हात मीं; । दिनमणिशरणागतें पामरें ही म्हणावें न केव्हां तरी भ्रांत होवूनियां 'हा!' तमीं." ॥ ७ ॥

श्रितनतजनवत्सळें राघवें तापनाशार्थ तो घेतला नीरदें जेंवि केकी कडे, । खुण करुनि गळां स्वभक्तप्रिया मारिला वालि वक्षीं महाबाण बैसोनि एकीकडे. ॥ प्रथम कटु वदे, मग श्रीवराच्या करीं सेवटीं दे सुत स्त्री, तयांच्या गुणा आठवी; । रुचिर कनकपद्ममाळा स्वयें स्वानुजा अर्पितां वीरलोकीं जगन्नाथ त्या पाठवी. ॥ ८ ॥

सुगळ करविला सुमित्रासुत प्रेरुनि श्रीकरें चक्रवर्ती कपींचा, यशें साजला; । हरुनि दुरितभीति तारा दिली श्री तसी; तो न सुग्रीव कोणा

१. त्यागिला, बहिष्कृत केला. २. कौशल्याला.

हि तत्सेवनें लाजला. ॥ उचित सुगुण अंगद क्ष्मावरें यौवराज्यार्ह केला, प्रताप त्रिलोकांत तो गाजला; । प्रभु शिखरिगुहेंत पर्जन्यकाळीं वसे, भेटला न प्लवंगेश, वाटे सुखें माजला. ॥ ९ ॥

सुभट अनुज धाडिला ईश्वरें, तद्धनुर्नाद ऐकोनि कांपे पुरी, पाहतां कोपला; । सुगळ हि बहु भी, पुढें शीघ्र[1] तारेसि धाडी, तिच्या आदरें कोप सौमित्रिचा लोपला. ॥ कपिपति विनवी, कथी, 'प्रेषिले दूत, येतील बा लक्ष्मणा! तूर्ण कीशर्क्षसेनाशतें.' । सुखवुनि शिबिरेंत घे राघवा, जाय तो त्याकडे दुःख यच्चिंतनें सर्व ही नाशतें. ॥ १० ॥

प्रभुसि नमुनि भेटला बंधु सुग्रीव जों, तों चि कीशर्क्षसेनाशतें गर्जलीं, पातलीं; । सकळजनमनें अकाळीं च कल्पांत होणार कीं काय या संशयीं तद्गजें घातलीं. ॥ करुनि अवधि एक मास प्लवंग प्रभुस्त्रीस शोधावया यूथप प्रेषिले वातसे, । पवनज नळ नीळ ऋक्षेश तारेय हे दक्षिणे, ते चि कर्ते क्षम स्वामिसेवा तसे. ॥ ११ ॥

प्लवग इतर सर्व शोधूनि मासांत आले, यमाची दिशा धुंडितां कीश ते भागले, । सुतृषित सिरले बिळामाजि विंध्याचळीं योजनांतीं प्रकाशासि देखावया लागले. ॥ मणिमय गृह, वापिका, दिव्य हेमद्रुम, स्वर्गसें स्थान, वृद्धा सती एकली पाहिली; । पवनसुत पुसे तया, ती कथी, 'हें मयें निर्मिलें, यांत हेमाप्सरा मत्सखी राहिली. ॥ १२ ॥

मय अशनिकरें[2] बळें स्वप्रिया अप्सरा भोगितां मारिला, स्थान हें कंजजें[3] अर्पिलें; । मम जनकहि मेरुसावर्णि बा! मीं स्वयंभाभिधा, त्वां स्ववृत्तें मला पाहिजे तर्पिलें.' ॥ पवनसुत कथी तिला, सर्व ती उत्तमें दे फळें, प्रार्थितां निर्गमाकारणें झांकवी । नयनयुगुळ, तों कपि क्षिप्र बाहेरि आले. तिर्ते मानिती न स्वयें माय ते कां कवी? ॥ १३ ॥

न जनकतनया दिसे, चोर ही; सिंधुतें पाहतां विंध्यपादीं[4] कपी बैसले सांधि ते, । सकळ अवधि मास लंघूनि त्या तीक्ष्ण दंडा सुकंठासि

१. मूळ पाठ—शीघ्र. २. वज्रधर इंद्रानें. ३. ब्रह्मदेवानें. ४. विंध्यपर्वताच्या लहानशा टेकडीवर. ५. दुःखी.

झाले न उक्तक्रियासाधिते. ॥ करिति मरणनिश्चय स्पष्ट तारासुताच्या मतें, गृध्र संपाति ये त्यांसि खाया नगीं, । कपिपसुत म्हणे, 'जटायु त्यजी रामकार्यी जसे प्राण सोडूं तसे धन्य होऊं जगीं.' ॥ १४ ॥

अनुजमरणवृत्त संपाति त्यांतें पुसे, विस्तरें आयके, 'हा!' वदे, तो कथी आपलें; । कटक निवावि जानकीचा बरा शोध सांगोनि तें जें कपींचें अशोधें तिच्या तापलें. ॥ विहगवर निशाकराच्या वरें पक्ष पावे, उडे, ताप त्या वानरांचा हि तत्काळ, जी, । स्तवन करुनि जांबवान् वाढवी अंजनानंदनोत्साह, जेणें नुरावी मनीं काळजी. ॥ १५ ॥

इति किष्किंधाकांड:

# सुंदरकांड

पवनतनुज होय दिग्योजनाकार, वेगें महेंद्राद्रिशृंगावरूनि प्रतापें उडे; । जलनिधिवचनें उठे क्षिप्र मैनाक, विश्राम द्याया नभोलंघनीं जों उरासीं जुडे, ॥ मनिं समजुनि विघ्न पाडी, जिणी नागमाता, वधी सिंहिका, दाटवी देवतांचे चुडे; ॥ मग उतरुनि लंबनामाचळीं भंग लंकाधिदेवीस दे, कांपवी तो पुरीचे हुडे. ॥ १ ॥

लघु वपु करि, ओतुसा होय, लंकेंत शोधी गृहें, रावणांतःपुरीं ही कृती तो सिरे; । निरखुनि मधुमत्तसुप्ता स्वकांतासहस्त्रीं दशास्या म्हणे मानसीं, 'भस्म तूं होसि रे!' ॥ हुडकुनि नगरी अशोकीं वनीं श्रीस पाहे, चढे शिंशुपाग्रीं, दडे, तों चि ये पाप तो । दशवदन, वदे तिला, 'मत्प्रिया हो' असें ऐकतां कीश तापे, ज्वरानें जसा तापतो. ॥ २ ॥

रघुपतिमहिषी करी फार धिक्कार; कोपे, म्हणे तो, 'दिला स्या द्विमासावकाश; स्वयें । जरि मम शयनीं न येईल द्या प्रातराशार्थ भाजूनि हे राक्षसीहो! मला निश्चयें.' ॥ उपशमवुनि उक्तिनीं युक्तिनीतिप्रवीणा प्रिया त्या स्मरांधासि दावी स्वकेल्यालय. । श्रुतिकटु बहु राक्षसी बोलती, श्री म्हणे, 'दुःख जाईल उद्बंधनें मात्र केल्या लय.' ॥ ३ ॥

---

१. वानरसैन्य. २. मूळ पाठ–उतरुनियां सुवेळीं नगीं. ३. मांजरासारखा. ४. शिसव्याच्या वृक्षावर. ५. क्रीडागृह.

रघुपतिगुण वर्णुनि प्रेम विश्वास देवूनि वंदूनि दे श्रीकरीं राममुद्रा कपी; । प्रमुदितहृदया सती स्वप्रियाच्या चारित्रामृतातें न चिंतूनियां शत्रुचा धाक पी. ॥ कथुनि खुण कथा[1] निरोप स्वचूडामणि श्री समर्पी, पुसे कीशकोटींद्र आज्ञा तितें; । त्वरित मग निघे कराया तया वैरिचे साश्रु जेणें वदावे अहोरात्र ' हा !' ज्ञाति तें. ॥ ४ ॥

हरिवर वन तें अशोकाख्य भंगी, वधी तक्षकक्रूर तद्रक्षक क्रुद्ध जो काळसा; । दशमुखसुत अक्ष ये, त्या ससेना हि मारी, त्यजी युद्धयज्ञीं बुधासंमता आळसा. ॥ तनुजमरण ऐकतां शोककोपाकुळें रावणें प्रेषिला इंद्रजित्संगरा पातला, । वधुनि कटक तो हि केला क्षण श्रांत वातात्मजें जो सुरेशारि होता जयें मातला. ॥ ५ ॥

कटकमथन देखतां मेघनादें धराया तया दुर्जया उग्र विधियस्त्र[2] जें योजिलें, । अवश हि वश होय त्या तो बळें अन्यतेजांत सत्तेज तें बालिशें राक्षसें मोजिलें. ॥ करुनि सुदृढबद्ध ओढूनि नेला सभेमाजि तो रावणें बोलवीला, वदे वास्तव, । ' प्रभुसि[3] दशमुखा ! सती दे; प्रसन्न प्रणामें चि होतो, सुखें वांच, या स्वल्प ही वेदसा प्राज्य देवा स्तव.' ॥ ६ ॥

अणिक हि बहु बोलिला स्पष्ट होणार तें भीड सोडूनि, अत्यंत मूढा जसा पंडित. । त्रिदशरिपु हि तो सभेमाजि अन्याय आगीं बरा लागतां कोपला जाहला खंडित. ॥ त्यजवि असि बिभीषण न्यायवादी, म्हणे, 'सर्वथा दूत मारूं नये,' आयके तो हि तें. । समय हि नव्हता चि आला वहायास दिक्कंठकंठोद्गतें वातजाच्या करें लोहितें. ॥ ७ ॥

दशवदन वदे, "अहो वीरहो! तैलसिक्तांबरें सर्व वेष्टा, बरें पेटवा पुच्छ, हा । सकळ निजपुरीपथांमाजि बांधूनि द्या दुर्दशा, हिंडवा, स्वापराधें म्हणो तुच्छ 'हा!'" ॥ कुमति करिति तें चि, तेव्हां महाकौतुकी श्रीहनूमान् प्रदीप्त स्वलांगूळ तो लांबवी. । अखिळ अहित झोडपी, गोड पीयूषसें सच्चरित्र प्रकाशी, तया कोण हो! थांबवी? ॥ ८ ॥

---

१. जयंतकाककथा. २. ब्रह्मास्त्र. ३. या चरणांत सहा अक्षरें जास्त असल्यामुळें हा चरण व्यालनामक दंडकाचा होतो. म्हणून हें अर्णमिश्रव्यालदंडक होय.

उडुनि रुचिर मंदिरें पेटवी, भेटवी धूमराज्यकंजा[१] आलि मंदाकिनीस क्षणें; । मुनिजनसहदेवगंधर्वसिद्धाप्सरांचीं विलोकूनि वृंदें नभीं जाहलीं संक्षणें.[२] ॥ पवनसुतमनीं असें, दोष दाहें झडो, होउ पावोनियां शोक लंका अलंका; रतो। त्यजुनि खळपतीस हे साधुसंगीं सदा कीं म्हणे, ' या जगीं हा कलंका अलंकार तो.' ॥ ९ ॥

विझवुनि जलधींत पुच्छाग्नितें स्वामिनीतें नमी; त्यासि संदेशपाथेय दे चारु ती. । पुनरपि कपि हर्षवाया उडे शंभुचा बाणसा हंससा तार्क्ष्यसा तातसा[३] मारुती. ॥ प्रमुदित उतरे महेंद्राद्रिशृंगीं, नमस्कारुनि ज्येष्ठपादांस, अन्यांस तो खेंव दे. । 'प्रभुवरचरणप्रतापें जसें कार्य तें सिद्ध झालें' द्विषत्सर्वगर्वघ्न तोखें वदे. ॥ १० ॥

परमकुशळ ऐकुनि क्लेशमुक्त प्रभूत प्रहर्षाकुलस्वांत ते नाचले सर्व, तें । सुयश मिरविलें महेंद्रें तसें शंभुनृत्यें जगीं जेंवि कैलास जो त्या महापर्वतें. ॥ सकळ उसळले कपि श्रीसुवार्तामृता सेवुनि व्योममार्गें प्रभूला वर्नां[४] मेघसे । वसति, करुनि चातकाचे परी सर्वदा शुष्क जे रामसौमित्रिसुग्रीवनामे घसे. ॥ ११ ॥

मधुवन लुटिलें तिहीं वाळिजोक्तें, मधु प्राशिलें, सत्फळें भक्षिलीं, नाशिलीं; । दधिमुख कपि ठोकिला, तो सुकंठासि सांगे असें, 'अंगदाचीं बळें पाहिजे शासिलीं.' ॥ समजुनि निजकार्यसिद्धि प्रहर्षें वदे, 'बा! उगा; जें तसें कृत्य कांहीं न तें आठिव; । प्लवग मजकडे अलंघ्या मदाज्ञा स्वयें सांगुनि क्षिप्र जावूनि ते सर्व ही पाठिव.' ॥ १२ ॥

दधिमुख कथि कीशपाज्ञा, निघे आंजनेयादि घेवूनि तो हृष्टधी वाळिचा नंदन. । धरुनि गगनमार्ग ये गर्जत प्राज्यतेजा, करी राघवा सानुजा स्वेश्वरा वंदन. ॥ प्रभु निजमुखें पुसे, 'मत्प्रियेचा समाचार कैसा?' तिहीं तों चि केला पुढें मारुती. । नमुनि विभुपदीं शिरोरत्न अर्पी, म्हणे, "काकवार्ता वदे, 'नाथ या कीं मला मारु?' ती." ॥ १३ ॥

---

१. धुराचा लोट ही च यमुना नदी. २. सानंद. ३. वाऱ्यासारखा. ४. मोठ्या वनास. ( अधिकरणार्थी चतुर्थी ).

वरदवर दयासमुद्र स्वयें होय तो सुप्रसन्न, प्लवंगा तया वायुजा बाहुनीं। गुरुतर उपकार वर्णूनि आलिंगिता जाहला सर्वभक्तोत्तमा आदरें बाहुनीं. ॥ सुमधुर वदला असें हा, 'परिष्वंग सर्वस्व घे, अन्य कांहीं नसे योग्य अर्पावया; । करिसिल हि असे पुढें, बा! ऋणी मीं तुझा, या जगीं दुग्ध नाहीं च दुग्धाब्धि तर्पावया.' ॥ १४ ॥

इति सुंदरकांड:

## युद्धकांड

दशरथसुत मारुतीतें पुसे, 'शत्रुचें दुर्ग कैसें? कसा मार्ग? सेना किती?' यापरी. । कथुनि सकळ तो म्हणे, 'सर्व शक्रास ही दुर्जय; त्वत्प्रतापा न कांहीं च तें बा! परी.' ॥ शुभ विजयमुहूर्त जो या सुकंठाचिया संमतें साधुनि स्वारिची व्हावया हानि घे. । बसवुनि अनुजासि वाल्यात्मजीं जेंवि सुस्यंदनीं वायुपुत्रीं बसोनि स्वयें हा निघे. ॥ १ ॥

लवणजलधितीर पावे महासैन्यसिंधूस नेवूनि जो राम तो अग्रजास त्यजी, । बुध शरण बिभीषण श्रीवरा ये, विलोकी तयाची दया ती सुरभ्[१]यग्रजा सत्य जी. ॥ करि नळकपि सागरप्रार्थित श्रीधवाज्ञेस पांचां दिसां सेतु तो योजनें शंभर, । द्रुमगिरिमय रुंद गावें दहा याम चोवीस जातां तटा ने चमू सर्व विश्वंभर. ॥ २ ॥

सुगळसह सुवेळगोत्रीं[२] चढे राम, लंका विचित्रा विलोकी; बसे शालशृंगीं अरी. । खगपति उरगीं जसा तो तसा क्रुद्ध सुग्रीव रक्षोधिराजीं पडे, युद्ध त्यासीं करी. ॥ प्रथम चि उडवी प्रहारें किरीट प्रतापी, सुवेळाद्रिच्या प्रोच्चशृंगीं पुन्हां ये हरी[३]; । रघुकुलप तया म्हणे, 'साहसें बा! हसें, त्वच्छिरीं भार हा, भा रहावी विचारें बरी.' ॥ ३ ॥

बुधमतनयरक्षणा ईश्वरें अंगद प्रेषिला दूत, तो बोलिला सत्सभातोखदें; । तरि हि न वचनें खळा रावणा मानलीं तीं, गतायुष्करुग्णा जनाला जसीं ओखदें. ॥ अहित[४] धरवि, जाय वेगें नभीं, च्यार मांसाद[५] घेवूनि जे

---

१. कामधेनूची वडील बहीण–दया. २. सुवेळनामक पर्वतावर. ३. वानर–सुग्रीव. ४. शत्रु रावण. ५. मांसभक्षक राक्षस.

दोर्युगीं सर्पसे झोंबले,। कपिपतिसुत बाहु झाडूनि पाडूनि मारी, तयां वाटतें दुष्टधी 'हा!' म्हणे, बोंबले. ॥ ४ ॥

करवुनि शिर चाप मायामय श्रीस दावी, म्हणे, 'मारिला राम माझ्या प्रधानें पहा!' । दशमुख रडवी तिला, प्राणनाथाचिया अत्यया सत्य या भासवी, शोक ओपी महा. ॥ शुचिमति सरमा कथी तत्त्व सीतेसि, दे सूक्तिहीं धैर्य, त्या संकटीं फार कार्यास ये. । वदलि, 'सैदालिपद्म आहे सुखी, त्वत्समा सत्समाजस्तुता पात्र दुःखा न आर्या सये!' ॥ ५ ॥

प्रथम समर होय भारी, कबंधप्रवृत्ति; प्रभूता नद्या डोह हीं रक्तभू सांचले; । दशमुखचतुरंगसेनांत तों फार मेले, समाचार सांगावया थोडके वांचले. ॥ मग घनरव रात्रियुद्धाध्वरीं अंगदें भंगिला, नागपाशास्त्र योजूनि मायाबळें । प्रभुवर करि बद्ध दोघे हि, तें ऐकतां पुत्र आचार्यसा पूजिला त्या दशास्यें खळें. ॥ ६ ॥

मग खळपतिच्या निदेशें खरा राक्षसी श्रीस घेवूनि गेल्या रणीं पुष्पकीं वाहुनीं. । रडलि पडलि मूर्छित क्षोणिजा नागपाशावृत प्रेतसे रामसौमित्रि ते पाहुनीं. ॥ हरुनि नयननीर शोक 'त्रि'पूर्वा 'जटा' धैर्य दे; व्यालबंधा निवारूनि तद्रक्षणें । गरुड सुयश मेळवी. मोहबंध श्रुतें या पवित्रे चरित्रें तुटे, होय भद्र क्षणें. ॥ ७ ॥

तदुपरि पवनात्मजें अद्रिचें श्रृंग घालूनि धूम्राक्षनामा महाशत्रु संहारिला, । समर करुनि वज्रदंष्ट्र प्रतापी परंतु स्वयें अंगदें तत्कृपाणें चि तो मारिला; ॥ अमररिपु अकंपन क्ष्मारुहें संगरीं अंजनानंदनानें तुठाया पुन्हां ताडिला, । बळजळनिधि नीलकीशें शिळेनें प्रहस्त प्रधान प्रतिज्ञा करूनि क्षणें पाडिला. ॥ ८ ॥

बहु भट खपतां रणीं क्रूरकर्मा दशास्य स्वयें ये, उठे श्रृंग घेवूनि; कीशेश तें । चुरुनि डिखळ तेंवि, मूर्छाकरीं त्या सुकंठासि तो मार्गणांच्या महादारुणें दे शतें. ॥ ऋषभ गवय पाडुनि क्षोणिपृष्ठीं गवाक्षास ही

---

१. बाहुद्वयाला. २. नाशा—मृत्यूस. ३. सज्जनरूप भ्रमराना कमलासारिखा. ४. कबंधप्रवृत्ति होय (धडें नाचावयास लागलीं). ५. रक्ताचे. ६. वृक्षानें.

लोळवी, संगरीं नीच मूढां सैळी. । खवळुनि दरडी जसा पूर तैसा चि त्या वानरांतें मदें तुच्छ मानी, चमू ढांसळी. ॥ ९ ॥

प्रभुसि पुसुनि सिद्ध सौमित्री जों होय युद्धार्थ, तों वायुजें संगरीं गांठिला रावण. । प्रकुपित तळमुष्टिनीं ताडिती वीर अन्योन्य ते; नीळ वर्षे नगांतें, गमे श्रावण. ॥ खरतर अनलास्त्र योजूनि पाडी तया, कीं किरीटीं ध्वजीं स्यंदनीं कार्मुकीं ही चढे, । द्रुहिणेरचित शक्ति हाणी उरीं लक्ष्मणाच्या, तदा राम चित्तांत अत्यंत कोपें कढे. ॥ १० ॥

पवनसुत उरीं खळा मुष्टि हाणूनि पाडी, पळे; शक्ति रामेक्षणें निघेना च ती. । विरथ करुनि सोडितां शत्रु रामें सुखें शक्र देवर्षि सुग्रीव जे हे तिघे नाचती. ॥ विधिवर नरवानरत्रास जे वेदवत्यादि शाप स्वयें भंग पावोनि ते आठवी, । उठउनि घटकर्ण कष्टें, तया रामसौमित्रिसेनाशना कालकल्पासि तो पाठवी. ॥ ११ ॥

समर करिल कोण त्या कुंभकर्णासह? त्रासले सर्व; राज्या मृगा व्याघ्रसा तो धरी. । परतुनि शिरतां पुरीमाजि दैवें सुटे, तत्क्षणीं वीर सुग्रीव तत्कर्णनासा हरी. ॥ प्रकुपित मुरडे, गिळी वानरांतें, जिराले, निघाले किती कर्णनासापथें आयतें. । प्रभुवरशर खंडिती तद्भुजांघ्र्युत्तमांगें प्रचंडें, यश प्राप्त या होतसे आयतें. ॥ १२ ॥

प्रथम अनुजघात त्या पामरा रामराजस्वरूपानभिज्ञा मृषा ऐकतां वाटला, । हळहळुनि म्हणे, 'अहाहा! महा हा बळांभोधि मर्त्याल्पतेजें अकस्मात् कसा आटला?' ॥ बहु धृति सुत जो त्रिमूर्धाख्य तो दे, वदे, 'देवदेवा! मला सर्प तार्क्ष्या तसे कांपती, । नरकपि किति काय? कीं सायकीं भस्म होतील हे, साधि बापा! जगाचा हि तूं कां पती?' ॥ १३ ॥

पवनतनय त्या त्रिमूर्ध्या वधी, तों चि देवांतका ही मनुष्यांतका राक्षसा अंगद; । द्रुततर अतिकायनामा चतुर्थ प्रतापी, तया होय सौमित्रि युद्धांगणीं भंगद. ॥ मग घनरव योजुनि ब्राह्म अस्त्र प्रभू सैन्य झाडून

---

१. छळी. २. ब्राह्म शक्ति. ३. बृहस्पतिसुतो कुशध्वजो तस्य कन्या वेदवती–**पंत.** ४. काळासारख्या. ५. सुग्रीवास. ६. विस्तृत.

ताडून पाडून गेला पुरीं; । दशवदन वदे, ‘सुता सद्गुणा! त्वद्यशीं स्वच्छता जी, न चंद्रीं हि; कोठून ती कापुरीं?’॥ १४ ॥

पवनतनुज मान देवूनि अस्रासि रात्री उठे, तों दशास्यानुजन्मा तया भेटला; । निरखिति हत सप्तषष्टि प्लवंगांचिया कोटि, शोकाग्नि अत्यंत तन्मानसीं पेटला. ॥ श्रम हरुनि बिभीषणें बोलवीतां पुसे जांबवान्, ‘मारुति स्वस्थ जीवंत आहे?’ असें. । करुनि नवल तो म्हणे, ‘रामराजा हि सोडूनि यातें चि बापा! तुवां आठवीलें कसें?’ ॥ १५ ॥

विधितनय वदे, ‘जगत्प्राणपुत्र स्वयें एक जीवंत, मेले हि सारे न मेले बरें; । व्यसु जरि बळसिंधु तो सर्व हि प्रेत आम्हीं, मदुक्त स्वचित्तांत तूं मान बापा! खरें.’ ॥ नमन करुनि वायुचा सूनु बोले, ‘असें स्वस्थ बा! मीं त्वदाशीर्बळें; काय आज्ञा मला?’ । कथुनि गिरि म्हणे तया, ‘च्यार संजीवनीमुख्यदिव्यौषधी आण, जा, हो यशस्वी भला.’ ॥ १६ ॥

नमुनि पुसुनि ऋक्षराजासि वेगें निघे, जाय कैलासपार्श्वस्थितौषध्यगातें पळें; । मुख चुकविति ओषधि, क्रुद्ध होय प्रतापी मरुत्पुत्र, तच्छृंग सारें चि तो घे बळें. ॥ त्वरित कुसुमगुच्छ तैसें चि झेलीत ये, तों चि ते आते तद्वात तद्गंध आला पिती, । सकळ उठति सुखसे; तें पुन्हां ने सुधी. या यशातें तुटाया महाबंध आलापिती. ॥ १७ ॥

प्लवगपतिनिदेश होतां चि उल्काधर क्रुद्धधी कीश लंकापुरी जाळिती राहिली. । खररव शतयोजनें दूर रक्षस्त्रियांचा जगें ऐकिला, दुःसहा ती दशा पाहिली. ॥ प्रबळदहनभीत बाहेर जे राक्षस प्राणरक्षार्थ आले, मुखें बोलिले ‘हाय!’ ते, । सकळ हि वधिले कपीनीं, जसे ओतुनीं आखु संप्राप्त झाले बिळ त्यागितां आयते. ॥ १८ ॥

रजनिचरवरें बळी कुंभकर्णात्मज प्रेषिले, ज्येष्ठ कुंभ प्लवंगेश्वरें मारिला । तदनुजनि निकुंभ तो जो धरी तातसा, वातजें भास्करें अंधकारौघसा सारिला. ॥ खरसुत मकराक्ष ज्या रुद्र दे शूळ, तो पावकास्त्रें रणीं राघवें लाघवें जाळिला. । पुनरपि घननाद ये, सानुजा ईश्वरा शोणितें रंगवी, कीं महास्त्रें वरें पाळिला. ॥ १९ ॥

कपटनिपुणमेघनादें समस्तांसि मायामयी जानकी दाविली, देखतां मारिली; । प्रभुसह बळ सर्व ही 'हा!' म्हणाया खळें लाविलें; अद्भुत भ्रांति सर्वत्र विस्तारिली. ॥ त्वरित मग निकुंभिळादेवतास्थान जें दूर तेथें महाहोम आरंभिला, स्यंदन[1] । प्रकट सहय आत्मभूच्या[2] वरें व्हावया तो हि मग्न प्रसिद्ध क्षमाजानिचा[3] नंदन. ॥ २० ॥

'परकपट' बिभीषण स्पष्ट सांगोनि ने लक्ष्मणा, तत्करें त्या अपूर्णक्रिया मारवी. । अनुजविजय ऐकतां राक्षसेंद्रानुजाच्या मुखें हर्षला यातुसेनात्रियामारवी[4]. ॥ दशमुख सुतशोकसंतप्त होवूनि घे खड्ग सीतावधा, ती खळा देखतां 'हा!' वदे; । सचिववर सुपार्श्व वारी बळें दुष्ट ही, वाटतें त्यास हें सद्यश प्राज्य सद्भाव दे. ॥ २१ ॥

खळ बळ चतुरंग धाडी, वदे, 'राम तद्बंधु मद्बंधु सुग्रीव मारूनि खा बापहो!। प्रभु बहु शतकोटि तें दों मुहूर्तांत मारी, म्हणे, 'पूतमद्बाणतीर्थांत निष्पाप हो.' ॥ रघुवर वदला, 'असें अस्त्रसामर्थ्य माझें जसें त्र्यंबकाचें, कळेना जडा यातुला. । दशमुख हि बिभीषणा! भस्म होतो, मला या सुकंठा तसा लाभ भारी घडाया तुला.' ॥ २२ ॥

श्रवण करुनि राक्षसांच्या क्षया दुःसहा राक्षसींच्या विलापास हि क्रोधशोकाकुळ । द्विजसुररिपु होय तो आपुलें दाटुनि प्रेपुनि श्राद्धदेवा[5]चिया सर्व ओकां[6] कुळ. ॥ दशवदन निघे स्वयें सानुजा रामभद्रा वधाया, महोत्पात झाले जऱ्ही देखिले. । अपशकुन हि केवळ क्रूर ही ते न त्या काळपक्कें महादारुणें रावणें लेखिलें. ॥ २३ ॥

करि अगनगवृष्टि सुग्रीव, रक्षोबलातें मथी, वात तैसा उरों दे न कांहीं उरी; । मग वधुनि महोदरा दारुणा रावणाच्या पुढें जो विरूपाक्ष अत्युग्र त्या ही चुरी. ॥ अतितरखरधी महापार्श्व ही अंगदें मारितां दिङ्मुखें[7] तामसास्त्रप्रयोगें हरी । मथुनि पळविले बहु, व्याकुळत्वांत सौमित्रि

---

१. घोड्यासह. २. ब्रह्मदेवाच्या. ३. पृथ्वीपति राजाचा मुलगा. ४. राक्षसांची सेना ही च कोणी रात्र, तिला दूर करणारा सूर्य. ५. यमाच्या. ६. घरास. ७. दशाननानें—रावणानें.

केला रणीं, धैर्य कोण्ही न तेव्हां धरी.॥ २४ ॥

खरतर शर रावणें सोडिले, तोडिले लाघवें राघवें सर्व ही गर्वहीनें पळें; । तुरगवर बिभीषणें मारिले, सूतमूर्धा धनुष्यध्वज छेदिले लक्ष्मणानें बळें. ॥ दशमुख अनुजात्यया शक्ति सोडी, तिला वीर सौमित्रि तत्काळ खंडी; तदा त्या खळें । दुसरि हि मयनिर्मिता टाकिली त्या रिपुघ्नाग्रजीं, राम तीतें म्हणे, 'हो विहिना फळें.' ॥ २५ ॥

'तव हि उर फुटो खळा! रामबाणें' असा भासतें लक्ष्मणाचें तया शाप दे वक्ष तें. । रघुकुलमणि शक्ति ओढूनि काढूनि मोडी; तदा तो तसे पावले ताप देव क्षतें. ॥ अजित पळवि बंधुच्या रक्षणा वानरेंद्रादि ठेवूनि भंगूनि तत्काळ दिक्कंधरा; । पुनरपि कपि शृंग घेवूनि ये; वाटतें लागलीं आणितां पावितां तें पळें पंधरा. ॥ २६ ॥

अमृतसमसदोषधीच्या रसें लक्ष्मण स्वस्थ[1] केला सुषेणें, तया राम भेटे, निवे; । अमरपतिरथीं बसे, रावणासीं करी युद्ध, तेव्हां म्हणे शंभु, 'नाहीं तुळा या शिवे[2]!' । बहुशतकपिनीं नगाहीं रणीं ताडिला, हाणिले बाण, धिक्कारिला, मोहला, काढिला[3] । क्षण दशमुख सुज्ञसूतें, तया दोष दे तो, वदे, 'धर्म केला नव्हे; सारथी हा ढिला.' ॥ २७ ॥

तरणिहृदय[4] कुंभजन्मा कथी, तज्जपें श्रीरवि प्रेमरोमांच देहीं रची, दे वर; । उडवि शत शिरें, तऱ्ही प्रेतभावा न वैरी वरी, फार चिंता करी तो शचीदेवर[5]. ॥ मग विनवुनि मातली सूचवी, ब्राह्म योजूनि सोडी स्वयंभूकृता अद्भुता सायका; । करि विवर उरीं, नगा वज्रसा लोळवी, बोळवी देवगोब्राह्मणादिद्विषन्नायका. ॥ २८ ॥

दशमुख पडतां चि लंकेकडे धांवले[6] शेष मांसाद ते वानरानीं क्षणें मारिलें[7]. । त्रिभुवनगत ताप रात्रिंचराधीश्वराच्या वधें कौतुकें राघवें सर्व ही सारिला. ॥ 'जय! जय!' वदले सुरब्रह्मरुद्रेंद्र, रामावरि स्वर्गपुष्पें महामेघसे वर्षले. । बहुघनरव दुंदुभी गर्जले, मुख्य गंधर्व ही अप्सरांचे थवे

---

१. निरोगी. २. हे पार्वति! ३. संग्रामांतून बाहेर दूर नेला. ४. आदित्यहृदय. ५. इंद्राणीचा दीर=इंद्रानुज राम. ६. धांवलेले. ७. येथें यमकहानि झाली आहे.

नाचले, हर्षले. ॥ २९ ॥

निशिचरपतिदारं मंदोदरीमुख्य ते सांत्विले, बंधुनें बंधु संस्कारिला आदरें; । प्रभुवरवचनें पदीं स्थापिला लक्ष्मणें, सोडिला रामभक्ताग्रणी मृत्युच्या हा डरें. ॥ जनकनृपसुता करी दिव्य, भेटे पिता दिग्रथ, प्रेत जीवंत केले सुधावृष्टिनें; । शुभवर सरमा कळा पावल्या, ती 'त्रि'पूर्वा 'जटा' ही निवे श्रीवराच्या दयादृष्टिनें. ॥ ३० ॥

बहु विनवि बिभीषण प्रांजलि, श्रीश त्यातें म्हणे, 'या ससेना सुकंठासि बा! पूज गा! । मज सुख भरताविना हें नको, भेटिव क्षिप्र तो, ताप त्याच्या विलाशें न दापू जगा.' ॥ ससुगळ बळ सर्व पूजी सुधी, पुष्पक व्योमयान प्रयाणार्थ दे, स्तोत्र भावें पढे; । कटक तदधिपांसह श्रीस घे सानुज, श्रीष्ट दिव्यांबुजीं भृंगसा त्या विमानीं चढे. ॥ ३१ ॥

प्रमुदित मन जानकीचें करी, युद्धभू दाखवी, संगरींच्या कथीं स्वप्रियेला कथा; । नळकपिरचिता महासेतुरूपा विलोकी सती आदरें सज्जयश्रीप्रदा त्या पथा. ॥ त्वरित सबहुमान तारादिकीशस्त्रिया आणवी जाणवि, 'प्राणवित्तादि सर्व व्यथा । हरुनि सदुपकार केला तदुत्तीर्णतेला पुरेना' असें श्री, तयां तद्भवां दे प्रथा. ॥ ३२ ॥

बहु अनुभविलीं स्थळें ऋष्यमूकाद्रि पंपा शबर्याश्रम स्वीय गोदातटीं पावनीं । कथुनि विभु म्हणे, 'तुला शोधितां तातघातें हि ज्यां फार केला विलाप प्रिये! या वनीं. ॥ कलशभवमहर्षिचें स्थान हें देवि! हें अत्रिचें, शोभवी यांत साध्वी तुज्या मूर्तितें. । भरत परतवावया या नगीं ये, मला ताप दे कर्म केली न तत्कामनापूर्ति तें.' ॥ ३३ ॥

दिनमणितनया अमर्त्यापगा राजधानी अयोध्या प्रियेला स्वयें मायसी दाविली, । प्रणति करविली; सुकंठादिकीं मानसीं भूगता सर्वदेवेश्वराची पुरी भाविली. ॥ उतरुनि नमिला भरद्वाज, तत्प्रोक्त भक्तानुजाचें व्रत स्वव्रत-

---

१. राक्षसाधिपति रावणाच्या भार्या. २. भीतीनें. ३. सुग्रीवासह. ४. श्री= लक्ष्मी—सीता, तिचा प्रियकर. ५. मोठेपणा. ६. कुंभजन्मा—अगस्त्यमुनि. ७. यमुना. ८. भागीरथी. ९. आईसारखी. १०. मानिली.

श्रेष्ठसें मानिलें, । पवनसुत पुढें कथाया प्रिय प्रेषिला, त्या गुहें राघवें वानिलें फार संमानिलें. ॥ ३४ ॥

प्रभुवर चवदा समा संपतां पंचमीच्या दिनीं श्रीभरद्वाजपुण्याश्रमीं राहिला, । सुवर वरुनि भेटला शृंगबेरीं गुहाख्या सख्या, स्पष्ट त्या चातकें मेघ तो पाहिला. ॥ तदुपरि भरतासि दे भेट, तेणें पदीं स्वामिच्या राज्य-भार स्वमूर्धां सुखें वाहिला. । प्रथम चरण भेटवीले तया पादुकांसीं, जयांच्या बळें दुःसह क्लेश तो साहिला. ॥ ३५ ॥

कुळगुरुजननीसशत्रुघ्नसर्वप्रधानाप्तपौरादि ते वंदनालिंगनें[1] तर्पिले, । कपिनिशिचरराज सौमित्रि जे यांसि आश्लेष सप्रेम रामानुजाहीं तदा अर्पिले. ॥ उकलवुनि जटा मग श्रीवरें वेष देवूनि सर्वांसि रम्य स्वयें घेतला आपला, । सकळ निवविला जन श्रीपुरींत प्रवेशोनि राज्याभिषेकोत्सवें फार जो तापला. ॥ ३६ ॥

त्रिभुवनपति होय राजा स्वयें, त्या पित्याच्या बसे भव्यसिंहासनीं, कीर्ति भारी करी, । श्रितहित भरतासि दे आपलें यौवराज्य प्रभु स्वप्रजा रंजवी स्वप्रजांचे परी. ॥ सकळजनमनांत जें जाड्य शल्य स्वलीलालवें दर्शनें चिंतनें उद्धरी तीव्र तें. । अमर समरसत्कथा वर्णिती, भाट केले मुनी [सर्व ही वेदसे] शुद्धरीतिव्रतें[2]. ॥ ३७ ॥

प्रभुवर सुरराजदत्ताच्छमुक्ताफळांचा स्वकंठस्थ हार प्रियेतें समर्पी, तया । पवनतनुभवासि दे ईश्वरी[3], शोभवी ती तितें सद्यशःशोभिता[5] त्या[4] हि दासा दया; ॥ सहकटक सुकंठ तत्सूनु ऋक्षेश[6] लंकेश यांतें स्वयें सर्व-रक्षःकलंकारि[7] तो । मणिकनकविभूषणांहीं तसा गौरवी, भाग्यवान् तात पुत्रांस जैसा अलंकारितो. ॥ ३८ ॥

युद्धकांड:

---

१. आलिंगन. २. सदाचरणशील रामानें. (या चरणांत सहा अक्षरें कमी आहेत, तीं आम्हीं कल्पून चौकटी कंसांत दर्शविलीं आहेत). ३. देवी. ४. देवी सीतेचा. ५. उत्तम यशानें भूषित करणारा. ६. जांबवंत. ७. राक्षसकुलाला कलंकासारिखा जो रावण त्याचा शत्रु राम.

# उत्तरकांड

बहु मुनिवर अत्रि कुंभोद्भव श्रीयवक्रीत भास्वत्तपा गाधिज स्वच्छधी गालव । प्रभुसि करिति हृष्ट भेटोनि हे अन्य ही, तेज विश्वास ज्यांचें म्हणे, 'सद्यशा गा लव.' ॥ 'दशमुख घटकर्ण यांहूनि अत्यंत विश्वांत तो मेघनाद प्रतापी' असें वानितां । रघुपति अति मात्र आश्चर्य पावे, पुसे तत्व कीं, 'यासि सर्वाधिकात्युग्र कां मानितां?' ॥ १ ॥

घटजमुनि म्हणे:-- प्रभो! सांगतों तत्कथा; ब्रह्मपुत्रें पुलस्त्यें ऋषींच्या सुता द्रापिल्या, । 'दिसतिल मज आश्रमीं आजपासून ज्या, त्या सगर्भा चि होवूत सर्वा' अशा शापिल्या. ॥ शुचिमति तृणबिंदुराजर्षिजा शाप नेणे, तयाच्या पडे दृष्टिला, होय ती पोटिसीं; । ऋषिस जनक दे, तिचा विश्रवा पुत्र तो, सख्य ज्या साधुचें सद्गुणांच्या सदा कोटिसीं. ॥ २ ॥

सुमति निजसुता भरद्वाज दे त्या, तिचा पुत्र यक्षेश जो राजराजाख्य सुज्ञान, या । अजितनिहतराक्षसत्यक्तलंका पित्यानें दिली, कीं, भला तूं जसा पात्र सुज्ञा नया. ॥ अतुळ धनदभाग्य पाहोनि रक्षोहिता पूर्वलंकेश पाताळवासी सुमाळी 'सुता-। समुचित वर विश्रवा' हें कथी, पाठवी कैकसी; ती प्रदोषीं वरी त्या तपस्विस्तुता. ॥ ३ ॥

दशमुख पहिला, दुजा कुंभकर्णाख्य, कन्या तिजी शूर्पणख्याह्वया जाहली जन्मती, । गुरुवरज बिभीषण ख्यात चौथा भला होय त्या कैकसीला, तुझा भक्त हा सन्मती. ॥ खरतर तप मस्तकच्छेद ज्यामाजि ऐसें करी, आत्मभू दे वर, स्वानना नावरी; । नर कपि न गणूनि घे सर्वदेवावधत्व दिकंठ, तद्बंधु तो मोहिला भूरिनिद्रा वरी. ॥ ४ ॥

हृदय सतत शुद्धधर्मीं रमो, संकटीं न भ्रमो, ब्राह्म यावें स्वयें साधु इत्यादि जे । वर वरि, विधि त्या चतुर्था म्हणे, 'हो चिरंजीव ही सद्गुरूनीं भल्या कीर्ति नित्या दिजे.' । असुमति शिकवी सुमाळी, वदे दिङ्मुख स्वाग्रजा, 'सोड लंका,' हठाला अरीसा धरी. । धनपति अलका रची, भव्य-कैलासगोत्रीं सुखें गुह्यकाधीश तो राज्य तेथें करी. ॥ ५ ॥

---

१. एक मुनि. २. दरडावल्या. ३. रामरूपी ब्रह्म. ४. चांगलें. * गरोदर.

प्रमुदित दशतुंड तो पुंड लंकेंत राजा वसे सर्वरक्षोभिषिक्त, स्वमाता-मह्रा। सुखवि, सकळ राक्षसांतें धरी, आत्मजोत्कर्ष पाहोनियां कैकसी ती हि माता मह्रां[1]. ॥ मग वरि मयजा जिचें नाम मंदोदरी; देउनीं जो तडि[2]-जिह्व त्या कालकेया स्वसा; । तदनु तसि च त्यासि वैरोचनाच्या सुतेची सुता वज्रकीला हि जो बंधु सर्वस्वसा. ॥ ६ ॥

तदनु सरमाभिधा सर्वगंधर्वभूपाळशैलूषकन्या कनिष्ठासि दे जोडुनीं, । दशमुखसुत मेघनादाख्य झाला प्रभो! जन्मतां मेघनादा असा नाद तो सोडुनीं. ॥ दशमुख बहु मत्त होवूनि पीडी जगा, राजराज[3] स्वयें दूत धाडी, वदे तो पटु, । 'त्यज अनय, तुझ्या वधा चिंतिती देव.' धर्में सखा शंभु झाला असे, फार लागे कटु. ॥ ७ ॥

कुपित खळ वदे, 'सखा शंभु झाला असें सांगतो, दावितो तेज, वासून आ लेंकरा। भिववितिं जन, मीं तसा काय रे!? जाण माझ्या तुझें वाचणें आजपासून आलें करा.' ॥ वधुनि निरपराध दूत स्वयें सैन्य घेवूनियां जाय उन्मत्त तो राजराज्यावरी[3], । द्रविणपति तया कुबुद्धीस दे शाप, तैसा युगें लोटल्या हीन घोरा जरा ज्या वरी. ॥ ८ ॥

वधुनि बळ रणीं करी मूर्छित, स्वाग्रजा 'हा!' असें सर्वदा यावया मंद नाकानना[4]; । पळउनि अलकेश्वरा व्याकुळा यक्ष तेथूनि घेवूनि गेले भयें नंदना कानना. ॥ त्रिभुवनजित पुष्पकामाजि बैसोनि मानी दशग्रीव गर्वे उते, होय तों रुद्ध तें। वरशरवण लंघितां, हेतु नंदीश सांगे, तया निंदिलें घेतला शाप त्या उद्धतें. ॥ ९ ॥

'उपटिन चि' म्हणे, बळें हात कैलासमूळांत घाली, प्रभु स्वांघ्रिजांगुष्ठ-भारें नगा। दडपि, चिरडि बाहु, तापे सहस्राब्द, मंत्री कथी शंकरा तें करीं व्यर्थ बा रे! न गा;' ॥ स्तव कारि दशकंठ, होय प्रसन्न प्रभु, स्यासि दे रावणाख्या हि, पावे तशा ही नता; । म्हणुन चि इतरा जगामाजि आली च आली तसी स्पष्ट शोधीत सर्वा यशा हीनता[5]. ॥ १० ॥

---

१. आनंदास. २. विद्युज्जिह्व (शूर्पणखापति). ३. कुबेर. ४. स्वर्गाच्या (देवांच्या) तोंडीं ५. शेकडों अन्याय.

दशवदन विमुक्त होवूनि 'शापें न आयुष्य नाशो' असा घे वर प्रार्थुनि। श्रीहरा, । मग नमुनि निघे, म्हणे राक्षसांतें, 'विलोकाल, ऐकाल, जी ती वरी स्त्री वरी श्री हरा.' ॥ गुरुतनयसुता सती अग्निकुंडीं पडे, झोंबतां शाप दे होउनीं साधुकन्या, 'यशें । भारिन जग, तुझ्या वधें भस्म व्हायासि जाणोनि रक्षोधमा! त्वां करावे न अन्याय शें.' ॥ ११ ॥

कुळगुरु मुनिराज संवर्त तो युद्धसिद्धा मरुत्तास वारी, मयूरीं सिरे वासव । झडकारि, शरठीं धनाधीश, पाशी हि हंसीं दडे, वायसीं काळ, ज्या त्रास हा आसव. ॥ खपवुनि मुनि यज्ञवाटस्थ गेला; शिव स्पर्शसा, त्या खळाची मनोवृत्ति ती खापरी. । गय सुरथ पुरूरवा गाधि दुष्यंत काळज्ञ हे बोलिले 'सर्व आम्हीं तुझे' यापरी. ॥ १२ ॥

नृपवर अनरण्य शापी तळें ताडितां पाडितां हासतां त्या म्हणे, 'अल्प मत्ताप हा; । ममकुलभवरामतेजें रणीं भस्म हो तूं, स्वपापें कुळीं आपल्या कल्प मत्ता! पहा. । नरपतिवारि दिव्यपुष्पांबुद, स्वर्गसहुंदुभिध्वान होय, स्वयें जाय नाका मग; ॥ सुरमुनिवचनें यमाच्या हि लोकास तो ही विचारूनि दिव्या तया गायना कामग. ॥ १३ ॥

नरकपतित जीव निःशेष सोडी, बळें वीर झोडी यमाचे रणीं, काळ ही तापला. । कलहरुचि यमा म्हणे, 'राक्षसाधीश येतो, प्रताप प्रभो! दाखवीं तूं तया आपला.' ॥ सुरगुरु धारितां करीं दंड वारी स्वयें अंतका, वासुकीची पुरी देववैरी मथी. । "'कवच' मग 'निवात' आधीं असें नाम ज्यांचें तयांतें करा सख्य[1]" हें त्या हि धाता कथी. ॥ १४ ॥

प्रबळ नगर अश्म संज्ञा जया, तेथ जावूनियां कालकेयांसह क्रूरकर्मा भिडे; । दशमुखभगिनीपतीतें हि खड्गें वधी, कीं, म्हणे शूर, 'रोधूं नको युद्धधर्मा भिडे[2].' ॥ सुरभिसि वरुणालयीं तो नमी, होय दुग्धाब्धि दुग्धें जिच्या; पाशिपुत्रांसि मोडूनि घे । बहु यश, मग ऐकुनि ब्रह्मलोकीं प्रचेता म्हणे 'क्लैब्य जोडू जगीं कीर्ति सोडू निघे.' ॥ १५ ॥

सुरनरफणियक्षगंधर्वदैत्यादिकन्या बळें पुष्पकीं रोधितां जाहल्या

१. सख्याच्या रूपामध्यें. २. भिडेनें.

तापत्या, । रडुनि कढुनि बंधुघातें सत्या 'या परस्त्रीनिमित्तें चि हो मृत्यु' देती असा शाप त्या. ॥ अमर करिति या हि शापीं महापुष्पवृष्टि प्रभो! दुंदुभि प्रोच्चनादें तदा गाजला. । न गणुनि खळराज तें जाय लंकेंत, भेटे सुता, तत्तपःसिद्धिनें ही कुधी माजला. ॥ १६ ॥

कथि सुमति बिभीषण, 'त्वत्सुतें सत्र आरंभितां, कुंभकर्णासि निद्रा सुखें लागतां, । जलधिसलिलवास माझा हि या दुर्गसंरक्षणीं बा! न कोणही प्रतापी धणी जागतां, ॥ उडविलि मधुनें स्वसारत्न कुंभीनसी; अन्य-दारापहारापराधद्रुमें दाविलें । परिभवफळ हें असें राक्षसेंद्रा! न वाटो तुझ्या मानसा, माझिया तों मनें भाविलें.' ॥ १७ ॥

परिभव पडतां चि कानीं निघे च्यार अक्षौहिणींचीं सहस्रें पुढें घालुनि क्षोभला; । परि परिसुनियां स्वसेचें सदुक्त द्रवे तो, मधुस्नेह संपादुनि क्रूर ही शोभला. ॥ सुरपरिभवकाम तेथूनि जावूनि कैलासपार्श्वीं विलोकूनि रंभा तिला लोभला, । धनदसुत हि शाप दे स्वप्रियेतें बळें भोगितां कीं, बळात्कार सोडूनियां हो भला. ॥ १८ ॥

प्रभु हरिस म्हणे, 'करीं युद्ध निःशंक, जा, ओघ न प्रेक्षितां वाड-वाचा हि आ खंडला. । वधिन समय पाहुनि क्रव्यभुक्पाळका मीं रणीं हा असों दे चि विश्वास आखंडला.[1]' ॥ तुमुल समर होय तेथें, अतिक्रूरकर्मा धरी मेघनाद स्वयें वासवा तातसा, । सहजगतिवशें चि तो देवसैन्यस्थ ही सांपडे प्राज्यवेगा तया वास वाता तसा. ॥ १९ ॥

द्रुहिण घनरवा म्हणे, 'गातिल त्वद्यशातें शचीच्या सदा सोडितां देवराया सया.' । नमुनि विधिस इंद्रजित् तो वदे, 'बा प्रजोत्पादका! मृत्यु-बाधा नसो, दे वरा यास या.' ॥ 'अमरपण नसे चि कोणास ही मृत्युलोकीं, प्रकारांतरें माग,' बोले विधाता असें. । घनरव वदला, 'नसो; हो मज स्यंदनस्था मला मृत्यु, मीं तुष्ट, हें देउ दाता,' असें. ॥ २० ॥

अभिमत वर देवुनि ब्रह्मदेव स्वयें सोडवी खिन्नचित्ता, कथी, 'म्यां अहल्या सुता । सुरुचिरतनु विश्वलावण्यजा तापसा गौतमा न्यासभूता[2]

१. इंद्राला. २. ठेव च अशी.

दिली सर्वलोकस्तुता. ॥ अविकृतमति मागतां दे तया साधुला. अर्पिली भोगिली ती सती त्वां करूनि छळ, । प्रकट तुज तया महापातकाचें असें भंगबंधादि हें वासवा! प्राप्त झालें फळ.' ॥ २१ ॥

शतधृतिकथितें वरें वैष्णवें भव्ययज्ञें पुन्हां त्या स्वतेजा पदा पावला वासव, । व्यसनपतित जे तयांतें म्हणे हा चि, 'तारीन मीं, माझिया सेवनीं भाव लावा सव.' । घनरवबळ ऐकतां सर्व ही विस्मया पावले, राम कुंभोद्भवातें पुसे, 'हा भ्रमे ॥ दशमुख धरणीतळीं तेधवां वीर कोणी नसे काय? कां लोक शोकाधिभारें भ्रमे?' ॥ २२ ॥

कलशजनि म्हणेः– प्रभो! दत्तपादप्रसादें वरांतें वरांतें सुविख्यात जो अर्जुन । प्रबळतम जगांत सर्वाधिकश्री करी बद्ध कारेंत[1] रोधी दशास्यासि तो अर्जुन. ॥ स्तुति करुनि पुलस्त्य या सोडवी; वानराधीश वाळी हि काखेंत घाली, मदातें हरी; । विनवुनि शुचि मित्रभावें असे, यामुळें, हा जगन्नायका, घे न याच्या पदातें हरी. ॥ २३ ॥

त्रिभुवनपति कुंभजातें म्हणे, 'हा हनूमान् बळांभोधि कीं वालिसुग्रीववैरीं वसे, । तदपि मथुनि वालिला पाळिला कां न सुग्रीव याणें? गमे ठावुकी शक्ति याला नसे.' ॥ घटजमुनि म्हणेः–भला रामचंद्रा! तुझी निर्मळा निस्तुळा बुद्धि सत्तर्कशाला भली; । 'स्तुतिविण न कळो तुला शक्ति' शापोक्ति हे तापसांची च या पीडका कर्कशा लाभली. ॥ २४ ॥

निपट शिशु रवीस मानी फळ, व्योमगर्भीं उडे, लाजवी विष्णुहृद[2]सतोखा वया. । सुरपतिस पुसे, रुसे राहु, 'अन्यास मद्भाग कैसा दिला? जातसे मत्त तो खावया.' ॥ चढुनि निजगजीं निघे शक्र, ये त्या हि जाणे फळ, ग्रासकामें पुढें होय हा कीश, तें । करगत खर शस्त्र हाणी, पशूंचीं जसा दंड जें स्वाहितांचीं रणीं तेंवि हाकी शतें. ॥ २५ ॥

परमदयित पुत्र वज्रप्रहारें महापर्वतीं पाडितां वायु विश्वावरि क्षोभला; । द्रुहिण उठवि, सर्वशस्त्रास्त्रदेवाद्यवध्यत्व दे, नाम ठेवी 'हनूमान्,' यशें शोभला; ॥ पढवि सकळ वेदशास्त्रें, रवी पृष्ठगामी पुढें हस्त

१. कारागृहांत. २. विष्णूच्या हृदयाला दिला आनंद ज्यानें त्या तारुण्याला.

जोडूनि हा स्वस्थचित्तें पढे, । सुमतिसुकृतितापसज्ञानितेजस्विवृंदाचिया मस्तकीं अंजनाकुक्षिजन्मा चढे. ॥ २६ ॥

घटजमुनि कथी अशा ज्या कथा दिव्य मात्रा चि या, सेविते जीव जे तद्भवा आमया । पुसुनि ऋषि समस्त ही स्वाश्रमातें निघाले, तयां प्रार्थुनि 'स्वाश्वमेधा' म्हणे राम 'या;' ॥ जनकसुगळराक्षसेंद्रादि हे पूजुनि स्वस्थळा साश्रु होवूनियां प्राणसे पाठवी, । प्रभुवर असकृत् प्रियाकीर्तिलाभार्थ जें तत्कृत प्राज्य साहित्य तें सर्वदा आठवी. ॥ २७ ॥

अतितममधुरें यशें पावनें आपलीं मानलीं तेंवि अन्यें कधीं ज्या न कीशा सितें, । बहुत चि रुचलें मनीं शील अत्यंत त्या प्रेमळा सेवकाचें सदा जानकीशासि तें. ॥ अभिमत वर दे, म्हणे, 'बा! तुझा मीं ऋणी स्पष्ट, वाटे दिलीसी च या कंजनाभा सती.' । वरगुणनिधि साधु यत्पुत्र, ती सज्जनाधीश्वरा मानसी जाहली अंजना भासती. ॥ २८ ॥

जनकनृपसुता सती गर्भिणी होय, तीतें पुसे भक्तकल्पद्रुमाराम हा दोहद; । कळवि शुचितपोवनप्रेक्षणेच्छा; म्हणे, 'जा उद्यां चि;' प्रियेसि प्रिय प्रीतिसंदोहद[१]. ॥ परिसुनि 'जन निंदिती' हें वदे लक्ष्मणा, 'जा च, सीतेसि तूं आदिकव्याश्रमीं सोड बा!' प्रभुवरवचनें तिला साश्रु नेवूनि टाकी, मिळे रत्नरक्षार्थ वाल्मीकि जो तो डबा. ॥ २९ ॥

नृगनृप निमिराज तच्छाप ते राम सांगे, ययाति क्षमाजानिची ही कथी सत्कथा; । यतिहत कुतरा दुजा जो उलूक स्वयें न्यायकर्ता दयावान् निवारी तयांची व्यथा. ॥ स्वयश अमृत चाखवी, दाखवी सर्वलोकैकसत्पाळ सद्धर्म सन्नीति यांच्या पथा; । अमरपतिसभेंत सर्वांचिया नव्यभव्यस्तवा मुख्यपात्रत्व सत्पुत्र दे दिग्रथा. ॥ ३० ॥

तदुपरि यमुनाश्रितब्राह्मणत्रास वारावया राघवें शूर शत्रुघ्न जो योजिला, । कुशलवसुतलाभ होतां चि पाहे तिला, आश्रमीं होय वाल्मीकि वैदेहसा तो जिला. ॥ लवण वधुनि तद्वनीं सत्पुरी निर्मुनि द्वादशाब्दीं फिरे, पुत्रगीतादिकाव्या रसा । पिवुनि निवुनि ये अयोध्यापुरा, स्वाग्र-

---

१. प्रीतीचा समुदाय देणारा (नितांतप्रियकर).

जाला भजे, मानसीं भृंग जैसा नवा सारसा. ॥ ३१ ॥

पुनरपि मधुरेसि शत्रुघ्न गेलयावरि ब्राह्मण प्रेतपुत्र प्रभुद्वारमार्गीं रची, । उठवि बसुनि पुष्पकीं शोधुनि श्रीश, मारी तपोनिष्ठ शूद्रासि, हें गाय देवी शची. ॥ घटज वलय दिव्य दे, श्वेतराजर्षि जें दंडकारण्य याची हि तो साधु सांगे कथा; । नमुनि मुनिस ये पुरा, यान धाडी कुबेराकडे काढ-वीता पलाशास्त्रियांच्या व्यथा. ॥ ३२ ॥

भरत विनवि, 'राजसूयें क्षय क्षत्रियांचा दयाळों! तुला बा! नव्हे योग्य हा, तापवी.' । 'हयमख बरवा' म्हणे लक्ष्मण; श्रीवराच्या विचारा रुचे, जिष्णुच्या जेंवि होता पवी. ॥ मुनि नृप कपियातुराज प्रिय क्षिप्र आणी, मखाश्वावना राम सौमित्रितें पाठवी. । कारि कनकमयी प्रिया; गोमतीच्या तटीं गेह कीं देह कोणीं मखींच्या सुखीं नाठवी. ॥ ३३ ॥

कुश लव गुरुच्या निदेशें महाकाव्य गाति स्वयें, आयके राम ही सद्यशा आपल्या; । फिरुनि करवि दिव्य, देवी शिरे भूतळीं; बोध धाता करी स्त्रीवियोगें तया तापल्या. ॥ करुनि तुरगमेध संपूर्ण विप्रादिकांतें सुसत्कारुनि प्रेमळ श्रीश तो बोळवी, । हयमखमुख दिक्सहस्त्राब्द यज्ञ प्रभूतोत्सवें चालवी, सिद्धि पौरांगणीं लोळवी. ॥ ३४ ॥

त्यजिति वपु सुखें च माता समस्ता हि भीतील सत्पुत्ररामानना कां पहातां सत्या? । नमन हि करितां यमेंद्रादिकांच्या हि देती स्वतेजें विमान-स्थिता कांप हातांस त्या. ॥ करुनि कुळगुरूक्त सर्व क्रिया भेटवील्या प्रिया राघवें साधुभूदेववेदानतें, । सकळ शुभ दिलें स्वयें सादरें निस्तुळ प्राज्य न स्वर्द्रुमाला हि जें देववे दान तें. ॥ ३५ ॥

मग भरत युधाजिता मातुळाच्या विचारें प्रभूच्या निदेशें रणीं तीन कोटि स्वयें । भसित चि करि मत्त गंधर्व संवर्तकास्त्रें, मनीं कांपले देव-दैत्यादि त्यांच्या क्षयें. ॥ रचुनि पुरयुग स्वपुत्रद्वय स्थापुनि स्वाग्रजातें नमी, देह वा वित्तवा साधु तो । प्रभुपदभजनापुढें तुच्छ मानी, रामे त्या हर्दी क्षाळिल्या ही पुन्हां चित्तवासा धुतो. ॥ ३६ ॥

---

१. साधु, ब्राह्मण व वेद यांला नम्र असणाऱ्या रामानें.

भरततनय तक्षनामा दुजा पुष्कलाख्य क्षमापाळ केले, तसे लक्ष्मणाचे सुत। प्रथम सुमति अंगद स्वच्छधी चंद्रकेतु द्वितीय प्रभूक्तें चि झाले नृपाळस्तुत. ॥ नकळत अयुताब्द गेले, स्वयें काळ ये, ब्रह्मवाक्यें तपस्वी तसा राम त्या खेंव दे; । 'मुनिवरवचन प्रभो! ऐक, ऐकेल पाहेल जो अन्य अत्यास ही वध्य तो' हें वदे. ॥ ३७ ॥

कथुनि समय लक्ष्मणा द्वारपाळत्व दे, होय एकांतवर्ती, पुसे देव तो तापसा; । कथि विधिवच काळ, 'वैकुंठधामासि यावें' असें प्रार्थितां मंजु[1] केला हि होता पसा; ॥ प्रभु 'बहु बरवें' म्हणे, तों चि आत्रेय ये, रोधितां शाप ओपावयाला सजे, कांपवी; । विभुसि कळवि शीघ्र सौमित्रि दुर्वास-ऐश्वर्य[2]; न त्रस्त होईल चंडासि या कां पवी? ॥ ३८ ॥

रघुतिलक निरोप त्या तापसा देवुनि क्षिप्र आत्रेयपादा नमीं[3], शीघ्र दे भोजन. । मुदितहृदय होय, जातां वदे, 'रामभद्रा! तुझ्या सद्यशें सर्व ही शंभुसा हो जन.' ॥ मग विभु हि पडे महासंकटीं, त्या 'वधासारिखा त्याग' ऐसें वसिष्ठें तदा बोधिलें; । त्यजुनि अनुजरत्न हि स्वप्रतिज्ञावन[4] सच्चरित्रें स्वयें विश्व तेणें तसें शोधिलें. ॥ ३९ ॥

अविकळ सरयूतटीं बैसतां लक्ष्मण व्योमयानीं सुराधीश्वरें सादरें वाहिला, । करुनि कुसुमवृष्टि वाद्यध्वनि स्तोत्र नेला समुद्ग्रीव[5] होवूनियां तो पुरें पाहिला. ॥ प्रभुवर भरता म्हणे, 'मीं हि जातों, प्रजापालनार्थें रहा, साधु धर्में करी रक्षण.' । भरत विनावि, "जाण मत्प्राण तूं, त्वद्वियोगें उभें बा! न राहेल माझें शरीर क्षण. ॥ ४० ॥

कुश लव अभिषेचुनि स्वप्रजापालना लालना योग्य हे रामचंद्रा! प्रभो! उत्तर[6]। प्रथम पद जयांसि या कोसलाख्यस्वदेशांत राजे करीं, दे 'बरें हें' असें उत्तर. ॥ जवन कुशल दूत शत्रुघ्न आणावया पाठिव क्षिप्र, लंकेश सुग्रीव यावे चि ते, । प्रियहितकर जे प्रभो! प्राणसर्वस्व ही संगरीं साधु अत्युत्सवें स्वत्प्रिया वेचिते." ॥ ४१ ॥

---

१. सुंदर. याचा संबंध पसा (अंजलि) याकडे. २. दुर्वाससामर्थ्य. ३. मूळ पाठ—पूजी तया. ४. आपल्या प्रतिज्ञेच्या रक्षणानें. ५. वर मान करून. ६. इतउत्तर (?)

पुरजन विनवी, 'पितासा सखा साच जो तूं सदा हो उदासीन तो या न दीनावरी, । तृषित सकळ जीव संतार्पिती, चालवीती व्रता, तीव्रता घे न, तोया नदी नावरी.' ॥ द्रवुनि अभय दे तया राम, शत्रुघ्न आणावया पाठवी दूत, तो ही तदा स्थापिता । निजसुतयुग होय, जे साधु नामें सुबाहू दुजा शत्रुघाती, निवारी तदास्था[1] पिता. ॥ ४२ ॥

झडकरि विरहार्त शत्रुघ्न आला अयोध्यापुरा, पल्वलींचा जसा मीन यावा सरा. । चरण कवाळितां म्हणे राम तत्काळ, 'सोडीन सारें, परंतु स्वयें मीं न या वासरा.' ॥ सुगळ नमुनि रामचंद्रा कथी, 'म्यां प्रभो! सर्व कीशांसि सांगीतलें अंगदाराधन. । तवपदसहवास नित्यप्रमोदावह, क्लेश दे याविना सर्वदा अंग दारा धन.' ॥ ४३ ॥

निशिचरपति ये, धरी पाय, भक्ता तयातें म्हणे राम, 'संरक्ष माझ्या नियोगा[2] पदा, । रवि विधु धरणी जगीं मत्कथा तों रहा, मद्यशें बा! न बाधेल काहीं वियोगापदा.' ॥ पवनसुत पदीं जडे, त्या वदे, 'मत्कथा मायसी, तूं इच्या साधु हो तोक थानीं सदा.' । निरवधिसुखलाभ सर्वांस या राघवाच्या विधीच्या शिवाच्या हि होतो कथानीं सदा. ॥ ४४ ॥

द्विविद कपि तसा चि जो मैंदनामा तिजा जांबवान् यांसि सांगे स्वयें, 'तिष्यें[3] ये तों रहा, । सतत मज मनीं स्मरा, नाम कंठीं धरा, अप्रयत्नें तरा, विश्व हें मीं च ऐसें पहा.' ॥ प्रभु कथुनि असें पुढें वाजपेयात-पत्राग्निहोत्रद्विजांतें[4] करी, पौर हर्पूनि घे । अनुजसचिवयुक्त, सर्वत्र जैसा घन स्वप्रसादामृत प्राज्य विश्रांत वर्षू निघे. ॥ ४५ ॥

सुरनुतसरयूमहासिंधुचें गोप्रताराख्य जें तीर्थ तेथें म्हणे, 'या, करा मज्जन.' । स्नपन करुनि होय विष्णु स्वयें राम, दिव्यत्व पश्चादिकां दे, असें वर्णिती सज्जन. । हरिविधिशिवदेवगंधर्वसिद्धादि[5] आले, नभीं ते विमानीं सुरांहीं महें वाहिले, । रविशशिशिखिभव्यतेजे नवे कामसे[6] आदरें अप्सरांच्या सहस्रायुतें पाहिले. ॥ ४६ ॥

---

१. त्याची काळजी. २. आज्ञेला. ३. तिष्य पुष्ये कलियुगे इत्यमरः—पंत. ४. वाजपेयी व अग्निहोत्री अशा ब्राह्मणाना. ५. हरिविधि० कडे संबंध. ६. मदनसे.

त्रिदश करिति पुष्पवृष्टि, स्ववाद्यध्वनि प्राज्य, गंधर्व गाती, वरा अप्सरा नाचती; । सुखद हिम सुगंध मंद स्वयें वायु वाहे तसी सुप्रमोदर्धि जी वर्णवेना च ती. ॥ अमर करुनि नेउनि स्थापिले भक्त संतानकीं लोक विख्यात सत्याख्य जो तत्समीं. । सदयहृदय विष्णु वैकुंठधामासि जातां वदे, 'नित्य पाहेन हे आपुले वत्स मीं.' ॥ ४७ ॥

वरदवर दयालु रामप्रभु प्रार्थितां उद्धरी, प्रेम भक्तांवरि प्राज्य ऐसें करी, । अमर समरभग्न भीती जयां, ज्यापुढें ते अरि स्पष्ट झाले हरिध्वस्त जैसे करी, ॥ भरण शरण आलियांचें व्रत श्रेष्ठ ज्याचें सदा दासचिंतागदा वैद्य देतो पदा, । अनघ जन घरीं हि ज्याच्या यशें, नाशल्या आपदा, स्वर्ङ्कुहूत्कंपदा भेटल्या संपदा. ॥ ४८ ॥

रघुपतियश शांति देतें खळा, क्षाळितें हृन्मळा, पाळितें आदरें सर्वदा साधुतें. । अमृतगुण उणा पडे, पाहतां लेश ही ताप राहों न दे, नाशितें गर्व, दासा धुतें. ॥ प्रमुदित करि सर्व ही सत्त्व[1], हें मानिलें पल्वलींचें हि भास्वन्महें[2] रंक राजीव न; । प्रकट तारि च वाटलें सर्वसर्वज्ञवर्यां निजानंदमग्ना सदा शंकरा जीवन. ॥ ४९ ॥

(गीतिवृत्त)

श्रीमद्रामप्रभुच्या चरणांवरि सदळिकुळमना यावें
भक्तमयूरें 'दंडकरामायण' पद्म अर्पिलें भावें. ५०

इति श्रीरामनंदनविरचिते दंडकरामायणे
उत्तरकांडः संपूर्णः ।

---

१. प्राणी. २. सूर्याच्या (पक्षीं) रामाच्या तेजानें डबक्यांतील हि कमळ हें रंक (क्षुद्र) न मानिलें.

# त्रुटितरामायण*

## बालकांड

( शार्दूलविक्रीडित )

श्रीनाथें नरसिंहदेह धरुनी जो दैत्य संहारिला,
तो हा रावण विश्रवःसुत निशाचर्याशयीं[1] जन्मला.
त्याणें विष्टप[2] पीडितां, दशरथापासूनि पृथ्वीवरी
साधुत्राणपरायण प्रकटला श्रीरामनामा हरी. १
आधीं गाधिज यज्ञविप्लवकर[3] क्रव्याद मारावया
मागाया रघुनंदनासि सहसा ये दिग्रथस्वालया[4];
तेव्हां लक्ष्मणराम तातवचनें अत्यंतचित्तोत्सवें
मार्गीं पावुनियां बळा अतिबळा[5] जाती मुनींद्रासवें. २
रोधी येउनि वाट काननचरी दुर्बुद्धिची पेटिका,
रामानें वधिली गुरूक्तिनिरतें नक्तंचरी ताटिका.
यज्ञाक्षणदाचरक्षय शरें केला प्रभूनें क्षणें;

---

* अपूर्णत्वामुळें व विशेषतः नामानुल्लेखत्वामुळें 'त्रुटित' हें नांव पावलेलें प्रस्तुत रामायण हें यापुढील साररामायणाचें वडील भावंड असावें. असें या रामायणांतील कित्येक श्लोक जसेच्या तसे साररामायणांत यथाप्रसंगीं उद्धृत केले आहेत या-वरून दिसून येतें. या रामायणाचीं कविलिखित पांच च पत्रें उपलब्ध आहेत, व 'केला तेव्हां स्वदैवें तव' अशा अपूर्ण द्वितीय चरणानें च पांचव्या पत्राची मर्यादा गांठली आहे, यावरून या रामायणाचीं पुढलीं कांहीं पत्रें गहाळ झालीं असावीं असें अनुमान निघतें. मात्र कवीनें हें रामायण कडेला लाविलें असेल किंवा नाहीं याविषयीं संशय उत्पन्न होतो. कारण, एकाद्या साद्यंत रामायणांतील कांहीं श्लोक कोणी कवि आपल्या च दुसऱ्या एकाद्या रामायणांत उद्धृत करील हें संभवनीय दिसत नाहीं. १. राक्षसीचे पोटीं. २. भूलोक. ३. विघ्न. ४. दशरथाचे घरीं. ५. भूक व तहान न बाधूं देणाऱ्या विद्या.

विप्रश्रेष्ठ सुतुष्ट होय हृदईं इष्टक्रियारक्षणें. ३
'सज्य त्र्यंबकचाप जो करिल हें त्याला सुता आपण
अर्पीवी' मिथिलाधिपें निजमुखें केला असे हा पण.
ऐसें ऐकुनि सानुजें रघुकुलोत्तंसें धरावासवें
केलें हृष्टमनें प्रयाण कुतुकें त्या भूमिदेवासवें. ४
मार्गीं गौतमशापपावकशिखादंदह्यमाना[1] शिला,
तद्वृत्तांत रघूत्तमें स्वगुरुला प्रार्थूनियां पूशिला.
तीचा ताप निजांघ्रिपंकजरजोलेशें तदा नाशिला,
भार्या अर्पुनियां दिलें सुख जगन्नाथें तपोराशिला[2]. ५
आनंदें मिथिलेशि जाउनि रघूत्तंसें जगन्मंगलें
लीलेनें भवचाप सज्ज करुनीं आकर्षितां भंगिलें.
सीता मौक्तिकहार घालुनि गळां सर्वोत्तमाला वरी;
लंकेवांचुनि हर्ष तो प्रसरला स्वर्गीं तळीं भूवरी. ६
पत्रें धाडुनि मैथिलें दशरथ स्त्रीपुत्रमित्रासवें
आणूनि स्वपुरीं विवाह बरवा केला प्रभूतोत्सवें[3].
सौमित्रीप्रति उर्मिळा निजसुता सत्कारुनी दीधली;
तें पाहूनि अपूर्व सौख्य हृदयीं सर्व प्रजा लाधली. ७
राजाच्या अनुजें कुशध्वजनृपें वंशद्वयानंदिनी
त्या काळीं भरतासि पूजुनि दिली ते मांडवी नंदिनी.
होती जे श्रुतकीर्तिनाम तनया ते ही स्वयें जेधवां
शत्रुघ्नाशि समर्पिली, सुख तदा जालें तिच्या बांधवा. ८
दासीदासरथेभवाह[4] जनकें देऊनियां जांवया
कित्ती[5] वासर ठेवुनी, मग दिली आज्ञा पुरा जावया.
तों आला भवचापभंगकुपित श्रीकंठशिष्याग्रणी[6],
जिंकी दाशरथी तयाप्रति पथीं लीलेकरूनि क्षणीं. ९

---

१. अत्यंत भाजणारी. २. गौतमाला. ३. मोठ्या थाटानें. ४. रथ+इभ=हत्ती +वाह=घोडे. ५. किती तरी, पुष्कळ. ६. श्रीशंकराचा पट्टशिष्य (परशुराम).

(इंद्रवज्रा) जिंकूनियां भार्गवराम रामें सत्कीर्ति केली भुवनाभिरामें.
साकेत आनंदविलें प्रवेशें लीलामनुष्यें रघुसंभवेशें. १०
इति बाळकांडः

## अयोध्याकांड

(शालिनी)

सा वर्षांची भूमिकन्या विवाहीं, होतीं अब्दें पंधरा राघवा ही.
साकेतीं ही स्त्रीसवें वास बारा वर्षें जाला रामचंद्रासि सारा. १
(स्रग्धरा) त्रिन्यून[1] त्रिंशदब्दें रघुपतिस, तधीं दो उणीं वीस वर्षें
जालीं सीतेसि देवद्विजगुरुभजनीं वर्ततां नित्य हर्षें.
कौसल्याजानि[2] तेव्हां 'प्रथमसुत' म्हणे 'योग्य लोकावनातें.'
कैकेयी राज्यकामें तव पतिस म्हणे, 'धाड तोका वनातें. २
(शा. वि.) पूर्वींचे वर दोन जे तुजकडे त्यांतून एका वरें
द्यावें हें भरतासि राज्य नृपते! त्वां शीघ्र अत्यादरें;
सेवावें इतरें चतुर्दशसमा[3] कांतार सीतावरें.'
कैकेयी वदतां असें नृप तिला प्रार्थी ससांत्वोत्तरें: ३

(इंद्रवज्रा)

'जो प्राप्त जाला बहु वत्सरानीं, तो तूं कसा धाडिसि वत्स रानीं?
घे राज्य सारें परि लेंकराशी देवूं नको केवळ शोकराशी. ४

(मञ्जुभाषिणी)

त्यज सर्व रोष, मज पाव; कासया सखि! फुंकिशी असुखपावकास या?
तुजला अकर्म बहु मानलें करूं, न पवे चि योग्य बहुमान लेंकरूं. ५

(भुजंगप्रयात)

सुतत्याग मन्मृत्युचा हेतु जाये! न कैशी मनाला दया हे तुजा ये?
करावा कसा निर्दये! वास रानीं महाभीकरीं माझिया वासरानीं? ६
(मंदाक्रान्ता) माझ्या सार्धत्रिशत युवती, त्यांत ही प्रीतिपात्र
जे तूं ते ही त्यजिशि मजला इच्छुनी राज्य मात्र.

---

१. तीन कमी तीस=२७. २. दशरथ. ३. चौदा वर्षें.

पुत्रत्यागें रमणमरणें लाज हे देवि! लोकीं,
दूर प्रांतीं म्हणउनि बरी दृष्टि हे दे, विलोकीं.' ७
(स्रग्धरा) एवं नानाप्रकारें युवति दशरथें प्रार्थिली फार सामें,
तें ती कांहीं न मानी अकरुणहृदया निस्त्रपा[1] राज्यकामें.
तेव्हां हें रामचंद्र श्रवण करुनियां सानुज स्त्रीसहाय
जाता जाला वनाला; पुरजन म्हणती देखतां त्यास 'हाय!' ८
(पृथ्वी) त्रिरात्र जळ सेविलें त्यजुनि राज्य जातां वना,
चतुर्थदिवसीं करी मग फळाचिया सेवना;
तरोनि सुरसिंधुला जनकजेश तो पावला
दशार्धमित[2]वासरीं वसतिला त्रिकूटाचला. ९

येथें साररामायण-अयोध्याकांड सर्ग १० यांतील ९ वा व १० वा
आणि सर्ग ११ यांतील १ ला असे श्लोक वाचावे.

(सारंग) वंदूनि मातेशि तेव्हां म्हणे 'आज
गेला असे सांग कोठें महाराज?'
'स्वर्गाशि गेला कुमारा! तुजा तात.'
'अंबे! अकस्मात जाला कसा घात?' १३
'हा! पुत्रशोकें चि मेला सुता! राय.'
'तो कोणता हें मला सांग हो माय!'
'बंधू नमस्कार सारे करा ज्यास;'
'जाले तया काय? तो मान्य राज्यास.' १४
'स्त्रीबंधु घेवूनि गेला अरण्यास;'
'कां मानलें हें जनाच्या शरण्यास[3]?'
'वत्सा! तुझी तातवाणी च तन्मूळ;'
'ऐसें कसें बोलिला भूपशार्दूळ?' १५
'बोले असें भूप मद्वाग्गुणाबद्ध[4];'

१. निर्लज्जा. २. पांचव्या दिवशीं. ३. रक्षणकर्त्यास. ४. माझ्या वचनरूप दोरानें बद्ध झालेला.

'कैंची फळप्राप्ति? कां पीडिला वृद्ध?'
'व्हावें तुला राज्य तो साधिला काम;'
'हा! पापिणी! काय केलेसि? हा! राम! १६
तूं राक्षसी, भक्षिला मेदिनीकांत,
केला कसा निर्दये! थोर आक्रांत?
श्रीरामपादाब्जसेवा चि मद्राज्य,
तें नाशिलें, दुःख संपादिलें प्राज्य.' १७

येथें साररामायण–अयोध्याकांड सर्ग ११, श्लोक ३ पासून अखेरपर्यंतचा मजकूर वाचावा.

इत्योध्याकांडः

## अरण्यकांड

(शार्दूलविक्रीडित)

कांतार क्रमितां रघूत्तम तदा पाहे विराधा वनीं,
कांपे सिंधुतरीसमा थरथरां ज्याचा धरा धावनीं;
ऐसा तो प्रबळ क्षपाचर करी सीतापहार क्षणें,
तेव्हां त्यासि वधी विभू, यश असें साधी जगद्रक्षणें. १
राहे पंचवटीस्थळीं दलकुटी निर्मूनि गोदातटीं,
तेथें ते नकटी पलाशपतिची केली स्वसा धाकटी;
तों आले कपटी सहस्र चवदा क्रव्याद मोटे हटी,
त्यांला ही निवटी रणांत न सरों देतां चतुर्थी घटी. २
सार्धद्वादश वत्सर प्रभु सुखें गोदातटीं राहिला,
हा त्यानंतर राक्षसव्रज महाबाणानळें दाहिला.
तेव्हां शूर्पणखी पलाशपतिला लंकेंत सारें कथी,
सीता वर्णुनियां तिच्या स्मरशरें त्याच्या मनाला मथी. ३
तो लंकापति कोपकामकलुशस्वांत स्वयें धांवला,
संगें घेउनि ताटिकासुत जवें गोदातटीं पावला;
मारीचासि करूनि हेमहरिण प्रेषी विमोहावया

सीतेला, तव ते विलोकुनि म्हणे, 'याला धरावें प्रिया!' ४

(स्रग्ध.) भार्याप्रीत्यर्थ धन्वी शरधर शिरला तो त्रिलोकीश रानीं,
चित्तीं योजी कुरंग श्रमउनि धरणें मारणें कीं शरानीं;
कांतारीं दूर गेला मृग मग जगतीनाथ ताडी स्वबाणें,
'हा सीते! लक्ष्मणा! हा!' अशि वदुनि गिरा सोडिले प्राण त्याणें. ५
'हा सीते! लक्ष्मणा! हा!' अशि रजनिचरें काननीं उच्चवाणी
जेव्हां उच्चारिली ते स्वमरणसमयीं राघवेंद्रोक्तिवाणी,
तीतें ऐकोनि पावे भय उटजगता तत्क्षणीं रामराणी,
आणी कांतांतशंका स्वहृदयकमळीं, नेत्रपद्मीं हि पाणी. ६
सौमित्रीतें म्हणे, 'जा त्वरित रघुपतिप्राण रक्षावयाला.'
तो प्रार्थी तीस, 'माते! भय किमपि नसे या त्रिलोकीं तयाला.
पूर्वीं तूं इच्छिला जो कनकमयमृग छद्म त्या राक्षसाचें,
प्रायः श्रीरामबाणाहत मृत पडतां बोलिला, हें न साचें.' ७

(शा.वि.) ऐसें ऐकुनि देवरोक्त मग ती बोलों नये तें वदे,
'दुष्टा! तूं उटजास सोड, उठ, जा.' आज्ञा असी त्यास दे.
एतां आत्मविनाशकाळ न रुचे सद्बुद्धि ही मानसा
शोक[1]क्रोधभयात्तबुद्धिस गमे जो आप्त तो शत्रुसा. ८
सौमित्रि क्षितिजा[2]दुरुक्तिविशिखव्याविद्धवक्षा रडे,
जाली दुःसह वेदना मग तिच्या पादोपकंठीं[3] पडे.
गेला व्याकुळ तो विलाप करित श्रीरामचंद्राकडे,
त्या काळीं यतिवेषरावणमनःसंकल्प सारा घडे. ९
माघीं शुक्लचतुर्दशीयदिवसीं संन्यासिवेषें खळें
नेली व्योमपथें विदेहदुहिता रक्षोधिनाथें खळें.
'हा रामा! हृदयेश्वरा! रघुपते! हा सद्गुणा! लक्ष्मणा!'
ऐसे फार करी विलाप हरितां ते अश्रुपूर्णेक्षणा. १०

---

१. शोक, क्रोध आणि भय यानीं व्याप्त बुद्धि ज्याची अशास. २. सीतेच्या कटुभाषणरूपी बाणानें अंतःकरण विदीर्ण झालेला. ३. पायाजवळ.

सीतेचें परिदेवन[1] श्रुतिपथीं येतां चि त्या काननीं
होता दिग्रथमित्र गृध्रपति तो कोपे जटायू मनीं.
दिक्कंठासि नभीं निवारुनि म्हणे, 'कां वृत्ति हे चोरटी
स्वीकारूनि मरावयासि हरिशी माझी स्नुषा गोरटी? ११
पृथ्वीची दुहिता त्रिलोकमहिता श्रीरामचेतोहिता
नेसी धीरहिता! न वृत्ति विहिता हे कामसंमोहिता.
श्री, प्राणास हि तार, जा; न[2] अहि ताडावा पदे दाहिता;
कीं काळप्रहिता तु ज्याचि महिता नेली असे लोहिता[3]. १२
सोडावी अति शीघ्र रामरमणी कीं जीवनाशा तरी,
आज्ञा घेउनि सेविजे स्वनगरी किंवा यमाची पुरी.
जोडीं बाण गुणासि तूं झडकरी कीं पाणियुग्माप्रती,
या पक्षांत रुचेल तो द्रुतगती संपाद लंकापती!' १३
(उपजाति) ऐकोनि ऐसें परमाभिमानी हांसोनि गृध्राप्रति तुच्छ मानी.
जटायु तेव्हां बहु कोपला हो! घे सेवटीं निर्भय युद्धलाहो. १४
(शा. वि.) केला जर्जर पक्षपादनखरें चंचुप्रहारें रणीं,
वाहे पर्वत गैरिकोदकें[4] तसा रक्तप्रवाह व्रणीं.
जाला चूर्ण रथ क्षतांग सहसा व्यामूढ कृत्यक्षणीं[5],
भासे शोणितवर्षिमेघसम तो नक्तंचरांचा धणी. १५
होता वृद्ध परंतु युद्ध करितां भासे युवा; विक्रमीं
सर्पालागिं जसा खगाधिप* तसा त्या शत्रुला आक्रमी.
वेगें राक्षसलोकराज उतरी श्रीरामदार क्षिती,
दोघे क्रुद्ध नियुद्ध[6] शुद्ध करिती, आरमा तदा रक्षिती. १६
मायादक्ष विपक्ष राक्षसपती कौक्षेयकानें[7] रणीं
गृध्राधीश्वरपक्ष लक्ष नसतां छेदी क्षयार्थ क्षणीं;

---

१. विलाप. २. दाहिता (भयंकर) अहि पदें न ताडावा. ३. रागानें लाल झालेली स्त्री. ४. खो. पा.–**अद्रि मनःशिलोदक.** (गेरूमिश्र उदक). ५. कार्यसमयीं. ६. बाहुयुद्ध. ७. खड्गानें. * लेखनप्रमाद–**मृगाधिप.**

क्षीणप्राण खगक्षमाधर तसा क्षोणीवरी तो पडे,
त्या काळीं क्षतरक्षणा क्षितिसुता अश्रुप्लुताक्षी रडे. १७
चित्तीं नाणुनि पातकीश चपळ क्रव्याद तो पातकी
ने लंकेशि अजोनकीरपरभृन्नासास्वरा[1] जानकी;
संस्थापी प्रमदावनीं निजकरें वंशाटवीदावनी,[2]
ठेवी रात्रिचर क्षणीं निशिचरस्त्री ही तिच्या रक्षणीं. १८
(मं. क्रां.) शब्दें रूपेंकरुनि गहनीं वंचिला राम एणें,[3]
यासाठीं तो करि झडकरी पर्णशाळेशि येणें.
भेटे मार्गी अनुज, मग तो वृत्त सारें निवेदी;
त्यातें 'केलें अनुचित' म्हणे, धैर्य चित्तासि नेदी. १९
(शा. वि.) दोघे येउनि पाहती तव गृहीं होते शिवा कावळे,
हाका फोडिति जानकीस परि ते कांहीं न जिह्वा वळे.
धांवा घेति इतस्ततस्तरुलतागुल्मीं जसे बावळे,
त्यांच्या नेत्रसरोरुहासि दिवसा जाणों रवी मावळे! २०
(हरिणी) रघुपति म्हणे, 'आर्ये! आर्ये! वियोगहुताशनीं
तळमळतसें कांते! शांते! क्षपारमणानने!
मम विषयिणी जाये! कां ये दया न तुझ्या मनीं?
करिल सुमनोधन्वी[4] तन्वि! व्यसु स्वशरें वनीं. २१
(शा. वि.) हा सीते! जनकाधिराजतनये! बिंबाधरे! सुंदरी!
हा नीलोत्पलपत्रदीर्घनयने! हा सुभ्रु! शातोदरी![5]
हा मच्चित्तसखि! क्षपापतिमुखि! प्राणेश्वरी! प्रेयसि!
तूं पापापरि टाकिलें; मग मला देहस्पृहा कायसी? २२
(स्रग्धरा) सोसीन क्रुद्धयुद्धोद्धुरसुरपतिचे कोटि ही वज्रपात;
कांते! साहेन घर्मज्वलदनलशिखालिंगनाला[6] वनांत.

---

१. अप्रौढ शुक आणि कोकिला यांप्रमाणें आहे नासिका व स्वर जिचा. २. वंश-रूपी अरण्याला वणव्याप्रमाणें अशी सीता (?) ३. मृगानें (मारीच्यानें). ४. मदन. ५. कृशोदरि! ६. उष्णताजनक अग्निज्वालांना (वणव्याला) कवटाळण्याला (?)

सीते! मातें असह्या अतनुसुमधनुर्निष्पतत्पंचबाणी
तैसा चि त्वद्वियोगज्वर परमतर क्रूर, हे सत्य वाणी. २३
हा सीते! काननांतीं शशिजितवदने! तूं न टाकूनि जावें.
वर्तावें मीं दिसाचें सुतनु! वद कसें? रात्रि कैसें निजावें?
आतां पाटीरशीतामलतनु! रविचा ताप कैसा सहावा?
सोसावा त्वत्सहायें; तुजविण विधुचा हा कसा नित्य दावा? २४
(उपजाति) हे पावती तूजविना शरानीं
कामाचिया प्राण विनाश; रानीं
करूं किती मी परिदेवनाशी?
न ताप गातों परि देव नाशी. २५
(शा. वि.) राज्यभ्रंश सुहृद्वियोग घडला, शोकें चि मेला पिता,
वन्याहार, सदा अरण्यवसती ते ही द्विषद्दूषिता;
ऐशा दुःखपरंपरेंत सुखदा होती सती योषिता
ते काळें हरिली; परि क्षय नसे या दुर्वहा जीविता.' २६
(पृथ्वी) विलाप विपिनांतरीं करुनियां असा फारसा,
रसातळवटीं तदा करुनि अस्त हक्सारसा,
रसाळ तरु मारुतोन्मथित ज्यापरी ऊपडे
पडे नृपति, कश्मलाभिधगुणांतरीं सांपडे. २७
(अनुष्टुप्) लक्ष्मणें गौतमीतोयें शीघ्र राघव शिंपिला.
स्मरे वधूला तो प्रेममुक्तेच्या निज शिंपिला. २८
(शा. वि.) केला सावध लक्ष्मणें मग वधू शोधावयाकारणें.
तूणीरासि धनुष्य घेउनि रघूत्तंसें जगत्कारणें
आत्मीयाश्रम वृक्षगुल्मलतिकास्थानें वनीं शोधिलीं,
नाना सत्त्वकुळें प्रियेशि पुसतां प्रार्थूनि संबोधिलीं. २९
कांतारीं फिरतां जटायु वसुधाकन्याधवें देखिला,

१. मदनाच्या पुष्पधनूंतून निघणारी बाणपरंपरा. २. शत्रूनीं दूषिलेली. ३. मूर्च्छेंत. ४. भात्याला. * शशी जित आहे वदनानें जिच्या.

वज्रच्छिन्नगरुद्रिरींद्रसम[1] तो चित्तांतरीं लेखिला.
'ताता! त्वद्गति कां असी?' म्हणुनियां शोकाकुळें राघवें
स्नेहानें पुसतां तयाप्रति कथी हा यापरी आघवें[2]: ३०
'वत्सा! तूज्या वधूतें दशमुख हरितां दोर्बळें पक्षपात
केला, तेव्हां स्वदैवें तव... ... ... ... ...

---

# साररामायण*

## बालकांड

### सर्ग पहिला

(मंदाक्रान्ता)

कौसल्याख्या अवनिपतिची ज्येष्ठ भार्या सुशीला,
हासे जीची वदनसुषमा[3] पूर्णिमेच्या शशीला.
सौंदर्याची खनि चि, न तसी देखणी देवकन्या.
साध्वी विप्रामरनतिपरा[4] कांतपद्भक्तिधन्या[5]. १
दूजी पत्नी भुवनसुभगा[6] शीलवृत्तानुरूपा[7]
साध्वाचारें पतिस सुखवी श्रीसुमित्रा सुरूपा.
होत्या सार्धत्रिशत[8] युवती, त्यांसवें सख्य तीचें;
कर्मे सारी कारि गुरुजनाल्हादकें उच्चनीचें[9]. २

---

१. वज्रानें छिन्नपक्ष झालेल्या महान् पर्वताप्रमाणें. २. अवघें, सर्व, * हें रामायण बाल व अयोध्या या दोन च कांडांपर्यंत कवीनें रचिलें आहे, असें, मूळ पोथीच्या अखेरच्या म्हणजे १९ व्या पत्राचें द्वितीय पृष्ठ, अयोध्याकांडाच्या अखेरच्या श्लोकाच्या १।२ ओळी लिहून व एकंदर ग्रंथसंख्या देऊन, कोरें च सोडलें आहे यावरून स्पष्ट होतें. ३. मुखकांति. ४. ब्राह्मण व देव याना वंदन करणारी. ५. पतिचरणभक्तीनें धन्य झालेली. ६. सर्व जगामध्यें सुंदर. ७. सच्छील आणि सदाचरण यानीं योग्य. ८. साडेतीनशें. ९. 'कर्मे' याचें विशेषण.

कैकेयी हे युवति तिसरी सद्गुणा क्रीडशाळा[१],
जीचा ठाईं धरणिपतिची प्रीति नांदे विशाळा.
मुख्या सार्धत्रिशतयुवतींमाजि *तीं कांतमान्या[२],
नान्या ऐशी क्षितिवरि वधू दिव्यरूपा वदान्या[३]. ३
अन्या सार्धत्रिशत रमणी भर्तृभक्तिप्रवीणा,
लाजे ज्यांच्या गलकलरवें[४] भारतीची[५] हि वीणा,
सौंदर्याच्या वसति[६], हसती ज्या सदा स्वर्वधूतें,
ज्यांला चंद्रें न चि निरखिलें तन्मुखाभावधूतें[७]. ४
सर्वां आदीं[८] दशरथनृप प्रीतिनें नित्य लक्षी,
चित्तेंवित्तेंकरुनि सुखवी, सर्वतः[९] प्रेम रक्षी.
सर्वां गर्वासह न धरिती लेश अन्योन्य दावा,
कांत स्वांतप्रियगुण असा काय त्यांचा वदावा? ५
त्या कांतांसीं प्रमुदितमनें रक्षुनी धर्म केली
भूपाळानें बहुदिन अपत्योद्भवार्थें[१०] चि केली.
नानातीर्थव्रतविधिसुरब्राह्मणाराधनातें
साधी, आधीं करुनि पुढती देहदाराधनातें. ६
पृथ्वीभारोद्वहन करितां सर्व तारुण्य गेलें,
सामर्थ्यानें वधुनि रिपुला स्वप्रजात्राण केलें.
वृद्धावस्था तनुशि जडली त्या हि काळीं विसावा
नाहीं[११], तेव्हां सुख भरवसा काय चित्ता असावा? ७

(पुष्पिताग्रा)

दशरथ अनपत्यभावतप्तें[१२] सतत सचिंत असे मनें अतृप्तें.

---

१. क्रीडेचें स्थान. २. पतीला मान्य. ३. उदार स्वभावाची. ४. कंठ. ध्वनीनें. ५. सरस्वती. ६. निवासस्थान. ७. तत् + मुख + आभा + अवधूतें = त्यांच्या मुखांच्या कांतीनें कंपित झालेला. ८. प्रथम. ९. सर्व बाजूनीं. १०. दारानपत्यायतघोऽर्थमायुः' या तत्त्वावर. ११. पुत्र नसल्याकारणानें. १२. अनपत्यतेमुळे तप्त अशा (मनें). * येथें 'भू' असें अर्धवट अक्षर अधिक लिहिलें गेलें आहे.

व्रतयमनियमोपवास साधी, परि सरला न तदीय मानसाधी.[1] ८

इति मयूरेश्वरकृतौ साररामायणे सर्गः १

## सर्ग दुसरा

(वंशस्थ)

अमात्य मंत्री गुरु विप्र जे[2] कृती तयांसि पाचारुनि तो महीपती,
समीप संस्थापुनियां बरेपरी अपत्यलाभार्थ विचार आदरी. १
म्हणे, "स्वपूर्वार्जित राज्य रक्षितां, अमार्गवर्ती खळ लोक शिक्षितां,
भवत्सहायें यश जोडिलें बरें, कृतार्थ केले चि शिवें दिगंबरें. २
सुरद्विजाॠणं[3] हि वारिलें खरें, यथाबळें पूजनवंदनादरें,
न फेडिलें आजुनि पूर्वजॠण[4] मीं, म्हणोनि आहें स्वमनीं बहु श्रमी. ३
'न पाविजे स्वर्ग कदापि अप्रजें' असें खरें बोलति साधु विप्र जे
सुतीव्र तें शल्य तसें चि लागतें, मनांत रात्रिंदिव हें चि जागतें. ४
वधू पवित्रा अनुकूलचारिणी सुरद्विजार्चागुरुभक्तिकारिणी
न पावल्या सत्कुलजा प्रजाफळ, जगत्रयीं मीं[5] दुरदृष्ट केवळ. ५
तनूद्भवालिंगनलालनस्पृहा न पूरली वृद्धपणीं अहा! पहा.
वृथा चि गेलें धन राज्य जीवन, न सेविलें दिव्यतपा तपोवन! ६
करावयाला हयमेध कामना करीतसे उन्मुख सर्वदा मना.
असेल तेथें[6] मज योग्यता जरी, तरी दिजे सम्मति आज साजरी." ७

(मालिनी) दशरथनृपवाणी ऐकुनी ते वसिष्ठ-
प्रमुख निगमसिंधु[7] क्ष्मासुरामात्यशिष्ट
म्हणति, 'नृपति! आहे तूज संतानलाभ,
क्रतु कर, पुरवील त्वत्स्पृहा पद्मनाभ.' ८
श्रवण करुनि ऐसें सन्मुनींच्या विचारें
करवि सचिवहस्तें यज्ञसाहित्य सारें.

---

१. मानसिक दुःख. २. खोडलेला पाठ—स्वसखे भले. ३. देव, ऋषि व इष्टमित्र यांचे ऋण. ४. पितृऋण. ५. निपुत्रिकानें. ६. अश्वमेधाविषयीं. ७. वेद-शास्त्रांचे समुद्र च असे.

विकळ तिल हि कांहीं काम्यकर्मीं नसावें,
अवगत न असे तें ब्राह्मणाला पुसावें. ९

सर्गः २

## सर्ग तिसरा

(वसंततिलका)

मंत्री सुमंत्र नृपतिप्रिय सद्विचार
सांगे; म्हणे, "विधितनूज सनत्कुमार
पूर्वीं भविष्य वदला, कथितों कथा ते;
एक तुज्या नरवरा! श्रुतिच्या पथातें. १
विप्रेंद्र काश्यप विभांडक जो असंग,
होईल तत्सुत महामुनि ऋश्यशृंग,
सद्ब्रह्मचर्य पितृभक्त अरण्यवासी
ज्ञानी मृगीप्रभव केवळचिद्विलासी. २
तैं लोमपादनृप अंगपती अवृष्टि-
काळीं असेल सतत द्विपैडब्द कष्टी.
तेव्हां स्वमूर्धनलिनीं च धरुनि पाय,
राजा पुसेल सुमुनींप्रति वृष्ट्युपाय. ३
ज्ञानी द्विजेंद्र भगवत्पदपद्मभृंग
'येईल अंगविषयीं जरि ऋष्यशृंग,
होईल लोकपरिपुष्टिकरेष्टवृष्टी,'
भूपासि हें कथितिल द्विज दिव्यदृष्टी. ४
तो लोमपाद परिसोनि अशी सदुक्ति
आणील काश्यपसुताशि करूनि युक्ती.
तेव्हां चि वर्षतिल त्या विषयीं पयोद,

१. हरिणीपासून झालेला. २. ब्रह्माचे च ठिकाणीं रमणारा. ३. बारा वर्षे. ४. आपल्या मस्तकरूपी कमलावर. ५. अंगदेशांत. ६. लोकांची परिपुष्टि करणारी अशी इच्छित वृष्टि.

क्षीण प्रजा सकळ पावतिल प्रमोद. ५
वैतान[1]पावकशिखाप्रतिमल्लवर्चा
भूपाळकें प्रणमिजेल करूनि अर्चा,
शांताभिधा स्वतनया भुवनैककांता
[2]स्वांतार्थदा मग दिजेल[3] महाप्रशांता. ६
सत्पुत्र ही दशरथाप्रति तत्प्रसादें
होतील भक्ति करितां विगतप्रमादें.'
हें जें भविष्य कथिलें विधिच्या कुमारें,
जालें चि देवमुनिवाक्य यथोक्त सारें. ७
तूजा सखा क्षितिपते! नृप लोमपाद,
जाला तयावरि महामुनिचा प्रसाद.
यज्ञास विप्रवर आण धरूनि पाद,
तात्काळ तो परिहरील मनोविषाद." ८
ऐकोनियां स्वहितहेतु सुमंत्रवाणी,
राजा सदार मुनिला स्वगृहासि आणी;
सत्कार फार चि वसिष्ठसमान याचा
भावें करी धरुनि मार्ग बरा नयाचा. ९
शांता[4]हृदीश्वरवसिष्ठमुखादिसंतीं
विध्युक्तयज्ञहय सोडविला वसंतीं[5].
येतां पुनः स्वसमयीं सरयूतटाकीं
आरंभितां मख महासुख होय नाकीं. १०
होतां तुरंगमख निर्जर[6] आवघे या
आले स्वयें क्षितिवरी निजभाग घेया.
सत्कर्म तें अवभृतांत हि सांग जालें,
केलें यथाविधि धनार्पण भूमिपालें. ११

---

१. यज्ञाग्निज्वालेला प्रतिस्पर्धी आहे तेज ज्याचें त्याला. २. आपलें मन अर्पण करणारी. ३. दिली जाईल. ४. शांताहृदयपति. ५. वसंतऋतूमध्यें. ६. देव

(शा. वि.) होतां सांग हयक्रतु क्षितिवरें पुत्रेष्टि आरंभिली,
तैं भागग्रहणार्थ भूमिवरती ये देवतामंडली;
ती रक्षःपतिपीडिताखिलजगद्दुःख स्वयंभूप्रती
सांगे, तच्छ्रवणें चि पावति महातापासि त्याच्या श्रुती. १२

इति सर्गः ३

## सर्ग चवथा

(मालिनीवृत्त)

शतमखमुखदेवांपासुनी पद्मयोनी
दशमुखकृतपीडा दुःसहा आयकोनि
त्रिदशसहित गेला क्षीरपाथोधिरोधा
मधुरिपुशि कथाया देवरक्षोविरोधा. १

सुरसह कर तेथें जोडुनी केशवाचे
स्तव करि बहु भावें सत्यलोकेश वाचे.
'जय जय! जगदीशा! स्वानुकंपावदक्षा!
नतजनसुरवृक्षा! दुष्टसंहारदक्षा! २

जय! जलधरनीला! भक्तापघ्नलीला!
असुरहननशीला! पापवासाग्निकीला!
सकलभुवनपाळा! कैटभाद्युग्रकाळा!
मुनिहृदयविशाळावाससंतोषशाळा! ३

जय! भवहरनामा! पूरितानम्रकामा!
जय! जगदभिरामा! सद्गुणग्रामधामा!
जय! वरदवरा! मानायका! दिव्यधामा!
जय! असुरविरामा! देवचूडाललामा!' ४

---

१. ब्रह्मदेवाला. २. कान. ३. इंद्रादिदेवांपासून. ४. क्षीरसमुद्रतीराला. ५. विष्णूला. ६. देवराक्षसांच्या तंट्याला. ७. भक्तांचे कृपेनें रक्षण करण्याविषयीं दक्ष. ८. पापरूपी तृणाला अग्निज्वालारूपी. ९. मुनिजनांच्या हृदयामध्यें विशाल आहे आवास (स्थिति) ज्याचा अशा व संतोषाच्या आश्रया!

विधिमुखसुरसंघोच्चारितात्मस्तुतीतें
श्रवण करि समस्तव्यापिसद्वस्तु[1] तीतें.
सदयहृदय साक्षान्नित्यमोदैकराशी
प्रकटुनि निजतेजें लोपवी भास्कराशी. ५
पतगकुलेवरां[2]सारूढ पाथोदवर्ण[3]
अरिकमळ[4]गदाब्जी कुंडलद्योतिकर्ण
सकलसुखनिधी तो श्रीश देवश्रमातें
हरि, हरि हरिदश्व[5] क्षिप्र जैसा तमातें. ६
प्रकट निकट होतां त्या महादीप्तिसद्मीं[6],
सकळ सुरजनानीं झांकलीं नेत्रपद्में.
प्रभुचरणदयेनें दर्शनप्राप्तिपात्र
त्रिदिवपतिसमाजीं आत्मभू एक मात्र. ७
भुवनविनतपादें मेघगंभीरनादें
विधिस कुशळवादें[7] हर्षवीलें प्रसादें.
'अभिलषित असेल स्वांतरीं तें वदावें'
स्वर्जनिस[8] पुशिलें हें दुःखकांतारदावें. ८
असि निजजनकाची दिव्यपीयूषवाणी
श्रवण करुनि हर्षें जोडुनीयां स्वपाणी
नमन करुनि भावें ब्रह्मदेव प्रभूतें
कथि दशमुखदत्तें तीव्रदुःखें प्रभूतें. ९
'अहि सुर नर सारे भाजिले स्वप्रतापें
न गणुनि अमरादिस्त्रीग्रहाद्युग्रपापें[9]
परमविकळ केले साधु सन्मार्गगामी,
म्हणुनि शरण आलों सेवकस्वर्नगा मीं. १०

---

१. ईश्वर. २. गरुडारूढ. ३. नीलवर्ण. ४. चक्र, पद्म, गदा आणि शंख यानीं युक्त. ५. सूर्य. ६. महातेजाचें स्थान च अशानें. ७. कुशलप्रश्नानें. ८. ब्रह्मदेवाला. ९. उग्रपापें (रावणें).

तुजहुनि दुसरा या राक्षसा लोकराया!
कवण कुशळ आहे भस्म युद्धीं कराया?
तवपदनतसाधुद्वेषकृत्पातकी जे
जगदसुखद, त्यांचा त्वां चि निःपात कीजे. ११
धरुनि हृदयिं याणें भाग्यतृष्णा तपातें
करुनि दिगयुताब्दें[1], शीतवर्षातपातें
न गणुनि, दशवार छेदुनी मूर्धपद्में
मजनिकट विनेलें[2] राक्षसें छद्मसद्में[3]. १२
मग विभु! मजपाशीं सर्वभूताभयातें
विनउनि वरितां मीं अर्पिलें तें चि यातें;
परि हरिवर घेतां तुच्छ मानूनि याणें
प्लवगमनुजनामत्याग केला अजाणें. १३
दशमुखनिधनातें रंध्र हें मात्र आहे,
अमर शरण आले दीनबंधो! तुला हे,
कर निजबिरुदातें योग्य तें लोकराया!
जगदभय कराया मस्तकीं दे करा या.' १४
द्रुहिणवचन ऐसें ऐकुनि श्रीनिवास
मधुमधुर वदे त्या नाभिकंजोद्भवास:
'निशिचर वधिला हें सत्य चित्तांत मानीं,
मनिं भय न धरावें लेश देवोत्तमानीं. १५
दशरथनृप पुण्यश्लोक संतानकामी
मम भजन करीतो, त्या धरानायका मीं
तनयकृतसुखाचा लाभ देईन आधीं,
मग वधिन दशास्या, जा, त्यजा सर्व आधी.' १६
करुनि वरसुधेनें ब्रह्मदेवासि तृप्त
त्रिभुवनपति लक्ष्मीकांत तो होय गुप्त.

---

१. दहा हजार वर्षे. २. विनविलें, प्रार्थिलें. ३. कपटगृह अशा.

मग अभय दिलें जें ज्यापरी आत्म[१]तातें
विधि सकळ हि सांगे तें स्वयें देवतातें. १७
"दशरथनृपगेहीं जन्म घेवूनि तूर्ण
करिल मनुजरूपें साधुलोकेष्ट पूर्ण.
प्लवगपतगऋक्षादि स्वयोनींत निर्मा
त्वरित हरिपदाच्या स्वप्रजा दास्यधर्मा. १८
प्रथम चि ममजृंभोत्पन्न भूभृत्[२]सदक्ष
गुरुतरतनु आहे जांबवान्नाम ऋक्ष,
रविशतमखवीर्योद्भूत सुग्रीव वाळी
असति विभुसहाय प्रौढधी वीर्यशाळी. १९
सविधिकशुभपुत्रीयेष्टिकर्मावसानीं
पुरुष अनळकुंडीं ऊठला दीप्यमानीं.
दशरथनृपहस्तीं दे स्वयें पायसानें
सहित क[३]नकपात्री पुत्रलाभार्थ मानें. २०
'तव युवति नरेंद्रा! पायसप्राशनानें
प्रसवतिल सुतांतें, जे सुखांचीं निधानें.'
वरवितरण पृ[४]थ्वीजानिला अप्रजाला
करुनि पुरुष तेथें गुप्त तो क्षिप्र जाला. २१
करि यु[५]गल विभाग क्ष्मापती पायसाचे
[६]अभिलषितफलेच्छापूरकोपाय साचे.
प्रथम निजकरानें ज्येष्ठदारेंशि अर्पी,
तदुपरि तनयेला केकयाच्या हि तर्पी. २२
युवतियुगळ केलें पायसानें कृतार्थ,
परि नृप तिसरीचें जन्म मानी अपा[७]र्थ;
मग पतिहृदयज्ञा स्वात्मभागार्धदानें

१. विष्णूनें. २. पर्वतासारखा. ३. येथें 'पात्र' शब्द स्त्रीलिंगी आहे. ४. पृथ्वीपति दशरथाला. ५. दोन. ६. 'विभाग' याचें विशेषण. ७. व्यर्थ.

सुखविति बहु दोघी त्या सुमित्रेसि मानें. २३
सकळ मुनि नृपानें तर्पिले अन्नपानें,
मग वि[1]धृतपदानें दीधलीं [2]कामदानें.
सुखउनि बहु मानें त्यक्तसर्वाभिमानें
निजवसतिस यानें प्रेषिले सुप्रियानें. २४

(शा. वि.) होतां गर्भवती तिघी हि युवती रामा सुखें फावती,
पीडा [3]मालवती, सुरेंद्र लवती, हर्षे स्तवूं धांवती.
जाल्या तुष्टमती प्रजा, प्रशमती संताप, विश्रामती
स्वस्वांतीं सुकृती मुनीश्वर कृती स्फारप्रसन्नाकृती. २५

सर्गः ४

## सर्ग पांचवा

(इंद्रवंशा)

सेवा प्रभूची सुखदा घडावया, रात्रिंचराचें कुळ [4]उपडावया,
गोपुच्छऋक्षप्लवगादियोनिज देवादिकांहीं सुत निर्मिले निज. १
ताराख्य जाला गुरुचा स्वनंदन, द्रव्याधिपाचा[5] सुत गंधमादन,
वज्रांग विद्वन्मणि विष्टपायुचा[6] बळी हनूमंत तनूज वायुचा. २
विख्यात मैंदद्विविदाभिधाधर स्ववैद्यसूनू[7] बळसिंधु सुंदर,
नीळाख्य वह्न्यात्मजनी[8] महाबळ शिल्पीं कृती भौम न देहभू[9] नळ. ३
पर्जन्य निर्मी शरभा बळाकरा, ज्याला सुषेणा जळनाथ[10] दुर्धरा,
सारे स्वताताधिकसद्गुणालय देवारिवंशक्षयदक्ष निर्भय. ४
सिद्धर्षिविद्याधरयक्षचारणगंधर्वताक्ष्योरगदेवतागण
उत्पादिती वानरऋक्षयोनिजा पद्मोद्भवाज्ञेकरुनि प्रजा निजा. ५
ऐसे असंख्यात वनेचराकृती[11] उत्पादिले पुत्र बळी महाकृती.

---

१. सिंहासनाधिष्ठितानें. २. इच्छित दानें. ३. नाहींशा होतात. ४. उपटून टाकण्यासाठीं. ५. कुबेराचा. ६. भुवनाचें जीवन च अशा. ७. अश्विनी-कुमार. ८. अग्निपुत्र. ९. जो कारागिरांत कर्तृत्ववान असा भौम (भूमीवरकि) न (तर स्वर्गीय) [अशा] विश्वकर्म्याचा पुत्र. १०. वरुण. ११. पश्वाकृति.

कर्में जयांचीं इतरांशि दुष्करें ब्रह्मांड ही उंचलणार जे करें. ६
केला तिहीं वास सुखें स्थळस्थळीं गंगातटीं हेमनगादिकाचळीं,
सुग्रीववाळ्यादि समीप राहती, रक्षोजनाचा वधमार्ग पाहती. ७
(मंदाक्रांता) काळे नीळे [1]हरित धवळे [2]कर्बुरारक्तवर्ण
देहच्छायेकरुनि किति ते लाजवीती सुवर्ण.
भूभृत्तुल्याकृति रणकृती [3]पक्षिनाथातिगामी,
वीर्यें तेजें भरुनि उरले सर्व [4]विध्यंडधामीं. ८

सर्गः ५

## सर्ग सहावा

(शालिनी)

[5]अंतर्वत्नी त्या तिघी भूपजाया जाल्या, आर्धीं दोहदें पांडुकाया;
दानीं त्राणीं पूजनीं मात्र गोडी, अन्नीं पानीं भाषणीं प्रीति थोडी. १
देहीं कांहीं फार [6]भूषा न साहे, सूक्ष्मश्वेतीं [7]अंशुकीं प्रीति राहे.
मुक्तामाळा चंदनालेप अंगीं माने, गोडी सत्कथांच्या प्रसंगीं. २
जाली त्यांच्या अद्भुता दीप्ति देहीं, होती सारे दीप [8]विच्छाय गेहीं.
भूपाळस्त्री यद्यपि स्वल्पभूषा तेजस्तोमें जिंकिती [9]चंद्रपूषां. ३
दीनत्राणीं पूर्णकारुण्यमूर्ति देती जेणें अर्थिवांच्छाप्रपूर्ति.
त्या राजस्त्री गर्भभारालसा ही जाणों सज्जा उद्धराया धरा ही. ४
प्रीत्युत्कर्षें जैं [10]परामर्शकाजा जाय स्त्रीच्या नित्य गेहासि राजा,
तेव्हां प्रत्युत्थान देतां निवारी, हस्ताधारें ऊठतां यत्न भारी. ५
राजा चित्तीं [11]वीटिकाद्वंद्वदानीं स्त्रीहस्तातें फार आयास मानी;
गर्भस्थूळें सूक्ष्म वस्त्रांत पोटें पाहे, लाहे भूपती सौख्य मोटें. ६
जों जों होती गर्भसंस्थूल पोटें तों तों भूपाच्या मनीं सौख्य मोटें.
आनंदाची वृद्धि गर्भापरीस राजस्वांतीं जाहली रात्रिदीस. ७

---

१. हिरवे. २. चित्रविचित्र रंगाचे व तांबडे. ३. गरुडापेक्षां शीघ्रगामी. ४. ब्रह्मांडांत. ५. गरोदर. ६. अलंकार. ७. पातळ आणि शुभ्र वस्त्राचे ठायीं. ८ निस्तेज. ९. चंद्रसूर्यांला. १०. समाचार घेण्यासाठीं. ११. तांबूलदानीं.

त्रैलोक्याचा नाथ आनंदसद्में[1] अस्मत्सार[2] प्राशिल स्वास्यपद्में,
जाणों ऐश्या या सुखानें सुतुष्ट जालें त्यांचें फार वक्षोज पुष्ट. ८
ऐशा साध्वी भूपपत्नी अहो ! त्या अंतर्वत्नी वर्षपर्यंत होत्या;
आला त्यांचा जेधवां सूतिकाल, नाचे हर्षे दिग्रथ क्षोणिपाळ. ९

(शा. वि.) उच्चस्थग्रहपंचकीं सशशिकीं[3] जीवीं[4] वसंतीं सितीं[5]
श्रीचैत्रीं नवमीदिनीं दिनकरीं मेषाख्यराशिस्थितीं
लग्नीं कर्कटकीं पुनर्वसुयुतीं मध्याह्नकालांतरीं
कौसल्या प्रसवे त्रिलोकपतिला दाशरथाच्या[6] घरीं. १०
रक्ताब्जच्छददीर्घनेत्र[7] जलदश्यामांग नीलालक
पीनाजानुभुज[8] प्रसन्नवदनश्री जन्मला बालक.
कंबुग्रीव[9] विशाळवत्स सुशिरा गंभीरनाभिह्रद
सर्वस्तुत्यसुलक्षणालयतनू त्रैलोक्यमोदप्रद. ११

(स्रग्धरा) पुष्यर्क्षीं मीनलग्नीं प्रसवलि तनया केकयाधीशकन्या,
आश्लेषर्क्षीं कुलीरीं[10] तनुजयुगळ ते श्रीसुमित्रा सुधन्या.
केली सर्वांरमाहीं प्रमुदितहृदयें तेधवां पुष्पवृष्टी,
सद्वाद्यें वाजवीलीं, अनुपम घडली सृष्टिला तुष्टिपुष्टि. १२

(शा. वि.) वाहे मारुत शीत मंद सुरभी, आनंदवी सज्जना;
त्या[11] तोयांबुनिधींत[11] साधु करिती सन्मज्जनोन्मज्जना.
बंदी मागध सूत वर्णिति यशें, वाद्यें तदा वाजती,
वेश्या नाचति, तोरणें प्रतिगृहीं नैकध्वजा साजती. १३
गाती मंजुळ सुस्वर[12] श्रुतिसुखें गीतें कृती गायनें[13],
जाती भूपतिमंदिराप्रति पुरस्त्रीलोक सोपायन[14];

---

१. 'स्वास्यपद्में' याचें विशेषण. २. आमचें दूध. ३. चंद्रयुक्त. ४. गुरुवारीं. ५. शुक्लपक्षांत. ६. दशरथाच्या. ७. रक्तकमळाच्या पाकळीप्रमाणें विस्तृत नेत्र आहेत ज्याचे असा. ८. पुष्ट व गुडघ्यापर्यंत लांब आहेत भुज ज्याचे तो. ९. शंखाप्रमाणें ग्रीवा (मान) ज्याची. १०. कर्कलग्नीं. ११. त्या (पुत्रजन्मरूप) आनंदसागरांत. १२. हस्तदोष—सुस्वर. १३. गायक. १४. नजराण्यासहित.

क्षमा ती होय सुरालयापरिस ही आनंदशोभायन.[1]
ख्याती काय नभीं अमर्त्य सुख तें जें विष्टपीं माय नें[2] ? १४
पुत्रास्यामृतपानतृप्तनयनें तुच्छीकृतस्वःसुखें[3]
सुत्रामसखें[4] प्रसन्नकमलावासाब्जराजन्मुखें.[5]
गोस्वर्णांबररत्नवाजिकारिभूदानें विचिंतादरें[6]
अर्थी ब्राह्मण सर्व ही नृपवरें सत्कारिले सादरें. १५
सारे चंदनसिक्त मार्ग, विलसत्सालंकृत स्त्रीनर,
वारे वाहति शीत मंद सुरभी चित्तप्रमोदाकर.
साकेताख्यपुरीं त्रिलोकपतिला सेवावया निश्चयें
ठाके येउनि देवनाथनगरीसंपत्तिशोभा स्वयें. १६
ठेवी 'राम' असे चि नाम सुखद ज्येष्ठात्मजा भूपती,
कैकेयीतनयाप्रती 'भरत' हे आख्या करी सन्मती.
आह्मा 'लक्ष्मण' हे सुलक्षणपणें स्थापी सुमित्रासुता,
शत्रुघ्नाख्य कनिष्ठ, दिव्य अभिधा या सर्वलोकस्तुता. १७
हर्षें द्वादश वासर क्रमुनियां श्रीमद्वसिष्ठोदितें
मार्गें पितृसुरर्षि[8] तर्पुनि असीं नामें[7] जगद्वंदितें
पुत्रांचीं सुखदायकें दशरथें जीं ठेविलीं, आजुनीं
लोकीं पुष्कळ सेविलीं परि न तीं जालीं कृशें वा जुनीं. १८

सर्गः ६

## सर्ग सातवा

(वंशस्थेंद्रवंशोपजातयः)

धरूनियां रूपचतुष्टयाप्रती लीलामनुष्याकृति तो रमापती
भूभारनाशार्थ करूनियां पण जाला जगत्पालक बाळ आपण. १

---

१. आनंद व शोभा यांचें स्थान. २. मावत नाहीं. ३. तुच्छ मानिलें आहे स्वर्गसुख ज्यानें. ४. इंद्राचा सखा दशरथ त्यानें. ५. प्रसन्न जी कमला—लक्ष्मी तिच्या निवासानें शोभत आहे मुख ज्याचें. ६. विगत आहे चिंता आणि भीति ज्याची त्यानें. ७. नांव. ८. पितर, देव व ऋषि.

पीतां स्तनातें क्षणमात्र राहणें, महादरें मातृमुखासि पाहणें,
वक्त्रांत तें दुग्ध तसें चि वाहणें, तेणें चि फूत्कार करूनि नाहणें! २
मुखांतुनीं दुग्ध गळे सुनिर्मळ, उरावरी ये अति शुभ्र वोगळ;
मंदाकिनीचा गगनीं प्रवाह तो, चंद्रप्रभापांडुर काय वाहतो! ३
पीयूषगर्वापहमाधुरीधरा त्रैलोक्यतापांतकरा सुखाकरा
निजाननें श्रीश रमामनोरमा चुंबी पदा दीनजनावनक्षमा. ४
रमाधराचा रस सेविला असे पद्मालया आपण भांमिषें वसे,
म्हणोनियां रम्यतरा महासुखा पाहोनि चुंबी नखदर्पणीं मुखा. ५
बैसोनि हर्षें जननीचिया कडे, विलोकुनी तन्मुखनीरजाकडे,
स्मितामृतापूरित बोल बोबडे बोले, तदा ब्रह्मसुख स्वयें दडे! ६
रमाकुचाग्रीं पद जे विराजती, करांशि ज्या कल्पतरू हि लाजती,
सदा तिहीं जेथ यथेष्ट रांगणें, केलें जनीं दुष्कर पुण्य आंगणें. ७
अत्यंतशुद्धस्फटिकालयांतरीं क्रीडा करी राम जधीं परोपरी,
नानासुतप्राप्तिसुखासि मावली विलोकुनी तत्प्रतिबिंब पावली. ८
स्वनंदनातें प्रतिबिंबमंडलीं धौतामळस्फाटिकमंदिरस्थळीं
माता न जाणे बहु शोधितां श्रमें, परंतु पावे सुख ती अशा भ्रमें. ९
धात्री जईं रामकरांबुजाप्रती धरूनियां चालविती स्खलद्गति
चुंबी धरा तीं प्रभुपादनीरजें, अलभ्य ज्यांचीं दिविषज्जनीं रजें. १०
पित्यापुढें रत्नविराजिकंकणें करें नमस्कार करूनि ठाकणें,
धाञ्युक्त सारें निजवृत्त सांगणें, अशा गुणें तो करि नाक ठेंगणें. ११
आर्थी जयांनें उपदेशिला विधी, नानाश्रुतींचा बहु खोल जो निधी,

---

१. हा व यापुढचे बरे च श्लोक हीं स्वभावोक्ति अलंकाराचीं अत्यंत मनोहर उदाहरणें आहेत. २. अमृताच्या गर्वाला हरण करणारी जी माधुरी तिला धारण करणारा. ३. लक्ष्मी. ४. कांतीच्या मिषानें. ५. बाल्यावस्थेंत मुलें पायाच्या आंगठा चोखतात त्यावर कवि अशी उत्प्रेक्षा करितात कीं, कांतिरूपानें रामाच्या नखांत वास करित असलेल्या लक्ष्मीचें च राम मुखचुंबन घेत आहे! ६. दाई. ७. देवांमध्यें. ८. उभें राहणें. ९. स्वर्ग. १०. ज्या मुखानें.

अशा निपीता[1]ब्धिसुताधरें मुखें नृपाळें[2]तांबूल निषेवणें सुखें[*]. १२
भूपापरी सर्व हि तो सभाजन याचें करी नित्य सुखें सभाजन[3];
विलोकितां मर्त्यकृता[4]वतारका न लोचनीं हालति पक्ष्मतारका. १३
आला चतुर्वर्ग[5] नृपालयीं स्वयें चतुःकुमारात्ममिषें चि निश्चयें,
तुला नसे भूपतिच्या सुखाप्रती, स्तवी सदा यास[6] मुखें दिवस्पती[7]. १४
रामासवें लक्ष्मण सर्वदा वसे, शत्रुघ्न तो ही भरताश्रयीं असे.
पूर्वीं[8] विभागक्रम जाहले जसे, द्वंद्वें सुखें वर्तति बंधु ते तसे. १५
छाया तनूची तनुला न सोडी, त्या बंधुची एक तसी च जोडी;
परस्परीं त्यांसि अपार गोडी, त्या मित्रभावा उपमा चि थोडी. १६

सर्गः ७

## सर्ग आठवा

(इंद्रवज्रा)

राजा कुमारोपनयोत्सवाला[9] पाहोनियां फार मनीं निवाला;
सर्वांस विद्या सकळा हि हृद्या आल्या अयत्नें परमानवद्या[10]. १
ज्येष्ठापचायी[11] विनयप्रधान, सत्यक्षमाधार दयानिधान,
विद्यानिधी पंडित लोकमान्य, सारे कृती पूतमती वदान्य. २
सर्वांहुनीं साधुगुणाभिरामीं[12] पृथ्वीपतिप्रीति अपार रामीं.
तो ही महात्मा सुपथानुरक्त दे तोष चित्ता गुरुपादभक्त. ३
ज्या रंजवील्या अतिमात्रकाळें सर्व प्रजा कामदभूमिपाळें[13],
त्या दिग्रथाहूनि सदैव रामा गाती मनोहारिगुणाभिरामा. ४
(शा. वि.) ऐसा पुत्रसुखामृतार्णवमहामीन प्रसन्नाकृती
साकेताख्यपुरीं सुखेंकरुनियां होता धरेचा पती.

---

१. सेवन केला आहे लक्ष्मीचा अधर ज्यानें त्या मुखानें. २. दशरथाच्या तोंडचा विडा. ३. प्रशंसन. ४. मर्त्यलोकीं केला आहे अवतार ज्यानें. ५. धर्मार्थकामरूप. ६. या सुखास. ७. इंद्र. ८. यज्ञीयपायसग्रहणमर्यां. ९. मुलांच्या मुंजीच्या समारंभाला. १०. अत्यंत निर्दोष. ११. वडील माणसाना मान देणारे. १२. सद्गुणानीं सुंदर अशा. १३. इच्छित देणाऱ्या. * लेखनप्रमाद—मुखें.

तों तेथें सकलक्ष्माभुरशिरोभृंगाब्जपादद्वय
विश्वामित्र मुनींद्र पुण्यजलधी आला सुकीर्त्याश्रय. ५

सर्गः ८

## सर्ग नववा

(उपेंद्रवज्रा)

नरेंद्र त्याची करुनी सपर्या म्हणे, 'अजी सर्वतपस्विवर्या!
भवत्पदाहीं मज धन्य केलें, समस्त ही पाप लयासि नेलें. १
तुजें सुरालभ्य गृहासि येणें, कृतार्थ केलें भुवनांत येणें.
निषेवितां त्वत्पदभासुधा[2] मीं असें निराकांक्ष सुरेंद्रधामीं. २
तुज्या पदें निर्जितकल्पवृक्षें भवोग्रतापप्रशमैकदक्षें
हृताब्धिजावाससरोजगर्वें[3] दिलीं सुरालभ्य सुखें हि सर्वें[4]. ३
अवाप्तकामा![5] श्रुतिकेलिधामा! पवित्रसत्कीर्तिगुणाभिरामा!
तवांघ्रिसेवा सुकृतें चि लाधे, जिणें चतुर्वर्ग सुखें चि साधे. ४
भवाब्धिमग्नाखिल उद्धराया तुला तनूधारण विप्रराया!
स्पृहा मनीं आणिक लेश नाहीं, विमुक्त तूं संसृतिवासनाहीं[6]. ५
(पुष्पि.) हयगजभूस्वतनुकळत्रपुत्रवित्तें सकळ तुजें, वदत असें प्रसन्नचित्तें;
अभिमत जें निजहृदया असेल कांहीं ग्रहण करीं, तवचरणा अदेय नाहीं.

सर्गः ९

## सर्ग दहावा

(उपजातिः)

असी नृपाची परिसूनि वाचा आत्मा सुखावे बहु ब्राह्मवाचा[7];
पावोनियां हर्ष अपार डोले तो पुण्यकीर्ति द्विजराज बोले: १
'राया! तुजी हे प्रिय सत्य वाणी गमे सुधांभोनिधिवीचिवाणी[8].

१. सर्व ब्राह्मणांच्या मस्तकरूपी भृंगाला कमलरूपी आहे पदद्वय ज्याचें तो. २. तुझी पदकांतिरूपी सुधा. ३. हरण केला आहे लक्ष्मीच्या निवासभूत कमळांचा गर्व ज्यांनीं. ४. सर्व सुखें ५. संपूर्ण आहे इच्छा ज्याची. ६. संसारविषयक वासनांपासून. ७. ब्राह्मणाचा (विश्वामित्राचा). ८. लाटेसारखी.

ऐशी च सूर्यान्वयराजचर्या[1] मी जाणतों सर्व हि भूपवर्या! २
पलाश मारीचसुबाहुनाम सुदुर्मती केवळ पापधाम,
पर्वांत[2] आणूनि चमू विशाला माजी सदा दूषिति पर्णशाला. ३
विण्मूत्ररक्तास्थिवसांत्रमाला[3] वर्षोनियां दूषिति आश्रमाला.
सदा हि विघ्नें करिताति होमीं, जालों असें पीडित फार हो! मीं. ४
सभा ऋषींची बहु खिन्न होती, हंसी जसी काकगणीं अहो! ती.
खळांशि शापूनि करीन रक्षा, राया! करितों परि पुण्यरक्षा[4]. ५
ध्वंसावया राक्षसलोकमाया असे तप द्वेषिबळें दमाया[5];
परंतु पुण्यक्षय होय राया! याकारणें[6] मात्र नये कराया[6]. ६
म्हणोनियां सानुज राम देणें, द्विजातिसंरक्षणपुण्य घेणें;
असे महात्मा तव पुत्र साधू सत्कीर्तिजाया स्वबळें चि साधू. ७
प्राणापरी रक्षिन यास, कांहीं माझ्या कृपेनें भय लेश नाहीं.
आणील हा साधुनि कीर्तिबाळा, प्रहर्ष देईल तुला नृपाळा! ८
असह्य इंद्रास हि जे प्रतापी मोटे बळी दानव दैत्य पापी,
आर्द्रा धरा तद्रुधिरप्रवाहें तुवां हि केली, कळतें जिवा हें[7]. ९
ऐशीं तुझीं ख्यात जनांत कर्मं, प्रजा सभद्रा[8] करुनि स्वधर्मं
जालासि वृद्ध, स्वकुमारहस्तें परंतु कार्यें करवीं समस्तें. १०
समाप्तिला नेउनियां स्वयज्ञा कुमार देईन तुजे नयज्ञा!
प्रेमा तुजा ज्यापरि नित्य रामीं, करीन तैसा चि धरावरा! मीं. ११
शौर्यक्षमौदार्यगुणाभिरामा! वीरेश्वरा! दैत्यचमूविरामा!
जशा तुला वर्णिति देवरामा, तशा चि गाऊत सदा हि रामा. १२
असो सदा वांच्छितकामसिद्धी, नांदो तुजा नित्य गृहांत ऋद्धी;
सुकीर्तिला ब्रह्मसभा वदो, घे यशासि, दे लक्ष्मण राम दोघे. १३

---

१. सूर्यवंशीय राजांची वागणूक. २. अमावास्येच्या पर्वकाळीं. ३. विष्ठा, मूत्र, रक्त, अस्थि, वसा (चर्बी) व आंतड्यांची माळा. ४. रक्षण. ५. दमन करण्याला. ६. खोडलेला पाठ—**म्हणोनि चित्तीं न धरीं कराया.** ७. हें आमच्या जिवाला कळतें. ८. कल्याणयुक्त.

स्वत्कीर्तिला पूर्णशशांक लाजो, क्षयें कळंकें बहु आंकला[1] जो.
यमालयाला रिपुलोक पाहो, सुखी यशस्वी विजयी नृपा! हो.' १४
(गाथा) मुनिचें असें विमल वाक्य नृपतिमन सर्व तापवी,
जंभमथनकमुक्त[2] जसें सकळायुधप्रवर पर्वता पवी. १५

सर्गः १०

## सर्ग अकरावा

(मणिमालावृत्त)

नरराज म्हणे, 'दयानिधाना! कळलें सर्व मला मुनिप्रधाना!
यजनीं रजनीचरोत्थ[3] बाधा मम हस्तें शमवूनि कार्य[4] साधा. १
निजकार्य निवेदिलें कराया जरि नेतोसि वनासि लेंकरा या,
तरि नेउनियां मला चि आधीं क्रतुविध्वंसकनाशकार्मे साधीं. २
करिती अमरांस ही दमाया समरीं राक्षस फार दुष्ट माया;
सुकुमार कुमार अप्रबुद्ध प्रबळीं[5] बाळ कसें करील युद्ध? ३
वय केवळ अल्प, युद्ध कांहीं नयनाहीं अवलोकिलें हि नाहीं;
समरास मरावया न याला, मज ने, बोल न लाविजे नयाला. ४
अमरांस हि दुःसह प्रतापी नरमांसाशन ते महोग्र पापी
करितील मुलांसि फार कष्टी, प्रभु! नेतोस कशास अंधयष्टी? ५
रजनीचरनाथ पंक्तितुंड[6] त्रिजगत्पीडक पापरूप पुंड,
घडतां कलि[7] तो त्रिकूटराजा[8] क्षणमात्रें चि करील घात माजा. ६
श्रमलों अनपत्यताविषादें; बहु काळें तुमच्या पदप्रसादें
मजला सुत चार मात्र जाले, परि ते कष्ट न आजुनीं विजाले. ७
वदतों मुनिनायका! खरा मीं, परमप्रेम जसें सदैव रामीं,
समदृष्टि करूनि पाहतों कीं, परि ते प्रीति नसे चि अन्यतोकीं. ८
पडतां लवमात्र रामदृष्टी मज होती[9] अयुतामृताब्दवृष्टी,[10]

---

१. दूषित झाला. २. इंद्रानें सोडलेले. ३. राक्षसांपासून उत्पन्न झालेली बाधा. ४. खोडलेला पाठ—कार्य. ५. प्रबळ राक्षसांबरोबर. ६. दशमुख रावण. ७. तंटा. ८. रावण. ९. खोडलेला पाठ—मज होय सुधा. १०. हजारों अमृतमेघांच्या वृष्टि.

क्षण एक न पाहतां अहो! तें मन वेडें बहु घाबरें चि होतें. ९
भवदंघ्रिरजोभिषिक्तमस्तें सुसुखें स्यां अवलोकिलीं समस्तें.
प्रवयाप्रति पुत्रशर्मभोग द्विजवर्या! घडतां नसो वियोग. १०

(तनुमध्याद्विरावृत्तावृत्त)

विप्राप्रति सामें सन्नंदन मोहें जोडूनि करातें प्रार्थी नृप तो हें,
'देहास हि देता दाता कवि शूर द्यावा सुत कैसा प्राणाहुनि दूर?' ११

मणिमालेयं सर्गः ११

## सर्ग बारावा

(हरिगीतिकावृत्त)

वाणी अशी ऐकोनियां तो गाधिज क्रोधाप्रती
आणी मनीं, तापे तदा [2]और्वें जसा स्रोतः[3]पती.
[4]वंध्या स्पृहा केली सुतस्नेहें जधीं [5]भूवासवें
[6]संध्यासपत्नीशी दिसे त्याची तनू दृष्टीसवें. १
'राया! तुजी पुत्रावरी माया असे भारी खरी,
सर्वस्वदानोच्चारणें कां बद्ध केली वैखरी?
सूर्यान्वयीं तूजी च ही सत्यप्रतिज्ञा पाहिली!
अद्यापि मीं नाहीं कधीं ऐशी अवज्ञा साहिली. २
जो काम तो जाला नृपा! हो कामना तूजी तरी;
तोकासि तूं देवूं नको, धोका नसो चित्तांतरीं.
लोकांतिंदा थांच्या अशी शोकावहा नोहे बरी,
[8]ओकाशि जातों; कां करूं [9]स्तोकामुळें धी घाबरी? ३
राया! भला केला बरा सत्कार तूं साधू खरा,
जालों कृतार्थ, क्षमावरा! आतां सुखें जातों घरा.
पुत्रासवें पाळीं धरा, धाको [10]नको दिक्कंधरा,
विप्रावनीं चिंता जरा पीडा नसे विश्वंभरा.' ४

---

१. म्हाताऱ्याला. २. वडवानलानें. ३. समुद्र. ४. विफल. ५. दशरथानें. ६. संध्यारागासारखी (आरक्त). ७. याचना. ८. गृहासि. ९. क्षुल्लक कारणानें. १०. भिऊं नको.

(गाथा)

मुनिवर कोपतां कंप पावे मही बहु भय लाधलें वज्रभृध्धाम ही;
क्षितिसुरमंडली होउनि व्याकुळा 'कुशळ असो' म्हणे 'दिग्रथाच्या कुळा.' ५

क्षमोऽयं (?) सर्गः १२

## सर्ग तेरावा

(प्रमिताक्षरा)

नरनायकाप्रति वसिष्ठ म्हणे, 'नृपते! वदान्यजनमौलिमणे!
अवमानिला न समजोन मुनी, सुत दे महर्षिचरणें नमुनी. १
मुनि हा श्रुतिस्मृतितपोंबुनिधी करणार सृष्टि दुसरा चि विधी.
जगदुद्भवस्थितिलयीं निपुण, त्रिदशेंद्रवंद्य सुरगीतगुण. २
तव भाग्य थोर म्हणवूनि असा ऋषि पातला तव गृहा सहसा.
निजपुत्र दे, भय धरीं न मनीं, न करीं विलंब मुनिच्या गमनीं. ३
स्वतपोबळें चि तवपुत्रकरें शमवील राक्षसबळें प्रखरें.
गगनापगेंदुहरहासनिभ[2] यश तूज देइल सुरासुलभ. ४
तनयास चापनिगमाब्जरवी[3] सकळास्त्रतत्व शिकवील कवी;
मुनिचा प्रसादलव ही भुवनीं विजयी करील समजें स्वमनीं. ५
न धरीं मनांत भय लेश नृपा! तुजहूनि हा करिल फार कृपा;
तनुजार्पण द्विजकरीं विहित स्वमतें किजे तरणिवंशहित. ६

(प्रभा)

रविकुळहित तें करावें च मीं म्हणउनि कथितों, न हो तूं भ्रमी;
त्वरित तनुज दे मुनीच्या करीं, उशिर दशरथा! न आतां करीं.' ७

सर्गः १३

## सर्ग चवदावा

(स्वागता)

श्रीवसिष्ठवचनें मुनिकाजा आणवी तनुज सत्वर राजा.

---

१. इंद्रगृह (स्वर्ग). २. भागीरथी व शंकरहास्य यांच्यासारखें शुभ्र. (हा एक कविसंकेत आहे). ३. धनुर्वेदरूपी सूर्याला विकासित करणारा रवि.

रामलक्ष्मण सभेप्रति आले, देखतां जन मनांत निवाले. १
रत्नकुंडलविराजितकर्ण पद्मनेत्र नववारिद्वर्ण
सस्मितानन सुधाकर राम हस्तिबालगति ये सुखधाम. २
सभ्यनेत्रकुमुदोत्सवकारी रामचंद्र जनताप निवारी,
तोषवी दशरथाक्षिचकोरा, वृद्धि दे मुनिसुखाब्धिसि थोरा[1]. ३
रामचंद्रउदयीं शशिकांतसन्मुनि द्रवति निर्मळ शांत,
सेउनि स्मितसुधारस धाले सज्जनौषधिसमूह[2] निवाले. ४
राघवें गुरुजन स्वकराहीं वंदिले भुवनभद्रकराहीं;
पोटिशीं धरुनि गाधिज याला 'पाव संतत' म्हणे 'विजयाला'. ५
बाष्पगद्गद वदे नृप, 'रामा! सज्जनप्रियगुणा! सुखधामा!
कौशिकांघ्रियुगदास्य कराया लक्ष्मणासहित जा रघुराया! ६
जाणतोसि गुरुभक्ति कराया, सांगणें तुज नको रघुराया!
सर्वथा करुनियां पदसेवा, तोषवीं गुणनिधे! क्षितिदेवा[3]. ७
आमचें परमदैवत रामा! ब्राह्मणांघ्रि पुरवी बहु कामा.
हे चि जंगम सुरद्रुम साचे, याहुनी गुण उणे परिसाचे. ८
राघवा! मजपरीस कृपा हा विप्रनायक करील चि पाहा.
कौशिकांघ्रि चुरितां निजहातें, त्या सुखें विसरशील गृहातें. ९
इष्टमित्रजननीजनकांहीं जें सुता! न दिधलें सुख कांहीं,
तें यथेष्ट तुज देइल साचें, काम हें पारि नसें अलसाचें. १०
आत्मतेज मुनि हा तुजमाजी ठेउनी मथिल राक्षसराजी[4],
चंद्रमंडळिं जसा स्वकराशी स्थापुनी रवि निशातम नाशी. ११
सुप्रसन्न मुनिनायक राहो, सर्वदा जय तुज्या स्वकरा हो,
दिव्यकीर्तिवनिता मणिमाळा त्वद्गळीं प्रविलसो मम बाळा! १२
सानुजास तुज विघ्न न बाधो, त्वत्करें मुनिपदार्चन साधो,

१. मोठी. २. सज्जन ह्या च विविध वनस्पति. (चंद्रकिरणाच्या अमृतवृष्टीनें ओषधि सतेज होतात म्हणून चंद्राला 'ओषधीश' अशी संज्ञा हि आहे). ३. ब्रह्मर्षि विश्वामित्राला. ४. राक्षसमंडळी.

दे पुनस्त्वरित दर्शन, यज्ञा रक्ष, जा गुरुसवें विनयज्ञा!' १३

(शा. वि.) ऐसा बोध करूनि कौशिककरीं श्रीराम भूपें[1] दिला,
आशीर्वाद सुरेंद्रदुर्लभ तदा विप्रें हि भूजानिला.
ज्याच्या पादरज:कणांशि सतत ब्रह्मेश[2] ही वांछिती,
तो सर्वेश्वर गाधिजानुग[3]. मुखें तद्भाग्य वर्णूं किती? १४

सर्गः १४

## सर्ग पंधरावा

(आख्यानकी)

घेऊनियां सानुज राम हर्षी निघे पुरापासुनि तो महर्षी,
चर्मी[4] निषंगी[5] कवची कृपाणी सुखें[6] चि जाती शरचापपाणी. १
जातां वना लक्ष्मणरामयुक्त द्विजेंद्र तो संसृतिपाशमुक्त,
स्वर्गापवर्गी स्वसुखें चि अंगें गमे मुनीच्या फिरताति मार्गे. २
किंवा तपोनिष्ठजनांतरांया[7] हरूनियां भक्त समुद्धराया,
घेऊनियां स्कंदगजाननांशी महेश जातो मुनिकाननांशि. ३
कीं घेउनी विष्णुमहेंद्र संगें तपोनिधी कश्यप विप्र अंगें
जातो वनाला सुकृतैकराशी तपस्विसत्कार करावयाशी. ४
या पादचारें[8] श्रम लेंकराशी नसो असें तो करुणेकराशी
आणूनि चित्तीं मग शीघ्र रामा समीप बाहे सुगुणाभिरामा. ५
'मार्गी असावें सुखरूप साधो! क्षुधा तृषा तूज कदा न बाधो;
देतों शिशो! यास्तव दोन विद्या तपोधिगम्या[9] परमानवद्या[10].' ६
बोलोनि ऐसें विधिनें बला ही दिली, दुजी ती अतिपूर्विका[11] ही;
तों हर्षला सानुज राम वाटे, सुधारसप्राशनसें चि वाटे. ७
मार्गी कथा वेदपुराणसारा[12] कथूनि नाशी श्रमभार सारा.

---

१. भूपतीला. २. ब्रह्मदेव व शंकर. ३. विश्वामित्राच्या मागून जाणारा. ४. ढाल घेतलेला. ५. भाते ज्याच्याजवळ आहेत असा. ६. स्वतः ७. अंतराया—विघ्नाला. ८. पायीं चालण्यानें. ९. तपानें च साध्य अशी. १०. अत्यंत निर्दोष. ११. आतिबळा. १२. वेदपुराणांच्या सारभूत.

थोडी च चित्ताप्रति वाट वाटे, गुरूक्तिनें हर्ष मनांत दाटे. ८
रामासमेत त्रिदशापगेला महामुनी तो उतरोनि गेला,
तों ताटका जेथ सदैव वागे, महाभयस्थान अरण्य लागे. ९
त्या ताटकेच्या भवना वनाला विलोकुनी तो भुवनावनाला[1]
सांगे मुनी, "या गहनांत रामा! असे पलाशी नरमांसकामा. १०
हे ताटकानाम कृतांतदूती[2] अनेकहिंसाकलुषप्रसू[3] ती,
आहार जी खेचरभूचरानीं[4] करीतसे नित्य हि या च रानीं. ११
हे कामरूपा अतिपापपात्री भयप्रदात्री[5] जशि काळरात्री.
दृग्गोचरप्राणिसमूह खाती, तुज्या, वधार्हा चि शिलीमुखा[6] ती. १२
येतां चि ते त्वां स्वशरें वधावी, धरा तिचें सेउनि रक्त धावी.
आतां चि येऊनि धरील वाटे, असें चि माझ्या हृदयास वाटे. १३
'स्त्री ही अवध्या' अशि तूं विपंका[7]! नको चि आणूं स्वमनांत शंका.
मारावया योग्य चि आततायी, नसे तयाचा वध दोषदायी." १४
ऐशी गुरूची परिसूनि वाणी, 'बरें' म्हणे कार्मुकबाणपाणी.
चापीं गुणाला रघुवीर जोडी, जया गुरूच्या वचनीं च गोडी. १५
रामें टणत्कार वनांत केला, कळे धनुर्ज्याध्वनि ताटकेला;
तों धावली वासुनियां मुखा ती, दिसे जणों सर्व जनास खाती. १६
कांपे धरारण्यनगादि सारें महाट्टशब्दें[8] चरणप्रहारें,
चावे करारां बहु उग्र दाढा करींद्रसंचर्वणकर्मगाढा[9]. १७
नेत्रें जसे केवळ खोल आड, यमालयाचें मुख तें कवाड!
नासाबिळें विंध्यदरीसमानें, पयोद माथां शिखरिभ्रमानें[10]. १८

---

१. जगद्रक्षक रामाला. २. यमाची सेविका च. ३. अनेक हिंसारूप पातकाना जन्म देणारी. ४. देव व मनुष्य यानीं. ५. भीतीला विशेष देणारी. ६. बाणाला. ७. निर्दोष रामा! ८. मोठमोठ्यानें ओरडण्यानें. ९. गजेंद्राला चावावयाच्या कामांत गढून गेलेल्या. १०. पयोद शिखरिभ्रमानें माथां [ वसति ]. मेघ पर्वत च समजून तिच्या मस्तकावर रहात.

मेदोवसाशोणितपंकलिप्ता[1] पयोदवर्णा[2] परमावलिप्ता,[3]
दुर्गंधिची केवळ काय माय, वनांत त्या दुःसह तो न माय. १९
व्याघ्री कुरंगाशि जशी च पाहे, तशी च रामाप्रति निःकृपा हे.
आली सुघोराकृति जेंवि कृत्या करावया राघवनाशकृत्या. २०
तेव्हां महादुःसहसायकानें उरःस्थळीं श्रीरघुनायकानें
भेदूनियां कुंठितशक्ति केली, गुहक्षतक्रौंचतुळेशि[4] नेली. २१
भेदूनि हृत्पंकजकोश सारा, शिलीमुख प्राशुनि जीव सारा
गेला, तदा देह तिचा गळाला. करी सकंप क्षितिच्या तळाला. २२
मारूनियां यापरि ताटकेला, क्षणांत तो निर्भय वाट केला;
आनंद जाला मुनिसत्तमाशीं, दिल्या सुखें पुष्कळ उत्तमाशीः २३
'वत्सा! सुहृन्मानसपक्षिनीडा![6] निवारिली त्वां मुनिवृंदपीडा.
सर्वांसुहृद्दंडनदक्षबाहो! सदा असा तूं विजयी च बा! हो.' २४
बोलोनि ऐसें मुनिवृंदपाळ रहस्यमंत्रासह अस्त्रजाळ
दे राघवाला विधियुक्त सर्व हरावया राक्षसलोकगर्व. २५

(कुसुमितलतावेल्लिताछंदः)

त्या श्रीरामाचा सुगुणनिधिचा मारितां ताटकेला
विश्वामित्रानें प्रमुदितमनें फार सत्कार केला.
बाधा लोकांची हरुनि सकळा सर्व ही ते द्विजाती
सांद्रानंदानें भरित हृदयें तेथुनी शीघ्र जाती. २६

सर्गः १५

## सर्ग सोळावा

(अथ विपरीताख्यानकी)

मुनींद्र तो नेउनि राघवास कामाश्रमामाजि[7] करी निवास.
महेशदृक्पावकदग्धमार वृत्तांत सांगे, सुखवी कुमार. १

१. चरबी आणि रक्त यांच्या चिखलानें भरलेली. २. काळी. ३. अतिगर्विष्ठ. ४. कार्तिकस्वामीनें फोडलेल्या क्रौंचपर्वताच्या स्थितीला. ५. यज्ञमंडप. ६. मित्रांचें अंतःकरण हा च पक्षी त्याचें घरटें च अशा! ७. मदनाश्रमांत.

निघोनि तेथूनि मुनींद्र पावे सिद्धाश्रमा, तों मुनिवृंद धावे.
करी सपर्या रघुनायकाची भक्तेष्ट*कामाप्तिविधायकाची. २
विलोकुनी आश्रम राम हर्षे, '[1]दीक्षेशि घे आज' म्हणे 'महर्षे!
तवांघ्रिचा सेवक अंतराया वारील, कीजे मख संतराया! ३
प्रसाद केला तव पादुकांहीं, नाहीं मला राक्षसभीति कांहीं.
करूं खळांचा बळनाश दावे, दीक्षेशि तूं स्वस्थमनें गुरो! घे.' ४
अशी सदुक्ती परिसोनि कानें आरंभिला तो मख कौशिकानें,
उभे चि केले रघुवीर दारीं त्या मंडपाच्या शरचापधारी. ५
अशांत मारीचसुबाहुसेना आली, जिणें सूर्य नभीं दिसेना.
तदा करीती खळ पापदृष्टी [2]विण्मूत्रपूयक्षतजास्थिवृष्टी. ६
ऋषी समस्त स्वमनांत भीती पाहोनि सेना गगनीं उभी ती.
रघूत्तमाला म्हणती, 'निवारीं रक्षोधमातें [3]खरबाणवारीं.' ७
म्हणे प्रभू, 'सर्व भय त्यजावें, जावें सुखें, स्वस्थमनें यजावें;
भवत्प्रसादें चि पळांत अस्ता पावेल हे दुष्टचमू समस्ता.' ८
वदोनि ऐसें करि सज्ज चापा, दावी [4]निशाचारिं बळी प्रतापा.
[5]मुनींद्रयज्ञघ्नपलाशकाळ सोडी महादारुणबाणजाळ. ९
जसा रवि स्वांशुगणें तमातें मर्दी, शराहीं असुराधमातें.
सुबाहु मारीच खळप्रधान तों कोपले केवळ [6]यातुधान. १०
रघूत्तमासी मग अप्रबुद्ध कोपें करीती बहुतीव्र युद्ध.
सुबाहुला [7]अग्निमयाशुगानें मारी क्षणें [8]द्वेषिजनांतगानें. ११
क्षणांत मारीचनिशाचराला एका शरें लोकभयंकराला
चतुःशत क्रोश समुद्र दूर त्यामाजि टाकी रघुराज शूर. १२
रघूद्वहाच्या खरबाणजालें रात्रिंचरांचें बळ भग्न जालें,

---

१. यज्ञदीक्षेला. २. विष्ठा, मूत्र, पू, रक्त आणि हाडें यांची वृष्टि. ३. तीक्ष्ण बाणांच्या समुदायानें. ४. राक्षसांचे ठिकाणीं. ५. विश्वामित्राच्या यज्ञाचा नाश करणाऱ्या राक्षसांचा काळ [राम]. ६. राक्षस. ७. अग्निस्वरूपी बाणानें. ८. शत्रुवर्गाचा नाश करणाऱ्या. * भक्तकामपूर्तिकर अशा.

दिगंतरीं [सर्व] भयें पळालें, रामाशि मोटें यश तें मिळालें. १३
द्विजाधिराजा कृतकृत्य जाला, पूजी स्वयें पंक्तिरथात्मजाला;
सुखें समालिंगुनियां जेयाशी अर्पी यथेष्टा रघुराज याशी. १४
'असो तुजें नित्य यश प्रवृद्ध, गावूत सर्वामर विप्र वृद्ध,
भुजा निजाश्रावनकर्मदक्षा वाढोत वीर्यें हतशत्रुपक्षा! १५
सुतांप्रती तात जसा कृपाळु लोकांशि तूजा भुज नित्य पाळु;
असो द्विषज्जीवनगर्वकाळ दोर्दंडवीर्योदय सर्वकाळ. १६
दिवाकराच्या स्वकुळांत राजे होणार, जाले रघुशेखरा! जे,
तयांत तूं जेंवि ग्रहांत भानु, ऋक्षीं शशी, पर्वतिं रत्नसानु. १७
सुरादिकांचीं तुजिया चि हस्तें होवूत कार्यें सफळें समस्तें.
सुधेशि गंगेशि सदा विसावा स्वत्कीर्तिनें पूतगुणा! असावा.' १८
(सालसा) कुशिकतनुज यज्ञबाधाविनाशें मनीं हर्षला,
सकळभुवनदुर्लभाशीःसुधा यापरी वर्षला.
दशरथसुत राहिले विप्रसेवासुखें आश्रमीं,
मुनि निजहृदयीं म्हणे, 'जाहलों धन्य सर्वत्र मीं.' १९

सर्गः १६

## सर्ग सतरावा

(कुटिलगतिः)

मुनिवर एकदां राघवाला म्हणे, 'रविकुलभूषणा! वीरचूडामणे!
मज जनकें मखप्रेक्षणा बाहिलें, म्हणउनि कर्म तें पाहिजे पाहिलें. १
परमपवित्र तो भूप माजा सखा, मज न दिसे दुजा सुज्ञ त्यासारिखा.
सुकृतफळें सदा ईश्वरीं अर्पितो, अभिमतदानमानें जना तर्पितो. २
रघुपति! तूं हि ये, आस कीं भूप हा; जनकमखक्रियाकौतुकातें पहा.
नरवरमंडळी तेथ आली असे, म्हणुनि विलोकिजे कोण राजे कसे. ३

---

१. विश्वामित्र. २. जयप्राप्तिकारक आशीर्वाद. ३. शत्रूंचें जीवित आणि गर्व खाना काळभूत. ४. बाहुवीर्यांचा उदय. सोडलेला पाठ—स्वदोःप्रतापोदय. ५. मेरुपर्वत. ६. विश्वामित्राच्या सेवेच्या सुखानें.

स्मरहरचाप आहे तयाच्या घरीं, करिल तयास जो सज्ज, त्याच्या करीं
निजतनया समर्पीन मीं आपण, असुकर फार केला असे हा पण. ४
तवजनकाप्त तो मान्य योगी कृती करिल तुजी स्वयें आदरें सत्कृती.
तरि उठ, हें जरी मानलें मानसा शुभगुणराजहंसांचिया मानसा!' ५
परिसुनि वाक्य हें राम भावें नमी, बहु विनयें म्हणे, 'त्वपदाधीन मी.
सुखकुतुकावहा मुख्य सेवा तुजी हृदभिमतप्रदा दासजीवातु जी. ६
रघुपतिचें असें बोलणें ऐकुनीं बहु सुख पावला मानसीं तो मुनी;
दशरथपुत्र ते घेउनीयां सवें द्विजजनयुक्त तैं जाय चित्तोत्सवें. ७
अमरनदीतटीं प्राणिशून्याश्रमा निरखुनियां म्हणे राम विप्रोत्तमा,
'रुचिरलताद्रुमव्याप्त ऐसें स्थळ फळजळपूर्ण हो शून्य कां केवळ?' ८
द्विजपति तो म्हणे, "सर्ववीरेश्वरा! ममहृदयप्रिय प्रश्न केला बरा.
तुज कथितों कथा, ऐक, ती सर्वथा परिहरि गौतमस्त्रीवियोगव्यथा. ९
शतधृतिची सुता श्रीअहिल्यासती, मुनिस दिली स्वयें गौतमाख्यास ती.
विमलतपोनिधी या पवित्राश्रमी युवतिसमेत होता महासंयमी. १०
मुनि नसतां गृहीं तत्स्वरूपें छळें रतिसुखलंपटें देवनाथें खळें
विधितनया सती भोगिली, तत्क्षणी निजसदनास ये तो द्विजांचा मणी. ११
भय धरुनि मनीं इंद्र रूपांतरें करुनि पळे, तदा ज्ञानियांच्या वरें
वळखुनि शापिला कीं, 'सहस्रें भगें तनुशि पडोत या पातकें दुर्भगें.' १२
बहुत चि कोप आला तपोराशिला, युवतिसि ही म्हणे, 'हो सुदुष्टे! शिला.
मजहुनि वाटला इंद्र तूतें बरा, तव मन वीटलें वैन्यवल्कांबरा.' १३
विधितनया म्हणे, 'त्वत्स्वरूपच्छळें हृदयपते! मला दूषिलें त्या खळें.
करुनि विचार हें ज्ञाननेत्रें पहा, परपुरुषीं नसे किंकरीची स्पृहा. १४
करुनि कृपा प्रभो! वारिजे शाप हा, मुनिजननायका! सर्वपापापहा!
सकरुणलोचनें किंकरीला पहा, नकळत पावल्यें व्यर्थ संताप हा.' १५

१. तुझ्या पित्याचा मित्र. २. शुभगुणरूपी राजहंसांच्या. ३. सुख व कौतुक यांला धारण करणारी. ४. दासाचें जीवनौषध च अशी. मूळ पाठ—कीर्तिची हेतु जी. ५. महादेवाची. ६. गौतमरूपाच्या कपटानें. ७. वनवासी व वल्कलधारी मला.

मग मुनि तो म्हणे, 'शाप नोहे वृथा; परि तुजला न हो प्रावभावीं[1] व्यथा.
दशरथपुत्र होईल राम स्वयें चरणरजें चि तारील तो निश्चयें. १६
करितिल तूजला प्रावभावीं श्रम म्हणउनियां असो प्राणिशून्याश्रम.
पुनरपि होइल प्राप्त मत्संगती, रघुपतिच्या पदें पावशी सद्गती.' १७
निजयुवतीस शापांत हा सांगुनी हिमगिरिलागि गेला तपाला मुनी;
विधितनया शिला या स्थळीं त्वत्पदा स्मरत असे सदा सर्वसौख्यप्रदा. १८
चरणरजें तिला उद्धरीं राघवा! निवर्वि रघूत्तमा! ताप तो आघवा[2].
चल तुज दावितों ती अहल्याशिळा, श्रम अवघा तिचा पाहिजे नाशिला.''
कथुनि कथा अशी दावितां ते शिला नमुनि दयार्णवें शाप तो नाशिला.
प्रभुपदरेणुनें स्वस्वरूपास[3] ती त्वरित चि पावली गौतमाची सती. २०
रघुपतिचीं पदें ती स्वमाथां धरी, तदुपरि भक्तिनें पूजनातें करी;
मुदितमनें स्तवी दुःखसंहारका भवजलराशिमज्जज्जगत्तारका[4]. २१
'जय! जगदीश्वरा! दीनबाधाहरा! रघुकुलशेखरा! कार्यमायानरा[5]!
त्रिभुवनपावना! भक्तलोकावना! नमन असो तुला सज्जनाच्या धना. २२
जय! जनमंगळा! पापदावानळा! सतत असो कळावृद्धि[6] या दोर्बळा.
तवपदपंकजें दीनरक्षापरें करुत मनांत या वास पीडाहरें. २३
तवपदपल्लवें जिंकिले स्वस्तरु, सतत अशी च हा लोकपीडा हरू.
त्रिभुवनमस्तकीं हा तुरासा वसो, क्षणभरि ही कदा याशि बाधा नसो. २४
भवभय वारिलें, संकटीं तारिलें, असुख विदारिलें, पाप संहारिलें,
तव चरणाशि उत्तीर्ण हे किंकरी नतिविण सांग होईल कोणेपरी? २५
शिवशिव! काय तें दुःख सांगों तुला, त्रिभुवनिं ही नसे ज्याशि कांहीं तुला.
तवपदरेणुनें तत्क्षणीं जाळिलें, मज जनकें सुतेतें तसें पाळिलें. २६
हरहर! या पदें धन्य हा वासर, बहु उपकार या पाददासीवर;
विसर नसो तुजा हा हि द्यावा वर, रघुपति! तूं चि लोकीं वदान्येश्वर.' २७

---

१. शिलारूपांत. २. संपूर्ण. ३. आपल्या मूळ अहल्यारूपास. ४. संसारसमुद्रांत बुडणाऱ्या विश्वाच्या उद्धारकाला. ५. कार्याकारितां मायेनें नर झालेला. ६. कलेकलेनें वृद्धि.

विधितनुजा स्तवी जों चि सर्वोत्तम, हिमगिरिपासुनी तेथ ये गौतम.
पुनरपि पूजिती वर्णिती दंपती, कलुष[1] भयें दिगंतीं तदा लंपती[2]. २८
पुसुनि तयांशि तो राम तेथूनि घे श्रुतिमय सद्द्विजाशी[3], स्वतोषें निघे;
कुशिकसुताशि आनंद तो नावरे, 'भवजलधींत बा! तूं' म्हणे 'नाव रे!' २९

(अथोपचित्र)

करुनी विमला मुनिची सती देवनदीप्रति सर्व हि जाती,
बहुतां दिवसीं मज भासती भेटलि जन्मदपज्जलजा[4] ती. ३०

सर्गः १७

## सर्ग अठरावा

(नवनंदिनी)

रघुनंदनासहित तो मिथिळेला द्विजवृंद घेउनि मुनीश्वर गेला;
कुशिकात्मजागमन ऐकुनि कानें सुख मानिलें बहु मनीं जनकानें. १
मग भूप तो सहपुरोहित आला, करि पूजुनी मुदित गाधिसुताला;
तव रामलक्ष्मण विलोकुनि हर्षे, 'मज हे' म्हणे 'कवण सांग महर्षे!' २
मुनि तो म्हणे, 'दशरथात्मज राया! निजयज्ञविघ्नकरनाश कराया
शिशु आणिले विशिखकार्मुकपाणी सकळप्रवीरमणि सद्गुणखाणी. ३
रघुवीर हा सकलसद्गुणधाम श्रुतिवेदपंडितशिरोमणि[5] राम;
दुसरा हि हा अनुज लक्ष्मण याचा, शुभलक्षणाढ्य निधि शौर्यनयाचा. ४
वधिली सुकेतुतनया अघरूपा[6], ममयज्ञविघ्नकर राक्षस भूपा!
मथिले, क्षणेंकरुनि गौतमजाया चरणें चि उद्धारिलि मैथिलराया! ५
त्रिपुरारिकार्मुकविलोकनकामें अवलोकिलें पुर तुजें रघुरामें,
कर शीघ्र बंधुसहरामसपर्या[7], कृतकृत्य हो सकळभूपतिवर्या!' ६
परिसोनि हें वचन मैथिल राजा स्वमनीं[8] म्हणे, 'निजसुखोदय माजा.'

---

१. पातक. २. लपतात. ३. उत्तम ब्राह्मणांचा आशीर्वाद. ४. जन्म देणारें असें जें पद त्यापासून निर्माण झालेलें जें जल त्यापासून उत्पन्न झालेली भागीरथी. ५. श्रुतीला वेद (जाणणारे) ते श्रुतिज्ञ, पंडित यांमध्यें अग्रेसर. ६. पापरूपिणी. ७. पूजा. ८. मूळ पाठ—हृदयीं.

हृदयीं धरी सुकृतपुंजफळाला[1], भवताप सर्व हि पळांत गळाला. ७
करि रामलक्ष्मणसभाजनें[2], हातें धरि शक्रदुर्लभपदांबुरुहातें;
वरि योगिचिंतितसुखप्रकरातें तरि[3] लागली भवनदांत करातें. ८
नृप आणवी शिवधनुर्व्रततीला[4], अवलोकिणार रघुसत्तम तीला,
भवचाप तें शर सहस्र भटाहीं[5] मग आणिलें बहु बळें सुभटाहीं. ९
नृपती म्हणे, 'मुनिवरा! जरि यातें रघुनाथ हा करिल सज्जित हातें,
तरि राघवाप्रति समर्पिन कन्या, कमला जशी हरिस तेपरि[6] धन्या.' १०
मिथिलेश यापरि जसा पण बोले, मुनि राघवाशि अवलोकुनि डोले.
गुरुच्या पदीं न करुनी उशिराला रघुवीर ठेवि विनयें स्वशिराला. ११
नमुनी शिरीं गुरुपदांबुरुहातें मग सांवरी परिकराप्रति[7] हातें,
उचलूनियां[8] शिवधनुर्व्रततीला करि सज्ज दाशरथि सुव्रत तीला. १२
करलाघवें मग सलील चि वोढी, अतिकोमलेक्षुसम[9] [10]तें धनु मोडी.
अशनिप्रपातशतरूप[11] कडाडे, ध्वनि तो समस्त भुवनांत गडाडे. १३
किति भूप वीर बहु विह्वळ जाले, कुतुकें समस्त सुर धांवत आले,
सुखहेतु मूर्ति अवलोकुनि दृष्टी करि-[ती] अमर्त्यसुमनोघनवृष्टी[12]. १४
भवचापभंग करितां जगदाद्यें सुर गाति, वाजविति सुस्वर वाद्यें.
तव उर्वशीप्रमुखनिर्जररामा[13] बहु रम्य नाचति सुखें अभिरामा[14]. १५
'जय रामचंद्र!' म्हणती मुनि राजे, तव त्या जयध्वनिस सागर लाजे.
मिथिलापुरी सुरपुरीहुनि साजे, प्रतिमंदिरीं प्रभुगुणस्तुति गाजे. १६
(स्रग्ध.) तातादेशें[15]करूनि प्रमुदितहृदया जानकी रत्नमाला
कंठीं घालूनि तेव्हां वरि अतिसुखदा सर्वलोकोत्तमाला.

---

१. रामचंद्राला. २. पूजन. ३. नौका. ४. धनुर्वल्लीला. ५. मोठे भयंकर अशा योद्ध्यानीं. (हा शब्द उद्भटशब्दसमानार्थक असावा). ६. तिच्यासारखी. ७. कंबरेला. ८. खोडलेला पाठ—**दिननाथवंशमणि सुव्रततीला उचली**. ९. अत्यंत कोवळ्या उसाप्रमाणें. १०. खोडलेला पाठ—**मुष्टिस**. ११. वज्रपाताच्या शंभर पटीनें कडकडाट झाला. १२. स्वर्गीय पुष्पांची दाट वृष्टि. १३. देवस्त्रिया. १४. सुंदर. १५. जनकाच्या आज्ञेनें.

जाला आनंद मोटा सकल हि भुवनीं, साधु संतुष्ट पुष्ट,
लंकानाथादिनक्तंचर खळ जळती मानसीं नष्ट दुष्ट. १७

* २५० सर्गः १८

## सर्ग एकोणविसावा

(वैतालीयं)

मैथिल राजा महामती धाडुनि पत्रें दिग्रथाप्रती
निजवृत्त समस्त जाणवी, सर्वांला लग्नासि आणवी. १

(ओपच्छंदासिकं)

पत्रें नेत्रें जसा विलोकी मानी भूपति जन्म धन्य लोकीं,
वैदेहाच्या पुराशि गेला, त्याणें आदर फार फार केला. २

(आपातलिका)

त्यानंतर त्या जनकानें भव्यदिनीं निगमोक्तविधानें
श्रीरामकरीं सुविनीता ते दिधली रुचिराकृति सीता. ३

(दाक्षिणांतिका)

निजौरसी अन्यदुर्मिळा नृपें दिली विध्युक्त ऊर्मिळा.
सुलक्षणा लक्ष्मणास ती वरी प्रमोदें सुंदरी सती. ४

(उदीच्यवृत्तिः)

कुशध्वजें मैथिलानुजें कैकेयीतनयास भूभुजें
दिली स्वयें मांडवी सुता ज्येष्ठा जी सुगुणा जनस्तुता. ५

(अथ प्राच्यवृत्तिः)

कन्या श्रुतकीर्ति दूसरी जीस या त्रिभुवनीं नसे सरी,
शत्रुघ्नकरीं सती भली ते मनांत सुख फार लाभली. ६

(प्रवृत्तकं) अनेक रत्नें मनोहरें जांवयांस दिधलीं धराबरें,
रैथाश्वपत्तीभवाहिनी अर्पिली रिपुमनोविदाहिनी. ७

---

* या ठिकाणीं कवीनें येथपर्यंतची ग्रंथसंख्या २५० दिली आहे. १. स्वतःची कन्या. २. जनकाच्या धाकट्या भावानें. ३. रथ, अश्व, पायदळ, घोडेस्वार व हत्ती एतद्रूप सेना. ४. शत्रूच्या मनाचा दाह करणारी.

(अपरांतिका)

तोषवूनि नृप सर्व जांवयां दे निरोप नगरासि जावया.

कौशिकादिमुनि सर्व तोषवी, वस्त्ररत्नकनकें विभूषवी. ८

(अथ चारुहासिनी)

अजात्मजें द्विप्रथें सुखें विलोकिलीं सत्स्नुषामुखें.

नृपात्मजा चारुहासिनी स्वपुत्रयोग्या विलासिनी. ९

(अमृतध्वनिवृत्त)

वैदेहभूपकृतसत्कार पंक्तिरथ सस्त्रीक पौर हि निवे,

पूजूनि कौशिकमुनीचें निजांघ्रियुग आज्ञा शिरीं नमुनि घे.

श्रीगाधिपुत्रपदविश्लेपदुःख रघुनाथासि विह्वळ करी,

तेव्हां द्विजेंद्र हृदयाब्जीं धरूनि हारि तापाशि त्या क्षडकरी. १०

सर्गः १९

## सर्ग विसावा

(अन्वळधृतिः)

जनकनृपतिस पुसुनि मग दशरथ सयुवतिसुतयुत धरि निजपुरपथ;

प्रकट दिसति तव अपशकुन सकळ, करिति अखिलजनहृदय बहु विकळ. १

(मात्रासमकं)

तों नंदन ये जमदग्नीचा कीं पुंज जसा ज्वलदग्नीचा,

तों पंक्तिरथ स्वमनीं धाके, जोडूनि करा विनयें ठाके. २

(विश्लोकः)

रामासि तो म्हणे, 'रे तोका! नाहीं च तुज कांहीं धोका.

मन्नाम मीरवीशी लोकीं, तें सोडवावया आलों कीं. ३

(वानवासिका)

जीर्णधनुर्भंगगर्व सोडीं, वैष्णवचापासि शीघ्र वोढीं.

सज्ज करायास यास वेणें, हें करुनीं बाहुयुद्ध देणें.' ४

---

१. येथें मुद्रालंकारानें वृत्तनाम सूचित केलें आहे. २. अयोध्येचा मार्ग.
३. मुला!

(म्लपक्षे) भार्गवोक्तिला पारिसुनि धीरें चाप सज्जिलें रघुकुलवीरें,
बाण जोडुनीं श्रुतिपथिं नेलें, मंडलाकृति त्वरित चि केलें. ५
(चित्रा) क्षत्रक्षयकर भृगुरामातें बोले रघुवर, 'कथिजे मातें,
लक्ष[1] त्वरिततर अमोघास[2] बाणास, न करु भुवनग्रास.' ६

(अथोपचित्रा)

जमदग्निसुत तदा हृतशक्ति प्रकटी सविनय तो बहु भक्ती.
परलोकगति शरण्य निवेदी, विशिखें मग तिजला प्रभु भेदी. ७
प्रभुका भृगुकुलवंशमणी आशीःसमेत दे तेजे[3] धणी;
पुजुनि विचारुनि तपोर्थगमना विपिनीं करी महाशांतमना. ८

मात्रासमकसर्गः २०

## सर्ग एकविसावा

(अथ शिखा)

भृगुकुलपतिपरिभव करुनि मुदित रघुवर करि निजपुरगमना,
स्तविति सुखित सकळ जन म्हणति 'जय अतुळबळजलधि! जय खळदमना!'

(अथ खजा)

मृदु शिशिर सुरभि पवन सुखवि जन, पुनरपि धरि निजरुचिस दिनमणी;
रघुकुलवरदशरथनृपतिनगर सुरपुरततिस[4] तृणसम गणी. २

(अथानंगक्रीडा) वाद्यध्वान व्योमीं गाजे,
साकेत स्वर्गासें साजे.
नटति युवतिगण, करिति किति तनन,
म्हणति अमरजन, 'सरस नरजनन.' ३

(अथ रुचिरा)

रघुवर दशरथ अमरकथितकथ[5] धरुनि सुनयपथ नुतसचिवसहित[6]

---

१. ज्यावर वेध करावयाचा तें स्थान. २. व्यर्थ न जाणाऱ्या. ३. वैष्णव तेज. ४. अमरावतींच्या समूहाला (शेंकडों अमरावतींना). ५. देवानीं ज्याच्या गोष्टी सांगितल्या आहेत असा म्हणजे देवानीं प्रशंसिलेला. ६. स्तविलेल्या सचिवासह.

सकळनृपमहित रिपुभयविरहित अनुदिन अवहित करि निजजनहित. ४

इति मात्रावृत्तप्रकरणसर्गः २१

इति श्रीमन्मयूरेश्वरविरचिते वृत्तरत्नमयरामायणे बाळकांडः १

---

# अयोध्याकांड

## सर्ग पहिला

(अथ प्रहर्षिणी)

साकेतीं दशरथ एकदा हितातें योजूनी नमुनि म्हणे पुरोहितातें,
'सर्वांच्या हृदयसुखार्थ राज्य रामीं द्यावें, हें तुज पुसतों मुनीश्वरा! मीं. १
श्रीरामाप्रति निजयौवराज्य देणें, होईल प्रमुदित सर्व लोक येणें,
या कर्मी मज तव संमति प्रधाना, यासाटीं तुज पुसतों तपोनिधाना! २
शत्रुघ्नासह भरतासि मातुलानें नेलेंसे जरि हि वरा कृपाकुळानें,
म्या वृद्धें परि शुभकार्य शीघ्र कीजे; सत्कर्मी उशिर न लाविती कृती जे. ३
संभार द्विजतिलका! यथोक्त जे कीं श्वःकाळीं करवि रघूत्तमाभिषेकीं.
साहित्य त्वदुदित जें सुमंत्र हा तें सारें ही करिल सुखें स्वकीयहातें. ४
हें माजें अभिमत तूं स्वयें चि रामा सांगावें निजवदनें गुणाभिरामा.
त्याला ही विहित असेल जे कराया ते आज्ञा कर वरदा! महर्षिराया!' ५
ऐशी हे दशरथभूमिनाथवाणी ऐके तो मुनि अमृताब्धिवीचिवाणी;
आनंदेंकरुनि म्हणे, 'भला भला हो! कीर्ति श्री तुजि भुवनांत निश्चला हो. ६
सर्वांचें प्रिय कारितोसि आज साधो! निर्विघ्नेंकरुनि तुजा स्वकाम साधो!
हें आहे विहित चि सत्पथा वयाला, जातों मीं रघुपतिका कथावयाला.' ७
भूपाशीं करुनि असा सुखें सुमंत्र संभारीं कुशळ नियोजिला सुमंत्र.
रामाच्या मग सदनासि तो रथानें गेला श्रीमुनि परमा मनोरथानें. ८
पूजांतीं रघुपतिला मुनी सुवृत्त संतोषेंकरुनि कथी समस्त वृत्त.

---

१. पूजित. २. सावधपणें. ३. मुख्य. ४. नेलें आहे. ५. साहित्य. ६. उदक. ७. तूं सांगितलेलें. ८. अमृतसमुद्राच्या लाटेप्रमाणें. ९. म्हातारपणाला. १०. चांगली मसलत. * खोडलेला पाठ—कर्म.

सांगोनि व्रत[1] अधिवासनप्रकार स्वस्थानाप्रति मग जाय लब्धसार[2]. ९
हें वृत्त श्रवण करूनि पौर सर्व आनंदें गणिति मनीं नभाशि खर्वं[3];
साकेतीं उभविति तोरणें पताका, हासे ते पुरवर दिव्यकांति नाका[4]. १०
कौसल्या निजहृदयीं म्हणे, 'नृपाचा गौरीशा! कर हृदयाभिलाष साचा.'
अन्या ही दशरथकामिनी सुसाध्वी ही वार्ता परिसुनि वांछिती न माध्वी[5].
हे वार्ता परिसुनि मंथराख्य चेटी दुःखार्ते धरि बहु पापबुद्धिपेटी,
हें सांगे सकळ युधाजितस्वसेला[6], तों ते दे[7] तिस मणिहार चीर सेला. १२
कैकेयीप्रति मग मंथरा वदे ती, 'स्वोत्कर्षीं उचित सभाग्य लोक देती,
तूं दुःखीं सुख तुमजोनि मानितीस, हा मोह प्रकट दिसे तुजा मतीस. १३
कौसल्यातनयकराशि राज्य जातें, चित्ताला सुख गमतें कसें तुज्या तें?
तूं पुत्रासह सवतीचिया पदासी सेवावें अनुदिन जेंवि दीन दासी. १४
भाग्याची त्रिभुवनिं कोसलेंद्रकन्या, राज्यार्ह प्रसवलि पुत्ररत्न धन्या;
निर्भाग्या तुजसम या जनांत नाहीं, बाळाचें कुशळ न साधिलें चि कांहीं.
रामाचे सुतसुत योग्य राज्यभागा, त्वत्कुक्षिप्रभवकुळा नसे चि जागा.
होतो कीं भरत चि दासताविभागी[8], अद्यापि स्वमनिं कशी न होशि जागी?
यासाठीं निजतनयाशि राज्य साधीं; बांधावा जळ नसतां चि सेतु आधीं.
यत्नानें झडकरि हा हरीं अपाय; निश्चिंत स्थिरमति बैसलीस काय? १७
पूर्वी जें त्रिदशवरें[9] नृपाशि नेलें, दैत्यांचें मथन जधीं रणांत केलें,
त्या काळीं पतिवर तूं महोपकार केला, तैं वर सुख पावला अपार. १८
जें केलें वरयुग द्यावयास मागें, तें शब्दीं धरुनि पतीस आज मागें.
एकानें रघुपति हा वनास आधीं धाडावा, मग इतरें स्वराज्य साधीं. १९
जावा हा रिपु चवदा समां[10] वनाशी, त्या स्थानीं फळेंदळकंदजीवनाशी[11].
तों तूजा सुत नृप बद्धमूलतेला पावेल क्षितिवरि रक्षितां प्रजेला. २०

---

१. यौवराज्याभिषेकाचें व्रत व तदुद्देशक विधान यांचा पद्धति. २. मिळविलें आहे ब्रह्मज्ञान ज्यानें. ३. लहान. ४. स्वर्गा. ५. मधुर मद्यविशेष. ६. कैकेयीला. ७. रामाभिषेकाची आनंदवार्ता कळविली म्हणून. ८. सेवेचा विभागी. ९. इंद्रानें. १०. वर्षें. ११. फळें, झाडपाला, कंद व उदक यांचें सेवन करणारा [होवो].

आला ही मग जरि राम या स्थळाला कैंचें हें नृपपद लभ्य दुर्बळाला?
ऐसें तूं कर, शिर शीघ्र कोपगेहीं; सद्भूषा वसन नको धरूं स्वदेहीं.' २१

(पंचचामर) ?

पारिसुनि असि मंथरोक्त दुष्ट बुद्धि ती म्हणे, 'सये!
निजहित कथिलें यथोक्त हें न कां स्वमानसास ये ?
सकळ हि नय जाणतीस, भासतीस तूं सरस्वती;
ममसुत नृप जाहल्यावरी करीन फार सत्कृति. २२
नृपतियुवति सार फार किंकरीमतासि ते दिनी
गणुनि हृदयीं मानि मूढबुद्धि साधिली च मेदिनी.
त्यजुनि वसन भूषण स्वयें स्वरत्नहार तोडुनी
क्षितिवरि निजली मुखावरूनि केशभार सोडुनी. २३

सर्गः २

## सर्ग दुसरा

(अश्वगतिः)

केकयजासदनाप्रति ये रघुवंशमणी,
तों न दिसे, मग दासजनास पुसे रमणी.
कोपगृहीं निजली कथितां मानें भीति धरी,
स्पर्श करूनि करें नृप यापरि सांत्व करीः १
'कां निजलीस अनास्तृतभूमिवरी रमणी!?
लोळति कां विरहव्यथितापरि हारमणी?
कां त्यजिलें तनुनें निजभूषण सांग मला,
हा तव वेष मना बहुदुःखदसा गमला. २
केशकलाप मुखेंदुवरी सखि! कां सुटला?
नूतनमौक्तिकहारसमूह कसा तुटला?

१. क्रोधागारांत. (क्रोध आल्याचें दर्शविणाऱ्या विशिष्ट स्थळीं). २. दशरथ. ३. जिच्यावर कांहीं आंथरलें नाहीं अशा जमिनीवर. ४. कंठ्यांतील रत्नें.

राहुनिगीर्णशशिभ्रमविह्वळ हा भगण
उत्तरला समरार्थ चि सोडुनियां गगन ! ३
तूं मममानसतापविनाशकळानिपुणा,
सर्व वधूंत हि तूं हृदयंगमशुद्धगुणा,
आपण भोगुनि देशि मला सखि ! खेद दुणा,
आज चि कां दिसतो सुभगे ! तव भाव उणा ? ४
बंध्य हि मुक्त करीन तुझ्या वचनें सुदती !
वध्य हि मी न वधीन; मनःप्रिय हो वदती.
दुःखित दीन नसे चि अथापि करीन सुखी,
वांछित सांग कुरंगविलोचनि ! चंद्रमुखी ! ५
त्वत्प्रिय तन्वि ! करीन, अशक्य अकार्य नसे;
हें लटिकें म्हणशी तरि राघवआण असे.
पंकजनेत्रि ! विशंक वदें, उठ, चुंबन दे;
ऊरुगति ! स्तननिर्जितपर्वतभिद्द्विरदे !' ६
(पं.) ऐशी ऐकोनियां वाणी नेत्रांतें ऊघडी राणी,
वाटे मनास नीरोषा, पावला भूपती तोषा. ७

सर्गः २

## सर्ग तिसरा

(भ्रमरविलसितं)

कैकेयी ते नरपतिस वदे 'पूर्वींचें तें वरयुग मज दे,
ऐकें राज्यीं मम सुत बसणें, अन्यें रानीं रघुपति वसणें. १

१. राहूनें निगीर्ण (गिळलेला) असा जो शशीविषयीं झालेला भ्रम त्यानें विह्वल झालेला नक्षत्रसमूह. (क्रोधराहूनें मुखचंद्र गिळला अशा भीतीनें त्रुटित मुक्ताहाराच्या विखरलेल्या मुक्तारूप नक्षत्रें त्या राहूशीं लढण्याला आकाशांतून खालीं उतरलीं आहेत कीं काय अशी उत्प्रेक्षा). २. बंधनीय. ३. बोलणारी. ४. प्रशस्त गति जिची अशी. ५. स्तनानें जिंकला आहे पर्वताला भेदणारा (अत्यंत मस्त) हत्ती जिनें. ६. क्रोधरहिता. ७. हस्तदोष—ऐकें.

चौदा वर्षें वनवसति करू, वन्याहारें[1] निजतनुशि धरू.
वल्कें वेष्टू सकलवपुकटी,[2] होऊ राम त्वारिततर जटी. २
राज्यस्थानीं भरत नृपवरें त्वां स्थापावा मग इतर वरें.
हें दे मातें, कर वचन खरें; सत्याहूनि त्रिभुवनिं न बरें. ३
कांताराातें[3] त्यजुनि पुर जरी श्वः[4] प्रस्थाना रघुपति न करी,
होतां इच्छा सकळ विफळ ही; मीं प्राणातें न धरिन पळ ही.' ४

(तनुमध्या)

चित्तेच्छित सांगे, ऐसा वर मागे; स्वार्थी बहु सज्जा जाली गतलज्जा. ५

सर्गः ३

## सर्ग चवथा

(सारंगवृत्त)

हें ऐकतां भूपती पावला ताप, तीतें म्हणे, 'काय तूं बोलशी पाप?
कां चित्त ऐसें कठोर प्रिये! आज जालें अमर्याद सोडूनियां लाज? १
पूर्वीं सदा आत्मसेवाविंतंद्रास[6] वर्णीत होतीस तूं रामचंद्रास,
कैकेयि! तो आज जाला कसा त्याज्य? कां मानिलें त्याहुनि श्रेष्ठसें राज्य? २
हा काम दुःखाग्निला जाहला आज्य; कां राम कांते! तुला वाटला त्याज्य?
होईल याणें जनीं दुर्यश प्राज्य, टाकूं नको पुत्र, वे सर्व ही राज्य. ३
कैकेयि! या बाळकानें तुजा काय केला असा उग्रदंडार्ह अन्याय?
दोषाविणें धाडिशी कां अरण्यास सद्वृत्तपात्रास माज्या हिरण्यास. ४
ज्येष्ठापचायी सुविद्य क्षमाशील हा टाकितां तूं जनीं निंद्य होशील;
दाता कृती शूर सत्कीर्ति निर्दोष ऐश्या स्वपुत्रीं बरा काय हा रोष? ५
जाले प्रयासें मला पुत्र हे चार, सर्वांहुनी राम हा आवडे फार;
याच्या वियोगें चि जातील हे प्राण, हें सांगतों आण वाहून मी जाण. ६
दे राज्य पुत्रास, राहो घरीं राम; स्वाधीन जें सांगशी आणशी काम.

---

१. खोडलेला पाठ–वन्यें वृत्तिप्रति सतत करू. २. सर्व शरीर व कंबर. ३. वनाला. ४. उद्यां. ५. खोडलेला पाठ–जे तूं. ६. आपल्या (उभयतांच्या) सेवेविषयीं तत्पर अशा रामास. ७. सोन्या बाळाला. ८. वडिलांची आराधना करणारा.

वृद्धासि देवूं नको पुत्रविश्लेष, या जीवना क्लेश शोषील निःशेष. ७
कोणीं सुबुद्धीस केला तुज्या भेद? होईल अंतीं तुला ही प्रिये! खेद.
चित्तांत आधीं विचारीं बरें फार, लोकीं करावा न दुष्कीर्तिविस्तार. ८
तूं धाडिशी काननीं रामरायास वैधव्यकामें पतीला मरायास॥
एकात्मजा ती कशी दुःख साहील? कोणाचिया वक्त्रचंद्रास पाहील? ९
मुक्तावतंसें चि जो भागतो फार, वाहेल कैसा शिरीं तो जटाभार?
वल्कें शरीरीं कसीं बाळ सोशील? तो वेष पाहोनि तूं खिन्न होशील. १०
जाया वनाला मला योग्य हा काळ, राहोनि गेहीं कसा पाठऊं बाळ?
वाजीकरिस्यंदना योग्य ते पाय संचार रानीं करीती कसे? हाय! ११
प्रासादयोग्यास पर्णालयीं वास हें दुःख मोटें रघूत्तंसजीवास.
मिष्टान्न ही अल्प मात्राग्रहें धन्य जो सेवितो त्यास मानें कसें वन्य? १२
सामंतभूपाळविद्वत्कृतक्रीड त्याला कसें श्वापदीं काननीं नीड?
कैकेयि! तूं त्यागिली सर्वथा भीड, जालें तुजें चित्त कां निष्कृपव्रीड? १३
शय्या तृणाची, नसे काननीं तल्प, पावेल निद्रेविणें खेद अस्वल्प.
केला असे हें न जाणोनि संकल्प तो टाक, होऊं न देणें प्रजाकल्प. १४
आरंभिलें तें चि भासे जरी गोड, मातें हि रामासवें काननीं सोड.
केले चि आहेत हे सिद्ध संभार; दे राज्य पुत्रास, घे सर्व भूभार. १५
द्विःसप्त वर्षें तुला वाटती अल्प, माझ्या मतें सर्व ही ते महाकल्प.
चौदा पळें ही वियोग प्रिये! फार, धाडूं नको राम मज्जीवनाधार. १६
साध्वि! प्रसादोन्मुखी हो,' असें राय बोले, रडे, होय अत्यंत विच्छाय;
टाकी तनू जेथ होते तिचे पाय, याहूनियां काय तेथें महोपाय? १७
ते निर्दया केकयाची सुता यास कोपें म्हणे, 'कां करीशी वृथायास?
आतां चि कीं वाहिली सूनुची आण? उच्चारिलें जें मुखें तें मनीं आण. १८
या पुत्रलोभें प्रतिज्ञाव्रतत्याग कां रूचला? हा यशाला तुज्या डाग.

---

१. प्राणाला. २. मोत्याच्या दागिन्यानीं. ३. श्रम पावतो. ४. मांडलिक राज व विद्वान यांबरोबर केली आहे क्रीडा ज्यानें. ५. घरटें (राहण्याला स्थळ). ६. बिछाना. ७. अत्यंत. ८. प्रजेचा नाश. ९. ब्रह्मदेवाचा शतवर्षात्मक काळ.

सत्यांशि[1] ज्यांच्यामुळें होतसे भंग त्यांशीं न साधू करीती कधीं संग? १९
सत्यांशि रक्षीं, पहा आपला प्रांत, तूं या अवस्थेंत होऊं नको भ्रांत.
येणें चि होईल अंतीं अधःपात, यामाजि आहे तुजा सर्वथा घात. २०
प्रातर्वनाला[3] न गेला जरी राम, माजा न हा पूर्ण होतां मनःकाम,
उद्बंधनें[4] कीं विषप्राशनें प्राण सोडीन ही तूं प्रतिज्ञा खरी जाण.' २१
ऐकोनियां हें वधूचें अभिप्रेत जाला महाराज तेव्हां जसा प्रेत!
गेली युगाहूनि ही रात्रि ती थोर, तीहूनियां काळ त्याला नसे घोर. २२
(पणव) दे तें सत्य सुख इहामुत्र[5], तैसा चि प्रिय सुमती पुत्र.
त्या दोघांत नृप महाभाग कोणाचा तरि करिल त्याग. २३

सर्गः ४

## सर्ग पांचवा

(भुजंगप्रयातं)

पुरामाजि आनंद मोटा सकाळीं, प्रजा मग्न जाल्या सुखाच्या सुकाळीं.
रघूत्तंसराज्याभिषेकोत्सवासी विलोकावया सिद्ध साकेतवासी[6]. १
वसिष्ठोक्त संभार ते सिद्ध जाले, नृपद्वारदेशीं द्विजस्तोम[7] आले.
गुढ्यातोरणांहीं पुरी फार साजे, तदानैकवाद्यस्वनें व्योम गाजे. २
मुनी पौर कित्तेक सामंत राजे जयांच्या स्वतेजें नभीं सूर्य लाजे,
रथेभाश्व[8] शृंगारिले द्वारदेशीं, वसिष्ठाचिया सिद्ध सारे निदेशीं. ३
स्वयें सर्व पौरांगना बाळ वृद्ध करीती सुखें तें महाद्वार रुद्ध.
विलोकावया राम विप्रादि सारे समुत्कंठित, स्वस्थ कोणी न थांरे[9]. ४
विलंबासह[10]ब्राह्मणादिप्रजेला गमे भूपती तो सुखानें निजेला.
सुमंत्रास ते प्रार्थिती मंजुवाणी[11] महोत्कंठितस्वांत[12] जोडूनि पाणीः ५
'न कां ऊठला आज अद्यापि राजा, पहाया सुमंत्रा! प्रधानेश्वरा! जा.

---

१. ही षष्ठ्यर्थी चतुर्थी आहे. २. मरणसीमा. ३. सकाळीं वनाला. ४. फांस लावून घेऊन. ५. इहपरलोकीं. ६. अयोध्येचे नागरिक लोक. ७. ब्राह्मणसमूह. ८. रथ, हत्ती व घोडे. ९. राहे. १०. विलंब सहन न करणाऱ्या. ११. गोड बोलणारा. १२. राज्याभिषेकोत्सवाविषयीं उत्कंठित अंतःकरण ज्यांचें.

स्वयें यौवराज्याभिषिक्तप्रभूतें विलोकूनि धावूं[1] प्रमोदें[2] प्रभूतें[2].' ६
असें ऐकुनीयां सुमंत्र प्रधान प्रवेशे यथानीति तो सावधान.
नमस्कार केला नृपाच्या पदासी, महाखिन्न ज्या मंदिरीं दासदासी. ७
नृपाच्या मुखाब्जाशि तो खिन्न पाहे, म्हणे, 'काय चिंता धरापाळका हे?'
पुसे केकयाच्या सुतेलागि वृत्त 'अहो! कां श्रमी आज राजा सुवृत्त?' ८
म्हणे ते सुमंत्रासि, 'रात्रौ सुतातें मनीं चिंतितां आत्मसेवारतातें
प्रभूला नसे लागली नीज कांहीं, म्हणोनी दिसे आज अस्वस्थ पाहीं. ९
मनीं काम रामाशि देखावयाचा, करीं तूं सुमंत्रा! स्वयें पूर्ण याचा.
त्वरेनें तयालागि जाऊनि आणीं,' असें बोलिली त्या प्रधानाशि राणी. १०
म्हणे तो सुमंत्र, 'स्वयें राजराजें[3] कथावें असे कार्य पृथ्वीवरा जें.
समीपस्थदासासि आज्ञा कराया अनौचित्य कांहीं नसे लोकराया. ११
स्वदासासवें मौनमुद्रेशि आज धरूनी असें खिन्न कां राजराज?
सुधास्पर्धि[4] वाणी निषेवीन आधीं, असे कार्यसंसिद्धि नाथप्रसादीं.' १२
नराधीश तेव्हां वदे सज्जवाचा,[5] 'मला दर्शनानंद दे राघवाचा.
सुमंत्रा! त्वरें आणि जा सुंदराशी रथीं वाहुनी मन्मनोमंदिराशी.[6]' १३
असें ऐकुनीं जोडुनीयां स्वपाणी सुमंत्र स्वयें रामचंद्राशि आणी;
नमी जानकीजानि येऊनि राया, उठे भूप पुत्राशि पोटीं धराया. १४
पडे मध्यदेशीं च दुःखाब्धिमग्न, महावृक्ष[7] जैसा वनीं वातभग्न.
'सख्या! वासरा! दे मला शीघ्र खेंव[8]' असें बोलुनी तो उठे मर्त्यदेव. १५
'अहाहा!' असें बोलुनीं रामराजा म्हणे, 'पावला मोह कां तात माजा?'
समालिंगुनीयां निजांकीं च तो वे, करीती महाखेद ते बंधु दोघे.[9] १६
विलोकूनियां मूर्च्छित क्ष्मावराशी तदा सर्व राजांगना दास दासी
करीति स्वबाष्पोदकें आर्द्र भूतें, मनीं पावलीं दुःख संपूर्ण भूतें.[10] १७

---

१. स्तुति करूं. २. पुष्कळ आनंदानें. ३. दशरथानें. ४. अमृताची स्पर्धा करणारी. ५. बोलण्याविषयीं तयार झालेला. ६. माझ्या मनाचें मंदीर च अशा रामचंद्राला. ७. मूळ पाठ–धरानाथ शाखी जसा. ८. आलिंगन. ९. राम-लक्ष्मण. १०. प्राणी.

असें जाणुनीं धांवला ब्रह्मनिष्ठ विवस्वत्कुळाचा गुरु श्रीवसिष्ठ;
पुसे राम मातेसि तद्दुःखहेतु 'श्रमी कां असा भानुमद्वंशकेतु?' १८
म्हणे केकयाची सुता, 'ऐक बाळा! असें दुःख जालें असे भूमिपाळा,
वरद्वंद्व मातें तुज्या या गुरूनें दिलें आप्तलोकांचिया स्वस्तरूनें. १९
वरातें समर्पूनि हा सत्यसंध स्वयें निर्गमीं जाहला भूप अंध;
गुरूक्ताशि ने सिद्धिला तूं चि आज, धरी तो तुला हें कथायाशि लाज. २०
असावी पित्याला अधःपातमुक्ती तुला ठाउकी पुत्रनामीं निरुक्ति;
प्रतिज्ञापरित्राणसामर्थ्यहीन म्हणोनि प्रभू दीसतो खिन्न दीन. २१
जरी रक्षिशील स्वतातप्रतिज्ञा तरी योग्य आहे तुला नीत्यभिज्ञा;
अधःपात सत्यच्युता होय साचा, असे मुख्य हा दुःखहेतू नृपाचा.' २२
म्हणे राम, 'तातार्थ मीं प्राणदान करीन क्षणें, हें मनीं सत्य मान;
त्यजीन स्वयें राज्यदाराधनातें, स्वमातेचिया ही पदाराधनातें. २३
करी जो अनुज्ञेविणें तातकार्य, जनामाजि तो धन्य सत्पुत्र आर्य;
दुजा बोलिला मध्यम प्रोक्तकारी, न वर्ते नियोगें हि जो तो भिकारी. २४
नसे संकट क्लेश कांहीं च देवा, मला सांग माते! पित्याची स्वसेवा.
करीन स्वयें सत्य हे जाण वाणी, न होईल ऐसें मनामाजि नाणीं.' २५
वदे मध्यमांबा तदा राघवास, 'द्विजे राज्य हें मच्छरीरोद्भवास.
चतुर्दिक्समा तूं हि कांतारवास करावा धरूनी जटा वल्कवास. २६
करावें असें आज हें तातकार्य, गुरूचा नियोग त्रिलोकीं अवार्य.'
म्हणे राम तत्काळ जोडूनि हस्त, 'करीतों स्वयें, मान्य केलें समस्त. २७
करूं राज्य हें पुत्र तूजा सुशील, प्रजेला सुखें तूं हि संरक्षिशील;
मला किंकराला स्वयें तात कां गे! परंतु स्ववक्त्रेंकरूनी न सांगे?' २८
रघूत्तंसवाणीस ऐकोनि भूप म्हणे नंदनाला असें आर्तरूप:
'सुता! स्त्रीजित भ्रांत उन्मार्गगामी पिता बांध, घे राज्य दिल्हें तुला मीं. २९
करीतां असें तूज नाहीं च पंक, मला बांधुनी राज्य घे, हो विशंक.

१. सूर्यवंशाचा. २. सिद्धीला नेण्यांत. ३. पुन्नाम नरकात् त्रायते इति पुत्रः असा अर्थ. ४. आज्ञा करण्यापूर्वी च. ५. सांगितलेलें करणारा. ६. कैकयी. ७. दोष.

करीशील ऐसें जरी तूं सुकृत्य, न बाधेल मातें कदा ही असत्य. ३०
पिता वृद्ध टाकूनियां दूरदेशा न जावें, धरीं मानसीं या निदेशा.
जगज्जीवना[1]! तूं मनाचा विसावा, वियोग क्षणार्धार्ध तूझा नसावा. ३१
वियोगें तुझ्या प्राण जातील माझे, त्वदाधार जीवातुवृंदोत्तमा! जे;
न जावें वनाला सुखाच्या निधाना! मला येवढें दे त्रिलोकप्रधाना!' ३२
असा पोटिशीं रामभद्राशि राजा धरूनीं रडे, फार निंदी स्वभोजा[2].
तदा मंजुशब्दें वदे राम राया, 'नसे योग्य तां* शोक चित्तीं धराया. ३३
प्रतिज्ञा तुझी सर्व होईल साची स्पृहासिद्धि मातेचिया मानसाची;
करू राज्य मद्बंधु! जातों वनातें; नको शोक देऊं नृपाळा! मनातें. ३४
कृपेनें तुझ्या सौख्य पावेन रानीं, त्वरेनें चि येईन हें सत्य मानीं;
चतुर्दिक्समा काळ जाईल तूर्ण, असो मध्यमांबामनःकाम पूर्ण. ३५
पुसोनि स्वमातेशि येतों निरोपा, वनीं वास वाटे मला फार सोपा.'
वदोनीं असें तो प्रसूच्या गृहातें त्वरें जाय, वंदी तिचे पाय हातें. ३६
म्हणे, 'मध्यमांबानियोगें वनाला मला आज जाणें जगत्पावनाला[3],
चतुर्दिक्समा दंडकीं[4] वास मातें असे; तूं न मानीं परंतु श्रमातें.' ३७
(विद्युल्लेखा) ऐकोनी हे वार्ता जाली ते शोकार्ता,
रामाची ही वाणी लागे वज्रावाणी. ३८

सर्गः ५

## सर्ग सहावा

(विबुधप्रिया)

ते म्हणे, 'रघुनायका! सुखदायका! तुजवांचुनी
या जगत्रितयीं नसे मज सौख्यलेश हि वांचुनी.
त्वद्वियोग रघूत्तमा! हृदयास या श्रमहेतु कीं
उग्रदुःखभराचिया न तुळेत पर्वत हे तुकीं. १
वासरा! तुज वास राजसुता वनीं रुचला कसा?

१. जीवनौषधिसमूहांत श्रेष्ठ अशा रामचंद्रा! २. आपली स्त्री. ३. जगदुद्धारार्थ. ४. दंडकारण्यांत. * तां = त्वां.

का कठोर करूनि मानस टाकिशी मज लोकसा[1]?
ने मला हि, चतुर्दशाब्दवियोगदुःख न सोसवे,
स्वप्नखेद सहावयास हि आजुनी हि नसे सवे. २
प्रीति देशि सपत्नमातृमनाशि होउनियां जटी,
दंडकीं हि तपस्विलोकगणाशि होशिल धूर्जटी[2].
दुःखसागरपारदा! मजला परंतु तरी[3] नसे,
नेत्रभृंग उपोषणें करितील हे किति दीनसे?' ३
पोटिशीं धरुनी सुतासि करी विलाप परोपरी,
कोपला बहु लक्ष्मण स्वमनांत धीरमणी परी.
अग्रजाशि म्हणे, 'विभो! मज दे नियोग, भुजाबळें
स्त्रीजित क्षितिपाळ बांधुनि राज्य साधिन हें पळें. ४
मारितों भरतासि आणि तयाचिया निजमातुळा,
मत्पुजाद्वितयाशि या भुवनत्रयांत नसे तुळा.
यौवराज्य करीं घडो तव, शत्रुला वनवास हा,
त्वदंघ्रिसेवनलब्धविक्रमदासकौतुक[4] तूं पहा.' ५
लक्ष्मणाशि धरूनियां हृदयीं म्हणे रघुराज तो,
'हें यथार्थ; परंतु बा! समयीं पराक्रम साजतो.
पूर्ण हो जननीमनोरथ, सत्यसंध पिता असो,
दंडकांत चतुर्दशाब्द तपोधनीं जन[5] हा वसो.' ६
'अंब[6]! तूं नगरीं असें, मम तात वृद्ध सचिंत हा
सेवनें सुखवीं, मनीं धर धीर, मीं नमितों पहा.
मत्समान चि पुत्र लक्ष्मण दास्य नित्य करू तुजें,
याँ[7] सुताशि सुदुर्लभ त्रिजगीं महासुखहेतु जें[8].' ७
कोसलेंद्रसुता म्हणे, 'पितृवाक्यपाळनतत्परा

१. परक्यासारख्या. २. शंकराप्रमाणें मान्य. ३. नौका. ४. तुझ्या पदसेवनानें मिळाला आहे पराक्रम ज्याला असा तुझा दास जो मी त्याचा चमत्कार. ५. मी. ६. माते कौसल्ये! ७. मला रामाला. ८. जें तुझें दास्य.

वासरा! जारि दंडकाप्रति जाशि चित्तसुखाकरा!
अंतराय नसो पथीं तुजला, असो सुख काननीं,
मच्छरीर परंतु हें पडलें वियोगवृकाननीं![1]' ८
वंदुनी जननीजनाप्रति रामचंद्र निघे तदा
'ने मला हि' म्हणोनियां धरि लक्ष्मण प्रभुच्या पदा.
माय बाप हि टाकिला, परि बंधुरत्न न सोडिलें;
स्नेहबंधन सज्जनें भुवनत्रयीं हि न तोडिलें. ९
सांगतां वनवासवृत्त विदेहराजसुता सती
सिद्ध होय निवारितां हि; वधूशि मुख्य गती पती.
ते धवानुमता[2] स्वभूषण तेधवां अति आदरें
दे समस्त अरुंधतीप्रति पूजुनी नमुनीं करें. १०
रामलक्ष्मण ही स्वभूषणवित्तसंचयगोधनें
ब्राह्मणांशि समर्पिती स्वसुखें मनोमळशोधनें.[3]
मातृसेवककिंकरीपुरलोकजानपदांप्रती[4]
पुष्कळ द्रविणार्पणें करिती सुखी सुमहामती. ११
रामलक्ष्मणजानकी चरणेंकरूनि[5] तिघेंजणें
भूपतीस पुसावयास्तव जाति शीघ्र सुलक्षणें.
त्यांशि पाहुनि भूसुरादिक लोक ते म्हणती, 'अहा!
स्त्रीजितें नरनायकें नयधर्म ही त्यजिला पहा! १२
स्त्रीस होउनियां वश स्वसुतांशि पाठवितो वना,
निर्दया भरतप्रसू त्यजिती कशी जनजीवना[6]?
यौवराज्यपदाभिषिक्तरघूत्तमास्यसुधारसें
लोचनांसि न तृप्ति, दुःख चि जाहलें बहु फारसें. १३
राक्षसी भरतप्रसू स्वकुटुंबनाश करी असी

---

१. वियोगरूपी लांडग्याचे तोंडांत. २. पतीनें अनुमोदिलेली. ३. अंतःकरणांतील पापानें शोधन करणारी. ४. आईचे दासदासी, नागरिक व देशांतील लोक (सर्व प्रजाजन) याना. ५. पायीं च. ६. रामाला.

पंडितप्रवरें धरापतिशेखरें वरिली कशी ?
ज्येष्ठपुत्र सुविद्य शूर पवित्र याशि वनाप्रति
धाडितो, बहुधा नृप भ्रमला चि केवळ संप्रति! १४
काननीं कुशदर्भकंटकगोक्षुरादि, पथीं खडे,
कोमळाकृति हीं तिघें, चरणप्रचार कसा घडे?'
यापरी जन तो विलोकुनियां तयांशि वदे, रडे;
लोकशोकजळेंकरूनि चिखोल भूमिवरी पडे. १५
रामचंद्र सदार सानुज जाउनीं सदनांतरीं
केकयेंद्रसुतेशि तातसमक्ष वंदुनियां करीं
तो प्रसन्नमनें म्हणे, "विपिनाशि जात असों तिघें;
हीं नरेंद्र नियोगें मात्र करू स्वयें मज कीं 'निघें'." १६
निष्कृपा विगतत्रपा भरतप्रसू कठिनांतरा
राघवाशि म्हणे, 'तुम्हीं पारि वल्कलें चि तिघें धरा.'
रामलक्ष्मण वल्कधारण तेधवां करिती क्षणें,
पावले बहु शोक लोक तपस्विवेषनिरीक्षणें. १७
चीरें घेउनि जानकी पतिला विलोकुनि लाजली,
तों वसिष्ठतनू रुँडाग्निकरूनियां बहु भाजली.
वल्कधारण वारुनी भरतप्रसूवरि कोपला,
'निर्दये! काशि घात तूं करितेशि केवळ आपला? १८
चीरधारण राघवें करणें खरें तुझिया वरें,
लक्ष्मणें गुरुभक्तिनें धरिलें चि वल्क असो बरें;
जानकीस सतीस वल्कल काय जाणुनि ओपिशी ?
निर्दये! कुटिले! न केवळ राज्य साधुनि हो पिशी.' १९
वल्कलांबरधारणोत्तर पुत्रयुग्ममुखाकडे
पाहुनी नृप होय मूर्च्छित, फार दीन तसा रडे.

१. राजश्रेष्ठ दशरथानें. २. दर्भविशेष. ३. सराटे. ४. दशरथ. ५. आज्ञा. ६. वस्त्र (वल्कल). मागें पृ. ३९७, टीप ३ पहा. ७. शोकाग्नीनें. ८. वेडी.

माय बाप गुरू नमुनि घे रघूद्वह[1], तत्क्षणीं
आणवी रथ तों सुमंत्रकरें नरोत्तम आंगणीं. २०
'लेंकरें सुकुमार, यांशि रथावरी तरि वाहणें;
पादचार अतीव दुष्कर, फार अंत न पाहणें.
रे सुमंत्र! सखे! तिघांशि शतांग[2] आणुनि वाहणें,
मी हि जाइन, राक्षसीसदनीं कदापि न राहणें.' २१
जानकी पहिली बसे, मग सानुज प्रभु तो चढे;
तों चि दुःखहुताशनीं अतिमात्र भूमिपती कढे.
'रे सुमंत्र! सखे! रहा, करुणार्द्रचित्त असो तुजें,
दाखवीं मज एकदां तरि पुत्ररत्नमुखांबुजें.' २२
रामचंद्र म्हणे, 'त्वरा कर, चाल चाल, पुढें पहा.'
भूमिनाथ म्हणे, 'सखे! सचिव! क्षणार्ध उभा रहा.'
तेधवां सुमती सुमंत्र रघूत्तमोक्त चि आदरी;
कोण ते परिसेल भूपतिचे विलाप परोपरी? २३
दूर तो रथ जाय तों बहु राय 'हाय!' म्हणे, पडे;
'न्या' म्हणे 'मज राक्षसीसदनांतुनीं महिषीकडे[3].
मातृपुत्रवियोगदायक हा तिच्या चि गृहीं पडो.
वांचणें न दिसे चि, मृत्यु चि तत्समीप मला घडो.' २४
तेधवां नृपतीशि सेवक उचलूनि मृतापरी
नेउनी मग ठेविती महिषीगृहीं शयनावरी.
रामलक्ष्मणजन्मदा[4] रडती पतीस विलोकुनीं,
वेधिल्या हृदयीं जणो परितापितायसशंकुनीं[5]. २५
जेधवां प्रभु तो निघे सहसा वनाप्रति जावया
पौर ते रडती समस्त हि, टाकिती द्रविणालया[6];
त्या रथासह धांवती, पडती पथीं किति कश्मलें[7],

१. रघुश्रेष्ठ राम. २. रथ. ३. पट्टराणी कौसल्येकडे. ४. कौसल्या व सुमित्रा.
५. अत्यंत तप्त अशा लोखंडाच्या खिळ्यांनीं. ६. संपत्ति व घरें यांना. ७. मूर्च्छेनें.

'हा!' असें वदती मुखें, नयनांतुनी गळती जळें! २६
लोक सर्व हि शोकविह्वळ ओकें टाकुनि धांवले,
कीं तृषाकुळ सर्व ते अमृताशयाप्रति पावले.
रोधिती रथमार्ग, पाहति रामचंद्रमुखाकडे;
बर्हिवेष्टितविद्युदंबुदसाम्य तें प्रभुला घडे. २७
लोक ते कर जोडुनीं म्हणती, 'वियोग न साहवे,
स्पष्ट संयमनीसमानपुरीस आज न पाहवे.
त्वत्पदांकितकाननीं विचरूं जसे सुरनंदनीं,
सर्व सौख्य असे त्वदास्यविलोकनीं पदवंदनीं. २८
त्वत्पदाब्जवियोगताप हरावया बळ सारसीं
पाहतां न दिसे, नसे चि निशाकरीं न सुधारसीं.
राघवा! मग शक्ति कोठुनि सर्पसेवितचंदनीं?
सर्व सौख्य असे त्वदास्यविलोकनीं पदवंदनीं. २९
त्वत्पदाब्जवियोगतापितचित्त हें न रमे घरीं,
न श्रुतिप्रतिपाद्यवस्तुविचारसारकथांतरीं,
न स्मरालसकेलिलालससुंदरीभुजबंधनीं,
सर्व सौख्य असे त्वदास्यविलोकनीं पदवंदनीं. ३०
त्वद्वियोगमनासि तोष नसे चि षड्रसभोजनीं,
गायनीं शयनीं धनीं वसनीं सुरूपवधूजनीं,
स्यंदनीं तुरगीं गजीं भुवनत्रयीं स्वकलेवरीं,
ने वनास जनास या रघुनायका! करुणा करीं. ३१
पन्नगाश्रितगेह, सिंहगुहा च, कीं पितृकानन,
बंधनालय, यातनास्थळ, कीं सकोपयमानन,

१. घरें. २. मयूरवेष्टित असा विद्युद्युक्त मेघ त्याचें साम्य. ३. यमपुरीसारख्या. ४. इंद्राच्या नंदनवनांत. ५. हंसविशेषीं. ६. वेदप्रतिपाद्य वस्तु जें ब्रह्म त्याच्या विचारांतील महत्त्वाच्या गोष्टीमध्यें. ७. मदनावेशानें आलस्ययुक्त व क्रीडोत्सुक अशा सुंदरीच्या बाहुपाशांत. ८. सर्पयुक्त गृह. ९. स्मशान. १०. नरक.

वाटती नगरी तशी तुजवांचुनी रघुनायका!
दे स्वपादसमागमामृत सर्वदा सुखदायका!' ३२
यापरी वदती, रथासह धांवती अनिवारित;
कोटि यज्ञ पदोपदीं अखिलाघसंचय सारित,
पावले तमसातटाप्रति लोक तों रवि मावळे;
काय पौरकथा वदों? नगरास टाकिति कावळे! ३३
(नर्कुटकं) रघुपति ते स्थळीं सकळ साधुनि सांध्यविधी[1]
करि जळसेवन प्रमुदितांतर धैर्यनिधी.
तृणशयनीं निजे जनकजेसह, खिन्न नसे.
तदनुजनी[2] सुखें सहसुमंत्र विनिद्र बसे. ३४

सर्गः ६

## सर्ग सातवा

(जलोद्धतगतिः)

निशीथसमयीं उठे रघुपती सुमंत्रसह तो करी दृढमती;
रथावरि बसे, त्यजी पुरजना, परंतु गमला बहु श्रम मना. १
धरील हृदयीं विषाद जननी, दिसेल बहु तें विरुद्ध चि जनीं,
श्रमेल जन कीं अरण्यगमनीं त्यजी म्हणुनि तो; कृपा परि मनीं. २
सुमंत्र मग तो धरी पुरपथा सुदूरवरि ने रघूद्वहरथा.
तयावरि पुनः शतांग फिरवी असें रघुपति स्वयें चि करवी. ३
सकाळ जन तो विलोकन करी, नसे चि तमसातटीं रथ परी.
म्हणोनि हृदयीं सशोक सकळ रडे, क्षितिवरी पडे सुविकळ. ४
विलोकुनि धरेवरी रथगती प्रजा धरि तिला मनांत मग ती;
निघे तव पुढें दिसे स्वनगरी, कुमारविरह क्षणांत चि हरी. ५
'नृपें फिरविला खरा रघुपती' असें चि जन ते समस्त म्हणती.
स्वयें पुरवरीं प्रवेश करिती, प्रमोद हृदयीं अपार धरिती. ६
पुरीं प्रभु नसे असे मग कळे, महाध्यनळ[3] तैं मनांत उजळे.

---

१. सायंकालीन संध्यावंदनादि विधि. २. लक्ष्मण. ३. चिंतारूपी मोठा अग्नि.

समस्त पडले वियोगदहनीं, पुरांत वसती जसे चि गहनीं. ७
जशा चि जपती पतीप्रति सती, सुबाहुदमना[1] मनांत भजती.
विहारवसनासनाशनगती[2] त्यजूनि जन ते न तेथ रमती. ८

(वंशपत्रपतितं) वंचुनि पौर लोक विभु तो त्वरित चि फिरला,
जाउनि शृंगिबेरनगराजवळ उतरला.
देवनदीतटीं गुहपती प्रभुचरण धरी,
भक्तिपुरःसरार्चन तदा नमुनि पद करी. ९
'राज्य समस्त घे' म्हणउनी गुह करि विनती,
सांत्व करूनि वृत्त कळवी सकळ रघुपती.
स्त्रीसह शिंशुपातरुतळीं[3] तृणशयनि जळा
सेवुनि जाह्नवीनिजतटीं[4] मुदित चि निजला. १०
लक्ष्मण चापबाण धरुनी गुहसह रजनीं
जागत बैसला सतत जो अवहित[5] भजनीं.
सौख्यनिधान ज्यांत भरले रुचिरगुणमणी[6]
रक्षितसे तयाशि बहुधा मनुजमिषफणी[7]. ११

सर्गः ७

## सर्ग आठवा

(दोहा) प्रातःकाळीं राघवें नमिला विधिनें सूर[8],
ज्याच्या उदयें पळतसे सारें ही तम दूर. १
पाठविला नगरासि तो बोध करूनि सुमंत्र,
गेला प्रभुला वंदुनी; काय करिल परतंत्र? २
गंगेत तरे राम तो अवलंबुनि गुहनाव,

१. सुबाहुदैत्याचा नाश करणाऱ्या रामाला. २. क्रीडा, वस्त्र, बसणें, खाणें, फिरणें, वगैरे गोष्टी. ३. शिसवाच्या झाडाखालीं. ४. येथील 'निज' शब्द निरर्थक दिसतो. ५. सावध. ६. सुंदरगुणरूप रत्नें. ७. मानवरूपी भुजंग. (लक्ष्मण हा शेषावतार आहे व द्रव्यनिधीवर तद्रक्षणार्थ भुजंग वसतो अशी समजूत आहे ह्या गोष्टी प्रसिद्ध च आहेत). ८. सूर्य.

लोकांला भवसागरीं तारी ज्याचें नाव. ३
रामाला गुह तो म्हणे शिरीं धरूनि पदास,
'संगें घे करुणाकरा ! हा सेवारतदास.' ४
राम म्हणे, 'मज पावली सेवा, न करीं शोक;
स्वपुरीं सुखें वसोनियां रक्षावे निजलोक. ५
चवदा वर्षे संपतां भेटेन खरें जाण,
आग्रह जरि करिशील तरि आहे माजी आण.' ६
ऐसें ऐकुनि गुह शिरीं धरी प्रभूचे पाय;
नाहीं उपाय यामुळें मग नगराला जाय. ७
राम हि गेला तेथुनीं विपिनीं सानुजदार,
मारुनि मेध्य[1] मृगाप्रती करि विधिनें आहार. ८
दुसरे दिवसीं वंदिले भरद्वाजमुनिपाद,
तो द्विजपती तिघांवरी फार चि करी प्रसाद. ९
श्रीमुनिशिष्यकृतप्लवें[2] तेथुनि तो रघुवीर
सानुज सदार पावला यमुनेचें परतीर. १०
मुनिकथितपथें पावला चित्रकूटशैलास,
ज्याला पाहुनियां मनीं लाज धरी कैलास. ११
वाल्मीकीचे त्या स्थळीं नमिले रामें पाय,
त्याचें एका आननें भाग्य वदावें काय? १२
केला त्या वाल्मीकिनें रामाचा सत्कार,
फार पावला तोष तो ससौमित्रि सहदार. १३
पर्णालय निर्मूनियां तेथें करी निवास,
तेव्हां मुनिजन हांसती इंद्राच्या विभवास! १४
(हंसी) पर्णागारीं त्रिभुवनधनें[3] केला वास प्रमुदितमनें,
झाले तुष्ट द्विजवर मनीं, ब्रह्मानंद प्रकट चि वनीं. १५

सर्गः ८

---

१. मृगयेला उचित अशा. २. नावेनें. ३. रामानें.

## सर्ग नववा
( मौक्तिकदाम )

सुमंत्र हि वंदुनि राघवपाय पुरीप्रति घेउनियां रथ जाय;
पुसे सचिवास तदा नरराय, 'सखे! करिती मम नंदन काय?' १
सुमंत्र म्हणे, "नृपते! रघुवीर वसे तमसातटि सेउनि नीर.
दुजे दिवसीं सुरसिंधुसुतीर विलोकुनि होय सुखी बहु धीर. २
निषादपती गुह रामपदास नमूनि म्हणे, 'कर पावन दास;
पुरीं निजराज्यपदीं वस तुष्ट, वसोत वनांत तुजे रिपु दुष्ट.' ३
असें परिसोनि म्हणे रघुराज, 'नको चि करूं मज आग्रह आज.
वनांत चतुर्दश वत्सर वास स्वयें करणें मज निर्विभवास. ४
नको मज कंदफलादिक लेश' असें वदला रघुराजकुलेश.
वटद्रुमदुग्ध[१] चि घेउनि राम जटा करवी स्वशिरीं अभिराम. ५
जळाशन मात्र करूनि कुमार निजे तृणतल्पतळीं[२] सुकुमार;
बसे मग जागत लक्ष्मणवीर रघूत्तमदास्यरती[३] रणधीर. ६
द्विजक्रतुपीडकराक्षसकाळ सदार उठे रघुनाथ सकाळ,
म्हणे मज, 'जा नगराशि, उशीर नको करु, दे नृपतीप्रति धीर.' ७
'असों सुखरूप वनांत समस्त, घडेल वियोगमहाविपदस्त.[४]'
निरोप असा कथिला सकळांस तुज्या तनुजें विरहें विकळांस. ८
स्नुषा हि तुजी करुनी नमनास म्हणे, 'असणें स्मृतिधैर्य[५] मनास.
समागम होइल, दुःख सरेल, जनांत हि कीर्ति बरी प्रसरेल.' ९
सुलक्षण लक्ष्मण ही शुभशील म्हणे, 'जरि शोक नृपा! करिशील
अयोग्य तुला बुधवृंदवरास, नसों प्रतिकूल तवोक्तवरास.[६]' १०
असा मज सांगुनियां निजभाव गुहाप्रति सांगुनि आणवि नाव;
सदार सबंधु जटी धृतचीर अमर्त्यनदीस तरे रघुवीर. ११

---

१. वडाचा चीक. २. गवताच्या बिछान्यावर. ३. रामसेवेंत ज्याला प्रेम आहे असा. ४. वियोगरूपी महाविपत्तींचा शेवट. ५. [आमचें] स्मरण आणि धैर्य. ६. तूं दिलेल्या वराला.

गुहास हि देवुनियां विरहास वनाप्रति जाय जसा सविलास,
तयावरि मीं फिरलों गतदैव, महाध्यनळीं पडलों चि तदैव." १२

(समानिका) तो सुमंत्र वर्तमान हें कथी विषासमान,
ऐकतां परेतरूप होय तत्क्षणीं च भूप. १३

सर्गः ९

## सर्ग दहावा

(मत्तमयूरम्)

राजा तेव्हां[1] शोक करी फार चि गेहीं
ज्याच्या जाला दीप्त चि दुःखानळ देहीं;
कौसल्या ते पंक्तिरथाला समजावी,
'स्वामी! आतां हे सुतचिंता न भजावी. १
आधीं केला हा न विचार प्रमदे[2] तां
विद्वद्वर्ये स्वात्मसुखानें वर देतां;
आतां राया! कां करिशी निष्फळ शोक
दुःखामध्यें घालुनियां सर्व हि लोक?' २
कौसल्येतें भूप म्हणे, "मीं अपराधी;
माझ्यायोगें हा सकळाला प्रखराधी.
वाग्बाणांहीं या हृदयालागि न भेदीं,
शब्दक्षारा हृत्क्षतवक्त्रीं सखि! नेदीं[3]. ३
सर्वांचा मीं घातक जालों अतिमात्र,
नाहीं कोणी मत्सम लोकीं अघपात्र.
पुत्रत्यागी स्त्रीजित दुर्लौकिककंद
विश्वस्तांचा हिंसक सद्वंचक[4] मंद. ४
'देतों राज्य' प्राज्य असें मीं वदलों कीं,
केले सारे सिद्ध चि संभार हि लोकीं.

---

१. त्या वेळीं ग. २. प्रमदेला—कैकेयीला. ३. हृदयाला झालेल्या जखमेच्या तोंडांत आणखी शब्दरूपी मीठ तरी भरूं नकोस. ४. सज्जनाना फसविणारा.

अंतीं तूतें स्त्रीवचनानें रघुरामा!
कांताराते पाठविलें सद्गुणधामा!
सर्वां लोकीं पुत्रपणीं तूं चि सुशील,
या सद्मीं निर्भय रात्रीं असशील!
कोणाला ही मत्सम तों तात नसेल,
मद्दौर्जन्यें विष्टप मातें चि हसेल. ५
पंडितमान्या! साधुवदान्या! गुणपात्रा!
वीरा! धीरा! राजसुता! कोमळगात्रा!
कैकेयीच्या पूर्ण कराया निजकामा
कांताराला पाठविलें मीं तुज रामा! ६
कौसल्येनें वृद्धपणीं पुत्रवियोग
हा केला कीं मीं च जनीं दुःसह रोग;
हा पापात्मा जाणुनि ऐसें अधमातें
पाहेना ही काक जगद्रक्षक मातें." ७

(शार्दूलविक्रीडितं)

पूर्वीं जो मृगयारतें दशरथें हस्तिभ्रमानें मुनी
बाणानें सरयूतटीं प्रमथिला, तज्जन्मदापासुनी
जाला शाप म्हणूनि विह्वळमनें 'हा! राम रे! राम रे!'
ऐसा फार तदा विलाप करुनीं तो पुत्रशोकें मरे. ८

(स्रग्धरा)

त्या काळीं श्रीवसिष्ठ क्षितिपकुळगुरु ज्ञानसंपूर्णधर्मी
नाहीं कोणी च गेहीं नृपसुत म्हणुनी राखवी दाहकर्मीं;
तैलद्रोणींत ठेवी शव, जवनपथिक प्रेषुनी त्यां कराया
साकेताला हि आणी त्वरित भरत जो मातुळाकाळवासी. १०

सर्ग २०

१ जग. २ त्रुटितसमासवर्णनावरील टीप मागें (पृ. ४७६) पहा. ३ श्रावण-नामक एक तपस्वी वैश्य. ४ शीघ्रगामी. ५ दूतांस. ६ मामाच्या घरीं राहिलेला.

## सर्ग अकरावा

(शार्दूलविक्रीडितं)

प्रासादीं[1] जननीपदीं भरत तो जाला शिर स्थापिता,
अत्युत्कंठितचित्त होउनि म्हणे, 'कां हो ! दिसेना पिता[2] ?'
तों ते याशि समस्त वृत्त कळवी, कीं पुत्र पावो सुखा.
तेव्हां यापरि बोलिला जननदा[3] होती जरी सन्मुखा ! १

(स्रग्ध.)'हा मूढे ! पापरूपे ! पति[4]सुतसुजनप्राणनाशात्तकाये !
दुष्टे ! शिष्टेष्ट[5]हंत्री ! व्यपगतकरुणे[6] ! निस्त्रपे[7] ! यातु[8]माये !
स्त्रीव्याजें राक्षसी तूं, न कळत वधिला तात माझा सुशील,
मारावी ताटकेच्यापरि, परि निरय[9]स्थांशि ही पीडिशील.' २

'निर्लज्जा निर्दया हे स्वजनक्षयकर, क्रूर जीचा विलास,
ऐश्या या पापिणीला वश नयनिपुणा ! तूं कसा जाहलास ?
बापा ! जो प्राण तुझा विमलगुण भला योग्य लोकावनाला
स्त्रीवाक्यें पाठवीला अनय न करितां राम तो कां वनाला ?' ३

(शा.वि.)'वृद्धत्वीं वश जाहला युवतिला तापोनि कामानलें
त्याचें वाक्य विनाशहेतुक परी तें तूज कां मानलें ?
मी जातां चि मदेक[10]जीवन पीता पावेल कीं मृत्युला,
हें रामा ! न विलोकिलें; जन म्हणे कां दूरदर्शी तुला ?' ४

'जातीनाशि वनाशि जानकि ! [11]तरि श्रीराम तो राहता;

---

१. त्रुटितरामायणीय पाठ—**साकेतीं**. २. त्रुटितरामायणांत हा श्लोक अपुरा च राहिला आहे. तिसरा चरण म्हणजे दुसऱ्याचें पाठांतर च आहे. कसें तें पहा:—

**पाहे उत्सुकचित्त होउनि, परी कोठें दिसेना पिता.**

३. जन्मदात्री कैकेयी. ४. पति, सुत व सुजन यांच्या प्राणनाशासाठीं आत्त (घेतला आहे) काय (देह—अवतार) जिनें अशा ! ५. शिष्ट लोकांच्या इष्ट वस्तूचा नाश करणारी. ६. निर्दये ! ७. निर्लज्जे ! ८. राक्षसिणी ! ९. नरकस्थांना हि १०. मी च आहे मुख्य जीवन जिचें. ११. त्रुटितरामायणीय पाठ—**जातीनास वनास ! जानकि जरी.**

मातातात हि टाकिले मग तुजी काय स्पृहा पाहतां?
भर्ता सेव्य पतिव्रतेप्रति असो निर्द्रव्य किंवा धनी,
हा माते! परि पाय कोमळ तुजे; पाषाण कांटे वनीं.' ५
'सौमित्रे! निजमातृतातभजनीं जें आवडी जें फळ,
तें सीतापतिसेवनीं तुज असे हें जाणतों केवळ.
वृद्धांचें करितासि दास्य, परि तूं या पापिणीच्या भयें
राज्य त्यागुनि निश्चयें चि विपिना गेलासि बापा! स्वयें.' ६
'बंधूला वनवास, मृत्यु घडला तातासि, आम्हांस हि
विश्लेषज्वर, जो मदर्थ जननी माझी दयेनें मही.
तस्मात्पातकराशि मीं चि भुवनीं, ऐसें जळो हें जिणें.
संगो ते विधिलेखनी मत्कपाळीं हा लेख केला जिणें.' ७
ऐसा फार विलाप तेथ करुनी आज्ञा न घेतां निघे,
कौसल्याचरणांबुजें निजशिरीं साष्टांग वंदूनि घे.
'जीणें स्वत्पति मारिला तनुज मी त्या सर्पिणीचा असें;
मारावें मजला,' म्हणे, 'अथ नसे, निःशंक गेहीं वसें.' ८
कैकेयीवचनें जसा रघुपती येथूनि गेला वना,
जावें आपण ही असें नृपतिच्या कां हो! न आलें मना?
सर्पाधिष्ठितगेहवास करितां कल्याण कैसें घडे?'
ऐसें बोलुनि बाष्पगद्गदरवें नानाप्रकारें रडे. ९
केली श्रीसरयूतटीं च भरतें विध्युक्त दाहक्रिया,
रामावांचुनि तन्मनासि पळ ही भासे न भूमि प्रिया.
माता मंत्रि वसिष्ठ पौरजन ही घेवूनि रामाकडे
गेला धांवत चित्रकूटविपिनीं बंधूसि वंदी, रडे. १०

---

१. त्रु. पाठ—टाकिला. २. त्रु. पाठ—पतिव्रताप्रति. ३. त्रु. पाठ—द्रव्याढ्य. ४. त्रु. पाठ—करितासि. ५. त्रु. कमा पाठ—या गेहाप्रति निश्चयें गेलासि बापा! स्वयें. ६. त्रु. पाठ—बंधूला. ७. वियोगसंताप. ८. ब्रह्मदेवाची लेखणी. ९. माझ्या कपाळीं.

तेथें पर्णकुटी करूनि बरवी मंदाकिनीचे तटीं
होता वल्कपटी कुशासनगत श्रीरामराजा जटी.
सीतायुक्त तटिल्लतायुतघनश्रीमूर्ति ते गोमटी
सौमित्री निकटीं विलोकुनि पडे दृष्टीशि त्यांच्या मिठी! ११
(स्रग्ध.)सर्वांला ही प्रमोदें रघुरमण यथायोग्य तो भेटला हो!
घेती मातृप्रधानादिक परम तदा लोक पीयूषलाहो.
आशीर्वादाशि देती गुरुजन, म्हणती, 'लोकरक्षार्हबाहो!
दुष्टांचा शिक्षिता तूं सुहृदुदयकरक्षेमसंकल्प बा! हो.' १२
विश्लेषें आपुल्या तो सदय निजपिता मृत्युला पावला, हे
वार्ता ऐकोनि मोहें क्षण रघुपति ही प्रेतसद्भाव लाहे.
सीता सौमित्रि दोघांस हि पतन घडे आश्रयाच्या निपातें,
वल्लीवृक्षादि मोडे निकटगत पडे जैं महावृक्ष वातें. १३

(शिखरिणी)

अशा काळीं धांवे कुळगुरु महात्मा झडकरी,
जळें बोधें लीलामनुजतनुला सावध करी.
वनीं वन्यद्रव्यें मग निजपिता श्राद्धविधिनें
सुखी केला रामें अनवरतकारुण्यनिधिनें. १४
अयोध्येला यावें म्हणुनि भरत स्वाग्रजपदें
धरी माथां, प्रार्थी प्रकटविनयार्थाक्षरपदें.
'पित्याचें मातेचें प्रिय वननिवासें परम तें
पुरें जालें, आतां प्रकृति सुखवावी गुरुमतें. १५
घनश्यामा! रामा! स्वपदभजना सेवकजना
दिजे, बापा! पापापह सुकवि नाहीं तुजविना.

---

१. मु. पाठ—मंदाकिनीच्या. २. वल्कलवस्त्रधारी. ३. येथें 'ताडिल्लता' असा पाठ हवा आहे. ४. अमृताचा लाभ. ५. लोकरक्षणसमर्थ बाहू ज्याचे असा. ६. मित्रांचा उदयकारक आणि कल्याणप्रद आहे संकल्प ज्याचा असा. ७. जवळचा. ८. स्पष्ट अशीं विनयार्थानीं अक्षरें व पदें यानीं. ९. प्रजा १०. वसिष्ठाच्या मतें. ११. पापनाशक.

कृपासिंधो! बंधो ! प्रकृति रमवीं, दुःख शमवीं;
करीं राज्य, प्राज्य[1] श्रम अनुभवीं व्यर्थ न भवीं. १६

(स्रग्ध.) कैकेयीच्या सुताचें नयनभवजलक्लिन्नहन्वग्रहातें[2]
स्पर्शोनी जानकीचा पति ‘ न कारि ’ म्हणे ‘ बा ! वृथा आग्रहातें.
ताताज्ञेनें वनीं मीं प्रमुदित चवदा वत्सरें संचरावें,
मातृप्रीत्यर्थ तूं ही स्वजनसुखकरा ! राज्य धर्मे करावें. १७

(शिख.) प्रतिज्ञा ताताची धृतिकरुनि[3] मीं रक्षिन वनीं,
पित्याची माजी तूं सफळ कर राहोनि भवनिं[4];
असत्यापासूनीं सकळ सुत तारूं स्वजनका,
सुमार्गीं आहें मीं, हठ धरुनि नेऊं मज नका.’ १८

(शा.) ऐसें ऐकुनियां स्वयें भरत तो वंदूनियां हस्तकीं
रामाच्या निजपादुकांसह तदा आज्ञेशि घे मस्तकीं.
नंदिग्रामपदीं वसोनि विनयें ज्ञानें बळें क्षिप्र जों[5]
चातुर्वर्ण्ययुता महीतळगता त्या सर्व रक्षी प्रजा[6]. १९

(स्रग्ध.) कैकेयीपुत्र जातां रघुरमण म्हणे, ‘ चित्रकूट त्यजावा;
मद्विश्लेषार्त[7] आहे निकट म्हणुनियां बंधु येतील धांवा.
यांचाभंगप्रतिज्ञावचनचलन[8] हें पातकाकीर्तिकारी.
येतां न्यायाशि[9] मातें पुनरपि भरत प्रार्थना कोण वारी ? २०

ऐसें चित्तांत एतां[10] अनुजनिवनितासंमतें राघवास
अत्र्यादिब्राह्मणेंद्रप्रियकर घडला दंडकारण्यवास.
सीताविद्युत्सहाय त्रिजगदघमहातापविध्वंसशूर
कारुण्यांभोद राम प्रकटुनि विपिनीं नाचवी सन्मयूर. २१

सर्गः ११ ॥ ग्रंथसंख्या ४६५

---

१. पुष्कळ. २. अश्रूंनीं ओली झालेली हनुवटी अग्रहातें ( तळहातानें). ३. त्रु. पाठ—**करुन**. ४. त्रु. पाठ—**भवनीं**. ५. ज्या. ६. त्रु. पाठ—**प्रज्या**. ७. माझ्या विरहानें पीडित असे बंधु. ८. [ भरताच्या ] याचनेचा भंग व वनवास-प्रतिज्ञेपासून च्युति. ९. त्रु. पाठ—**न्यायासि**. १०. त्रु. पाठ—**येतां**.

# धन्य*रामायण

(गीतिवृत्त)

विष्णु प्रभु अवतरला जेथें तो वंश भानुचा धन्य,
धन्य दशरथ, त्रिजगीं कोणही झाला नसे असा अन्य. १
देवर्षि धन्य, धन्य श्रीमान् वाल्मीकि आदिकवि लोकीं,
धन्य महाकाव्य श्रीरामायण, जें बुडों न दे शोकीं. २
धन्य विभांडकसुत मुनि, कौसल्या रामसुप्रसू धन्या,
तो ही धन्य, सपूर्वज ज्याची हे अदितिसी सती कन्या. ३
धन्या कैकेयी, सुत भरत जिचा जो द्विषन्मुखें सुकवी;
धन्या सती सुमित्रा, लक्ष्मणशत्रुघ्न हे जिचे सुकवी. ४
धन्य वसिष्ठ महर्षि, श्रीरामा सानुज्यासि जो पढवी;
सद्गुण नृपनंदन जे त्या सर्वांच्या हि मस्तकीं चढवी. ५
धन्य श्रीमान् गाधिज सच्छिष्यप्रेम जो करी रामीं,
शत अस्त्रें शिकवि, म्हणे, 'देतों हें कवच तव शरीरा मीं.' ६
ती ताटका हि धन्या, रामें वधिली वनांत जी चंडी;
धन्य सुबाहु हि, ज्याचें शिर राघव पूतमार्गणें खंडी. ७
ज्या बाणपुंखवातें शतयोजन दूर संगरीं उडवी,

---

* मैराळबोवा चातुर्मास्ये यांच्या हातून गहाळ झालेल्या रामायणांपैकीं हें असून याची प्रस्तुत आधारभूत त्रुटित नक्कल ठाण्याचे काव्येतिहासभक्त रा. रा. वि. ल. भावे यांनीं उपलब्ध करून दिली आहे. या रामायणाचें क्रमस्थल हें नव्हे हें वाचकांस सांगावयास नको च. तथापि याच्या मागलीं पुढलीं रामायणें सर्वस्वीं निश्चित नाहींत, सर्वभक्षक काळानें या रामायणाचा मधें च चावा घेतला असल्यामुळें तें वाचकांचा मनोभंग हि करितें, तरी आपल्या भक्तिबळानें व नैसर्गिक काव्यरचना-पाटवानें अष्टोत्तरशत रामायणांचा संकल्प सिद्धीस नेणाऱ्या महाकवि पंतांना हि अखेर धन्यवाद सूचित करणें इष्ट म्हणून हें रामायण आम्हा अखेरीस घातलें आहे.

मारीच धन्य होय, त्रासें रामीं च चित्त जो बुडवी. ८
सिद्धाश्रम धन्य, तसा धन्य श्रीगौतमाश्रम हि झाला;
होय अहल्या धन्या, प्रभु उद्धारा स्वयें जिच्या आला. ९
धन्य जनकनृप, मिथिला धन्या, धन्या धरासुताबाळा;
धन्य पण, धन्य शिवधनु, धन्या श्रीरामकंठगा माळा. १०
धन्या श्रीरामाला सीता, आणूनि दशरथा, अन्या
दे जनक लक्ष्मणाला गाधिजपद नमुनि उर्मिला कन्या. ११
धन्य कुशध्वज दे जी भरताला ते हि मांडवी धन्या,
धन्या श्रुतकीर्ति, दिली शत्रुघ्नाला हि जी दुजी कन्या. १२
अति धन्य विवाहोत्सव ज्यांहीं मिथिळेंत पाहिले सुर ते,
हे ही धन्य चि, गाती ऐकति अद्यापि रसिक जे पुरते. १३
बहु सुगुण दास दासी रथ हय गज रत्न भूषणें कनकें
अति धन्य सर्व झालें, जें श्रीरामासि अर्पिलें जनकें. १४
मार्ग धरी, क्रोध करी, ज्याचें दे मोह दिग्रथा गात्र,
भृगुराम धन्य झाला, प्रभुनें केला सुशांतिला पात्र. १५
साकेत धन्य झालें विजयिसुतयुतप्रभुप्रवेशमहें[1].
पौर सकळ यश गाती, भृगुरामा मद हरूनि दे शम हें. १६
धन्य युधाजित् प्रेक्षुनि परमोत्सव होय लोकरायास,
पुसुनि सशत्रुघ्न भरत ने स्वपुरा धन्य तो करायास. १७
दशरथ म्हणे, 'करावा युवराज ज्येष्ठ सुत;' विचारा या
गुरु सचिव 'धन्य' म्हणती, वर शोभी जी प्रिया तिचा राया. १८
धन्या देवर्षिमतें जारि जनधींतूनि मंथरा गेली,
धन्या कैकेयी जारि पतिवरि सोडूनि पंथ रागेली. १९
स्त्री वर मागे, 'सुत युवराज, जटा वल्कधर जसा वन्य
राम चतुर्दश वर्षें हो, तूं ही सत्यरक्षणें धन्य.' २०
हा परम धन्य आग्रह देवर्षिप्रिय यशस्कर स्तव्य

१. विजयी पुत्रानीं युक्त अशा राजा दशरथाच्या प्रवेशानंदानें.

कव्यातिमहित [१]महितपदफळ दशमुखपीडितप्रजाभव्य. २१
वनवासा राम निघे, जे पुत्री देव विप्र राजन्य
त्यांत कराया रक्षुनि सत्यव्रत आपला पिता धन्य. २२
सीता लक्ष्मण हि निघे, सर्व हि वदले तदा तयां 'धन्य!'
हें यश पोषी विश्वा, मातेचें जेंवि बाळका स्तन्य. २३
धन्य सुमंत्र तुरग रथ, धन्य चि ये 'हाय!' पौरवदना तें,
धन्य गुह निषाद, सखा हें दे प्रभु ज्यासि गौरवद नातें. २४
धन्य वट, जटा वळिल्या ज्याच्या दुग्धें सहानुजें रामें;
तापसवेष हि धन्य चि तो, जो स्वीकारिला रमाधामें. २५
शय्या ज्यांहीं रचिली ते पल्लव तीं तृणें महाधन्यें,
धन्या गंगा, धन्या नौका, धन्यें फळादिकें वन्यें २६
धन्य भरद्वाज हि तो, प्रभु वंदी ज्यास जेंवि जनकास,
धरिती यन्नामाची दुस्तरभवसागरांत जन कास. २७
नग चित्रकूट धन्य, प्रभु जेथें उटज करुनि वास करी;
[२]ज्याचा मोह न साहे गुण, जैसा [३]गंधहस्तिवास [४]करी. २८
तो धन्य शाप, धन्य चि दशरथनृपमृत्यु; 'राम! राम!' असें
म्हणत प्राण त्यागी प्रभुशोकें; मरण हें न धन्य कसें? २९
मातेतें धिक्कारुनि धन्य भरत होय; अन्य तापावे,
परि बहु साधु निवाले; सत्पुत्रें ती हि धन्यता पावे. ३०
शत्रुघ्न धन्य, दासी, म्हणतां चि [५]सेवाग्रहें 'रहा,' न वधी;
कौसल्या भरतातें 'धन्य' म्हणे, कीं कळे न हा [६]नवधी. ३१
करि संस्कार पित्याच्या जो अंतीं योग्य होय देहातें,
धन्यस्वार्थ भरत तो विधिनें तिळमिश्र तोय दे हातें. ३२
गुरुराज्यग्रहणाज्ञा कुळगुरुची जी तिची अवज्ञा त्या

---

१. पूज्य सत्पुरुषांच्या पायांचें फळ. २. ज्या चित्रकूटाच्या. ३. 'यस्य गंधमाघ्राय पलायन्तेऽन्यदंतिनः । स गंधगज इति ख्यातः गजशास्त्रविशारदैः ॥' ४. साधारण हत्ती. ५. अत्यंत आग्रहें. ६. बुद्धि फिरलेला असा.

धन्यत्व चि दे भरता, न स्पर्शे अज्ञता लव ज्ञात्या. ३३
धन्य प्रेमळ गेला तो स्वामी आपला परतवाया;
राज्याधिकार इतरा सुखद गमे, तापला पर तवा या. ३४
धन्य स्वयें परंतु न धन्य असें भरत आपणा मानी;
गमता गुहा मुनिस ही जातो प्रभुची करावया हानी. ३५
भी राज्यस्वीकारा परधर्मा जेंवि जेंवि अन्याया;
प्रभुपादुका न मिळत्या कोण वळवि त्या सुबुद्धि धन्या या? ३६
नंदिग्राम हि धन्य, प्रभुच्या जेथें दया समा चवदा
बहु करिति पादुका या, धन्या सुगुणा तयासमा च वदा. ३७
अति धन्य अत्रि, रामें जो दशरथसा च मानिला; धन्या
अनसूया शोभविता जी गमली माय, जानकी कन्या. ३८
धन्य विराध, जयाच्या वारी श्रीरामचंद्र शापातें;
दंडकवनमुनि धन्य, प्रभु नुरवी तन्मनांत तापातें. ३९
शरभंग सुतीक्ष्ण घटज धन्य, सरीं अप्सरांस जो भ्रमला
तो मांडकर्णि धन्य, प्रभु चित्तीं यद्व्रतव्ययें श्रमला. ४०
गृध्र हि धन्य जटायु, प्रभु वदला ज्यास, 'बा! जपा सून
हे तुमची, सुत आम्हीं, रक्षा गहनांत आजपासून.' ४१
श्रीपंचवटी धन्या, धन्या गोदावरी नदी; अजि! तें
निरुपम भाग्य तयांचें, ज्या सादर सुचिर सेविल्या अजितें. ४२
धन्या शूर्पणखा, जी करि जीवांची उदंड हानि, रया
वात्येच्या प्रकटि, तिच्या चुकवि प्रभुकृत सुदंड हा निरया. ४३
चवदा सहस्र राक्षस धन्य चि, केवळ न धन्य तो खर चि;
त्रिदशांत चि स प्रभुच्या ........................ ४४

...................... दी घटकर्णकर्णनासा जो
तो 'धन्य! धन्य!' ऐशा पावुनियां कां न वर्णना साजो? ८८
क्षोभे विकर्णनास, त्रासे ज्याच्या महेंद्र हाकेला,
तोडुनि भुजचरणशिर प्रभुनें अति धन्य वीर हा केला. ८९

घनरव धन्य म्हणुनि घे, न गणुनि परयत्न सानुजा रामा
सबळा पाडी, जैसा प्रळयानिळ रत्नसानुजारामा. ९०
मारुति ओषधिपर्वतशृंग द्रुत ऋक्षवरवचें आणी,
उठवी सबळा प्रभुला, ऐके 'अति धन्य! धन्य!' हे वाणी. ९१
झाले धन्य घटश्रुतिसुत कुंभ निकुंभ गुरुसमरयज्ञ
रावणपुत्र त्रिशिरा अतिकाय हि करुनि गुरुसम रयज्ञ. ९२
श्री बधुनि विभुसि मोही, ज्यासि म्हणति 'धन्य!' लक्ष मायावी,
त्या रावणिर्ते लक्ष्मण वधि; खळदलनीं च न क्षमा यावी. ९३
प्रभु या कर्में अनुजा बहु 'धन्य!' म्हणे, द्रवोनि कुरवाळी,
जेणें पळांत वधिला एकें चि शरें चिरूनि उर वाळी. ९४
सुतशोकार्त दशानन सीतेसि वधावया कृपाण धरी,
सचिव सुपार्श्व तयातें वारुनियां आपणासि धन्य करी. ९५
चतुरंग बळ सहस्राधिककोटि दशास्य पाठवी, राहे
होउनि धन्य स्वर्गी, राम म्हणे, 'दे न पाठ वीरा! हे.' ९६
मग मरणनिश्चयें ये, प्रभुसीं दशवदन तो करी जन्य,
बैसुनि रामप्रभु ही त्या शक्ररथास ही रणीं धन्य. ९७
सौमित्रि पडे, वक्षीं खरशक्ति महेंद्रजितपिता हाणी,
म्हाणी रक्षें, पुनरपि तें ओषधिशृंग धन्य तो आणी. ९८
सप्त अहोरात्रें रण होय न तो अन्यसम रस वदावा,
देवर्षि वदे, 'प्रभुजी! चिर जग हो धन्य, समरसव दावा.' ९९
मनुदा घटजा वरदा भर्का धन्यत्व आरिस दे वधुनी,
सत्कवि म्हणति, 'न अधिका या प्रभुच्या कीर्तिपरिस देवधुनी.' १००
ते दिव्य दुंदुभीरव स्तव जयजयकार देवमुनिजन्य,
हिम मंद सुगंध पवन ते, दिन तें, नृत्यगान ही धन्य. १०१
तापद कुसंग सुटला, प्रभु सांत्वन करि, मनीं दया आली;
मंदोदरी हि धन्या साधुबिभीषणसमाश्रयें झाली. १०२

---

१. मेरुपर्वतावरील बगीचाला. २. मोठा युद्धयश.

जळ दे साधु बिभीषण, मेला अभिमुख करूनि जो जन्य,
प्रभु हि 'ममाप्येष यथा तव' हें बोले, कसा न तो धन्य? १०३
केला धन्य बिभीषण अभिषेचुनि लक्ष्मणें पुन्हा विधिनें;
धन्या सीता झाली दिव्यें स्वीकारितां दयानिधिनें. १०४
वर देउनि रणमृतकपिकोटि उठविल्या, अशा यशें शक्र
केला धन्य प्रभुनें, जेणें गजसा चि तारिला नक्र. १०५
'झालों मीं धन्य' म्हणे दशरथ, राम हि तसें च वदला हो!
तात तसें सुत हि वदे, 'स्वीकारीं धन्यतेसि पदलाहो.'[1] १०६
पुष्पकविमान धन्य प्रभुनें केलें बसोनि बसवून
सकटक कपि यातुपति हि, मोक्षपदीं स्वस्थ जेंवि वसवून. १०७
सेतु विलोकुनि सीता 'मीं धन्य' म्हणे, 'असा पहायास
अत्यद्भुत हा चि जगीं; मजकरितां सोसिले महायास.' १०८
तारा धन्या केली सीतेनें पुष्पकांत वाहून,
इष्टिस धन्य करी प्रभु पंचवटी पाहवूनि पाहून. १०९
धन्य करि भरद्वाजा वंदुनि भेटुनि गुहा स्वपादरता,
प्रभु भक्ता भरताची करि धन्या त्रिभुवनांत सादरता. ११०
राज्याभिषेकविधिनें राज्यपदातें वसिष्ठपद नमुनी
स्वीकारूनि धन्य करी, स्तविति ससुर सुप्रसन्नवदन मुनी. १११
धन्या पुरी अयोध्या, धन्या सर्व प्रजा, धरा धन्या,
धन्या भास्करसंतति. रामकथा लाजवी कथा अन्या. ११२
साकेत चि वैकुंठ, ज्ञाते याचें चि धन्य यश गाती,
अत्यंत दुर्लभा जी मुक्ति अयोध्यापशूंसि वशगा ती. ११३
श्रीरामराज्य धन्य, श्वा ही न करी जयांत अन्याया,
'राज्य प्राज्यगुण असो, महदंतर' सुज्ञ वदति 'अन्या या.' ११४
धन्य सुगळ अंगद कपि ऋक्ष, बिभीषण सरजनिचर धन्य,
अति धन्य मारुति, असो न त्रिजगीं श्रीशसुबहुमत अन्य. ११५

---

१. तात वदे, 'पदलाहो स्वीकारीं;' पुत्र वदे, 'धन्यतेसि स्वीकारीं.'

धन्य श्रीवाल्मीकि, प्रभुचें यश जो अशेष गाय कवी;
नायक विश्वाचा जो ऐके सादर, सभेसि आयकवी. ११६
घोर कलींत मयूर हि गाववुनि स्वयश धन्य केला हो!
हे श्रीरामप्रभुची कीर्ति सखी जह्नुकन्यकेला हो. ११७

(स्रग्धरावृत्त)

भावें हें धन्यरामायण रघुपतिच्या वाहिलें पादपद्मीं,
छद्मा[1] यद्दृष्टितें ही प्रभुवर वसवी जो सदा दिव्यसद्मीं.
दीना भक्ता मयूरा मज हि निजयशीं लाविली नित्य गोडी,
जोडी पीयूष ज्यातें कर सुरसिकहो! हे दया काय थोडी? ११८

इति श्रीरामनंदनमयूरविरचितं धन्यरामायणं संपूर्णं।



१. पापनिरत अशा.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ । पंक्ति | शुद्ध |
|---|---|
| ६।१२ | तों |
| ६।२६ | ७. मारुतीच्या उत्तम धनीविषयक प्रियत्वें. |
| ८।१२ | वर्णवा.' |
| ११।२४ | ४ शांतादुर्गेला केलेलें आहे वंदन ज्यानें. |
| १७।२० | अजस्र. |
| १७।२७ | ५. सतत, नित्य. |
| २०।५ | १. यन्नाम हयमखा [ व ] वाजपेया स्वभक्ता सुकृत दे [ असें ] वदे. |
| २५।२१ | हो राख न, |
| २५।२७ | ४. टीप रद्द. |
| ३४।३ | चित्रकूटनग. |
| ३६।२३ | प्रभुस्मरण[३]वस्तु |
| ३६।२८ | ३. वस्तु=पदार्थ, संजीवक. |
| ४३।२८ | २. भार्गवाचा. |
| ५१।२५ | २. शापग्रस्ता ( इंद्रा ). |
| ५३।२७ | डोलणें(सदोष पदच्छेद). |
| ५४।२७ | २. दाहकत्व. |
| ६०।१८ | पुरीं |
| ६२।२६ | 'रविसुता |
| ६४।२४ | १. शौर्य. |
| ६८।२८ | २. बृहस्पति. |
| ७०।९ | सुधांशुहासे ! |
| ७४।२७ | २. लास. |
| ७५।२८ | १०. आश्रित करून. |
| ७७।२८ | ३. नवस. |
| ७८।२८ | १. सखी, मैत्रीण. |
| ८०।२५ | हानि; शाप |
| ८८।२७ | २. पुढें पृष्ठ २७० टीप ३ पहा. |
| ९१।६ | कसा. |
| ९१।२० | स्वर्ग[३]वर्त्ते. |
| ९४।१६ | प्रबळ [ परि ] |
| ९४।१९ | धराया, तत्प्रियातें. |
| १००।२८ | * करावा [ म्हणून ] |
| १०१।७ | प्रबळपवनवेगें. |
| १०३।२६ | आशीर्वाद |
| १०६।१५ | शि[३]वोपाय |
| १०६।२५ | ३. कल्याणहेतु. |
| १०७।२७ | १. रामलक्ष्मण–**पंत.** |
| १०९।१० | तैलपूर्ण. |
| ११०।१२ | सीतादयित |
| ११२।२३ | करि, |
| ११३।२८ | ४. शांति. |
| ११४।८ | साधु |
| ११४।२७ | ब्रह्म्याच्या |
| १२०।३ | कोपें, |
| १२०।२१ | रात्री |
| १२१।२६ | हा ! |
| १२३।७ | शिखुनि |
| १२५।२१ | असु; |
| १३५।२० | देवि ! |
| १३८।१६ | तशा तें. |

| पृष्ठ । पंक्ति | शुद्ध. |
|---|---|
| १४०।२ | विभुसि |
| १४१।८ | मिरवि |
| १४१।२५ | २. सीतायुक्त म्हणून विद्युदालिंगित मेघसा. |
| १४५।२१ | कारि अधर्म येर हा. |
| १४७।१६ | वांचला [ न ] |
| १५५।७ | कामनयनें |
| १५६।३ | [ हरिगीतिका ] |
| १६१।१० | रक्षश्चमू |
| १७५।२५ | ७हें |
| १७५।२८ | ७. अभिषेककालीन. |
| १८०।२८ | ४. महामुनींच्या समाजीं. |
| १८३।२८ | ४. संजातमदनयने ! |
| १९४।१८ | लंकार्थी; ‘ सोडू या ’ म्हणे ‘ कधीं न ’ रमा. |
| १९४।२८ | १. टीप रद्द |
| १९५।८ | अत्यद्भुतप्रतापें |
| १९५।२५ | २. ध्वनियुक्त वेगानें. |
| १९८।१२ | कामारातिचाप |
| २०३।२० | तो |
| २०४।२२ | अवध्य |
| २११।२८ | ९. शंकराप्रमाणें ( मदनदाहकारक ) पराक्रम करण्याची इच्छा धारण केलेल्या. |
| २१३।१६ | अवध्य |
| २१३।२७ | ६. योग्य आहे अभिनंदन ज्याला. |
| २१७।११ | दशमुखभगिनी घ्राणच्छेद |
| २१७।१९ | हृद्गत |
| २१७।२७ | ३. गरुडरथ विष्णु. |

| पृष्ठ । पंक्ति | शुद्ध. |
|---|---|
| २१८।१९ | ‘ राय ’ |
| २१८।२७ | ३. नारायण. |
| २१९।१८ | प्रभुअनुजातें |
| २२८।२१ | ० पाशि ० |
| २३२।२७ | नियमन करणारा. |
| २३४।२० | मानी |
| २३४।२६ | ८. मानता झाला. |
| २३५।२१ | मारुत |
| २३५।२८ | ६. मारुति. |
| २३७।१६ | मारुत |
| २३७।२७ | ५. मारुति. |
| २३८।२७ | १. नाश. |
| २४३।४ | भिडे थितकामद |
| २४३।१८ | मज, पूजा ख्यगनायक |
| २४४।२३ | कवीनें. |
| २४४।२४ | लक्ष्मीच्या. |
| २४५।२ | पूजेचा |
| २४६।२ | ० दुर्गात ० |
| २४७।२५ | १. परंपरेला. |
| २४८।२० | वायुसुतांतक |
| २५१।२१ | हातें |
| २५१।२२ | शोकार्थ |
| २५१।२८ | ७. पतिनिधनानें होणाऱ्या |
| २५४।२७ | ५. सूक्ष्मशरी[illegible]रुति ). |
| २६५।२ | अनिमिष तात |
| २६५।२६ | १. टक लावून. |
| २६७।८ | विषाग्निकटु |
| २६७।२६ | २. दुष्टबुद्धि अशी. |
| २६८।२८ | ८. जांबवान. |
| २७०।२१ | ‘ आर्य सुगळ परमसखा |
| २७१।२८ | भागीरथी तिचा. |

| पृष्ठ । पंक्ति | शुद्ध. |
|---|---|
| २७३।२८ | ५.सीतारक्षणभार. |
| २७४।३ | ० पुत्रा |
| २७४।२५ | १. दुष्ट मेघांची फळी फुटल्यावर. |
| २८०।२२ | स्वीकारुनि पुन्हां |
| २८५।२८ | २. आशीरप्यत्र–पंत |
| २९०।२२ | मार्गे |
| २९२।२ | आल्याला |
| २९२।२७ | ३. श्रीचें विशेषण. |
| ३०१।२६ | पुष्परूपी |
| ३०१।२७ | असा लक्ष्मण. |
| ३०२।१५ | भरत अनुजसहित |
| ३०४।१८ | तात विलापा |
| ३०४।२४ | कर्मातें |
| ३०४।२७ | श्रावणपित्यानें |
| ३०४।२८ | १२. रामविरहातें. |
| ३०५।२ | गाइल, |
| ३०८।२६ | २.[पृ. ३१३ टी.२ पहा] |
| ३१३।२२ | ये तों |
| ३१३।२६ | विध्यस्त्राभिमंत्रितें |
| ३१७।२८ | ८. चांगलें रणकंदन. |
| ३१८।२६ | १. दिनोत्पादक सूर्याप्रमाणें. |
| ३२५।११ | ‘ हें चारित ’म्हणे ‘ कवीस हो गाया.’ |
| ३२५।१७ | गजवदनवामदेवरद |
| ३२६।१३ | दाशरथिप्रभूत्तमा |
| ३२८।२७ | ७. विजयाचें विशेषण. |
| ३३०।२६ | ६. टीप रद्द. |
| ३३३।१८ | अनिर्विण्ण सज्जनद्वेषी |
| ३३३।२७ | ६. संतुष्टचित्त असा. |

| पृष्ठ । पंक्ति | शुद्ध. |
|---|---|
| ३३७।२६ | ज्यानें अशा |
| ३४०।२६ | २. यादवपती. |
| ३४५।१० | सामगगातगुण |
| ३४८।१५ | तापा |
| ३५०।२८ | ६. राक्षस (मारीच). |
| ३५४।१८ | ‘स्वयशोमृत |
| ३५८।२७ | असे पर्वत. |
| ३५९।१७ | निवृत्तात्मा |
| ३६१।२ | करी, पवनजा |
| ३६१।२७ | १.संसारोत्तीर्ण,जन्ममुक्त. |
| ३६१।२८ | ७. बोलणें. |
| ३६५।१० | मुदित० ‘हरिणा |
| ३७१।२७ | भयाचा नाश. |
| ३७५।२३ | पुनरपि |
| ३८०।२६ | ३. विरह असह्य जिला. |
| ३८१।३ | चरमजनु ज्याचें |
| ३८३।८ | सबळखरवधा |
| ३८५।५ | जलधिपालिकडे |
| ३८७।२८ | १. चांचे कोळी. |
| ३८७।२८ | २. अकल्याणकारकांचा. |
| ३८९।१७ | दुस्तरजलनिधिपारा |
| ३८९।२८ | ३. होडगें. |
| ३९०।६ | अजित,० तो |
| ३९२।४ | प्राणसखे |
| ३९६।२७ | १. मुनींचा वेष. |
| ३९७।२५ | १. सुंदरी |
| ३९८।२७ | ४. दिसतो न दिसतो अशा रीतीनें. |
| ४०३।२७ | ५. टीप रद्द. |
| ४०७।२७ | १. टीप रद्द. |
| ४१३।२३ | ५. व्यालेली. |

